# स्कंदपुराण.

भाग ३ रा



स्वल्प किंमतींत सुलभ-पुराण-ग्रंथमाला.

पुस्तक ७ वें.

# स्कंदपुराण

भाग तिसरा.

लेखक,

शास्त्री नरहर रावजी जोगळेकर.

प्रकाशक

दामोदर सांवळाराम आणि मंडळी,

प्रिंटर्स, पब्लिशर्स, एजंटस्-नं. ३८८ ठाकुरद्वाररोड—मुंबई, पो. नं. २.

सन १९१८ इ.



किंमत १॥ रु.

# प्रस्तावना.

ऋग्यजुःसामाथर्वाख्या वेदाश्चत्वार उद्धृताः ॥
इतिहासपुराणं च पञ्चमो वेद उच्यते ॥ १ ॥

( श्रीमद्भागवत स्कंध १ अध्याय ४ श्लोक २० )

पुराण हा शब्द आज कांहीं नवीन नसून सर्वपरिचितच आहे. पुराण शब्दामध्यें पुरा व न असे दोन शब्द आहेत. पुरा म्हणजे पूर्वी न म्हणजे नव्हतें तें पुराण. वेद जसे अनादि आहेत तशीं पुराणें नाहीत. पूर्वी नव्हतीं म्हणजे पुराणें तयार होण्यापूर्वी तीं नव्हतीं, असा अर्थ करावयाचा ' पुराण ' शब्दाचा अर्थ ' प्राचीन ' असा होतो. असाच केवळ अर्थ घेतला तर वेद हे पुराणांच्याहि अगोदरचेच आहेत, मग त्याला पुराण कां म्हणूं नये, तर त्याचें कारण वेद हे अनादि असल्यामुळें ते नव्हते असा कालच नाहीं, अर्थात् त्यास पुराण म्हणतां येत नाहीं; व पुराणें अनादि नसल्यामुळें व आदि असल्यामुळें पूर्वी नव्हतीं ही स्थिति त्यांस संभवते; व म्हणूनच त्यास पुराण अशी संज्ञा आहे. कोणी पुराण शब्दाची व्याख्या अशी करितात कीं, पुरा म्हणजे पूर्वी न च्या ऐवजीं नव शब्द घेऊन नव म्हणजे नवीन अर्थात् ज्या वेळीं पुराण तयार झालें त्या वेळीं तें नवीनच होतें; म्हणून त्यास पुराण म्हटलें. आतां हा दुसरा अर्थ तितका तंतोतंत लागूं पडत नाहीं. असो. असें जें पुराण त्याचीं पांच प्रकारचीं सर्ग[1], प्रतिसर्ग[2], वंश[3], मन्वंतरें[4]; व वंशानुचरित[5] अशीं लक्षणें आहेत. ह्या पांच लक्षणांनीं जें युक्त तेंच पुराण होय. एकंदर विद्या चौदा आहेत; व त्यांत पुराण ही चौदावी विद्या आहे. त्या चौदा विद्या अनुक्रमें १ ऋग्वेद, २ यजुर्वेद, ३ सामवेद, ४ अथर्ववेद, ५ शिक्षा, ६ कल्प, ७ व्याकरण, ८ नैरुक्त, ९ ज्योतिष, १० छंद, ११ धर्म, १२ मीमांसा, १३ न्याय व १४ पुराण अशा ह्या चौदा विद्या आहेत. ज्याप्रमाणें ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, व अथर्ववेद हे चार वेद आहेत, तसेंच पुराण व इतिहास ( भारत ) हाहि एक पांचवा वेदच आहे. " **भारतः पञ्चमो वेदः** " असें पुराणांमध्यें व्यासानीं म्हटलें

---

१ तात्विक सृष्टीची उत्पत्ति. २ सामान्य प्राण्यांची उत्पत्ति. ३ सूर्यवंश, व चंद्रवंश वगैरे, ४ स्वायंभुव प्रमुख चौदा मनूंची माहिती. ५ मोठमोठ्या अवतारी पुरुषांचीं चरित्रें.

आहे. भारतालाच इतिहास म्हणतात, व वाल्मीकिरामायणाला काव्य म्हणतात. ह्या शिवाय व्यासप्रणीत जे ग्रंथ त्यास पुराण अशी संज्ञा आहे. एकंदर महापुराणेंहि अठरा आहेत. पूर्वी सर्व मिळून पुराण एक होतें; व त्यास ब्रह्मपुराण असें नांव होतें. हें एकच ब्रह्मपुराण शंभर कोटी होतें; म्हणजे शंभर कोटी श्लोक त्या पुराणाचे होते. नंतर व्यासानीं त्या शंभर कोटी पुराणांचा सारांश चार लक्ष श्लोकांत घेतला आहे; व सर्व पुराणांचा संक्षेप करून विषयवारीनें ब्रह्मादि अठरा मुख्य भाग ( प्रकरणें ) कल्पिले आहेत; व त्यास निरनिराळीं नांवें कल्पिलीं, तींच हीं अठरा महापुराणें होत. त्यांची संख्यावारी पुढीलप्रमाणें आहे. १ ब्रह्मपुराण संख्या १००००, २ पद्मपुराण ५००००, ३ विष्णुपुराण २३०००, ४ वायुपुराण २४०००, ५ भागवतपुराण १८०००, ६ नारदपुराण २५०००, ७ मार्कंण्डेयपुराण ९०००, ८ अग्निपुराण १६०००, ९ भविष्यपुराण १४०००, १० ब्रह्मवैवर्तपुराण १८०००, ११ लिंगपुराण ११००, १२ वराहपुराण २४०००, १३ स्कंदपुराण ८११००, १४ वामनपुराण १००००, १५ कूर्मपुराण १७०००, १६ मत्स्यपुराण १४०००, १७ गरुडपुराण १९०००, १८ ब्रह्मांडपुराण १२००० अशी हीं अठरा पुराणें आहेत. ह्याशिवाय प्रत्येक पुराणांतील अवशिष्ट भाग काढून त्याचीं अठरा उपपुराणें; म्हणजे पुराणांचीं परिशिष्टें काढिलीं, तीं अनुक्रमें १ सनत्कुमारसंहिता, २ नारसिंहपुराण, ३ स्कंदपुराण, ४ शिवधर्मपुराण, ५ दुर्वासपुराण, ६ नारदपुराण, ७ कपिलपुराण, ८ उशनसपुराण, ९ मानवपुराण, १० ब्रह्माण्डपुराण, ११ वरुणपुराण, १२ कालिकापुराण, १३ माहेश्वरपुराण, १४ सांबपुराण, १५ सौरपुराण, १६ पाराशरपुराण, १७ मारीचपुराण, १८ भार्गवपुराण हीं उपपुराणें होत. शिवाय उपोपपुराणेंहि अठरा आहेत, त्यांचें वर्णन विस्तारभयामुळें येथें देत नाहीं. पुढें एकादे वेळीं देऊं. तात्पर्य, ह्या अठरा महापुराणांपैकीं ज्याच्या तिसऱ्या भागाची आपण प्रस्तावना लिहीत आहों, त्या स्कंदपुराणाचें परिगणन तेराव्या संख्येनें केलें आहे. ह्या स्कंदपुराणाची श्लोकसंख्या एक्याऐंशीहजार एकशें आहे. ह्या पुराणाचीं, माहेश्वर, वैष्णव, ब्रह्म, काशी, अवन्ति, नागर व प्रभास अशीं सात खंडें आहेत. ह्या सर्वही अठरा महापुराणांमध्यें स्कंदपुराण फारच मोठें असल्यामुळें ह्याचे चार भाग करावे लागले. त्यांपैकीं पहिल्या भागांत माहेश्वरखंड व वैष्णवखंड अशीं दोन खंडें म्हणजे अंदाजानें पंधरा हजार श्लोकांचें भाषांतर दिलें आहे नंतर जो दुसरा भाग छापला त्यांत ब्रह्मखंड, काशीखंड व अवंतिखंडांतील अवंतिक्षेत्रमाहात्म्य एवढें भाषांतर दिलें आहे. हें अदमासें चौदा हजार श्लोकांचें भाषांतर केलेलें आहे. हा जो सांप्रत छापून प्रसिद्ध झालेला स्कंदपुराणाचा तिसरा भाग त्यांत पांचव्या अवन्तिखंडांतील चतुरशीति ( ८४ ) लिंगमाहात्म्य, रेवाखंड व

साहावें नागरखंड एवढा भाग तयार केला असून ह्यांत ५९५ अध्याय आहेत; व यांत तीस हजार श्लोकांचें भाषांतर छापून प्रसिद्ध केलें आहे; व पुढें जो आम्ही चौथा भाग छापणार आहों, त्यांत फक्त सातवें प्रभासखंडच येणार असून अदमासें पांचशें अध्यायाचें म्हणजे बावीसतेवीसशें श्लोकांचें भाषांतर येणार आहे. असे चार भाग मिळून ह्याची समाप्ति होणार आहे. आतां सांप्रतच्या स्कंदपुराणाच्या तिसऱ्या भागांत जे ५९५ अध्याय आले आहेत, त्यांची अनुक्रमणिका दिली आहेच, शिवाय येथें साधारणतः ह्या पुस्तकांत कोणकोणते विषय आले आहेत, ते संक्षेपानें मालेच्या वांचकांकरितां सादर करितों. ज्यायोगें ह्या भागांतील सर्व कथानकांचा थोडक्यांत बोध होईल.

आतां ह्या तिसऱ्या भागांत, आरंभीं अवंतीखंडांतर्गत दुसरें चतुरशीति ( चौऱ्याऐंशीं ) लिंगमाहात्म्य दिलेलें आहे. ह्यामध्यें एकंदर अध्याय ८४ आहेत; आणि ह्यावरून त्याला चतुरशीतिलिंगमाहात्म्य असें संस्कृत नांव प्राप्त झालें आहे. ह्या माहात्म्यामध्यें शिवलिंगांचीं माहात्म्येंच सांगितलीं आहेत; प्रथम अगस्त्येश्वर माहात्म्य दिलें आहे. अगस्त्यानें देवरक्षणार्थ दैत्यांचा क्रोधाग्नीनें नाश केल्यामुळें, त्याला हिंसाजन्य पातक लागलें, त्या पातकाच्या नाशार्थ त्यानें शिवलिंगपूजन केलें व तो पापमुक्त झाला; आणि त्यामुळें त्या शिवलिंगाला अगस्त्येश्वर नांव प्राप्त झालें. त्याच्या पूजनानें हिंसाजन्य पाप दूर होतें, अशी कथा पहिल्या अध्यायांत आहे. ह्याच क्रमानें दुसऱ्या—तिसऱ्या अध्यायांतहि गुहेश्वर, ढुंढेश्वर, डमरुकेश्वर वगैरे स्थानांचीं माहात्म्यें दिलीं आहेत. प्रत्येक माहात्म्यांतील क्रम एकसारखा आहे. जसें गुहेश्वर हें गुहानें स्थापिलें, ढुंढेश्वर हें ढुंढ नांवाच्या शिवगणानें स्थापिलें, वगैरे वगैरे. कोणाएकाकडून एकादें पाप घडलें; व तो त्या पापाच्या निवारणार्थ एकाद्या ऋषीच्या सांगण्यावरून अवंतिक्षेत्रांत गेला; आणि तेथें शिवपूजन करून स्वतःच्या नांवानें शिवलिंग स्थापून पापमुक्त झाला. त्या लिंगाच्या पूजनानें ज्याची जशातऱ्हेची पापनिवृत्ति झाली; तशाच तऱ्हेची पापनिवृत्ति त्या लिंगाच्या पूजनानें होते, असें त्याचें माहात्म्य त्या त्या अध्यायांतून दर्शविलें आहे. ह्या क्रमानें चौऱ्याऐंशीं लोकांनीं स्वपापनिवृत्त्यर्थ अवंतिक्षेत्रांत, चौऱ्याऐंशीं शिवलिंगें स्थापिलीं. त्यांच्या पूजनानें ते पापमुक्त झाले, अशी कथा ह्या सर्व माहात्म्यांतून आहे. आतां तीं माहात्म्यें कोणतीं म्हणाल तर १ अगस्त्यस्थापित अगस्त्येश्वर, २ गुहस्थापित गुहेश्वरमाहात्म्य, ३ ढुंढस्थापित ढुंढेश्वरमाहात्म्य, ४ डमरुकेश्वर, ५ अनादिकल्पेश्वरमाहात्म्य, ६ स्वर्णजालेश्वरमाहात्म्य, ७ त्रिविष्टपेश्वरमाहात्म्य, ८ कपालेश्वरमाहात्म्य, ९ स्वर्गद्वारेश्वरमाहात्म्य, १० कर्कोटेश्वरमाहात्म्य, ११ सिद्धेश्वरमाहात्म्य, १२ लोकपालेश्वरमाहात्म्य, १३ कामेश्वरमाहात्म्य, १४ कुटुंबेश्वरमाहात्म्य, १५ इंद्रद्युम्नेश्वरमाहात्म्य,

१६ ईशानेश्वरमाहात्म्य अशाप्रकारचीं माहात्म्यें वर्णिलीं आहेत. तसेंच १७ अप्सरेश्वर, १८ कलकलेश्वर, १९ नागचंडेश्वर, २० प्रतिहारेश्वर, २१ कुक्कुटेश्वर अशीं माहात्म्यें वर्णिलीं आहेत; तशींच पुढेंहि प्रत्येक अध्यायांत क्रमाक्रमानें कर्कोटेश्वर, मेघनादेश्वर, महालयेश्वर, मुक्तेश्वर, सोमेश्वर, अनरकेश्वर, जटेश्वर, रामेश्वर, च्यवनेश्वर, खंडेश्वर, पत्तनेश्वर, आनंदेश्वर, कंथडेश्वर, इंद्रेश्वर, मार्कंण्डेयेश्वर, विश्वेश्वर, कुसुमेश्वर, अक्रूरेश्वर, कुण्डेश्वर, लुंपेश्वर, गंगेश्वर, अंगारेश्वर, उत्तरेश्वर, त्रिलोचनेश्वर, वीरेश्वर, नूपुरेश्वर, अभयेश्वर, पृथुकेश्वर, स्थावरेश्वर, शूलेश्वर, ॐकारेश्वर, विश्वेश्वर, कण्ठेश्वर, सिंहेश्वर, रेवतेश्वर, घंटेश्वर, प्रयागेश्वर, सिद्धेश्वर, मतंगेश्वर, सौभाग्येश्वर, रूपेश्वर, धनुःसहस्रेश्वर पशुपतीश्वर, मल्लेश्वर, जल्पेश्वर, केदारेश्वर, पिशाचेश्वर, संगमेश्वर, दुर्धर्षेश्वर प्रयागेश्वर, चन्द्रादित्येश्वर, करभेश्वर, राजस्थलेश्वर, वडलेश्वर, अरुणेश्वर, पुष्पदन्तेश्वर, अविमुक्तेश्वर, हनुमत्केश्वर, स्वप्नेश्वर, पिंगलेश्वर, कायावरोहणेश्वर, बिल्वेश्वर, उत्तरेश्वर, अशातऱ्हेनें चौऱ्याऐंशीं शिवलिंगांचीं माहात्म्यें ह्यामध्यें सांगितलीं आहेत. ह्याप्रमाणें सांगून तिसऱ्या रेवाखंडाला प्रारंभ केला आहे.

ह्या रेवाखंडामध्यें २३२ अध्याय आहेत. हें सर्व खंड मार्कंडेय व धर्मराज यांच्या संवादानें युक्त आहे. याच्या पहिल्या अध्यायांत सर्व पुराणांची माहिती दिली आहे. रेवा शब्दाचा अर्थ मराठीमध्यें नर्मदानदी असा आहे. नर्मदानदी सर्वांना माहित आहेच. ह्या नर्मदानदीचें माहात्म्य ज्यांत आहे, त्याला रेवाखंड म्हणतात. ह्याच्या दुसऱ्या अध्यायांत नर्मदेचें माहात्म्य वर्णिलें आहे. नंतर तिसऱ्या अध्यायापासून मार्कंडेयानें प्रलयकाळीं जेव्हां नौकारोहण केलें तेव्हां त्याला नर्मदादर्शन झालें, व त्याला तिचें माहात्म्य समजलें. नंतर पांचव्या अध्यायापासून बाराव्या अध्यायापर्यंत नर्मदेची उत्पत्ति वर्णिली आहे. तेराव्या अध्यायापासून एकोणीस अध्यायापर्यंत एकवीस कल्पांचें वर्णन केलें आहे विसाव्या अध्यायापासून चोवीस अध्यायापर्यंत प्रलयकाळस्वरूप वर्णिलें आहे. व नर्मदेच्या अनेक पोटनद्यांचें वर्णन केलें आहे. पंचविसाव्या अध्यायांत मधूकतृतीयाव्रत सांगितलें आहे. नंतर अनुक्रमें ज्वालेश्वर, कावेरीसंगम माहात्म्य, दारुतीर्थमाहात्म्य, अग्नितीर्थमाहात्म्य, रवितीर्थमाहात्म्य, मेघनादतीर्थमाहात्म्य वगैरे तीर्थांचीं माहात्म्यें सव्विसाव्या अध्यायापासून वर्णिलीं आहेत. नंतर चाळीसाव्या अध्यायापासून शिवलिंगांचीं माहात्म्यें वर्णिलीं आहेत. तीं अनुक्रमें करञ्जेश्वर, कुंडलेश्वर, पिप्पलादि, विमलेश्वर वगैरे होत. पंचेचाळीसाव्या अध्यायांपासून पन्नास अध्यायापर्यंत अंधकासुराची कथा दिली आहे. आणि एकावन्न व बावन्न ह्या अध्यायांत दानमाहात्म्य सांगून महातपामुनीचें चरित्र सांगितलें आहे. नंतर चित्रसेन राजाची कथा दिली आहे. शबरकथा, रुधिरकंदादि तीर्थ ह्यांची माहिती ऐंशी अध्यायापर्यंत दिली आहे. नंतर एक्या

ऐंशी अध्यायापासून वरुणेश्वर, वह्नितीर्थ, हनुमंतेश्वर, रामेश्वर, सोमनाथ, पिंगलेश्वर, ऋणत्रयमोचनतीर्थ, कपिलेश्वर, पूतिकेश्वर, जलशायी, चंडादित्यतीर्थ, यमहास्यतीर्थ, नंदिकेश्वर, नारायण, कोटीश्वर, व्यासतीर्थ, प्रभास, नागेश्वर, मार्कण्डेयेश्वर, संकर्षण, मन्मथेश्वर, एरंडीसंगम, वगैरेचीं महात्म्यें सांगून रेवाखंडाच्या समाप्तीपर्यंत सर्वत्र तीर्थमाहात्म्यें वर्णिलीं आहेत. ह्याप्रमाणें रेवाखंड पुरें झाल्यानंतर साहाव्या नागरखंडाला प्रारंभ झाला आहे.

ह्या साहाव्या नागरखंडांत एकंदर दोनशें एकोणऐंशी अध्याय आहेत. ह्यांत विशेषतः नागरजातीची उत्पत्ति सांगितली आहे. तसेंच त्यांत हाटकेश्वरक्षेत्राची उत्पत्ति व त्या क्षेत्रांत असणारीं जीं लिंगें त्यांचीं माहात्म्यें सांगितलीं आहेत. तेराव्या अध्यायापासून अचलेश्वरादि अनेक तीर्थांचीं लिंगमाहात्म्यें वर्णिलीं आहेत. मध्यंतरीं चमत्कारक्षेत्राला प्रदक्षिणा व नमस्कार करणारास कोणकोणतीं फळें प्राप्त होतात तेंहि दर्शविलें आहे. रक्तशृंगाचें माहात्म्य व विदूरथाख्यान हें पंधरा ते सतरा अध्यायांत सांगितलें आहे. अठराव्या अध्यायांत गयाशिरमाहात्म्य व एकोणिसाव्या अध्यायांत पितृकूपिकामाहात्म्य वर्णिलें आहे. नंतर एकोणतीस अध्यायापर्यंत तीर्थमाहात्म्यें सांगून पुढें तिसाव्या अध्यायापासून सिद्धेश्वरादि शिवलिंगाचीं माहात्म्यें वर्णिलीं आहेत, तीं अनुक्रमें सिद्धेश्वर, नागहद, चित्रेश्वरी, ययातीश्वर, चित्रशिला, विश्वामित्रेश्वर, महाकालेश्वर, उमामहेश्वर, द्वादशादित्य, एकादश रुद्र, गरुडेश्वर, कुशलेश्वर, वगैरेचीं महात्म्यें सांगितलीं आहेत. तशीच वसुषेणेश्वरादि लुप्त तीर्थें व महेश्वरादि जीं इतर अडसष्ट तीर्थें आहेत, त्यांचीं माहात्म्यें वर्णिलीं आहेत. ह्यांत पुष्पादित्यमाहात्म्य व मणिभद्राख्यान एकशें पंचावन्न अध्यायापासून दिलें आहे, तें फारच विचित्र आहे. त्यानंतर दोनशें चौवेचाळीस अध्यायापर्यंत एकादशीव्रताचीं माहात्म्यें, चातुर्मास्यांतील नियम, वर्णधर्म, आश्रमधर्म वगैरे विषय संक्षेपानें वर्णिले आहेत. ह्यांतील पैजवनाच्या चरित्रावरून शूद्राला वेदकर्म करितां येतात, असें सिद्ध होतें. पैजवन हा जातीचा शूद्र असूनहि त्यानें वेदाध्ययन व शालिग्रामपूजन गालवमुनीच्या सांगण्यावरून केलें; व यज्ञादि कर्में करून तो पैजवन मुक्त झाला, अशी कथा आहे. नंतर शिवपूजनमाहात्म्य, शिवध्यानविधि वगैरे सांगितल्यानंतर शेवटीं शिवलिंगांपैकीं, वैष्णव, शैव, ब्राह्म, वगैरे अनेक लिंगांचीं माहात्म्यें सांगितलीं आहेत. अशातऱ्हेनें हा स्कंदपुराणाचा ३ रा भाग संपविला आहे.

आपला कृपाभिलाषी,

**पुराणभूषण—नरहर रावजीशास्त्री जोगळेकर.**

भाषान्तरकार.

---

# प्रकाशकांचे दोन शब्द.



स्कंदपुराणाचा हा तिसरा भाग आज वाचकांच्या हातीं देत आहोंत. स्कंदपुराणापैकीं आतां प्रभासखंड हा भाग राहिला आहे. त्याचे अध्याय पांचशांवर आहेत. अठरा पुराणांत स्कंदपुराण पुष्कळ मोठें असल्यामुळें त्याचे चार भाग करणें भाग पडलें. मध्यंतरी कित्येक अनिवार अडचणीमुळें हें पुराणप्रकाशनाचें काम दिनावधीवर पडलें होतें. तशांत युरोपांतील महायुद्धामुळें कागद वगैरेच्या किंमती कल्पनेबाहेर वाढल्यानें थोडे दिवस थांबणें भाग झालें; परंतु अशा रीतीनें वाट पहात बसल्यानें हातीं धरलेलें हें पुराणप्रकाशनाचें काम शेवटास जाणेंच अशक्य होईल म्हणून हल्लींचे अडचणीचे दिवस पार पडेपर्यंत तूर्त दरमहा ८० पृष्ठें या हिशेबानें वर्षांत सुमारें १००० एक हजार पृष्ठें अशा प्रमाणानें मासीक रूपानें हें पुराण–ग्रंथ–प्रकाशनाचें काम चालविण्याचें ठरविलें आहे, आणि त्याची वार्षिक वर्गणी तीन रुपये ठेविली आहे. स्कंदपुराणापैकीं राहिलेला भाग–प्रभासखंड वरप्रमाणेंच दरमहा ८० पृष्ठें याप्रमाणें देऊन पूर्ण करण्यांत येईल, व त्यानंतर ब्रह्मपुराणास सुरवात करणार आहोंत. या नवीन व्यवस्थेनें दरमहा नियमित पृष्ठें मालेच्या वर्गणीदारास मिळण्याची सोय होऊन हें पुराणग्रंथमालेचें काम सुरळीत चालण्यास मार्ग होईल. ही व्यवस्था ज्यांस पसंत असेल त्यांनीं वर्गणी पाठवून नांव नोंदविण्याची त्वरा करावी. मालेचा पहिला अंक आक्टोबरच्या पहिल्या आठवड्यांत प्रसिद्ध होईल. बाहेर गांवच्या वर्गणीदारांनीं टपालखर्चाबद्दल ६ आणे अधीक पाठवावे.

प्रकाशक.

---

# स्कंदपुराण.

## भाग ३ रा.

## विषयानुक्रमणिका.

### अवन्तीखंड ५ ( चतुरशीतिलिंगमाहात्म्य २ ).

# अनुक्रमणिका.



## अवंतिखंड ५ ( रेवाखंड ३ ).

**अवन्तिखण्डसमाप्त ॥ ५ ॥**

## नागरखंड ६.

नागरखंडानुक्रमणिका समाप्त.

**तिसरा भाग समाप्त.**

# स्कंदपुराण.

## अवन्तीखंड. ५

## ( चतुरशीतिलिंगमाहात्म्य. २ )

### अध्याय १ ला.

### अगस्त्येश्वरमाहात्म्य.

एकदां पार्वती व शंकर एकांतांत बसलीं असतां पार्वती शंकरास विचारिते, कीं, ज्याठिकाणीं श्राद्धविधी केला जातो, अशीं पृथ्वींतील तीर्थें, व पुण्यकारक नद्या ह्यांचें माहात्म्य सांगा. असा पार्वतीचा प्रश्न ऐकून शंकर पार्वतीस म्हणतात; हे पार्वती ! पृथ्वीतलावर यमुना, चंद्रभागा, वितस्ता, नर्मदा ह्या नद्या मुख्य होत; व कुरुक्षेत्र, गया, नैमिष, केदार, पुष्कर, महाकालवन, हीं क्षेत्रें सर्व-क्षेत्रांहून श्रेष्ठ होत. महाकालवनांत महाकालनांवाचा ईश्वर राहतो. हें क्षेत्र चार कोस लांबरुंद आहे. तेथें स्नानादि केलीं असतां ब्रह्महत्त्यादि दोष दूर होतात. चौऱ्यांयशीं लिंगांचीं नांवें प्रातःकाळीं उठून स्मरण करणारास शिवलोक प्राप्त होतो. त्या चौऱ्यांयशी लिंगांपैकीं पहिलें अगस्त्येश्वर [illegible] लिंग होय. पूर्वीं एकदा दैत्यांनीं देवांचा पराजय करून त्रैलोक्य आपल्या ताब्यांत घेतल्यामुळें सर्व इंद्रादि देव दीन होऊन पृथ्वीवर हिंडूं लागले. हिंडतां[illegible] हिंडतां अगस्त्य-ऋषीची व देवांची गांठ पडली. नंतर देवांनीं आपली सर्व हकीगत त्या[illegible] सांगि-तली; व आम्हाला दैत्यांनीं जिंकिल्यामुळें आम्ही दीन झालों आहों, आ[illegible]मचें रक्षण करा, अशी त्यांनीं अगस्त्याची प्रार्थना केली. अशी देवांची दुर्दशा पाहून अगस्त्यऋषीला राग आला; व आपल्या क्रोधाग्नीनें सर्व दैत्यांचा फडशा पाडला. नंतर आपण दैत्यांचा नाश केला, ही एकप्रकारची आपल्याकडून हिंसा घडली; व हिंसा हा अधर्म होय, असें मनूनें सांगितल्यामुळें आपण हा एक अधर्मच केला, असा अगस्त्यऋषीस पश्चात्ताप झाला. त्यावेळीं ब्रह्मदेव अगस्त्याजवळ आले; व त्यानें अगस्त्यऋषीस केलेल्या पापाच्या नाशार्थ महाकालवनामध्यें जाऊन, व शिवलिंगाची स्थापना करून पूजन करण्याबद्दल सांगितलें. नंतर अगस्त्य ऋषी महाकालवनामध्यें जाऊन, व आपल्या नांवानें एक शिवलिंग स्थापून त्यानें त्याचें पूजन केलें, त्यायोगें तो निष्पाप झाला. हे पार्वती ! जे कोणी अगस्त्येश्वर लिंगाचें पूजन करितील, त्यांचीं सर्व पातकें नष्ट होऊन त्यांस शिवलोकाची प्राप्ती होईल.

# अध्याय २ रा.

## गुहेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती ! आतां दुसरें जें गुहेश्वर लिंग त्याचें माहात्म्य सांगतों; ऐका. पूर्वी रथंतरकल्पामध्यें मंकणकनांवाचा एक ऋषि सिद्धि मिळविण्याकरितां तपश्चर्या करिता झाला. कोट्यावधी वर्षें तप केल्यानंतर त्याच्या हातांत असलेल्या दर्भमुष्टींतून एकाएकीं शाकरस ( भाजीचा रस ) उत्पन्न झाला. त्यायोगें त्यास आश्चर्य वाटून आपणास सिद्धि प्राप्त झाली, असें समजून; व माझ्यासारखा पुण्यवान् व सिद्धि मिळालेला असा दुसरा सर्व जगांत कोणीहि मनुष्य निघणार नाहीं, अशा गर्वानें तो नाचूं लागला. तो मंकणक ज्या वेळीं नाचूं लागला त्या वेळीं त्याच्या तपःप्रभावानें संपूर्ण जगहि नाचूं लागलें; त्यायोगें डोंगरांचें कडेचेकडे ढासळूं लागले, नद्या जिकडे तिकडे वाहूं लागल्या. व सर्वत्र प्रलय होण्याची पाळी आली. त्या वेळीं ब्रह्मादि देव मजजवळ येऊन प्रार्थना करून सर्व झालेलें वर्तमान सांगते झाले. नंतर मी ब्राह्मणाचें रूप घेऊन मंकणकाजवळ आलों; व उगीच कां नांचतोस असा मंकणकास प्रश्न केला. त्यानंतर मंकणक शंकरास म्हणतो कीं, माझ्या हातांतून शाकरस निघत आहे, तो तुला दिसत नाहीं काय ! ह्या शकरसाच्या दर्शनानें मी सिद्ध झालों, असें समजून मला अत्यानंद झाला; व त्या आनंदाचे भरांत मी नाचत आहे. असें मंकणकाचें भाषण ऐकून मीहि मोठ्यांदा हसलों व आपल्या अंगठ्यावर एक बोट मारून त्यांतून भस्म बाहेर काढलें; नंतर मी त्यास बोललों कीं, माझ्या अंगठ्यांतून भस्म निघालें, तरी सुद्धां मी तुझ्याप्रमाणें नाचत नसून स्वस्थ आहे, तूं इतका वेड्यासारखा का नांचतोस. नंतर मंकणकानें माझी पुष्कळप्रकारें स्तुति केली. नंतर मी त्यास वर माग, असें बोललो, त्यावर मंकणक म्हणतो कीं, माझ्या तपामध्यें कोणतेंहि विघ्न येणार नाहीं, असें करा. नंतर मी त्यास म्हटलें; मंकणका ! तूं महाकालवनांत जाऊन तेथें सात कल्पपर्यंत सतत असणारी जी गुहा त्याठिकाणीं गुहेश्वर नांवाचें एक लिंग आहे, त्याचें दर्शनानें तुझ्या तपाला कधींहि अडथळा येणार नाहीं; व तुझें तप दिवसेदिवस अधिकाधिक वाढेल. ह्याप्रमाणें माझें भाषण ऐकून मंकणक तेथें तपादि करून व गुहेश्वराचें दर्शन घेऊन पुष्कळ कालपर्यंत राहता झाला. त्याठिकाणीं जाऊन गुहेश्वराचें पूजन करणारास सुख, सौभाग्य; व अनेक सिद्धि प्राप्त होतात.

## अध्याय ३ रा.

### ढुंढेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती! आतां तिसऱ्या ढुंढेश्वराचें माहात्म्य सांगतों; ऐका. पूर्वी एकदां कैलासपर्वताचे ठिकाणीं असणारा ढुंढनांवाचा एक शिवगणांचा स्वामी फिरत फिरत इंद्रसभेंत गेला. तेथें नृत्य करणारी रंभा अवलोकन करून तो मोहित झाला. हें इंद्राला समजतांच त्यानें ढुंढाला शाप दिला कीं, ज्यापेक्षां तूं काममोहित होऊन रंभेच्या नृत्यांत विघ्न आणिलेस; व आमचें मन विरस केलेंस, त्यापेक्षां तूं भूलोकीं जाऊन मनुष्ययोनींत जन्म घेशील. असा शाप होताच ढुंढ हा भूलोकीं उत्पन्न होऊन नंतर महेंद्रपर्वतावर तप करूं लागला. पुष्कळ दिवसपर्यंत तपश्चर्या केल्यावर तेथें आकाशवाणी झाली कीं, तूं महाकालवनांत जाऊन शंकराचें पूजन कर; म्हणजे तूं शापमुक्त होऊन स्वस्थानाला जाशील. नंतर आकाशवाणीनें सांगितल्याप्रमाणें तो महाकालवनामध्यें येऊन तेथें शिवलिंगाचें पूजन करूं लागला असतां एकाएकीं शिवलिंगाचें आंतून वाणी उत्पन्न झाली कीं, हे ढुंढा! तुला कांहीं वर मागावयाचा असल्यास माग. नंतर ढुंढ म्हणतो कीं, हे परमेश्वरा! माझी तुझेठिकाणीं सतत भक्ति उत्पन्न होवो; व जे कोणी ह्या तुझ्या लिंगाचें पूजन करितील ते सर्व पातकापासून मुक्त होऊन अंतकाळीं तुझ्या लोकाला प्राप्त होवोत. नंतर शंकर म्हणतात; ढुंढा! तूं [illegible]र मागितल्याप्रमाणें सर्व कांहीं होईल, व ह्या लिंगाला आजपासून ढुंढेश्वर हें नांव प्राप्त होईल ह्याप्रमाणें वर मिळाल्यामुळें ढुंढ हा शापमुक्त होऊन स्वस्थानीं गमन करिता झाला. जे कोणी ह्या ढुंढेश्वराचें पूजन करितील, त्यांस शंभर राजसूयज्ञाचें पूण्य लागेल; व ते पापमुक्त होतीत.

## अध्याय ४ था.

### डमरुकेश्वरमाहात्म्य.

शंकर पार्वतीला म्हणतात; हे पार्वती! आतां चवथें जें डमरुकेश्वर लिंग, त्याचें माहात्म्य सांगतों; ऐका पूर्वी वैवस्वतकल्पामध्यें रुरु या नांवाचा एक दैत्य होता. त्याला वज्रनांवाचा एक पुत्र झाला. त्यानें सर्व देवांना जिंकिलें; व तो स्वतः स्वर्गाचें राज्य करूं लागला. सर्वत्र दुष्कर्माचा विस्तार झाल्यामुळें देव व ऋषी वज्रनांवाच्या दैत्याचा वध करण्याविषयीं एकत्र जमून विचार

करीत असतां एकाएकी तेथें एक कृत्या उत्पन्न झाली; व ती देवांस म्हणते कीं, देवहो! तुम्ही मला कां उत्पन्न केलें; व मी तुमचें काय कृत्य करावें, तें सांगा. नंतर देवांनीं वज्राचीं दुष्ट वर्तनें कृत्येस सांगून त्याच्या नाशाविषयीं तिची प्रार्थना केली. त्यावेळीं कृत्येनें मोठें हास्य केलें; व आपल्या हास्यापासून सशस्त्र अशा पुष्कळ कन्या निर्माण केल्या; व त्यांचें व वज्राचें युद्ध झालें, त्यावेळीं वज्रानें त्या मातृगणांचा पराभव केला. नंतर नारद ऋषि मदरपर्वतावर येऊन वज्र दैत्यानें केलेला देवांचा पराजय मला निवेदन करिता झाला. नंतर मी महाकालवनांत जाऊन डमरूचा शब्द केला. त्यावेळीं एक शिवलिंग जमिनींतून बाहेर आलें; व त्यांतून एकसारख्या ज्वाळा बाहेर निघाल्या; व त्या ज्वाळांनीं वज्रदैत्यांचें सर्व सैन्य नाश पावलें. त्या योगें देवांना मोठा आनंद झाला; व त्यांनीं डमरुकेश्वराला साष्टांग नमस्कार केला. जे कोणी ह्या डमरुकेश्वराचें दर्शन घेऊन पूजन वगैरे करितील ते सर्व पापापासून मुक्त होतील; व त्यास चांद्रायणादि व्रतें केल्याचें पुण्य लागून, त्यांचे शत्रु एकदम नाश पावतील; व ते सर्वदा सुखी होऊन शिवलोकीं जातील.

---

## अध्याय ५ वा.

### अनादिकल्पेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती! पांचवें अनादिकल्पेश्वर नांवाचें जें लिंग आहे, त्याचें माहात्म्य सांगतों. जें ऐकलें असतां सर्व पातकें नष्ट होतात. प्रलयकाळीं सर्व त्रैलोक्य ज्या वेळीं जलमय झालें, त्यावेळीं हें लिंग पाण्यामध्यें उत्पन्न झालें. ह्याच लिंगापासून सर्व स्थावरजंगमात्मक त्रैलोक्य सृष्टीच्या उत्पत्तीच्या काळीं उत्पन्न झालें; व योग्य समयाला सर्व त्रैलोक्याचा नाशहि ह्याच लिंगामध्यें होत असतो. ह्या लिंगापासूनच रजोगुणी ब्रह्मदेव उत्पन्न झाला; व त्यास सृष्टि उत्पन्न करण्याचें काम नेमून दिलें. ह्याच लिंगापासून सत्त्वगुणी विष्णु उत्पन्न झाला व त्यास त्रैलोक्यरक्षणाचें काम नेमून दिलें. व ह्या लिंगापासूनच तमोगुणी रुद्र उत्पन्न झाला; व तो सर्वांचा प्रलकाळीं नाश करिता झाला. तात्पर्य ह्या अनादिकल्पेश्वरलिंगाच्याच ह्या मुख्य तीन विभूति उत्पत्ति, स्थिती व नाश करण्यास समर्थ आहेत. हें सर्वांच्या आदिपासूनच असल्यामुळें सर्वांहून श्रेष्ठ आहे. ह्यास आदि, मध्य; व अंत नसून हें त्रिकालाबाधित आहे. अशा ह्या सर्वोत्कृष्ट लिंगाचें दर्शन घेणारा; व पूजनादि करणारा पंचमहापातकापासून मुक्त होतो; व त्यास राजसूययज्ञ, अश्वमेधयज्ञ व ज्योतिष्टोमादि यज्ञ केल्याचें पुण्य

लागतें. जे मनुष्य अनादिकल्पेश्वराचें दर्शन घेत नाहींत, ते मनुष्य पशुतुल्य समजावे. ह्या लिंगाचें डाव्या हाताला विष्णु व उजव्या हाताला महादेव राहिलेले आहेत. जो हें माहात्म्य श्रवण करील तो शिवलोकीं जाईल.

---

## अध्याय ६ वा.

### स्वर्णज्वालेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती ! आतां साहावें जें स्वर्णज्वालेश्वर लिंग, त्याचें माहात्म्य सांगतों; ऐका. एके काळीं तूं व मी उभयतां देवांचीं शंभर वर्षे पुरीं होईपर्यंत एकांतांत रममाण होत असतां देवांनीं अग्नीला आंत आमच्याकडे पाठविलें. त्यावेळीं आम्ही आपलें वीर्य ( शुक्र ) अग्नीच्या तोंडांत घातलें. नंतर त्यायोगें अग्नीच्या सर्व देहाचा दाह होऊं लागला. नंतर तो अग्नि गंगेमध्यें जाऊन गंगेंत स्नान करून तें शुक्र गंगेंत टाकता झाला; तरीसुद्धां अग्नीमध्यें अवशिष्ट राहिलेलें वीर्य सुवर्णरूपानें बाहेर पडलें. अग्नीपासून उत्पन्न झालेल्या स्वर्णानें देव; व दैत्य लुब्ध होऊन तें घेण्याकरितां तिकडे धावले. त्यावेळीं हें माझें सुवर्ण असे म्हणून देव; व दैत्य अपसांत भांडूं लागले; व उभयतांमध्यें भयंकर युद्ध झालें. ह्या अग्नीपासून उत्पन्न झालेल्या सुवर्णामुळें हा युद्धप्रसंग होऊन असंख्य प्राण्यांचा वध झाला. हें पाहून मला क्रोध उत्पन्न झाला; व मी अग्नीकडे क्रोधदृष्टीनें पाहूं लागलो. नंतर अग्नि मला शरण जाऊन; व आपला पुत्र जो स्वर्ण ( सुवर्ण ) त्यास माझें स्वाधीन करून त्यानें माझी प्रार्थना केली कीं, आपण ह्या माझ्या पुत्राचें रक्षण करा. नंतर मी लोभामुळें अग्निपुत्र स्वर्णाला आपल्या मांडीवर घेतलें; व भीऊं नको, असें अग्नीस अभिवचन दिलें. नंतर मी स्वर्णाला आज्ञा केली कीं, महाकालवनामध्यें एक माझें पवित्र स्थान आहे. त्याचें दर्शन घेतलें असतां तूं कृतकृत्य होशील. माझ्या आज्ञेनें स्वर्ण हा स्वतःच्या ज्वालेप्रमाणें शोभणाऱ्या तेजानें युक्त असा महाकालवनामध्यें जाऊन तेथें लिंगाचें पूजन करून अक्षय्य सिद्धि मिळविता झाला; त्यायोगें त्या लिंगाला स्वर्णज्वालेश्वर हें नांव प्राप्त झालें. गयाश्राद्धाचें पुण्य ह्या लिंगाच्या केवळ दर्शनानेंच प्राप्त होतें; व एक लक्ष गायत्रीजपाचें पुण्य लागून मोक्षप्राप्ति होते.

---

## अध्याय ७ वा.

### त्रिविष्टपेश्वराचें माहात्म्य.

शंकर म्हणतात;–हे पार्वती ! आतां त्रिविष्टपेश्वर नांवाचें जें सातवें लिंग आहे, त्याचें माहात्म्य सांगतों; ऐका. ज्या ह्या त्रिविष्टपेश्वराच्या माहात्म्यश्रवणानें त्रिविष्टप म्हणजे स्वर्ग प्राप्त होतो. पूर्वीं एकदा वाराहकल्पामध्यें नारदऋषी इंद्राला पाहण्याकरितां स्वर्गांत गेला असतां नंदवनामध्यें इंद्राला पाहून त्यास नारद महाकालवनाचें माहात्म्य सांगूं लागले. नारद म्हणतात; हे इंद्रा ! पृथ्वीमध्यें नैमिषतीर्थ श्रेष्ठ आहे. त्याच्या दसपटीनें अधीक पुष्करतीर्थ श्रेष्ठ आहे. त्याच्याहून दसपट प्रयाग, त्यापेक्षां दसपट अमरेश्वरतीर्थ; त्याहून प्राची सरस्वती, त्याहून गयाकूप दसपट श्रेष्ठ आहे. त्याहून कुरुक्षेत्र श्रेष्ठ आहे. कुरुक्षेत्राच्या दसपट काशीक्षेत्र; त्याहून अधीक महाकालवन श्रेष्ठ आहे. महाकालवनामध्यें एकंदर साहासष्ट अब्ज इतकीं तीर्थें व शिवलिंगें वास करितात; व नऊ कोटी शक्ती (देवता) त्याठिकाणीं राहतात, असें हे सर्वश्रेष्ठ महाकालवन आहे. हें प्रलयकाळीं सुद्धां टिकणारें असें अक्षय्य आहे. ह्यांप्रमाणें नारदाचें भाषण ऐकून सर्व इंद्रादि देव नारदाची स्तुति करूं लागले; व म्हणूं लागले कीं, आतां आम्ही महाकालवनावाचून दुसरीकडे कोठेंहि जाणार नाहीं, कारण तुमच्या सांगण्यावरून आमची पक्की खात्री झाली आहे कीं, कैलास, मेरु, मंदर, अमरावती, भोगवती, ब्रह्मलोक, वैकुंठ ह्याहूनहि ह्या महाकालवनाचें माहात्म्य अवर्णनीय आहे. असें म्हणून सर्व देव महाकालवनांत जाऊन राहिले; व मजकडे कोणीहि येईना; व सर्व स्वर्ग ओसाड पडला. शेवटीं मीहि कैलास सोडून महाकालवनांत जेथें ब्रह्मा, विष्णु, इंद्र वगैरे देव राहिले होते तेथें गेलों. नंतर तेथें आकाशवाणी झाली कीं, हे त्रिविष्टपहो (देवहो) तुम्ही आपल्या नांवानें येथें एक शिवलिंग स्थापित करा. नंतर त्या आकाशवाणीनें सांगितल्याप्रमाणें सर्व देवांनीं त्रिविष्टपेश्वर नांवानें एक शिवलिंग महाकालवनांत स्थापित केलें. जे कोणी चतुर्दशी, अष्टमी, संक्रांत वगैरे पुण्यतिथीला त्रिविष्टपेश्वराचें पूजन करितात, ते अक्षय्य स्वर्गलोकीं जाऊन राहतात; व शेवटीं शिवलोकाला जातात.

## अध्याय ८ वा.

### कपालेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती ! आतां आठव्या कपालेश्वराचें माहात्म्य सांगतों; ज्याच्या दर्शनानें ब्रह्महत्त्यादि पातकें नष्ट होतात. पूर्वीं वैवस्वतकल्पामध्यें महा-

कालवनांत ब्रह्मदेवानें यज्ञ करण्यास प्रारंभ केला. त्या यज्ञामध्यें सर्व ब्राह्मण हवनादि कर्मे करीत असतां मी भिक्षुकाचा वेष घेऊन तेथें गेलों. फाटकी गोधडी पांघरलेल्या, हजामत करवलेल्या, चित्ताभस्म अंगाला लावलेल्या; व हातांत नरकपाल घेतलेल्या अशा मला पाहून सर्व ब्राह्मण माझा धिक्कार करून माझी निंदा करूं लागले. त्या वेळीं मी त्या ब्राह्मणास बोललो कीं, तुम्ही दयाळू असून जे दुसऱ्याचें दुःख तेंच आपलें दुःख असें मानणारे आहां; तुम्ही माझ्यावर दया करा. ब्राह्मण हे सर्वांचे मित्र असतात. मी भिक्षुक ब्राह्मण असून शिवभक्त आहे; व हातांत नरकपाल घेऊन भिक्षा मागणें हें माझें व्रत आहे. मी बारा वर्षेपर्यंत शिवपूजन करण्याचा निश्चय केला आहे. नंतर ते ब्राह्मण माझी निंदा करून; व मी अपवित्र आहे, असें समजून त्यांनीं मला ठार मारिलें, त्यायोगें माझ्या हातांतील नरकपाल खालीं पडलें; व तेथें असंख्य कपालें निर्माण झालीं. तें पाहून ब्राह्मणांना आश्चर्य वाटलें; हें कृत्य शंकरावाचून होणार नाहीं, असें निश्चित समजून शंकराची स्तुति करण्यास सर्व ब्राह्मणांनीं प्रारंभ केला. तेव्हां मी तेथें प्रगट होऊन ब्राह्मणास बोललो कीं, तुम्ही भिक्षुक ब्राह्मणाचा वध केलात, अर्थात् तुम्हाला ब्रह्महत्त्येचें पातक लागलें आहे; करितां त्या पातकाच्या नाशार्थ कपालेश्वराचें दर्शन घेऊन पूजन करा. असें शंकराचें भाषण ऐकून ब्राह्मणांनीं त्याप्रमाणें कपालेश्वराचें पूजन केलें; व तें पापमुक्त झालें. मी सुद्धां ज्या वेळीं ब्रह्मदेवाचें पाचवें मस्तक तोडिलें, त्या वेळीं मलाहि ब्रह्महत्त्येचें पातक लागलें; व तें पातक नाहींसें करण्याकरितां मी कपालेश्वराचें पूजन केलें होतें; व त्या पूजनानें मी ब्रह्महत्येच्या पातकापासून मुक्त झालों. जे कपालेश्वराचें पूजन करितील ते पुण्यवान् होऊन व ब्रह्महत्त्यादि पातकापासून मुक्त होऊन कैलासपर्वतावर शिवलोकीं जातील, ह्यांत संशय नाहीं. जे कोणी नेमानें ह्या कपालेश्वराचें दर्शन घेतील ते अंतकाळीं निष्पाप होऊन शेवटीं माझ्या नगरीला प्राप्त होतील.

---

## अध्याय ९ वा.

### स्वर्गद्वारेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात, हे पार्वती ! आतां नवव्या स्वर्गद्वारेश्वर लिंगाचें माहात्म्य सांगतों; ऐका. जें स्वर्ग; व मोक्ष देणारें आहे. एकदां तुझ्या अश्विनीप्रमुख बहिणी पिता जो दक्ष त्याच्या यज्ञसमारंभाकडे जाण्यास निघाल्या असतां, तुझ्याजवळ येऊन म्हणतात कीं, आम्हीं सर्व यज्ञोत्सव पाहण्याकरितां जात असतां; व आम्हाला पित्यानें येण्याविषयीं आमंत्रण दिलें असतां तूंच एकटी आमंत्रण न

केलेली अशी कशी राहिलीस ! व तूं आमच्याबरोबर कां येत नाहींस ! आम्हाला वाटतें कीं, आपला पिता दक्ष तुला आमंत्रण देण्यास विसरला असेल. असें बहिणींचें भाषण ऐकून; व आपल्या बापानें आपणाला आमंत्रण दिलें नाहीं, हा अपमान सहन न होऊन तूं आपला देह तेथेंच विसर्जित केलास. नंतर अश्विन्यादिकांनीं हें सर्व वर्तमान बापास कळविलें. नंतर तूं प्राणत्याग केलेला पाहून मला फार राग आला; व मी आपले असंख्य शिवगण दक्षयज्ञाचा नाश करण्याकरितां पाठविले. शिवगणांना पाहून दक्षयज्ञामध्यें प्राप्त झालेले देव; व ब्राह्मण जिकडेतिकडे सैरावैरा पळूं लागले. नंतर शिवगणानीं जिंकिलेले देव विष्णूकडे गेले, विष्णूनें शिवगणांचा पराजय करण्याकरितां आपलें सुदर्शन चक्र सोडिलें. तें चक्र वीरभद्रानें गिळून टाकिलें, त्यावेळीं विष्णूची व वीरभद्राची भयंकर लढाई झाली; त्यांत वीरभद्राचा पराजय झाला. तेव्हां सर्व शिवगण मजजवळ येऊन झालेलें वर्तमान सांगते झाले. विष्णूबरोबर युद्ध करण्याच्या इराद्यानें मी हातांत शूळ घेऊन युद्धभूमीवर गेलो. त्रिशूळ घेतलेल्या अशा मला पाहून विष्णु गुप्त झाले. अशातऱ्हेनें दक्षयज्ञाचा नाश व देवांचा पराजय करून मी शिवगणांना ताकीद दिली कीं, माझ्या आज्ञेशिवाय देवांना स्वर्गाच्या द्वाराजवळ येऊं देऊं नका. देवांचा स्वर्गद्वाराचा मार्ग कुंठित झाल्यामुळें इंद्रादि सर्व देव ब्रह्मदेवाकडे गेले. ब्रह्मदेव सर्व देवांना घेऊन महाकालवनांत येऊन स्वर्गद्वारेश्वरलिंगाचें दर्शन घेता झाला. त्यायोगें मी प्रसन्न होऊन देवांना स्वर्गद्वाराची प्राप्ती करून दिली; व ते आनंदानें स्वर्गात राहते झाले. जे कोणी अष्टमीला किंवा चतुर्दशीला सोमवारीं स्वर्गद्वारेश्वराचें पूजन करितील ते माझ्याठिकाणीं लीन होऊन मुक्त होतील.

---

## अध्याय १० वा.

### कर्कोटकेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती ! आतां दहाव्या कर्कोटेश्वराचें माहात्म्य सांगतों. पूर्वीं सर्पांची आई जी कद्रू, तिनें आपलें वचन मोडल्यामुळें सर्पांना शाप दिला कीं, जनमेजय सर्पसत्र करून तुम्हां सर्वांना जाळून टाकील. नंतर आईच्या शापानें भ्यालेले सर्प जिकडेतिकडे जाऊन लपून बसले. शेष हा तप करण्याकरितां हिमालयपर्वतावर गेला. शंखचूड नांवाचा सर्प मणिपूरक्षेत्रांत गेला; कालीयसर्प यमुनेच्या डोहांत जाऊन राहिला. ज्यांना जिकडे रस्ता मिळाला तिकडे सर्व सर्प आपले प्राण जगविण्याच्या इच्छेनें जाऊं लागले. कांहीं ब्रह्मलोकीं, कांहीं विष्णुलोकीं जाऊन राहिले. ब्रह्मलोकीं गेलेल्या कर्कोटकनांवाच्या सर्पाला ब्रह्मदेव सांगतात कीं, तूं महाकालवनांत जाऊन शंकराच्या

लिंगाचें पूजन कर; व त्याची प्रार्थना कर; ह्मणजे त्यायोगें सर्व सर्पांचें कल्याण होईल. नंतर कर्कोटकानें ब्रह्मदेवाच्या सांगण्याप्रमाणें केल्यावर महाकालवनामध्यें मी प्रसन्न होऊन कर्कोटकाला म्हणालों कीं, तुझ्या भक्तीनें मी संतुष्ट झालो आहे. सर्व सर्पांना मी अभयदान देतों; व तुला ह्या क्षणींच मुक्ति देतों, असें म्हणून मी कर्कोटकाला आपल्या स्वरूपांत लीन केलें. त्या दिवसापासून ज्या शिवालिंगाचें कर्कोटकानें पूजन केलें त्यांस कर्कोटकेश्वर हें नांव प्राप्त झालें. त्या कर्कोटकेश्वराच्या दर्शनानें सर्व पीडा दूर होतात. जे नियमानें कर्कोटकेश्वराचें दर्शन घेतात, ते ह्या लोकीं सुख भोगून अंतीं माझ्या लोकाला प्राप्त होतात. पंचमील किंवा चतुर्दशीला जे रविवारीं कर्कोटकेश्वराचें दर्शन घेतात, त्यांच्या कुलांत कोणालाहि सर्पपीडा उत्पन्न होत नाहीं. दुर्दैवी स्त्री सौभाग्यसंपन्न होईल. जी स्त्री गर्भार असेल तिला पुत्र होईल; व बालग्रहादि पीडा दूर होतील.

---

# अध्याय ११ वा.

## सिद्धेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती! आतां अकराव्या सिद्धेश्वरलिंगाचें माहात्म्य सांगतों, ऐका. पूर्वी एकदा देवदारुवनामध्यें योगीलोक सिद्धी प्राप्त होण्याकरितां तप करीते झाले. अनेकप्रकारें घोर तपश्चर्या करूनहि ज्यावेळीं सिद्धि प्राप्त होईना त्यावेळीं योगी लोक फार चिंता करूं लागले. नंतर आकाशवाणी झाली कीं, जर तुम्हाला सिद्धीच्या प्राप्तीची इच्छा असेल तर तुम्ही महाकालवननामध्यें जाऊन शिवालिंग स्थापून त्याची पूजा करा; म्हणजे तुम्हाला सिद्धि प्राप्त होईल. सनकादिसुद्धा ज्याच्या पूजनानें सिद्धीप्रत प्राप्त झाले. पूर्वी वसुमान् नांवाचा राजा ह्याच लिंगाचें पूजन करून सिद्धि मिळविता झाला. ह्याप्रमाणें आकाशवाणी ऐकून ते योगी महाकालवनामध्यें येऊन; व शिवालिंगाचें दर्शन घेऊन त्याचे यथाविधी पूजन करिते झाले; व त्यायोगें तत्काळ त्यांना सिद्धि प्राप्त झाली. त्या दिवसापासून त्याला सिद्धेश्वर हें नांव प्राप्त झाले. जो नियमानें सिद्धेश्वराचें पूजन करितो, त्यास साहा महिन्यांत सिद्धि प्राप्त होते. जे अष्टमीला किंवा चतुर्दशीला सिद्धेश्वराचें दर्शन घेतील, त्यास पुत्र नसल्यास पुत्र होतील; ते दरिद्री असल्यास श्रीमंत होतील; विद्यार्थी असल्यास विद्वान् होतील; लग्न करण्याची इच्छा असल्यास लग्न होईल. जे संक्रात, सोमवार किंवा ग्रहण ह्या दिवशीं सिद्धेश्वराचें दर्शन घेतील त्याच्या शंभर कुलांचा उद्धार होईल.

---

# अध्याय १२ वा.

## लोकपालेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती! लोकपालेश्वर हें बारावें लिंग होय; ज्याच्या दर्शनानें सर्व पापें नाहींशीं होतात. पूर्वी हिरण्यकशिपु नांवाच्या दैत्यापासून हजारों दैत्य उत्पन्न झाले. त्या सर्व दैत्यांनीं संपूर्ण जग व्यापून टाकिलें. सर्व आश्रम; व यज्ञ ह्यांचा नाश करून पुष्कळसे ब्राह्मण भक्षण करून टाकिले. हा अनर्थ पाहून लोकपालांना भीति वाटली; व ते विष्णूला शरण गेले. नंतर विष्णु त्यांच्या नाशाकरितां शंख, चक्र, गदा इत्यादि आयुधें घेऊन दैत्यांकडे गेले असतां ते पाताळांत जाऊन लपून बसले. त्या दिवसापासून ते दैत्य नित्य दिवसा पाताळांत लपून बसत; व रात्रीं लोकपालांना त्रास देत, हा सपाटा त्या दैत्यांनीं सुरु केला. नंतर अनुक्रमें इंद्र, यम, वरुण, कुबेर वगैरे सर्व लोकपाल जिंकिलें. नंतर ते लोकपाल पुनः विष्णुला शरण गेले. त्यावेळीं विष्णु लोकपालांस म्हणतात कीं, तुम्ही महाकालवनामध्यें जाऊन शंकराची आराधना करा; म्हणजे तुम्हाला सिद्धि प्राप्त होऊन सुखप्राप्ति होईल. नंतर ते महाकालवनामध्यें येऊन शिवलिंगाचें दर्शन घेऊन पूजनादि करूं लागले. नंतर दैत्य लोकपालांच्या पूजनादि पुण्यकर्मामध्यें विघ्न करण्याकरितां आले असतां एकाएकी त्या लिंगांतून अग्निज्वाळा उत्पन्न झाल्या; व त्या योगें सर्व दैत्य भस्म होऊन गेले; व लोकपाल आनंदानें आपआपल्या स्थानाला सुखानें राहते झाले. त्या दिवसापासून त्या लिंगाला लोकपालेश्वर हें नांव प्राप्त झालें. जे कोणी ह्या लिंगाचें पूजन करितील; व दर्शन घेतील, ते ऐश्वर्य व सिद्धि ह्यांप्रत मिळवून मुक्त होतील.

---

# अध्याय १३ वा.

## कामेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वति! ज्याच्या दर्शनानें सौभाग्याची प्राप्ती होते. असें जें तेरावें कामेश्वर लिंग त्याचें माहात्म्य सांगतों; ऐका. पूर्वी प्रजा उत्पन्न करण्याच्या इच्छेनें ब्रह्मदेव ध्यान करीत असतां एक तेजस्वी पुरुष त्याला दिसला. त्या वेळीं ब्रह्मदेवानें तूं कोण आहेस ? असें त्या दिव्य पुरुषास विचारिलें. नंतर तो पुरुष बोलला कीं, तुझा प्रजा उत्पन्न करण्याचा अभिप्राय जाणून मी येथें प्रगट झालों आहे; करितां तुझें कांहीं काम करावयाचें असल्यास सांग. नंतर

ब्रह्मदेव म्हणतात कीं, हे दिव्यमूर्ते! मी प्रजा उत्पन्न करण्याच्या इरा-द्यानें जे प्रजापति उत्पन्न केले, ते प्रजा उत्पन्न करण्यास असमर्थ झाले आहेत; तेव्हां प्रजा उत्पन्न करण्याचें काम तुझ्याकडे मी सोंपविणार आहे. सर्व प्रजापतींमध्यें तुला श्रेष्ठत्व दिलें आहे. ह्याप्रमाणें ब्रह्मदेवाची आज्ञा ऐकून दिव्य-रूपधारी मदन (कामदेव) गुप्त झाला. माझ्या आज्ञेशिवाय मदन निघून गेला. असें पाहून ब्रह्मदेवाला राग आला; व त्यानें मदनास लवकरच नाश पावशील, असा शाप दिला. नंतर मदनाला पश्चात्ताप होऊन तो ब्रह्मदेवाला शरण गेला. ब्रह्मदेवानें मदनास उच्छाप देऊन त्यास राहण्याकरितां बारा स्थानें नेमून दिलीं. तीं येणेप्रमाणें:—१ स्त्रियांचे कटाक्ष, २ मांड्या, ३ स्तन, ४ नाभी (बेंबी), ५ खांदे, ६ अधरोष्ठ (खालचा ओंठ) ७ वसंत ऋतु, ८ कोकिलांचा स्वर, ९ चांदणें, १० वर्षाऋतु, ११ चैत्रमास, १२ वैशाखमास, ह्या बारा स्थानांचे-ठिकाणीं राहण्यास सांगितलें. नंतर ऐके दिवशी मी तपश्चर्या करीत असतां हाच मदन माझ्या तपामध्यें विघ्न आणण्याच्या इराद्यानें माझ्या हृदयांत शिरला. त्यायोगें माझें मन चलबिचल होऊन मी तुझें स्मरण केलें. असें कां झालें; ह्याबद्दल मी विचार करीत असतां माझ्या हृदयांत असणाऱ्या कामदेवाला जाळून टाकिलें. नंतर मदनाची स्त्री रति फारच शोक करूं लागली. मी रतीस बोललों कीं, अनुग्रह करण्याच्या इच्छेनें अनंग (अंगरहित) केला आहे. जर हा अनंग महाकालवनांत जाऊन कामेश्वरलिंगाचें पूजन करील तर कृष्णापासून रुक्मिणींचें उदरीं अंगरूपानें (देहधारण करून) उत्पन्न होऊन तुझें मनोरथ सिद्धीस नेईल. नंतर माझ्या सांगण्याप्रमाणें अनंगानें (कामदेवानें) अवन्तीनगरीमध्यें म्हणजे महाकालवनांत जाऊन कामेश्वराचें पूजन केलें; व त्या पूजनाचे योगें कामाचे व रतीचे सर्व मनोरथ पूर्ण झाले. जे कोणी चैत्र शुक्ल त्रयोदशीला कामेश्वराचें दर्शन घेतील त्यांच्या सर्व इच्छा पूर्ण होऊन अंतीं मुक्त होतील.

---

## अध्याय १४ वा.

---

### कुटुंबेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात—हे पार्वति, कुटुंबेश्वर हें चौदावें लिंग आहे; त्याच्या दर्श-नानें कुटुंबांची वृद्धि होते. ज्या वेळीं देवदैत्यांनीं मिळून क्षीरसमुद्राचें मंथन करून चौदा रत्नें काढिलीं त्या वेळीं विषहि उत्पन्न झालें. त्या कालकूट विषानें सर्व त्रैलोक्य जळूं लागलें. नंतर सर्व देवांनीं माझी प्रार्थना केली; व त्यायोगें मी तें वीष पिऊन टाकिलें. माझें तें स्वरूप पाहून तूंहि भीतीनें पळून गेलीस.

मी कालकूटविष प्याल्यामुळें माझ्या अंगाचा दाह होऊं लागला; व तूंहि जवळ नसल्यामुळें मला दुःखहि फार झालें. नंतर जवळच गंगा होती तिची प्रार्थना करून सांगितलें कीं, हें प्राशन केलेलें कालकूटविष तूं आपल्या पाण्याच्या प्रवाहानें समुद्रांत नेऊन टाक. असें माझें भाषण ऐकून गंगा म्हणाली कीं, मी कांहीं कालकूटविष वाहून नेण्यास समर्थ नाहीं. नंतर मी यमुना, सरस्वती वगैरेहि नद्यांची तशीच प्रार्थना केली. शेवटीं शिप्रानदीनें माझें हें शरीराला दाह करणारें कालकूटविष घेऊन महाकालवनामध्यें शिवलिंगावर नेऊन टाकिलें; त्यायोगें तें लिंग विषरूप झालें. नंतर सर्व देवांनीं तें विषरूपी शिवलिंग पाहून पुनः पूर्ववत् करण्याविषयीं माझी प्रार्थना केली. तेव्हां मी त्या देवांस बोललों कीं, ज्या वेळीं कायावरोहणक्षेत्रांत राहणारे ब्राह्मण ह्या लिंगाचें पूजन करितील, त्या वेळीं हें लिंग पूर्वीप्रमाणें होईल. ह्याप्रमाणें माझें भाषण ऐकून देव त्या ब्राह्मणांस बोलावण्याकरितां कायावरोहणक्षेत्रांत गेले; व देवांच्या आज्ञेप्रमाणें त्या ब्राह्मणांनीं विषरूप झालेल्या शिवलिंगाचें पूजन केलें; व त्यायोगें तें लिंग पूर्वीप्रमाणें सौम्यरूपी झालें. त्या लिंगाच्या पूजनानें कायावरोहणांतील सर्व ब्राह्मणांच्या कुटुंबांची ( वंशाची ) वृद्धी झाली; व त्यामुळें ह्या लिंगास कुटुंबेश्वर हें नांव प्राप्त झालें. जे कोणी अष्टमीला किंवा चतुर्दशीला कुटुंबेश्वराचें दर्शन घेतील; किंवा त्याचें पूजन करितील, त्यांच्या सर्व इच्छा सफल होतील.

---

## अध्याय १५ वा.

### इंद्रद्युम्नेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती ! आतां पंधराव्या इंद्रद्युम्नेश्वराचें माहात्म्य सांगतों. ज्याच्या दर्शनानें यश; व कीर्ति प्राप्त होतात. प्रजेचें पुत्राप्रमाणें पालन करणारा असा इंद्रद्युम्न नांवाचा राजा होता. त्यानें पुष्कळ यज्ञ केले; व शेवटीं तो स्वर्गाला गेला. पुण्य संपल्यावर पुनः तो मृत्युलोकीं प्राप्त झाला. व त्यामुळें त्याला फार वाईट वाटलें; व तो चिंता करूं लागला. पुष्कळप्रकारें विचार केल्यावर पुनः स्वर्गवासी होण्याकरितां तो हिमालयपर्वतावर गेला; व तेथें तपश्चर्या करूं लागला. नंतर मार्कण्डेय ऋषीनें इंद्रद्युम्नास सांगितलें कीं, जर तुला कायमचें सुख हवें असेल तर, तूं महाकालवनांत जाऊन शिवलिंगाचें पूजन कर. नंतर मार्कण्डेयानें सांगितल्याप्रमाणें इंद्रद्युम्नराजा महाकालवनांत जाऊन कल्कलेश्वराजवळ असणाऱ्या एका शिवलिंगाचें पूजन करिता झाला. नंतर देव, गंधर्व विमानांत बसून इंद्रद्युम्नाला ह्मणतात कीं, हे राजन् ! तुला ह्या शिवलिंगपूज-

नानें उत्तम कीर्ति प्राप्त झाली आहे; व तुला लवकर कायमचें स्वर्गसुख प्राप्त होईल. व हें लिंग तुझ्या नांवानें प्रसिद्ध होईल. जे कोणी ह्या इंद्रद्युम्नेश्वराचे पूजन करितील ते सर्व पातकापासून मुक्त होऊन शेवटीं स्वर्गाला प्राप्त होतील.

## अध्याय १६ वा.

### ईशानेश्वरमाहात्म्य.

ईशानेश्वर हें सोळावें लिंग होय. त्याच्या दर्शनानें ऐश्वर्य प्राप्त होतें. एकदा तुहुंड नांवाच्या दैत्यानें सर्व देव जिंकून स्वर्ग आपल्या ताब्यांत घेतला. नंतर देव विचार करीत बसले असतां नारदऋषि देवांजवळ येऊन ऐश्वर्यप्राप्तीकरितां महाकालवनांत जाऊन ईशानेश्वराचें पूजन करण्याविषयीं त्यांस सांगते झाले. नंतर नारदाच्या सांगण्याप्रमाणें सर्व देव ईशानेश्वराजवळ येऊन त्यांचें पूजन करून पुष्कळप्रकारानें ईशानेश्वराची स्तुति करण्यास प्रारंभ करिते झाले. त्याबरोबर त्या लिंगांतून एक धूमानें युक्त अशी ज्वाला उत्पन्न झाली; व तिनें तुहुंडाचा नाश केला. नंतर देव मोठ्या आनंदानें स्वर्गांत राहूं लागले. हें लिंग ऐश्वर्य देणारें असल्यामुळें ह्यास ईशानेश्वर हें नांव प्राप्त झालें. जे कोणी ह्या लिंगाचें पूजन करितील त्यांस ऐश्वर्य प्राप्त होऊन ते ब्रह्मलोकाला प्राप्त होतील.

## अध्याय १७ वा.

### अप्सरेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वती ! आतां सतराव्या अप्सरेश्वराचें माहात्म्य सांगतों. ज्याच्या पूजनानें इच्छित मनोरथ सिद्ध होतात. कोणी एकेकालीं नंदनवनामध्यें इंद्र सभेंत बसला असतां तेथें रंभेचें नृत्य सुरू झालें. कांहीं काळानें रंभेच्या चित्तांत पापबुद्धि उत्पन्न झाल्यामुळें प्रमादानेंच नृत्यामध्यें पुष्कळशा चुका होऊं लागल्या. तें पाहून इंद्राला क्रोध आला; व त्यानें रंभेला शाप दिला कीं, तूं भूमीवर मनुष्ययोनींत जन्म घेशील. त्या इंद्राच्या शापामुळें रंभा अप्सरांसह निश्चेष्ट होऊन पडती झाली; तितक्यांत नारदऋषि तेथें येऊन शोक करणाऱ्या सर्व रंभेसह अप्सरांना पाहून विचारितां झाला कीं, अप्सराहो ! तुम्ही शोक कां करितां; तें सांगा. नंतर अप्सरांनीं सर्व हकीगत सांगितल्यावर नारद म्हणतात. तुम्ही महाकालवनामध्यें जाऊन शिवलिंगाचें पूजन करा.

नंतर अप्सरांनीं अप्सरेश्वरांचें पूजन केल्यावर मी संतुष्ट झालो; व रंभेला बोललो कीं, तूं आतां स्वर्गांत जा. तुझ्यावर इंद्र प्रीति करील. नंतर अप्सरांसह रंभा स्वर्गांत जाऊन सुखानें राहती झाली. ज्या लिंगाचें अप्सरांनीं पूजन केलें त्या लिंगाचें नांव अप्सरेश्वर असें पडलें आहे. जे कोणी ह्या अप्सरेश्वराचें पूजन करतील ते इच्छित मनोरथ प्राप्त करून घेऊन शेवटीं स्वर्गांत जातील.

## अध्याय १८ वा.

### कलकलेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वती! ज्यावेळीं तुझा माझा विवाह झाला त्यावेळीं तूं स्वरूपानें काळी असल्यामुळें तुझें नांव महाकाली असें ठेविलें होतें. एके-दिवशीं मी तुला सहज महाकाली ह्या संबोधनानें हाक मारली. त्यावेळीं हा मी अपमान केला, तसें तुला वाटून माझें बोलणें तुला सहन झालें नाहीं; व तूं मला पुष्कळप्रकारें टोंचून बोललीस. तेव्हां मी मोठा कोलाहल केला; व मीहि तुला पुष्कळ दूषणें दिलीं. अशातऱ्हेनें उभयतांमध्यें मोठें भांडण लागलें. त्या भांडणाचा जो मोठा कलकल शब्द उत्पन्न झाला; त्यापासून एक शिवलिंग भूमि फोडून बाहेर निघालें. कलकल शब्दाच्या योगें लिंगाची उत्पत्ति झाली; म्हणून त्यास कलकलेश्वर हें नांव प्राप्त झालें. जे कोणी ह्या लिंगाचें पूजन करतील, त्यांच्या घरांत भांडणतंटे होणार नाहींत; व त्यांचीं सर्व कार्यें निर्विघ्नपणें सिद्धीस जातील. जे कोणी चतुर्दशीला कलकलेश्वराचें लिंग पूजितील ते अंतीं शिवलोकीं जातील.

## अध्याय १९ वा.

### नागचंडेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती! आतां एकोणिसाव्या नागचंडेश्वराचें माहात्म्य सांगतों; ऐका. ज्याच्या दर्शनानें देवांचा निर्माल्य ओलांडिल्यामुळें उत्पन्न झालेलें पाप नाहीसें होतें. पूर्वी एकदा देव, ऋषि, गंधर्व, चारण; व गुह्यक हे सुधर्मानामक सभेमध्यें बसले असतां इंद्र नारदाला विचारिता झाला कीं; पृथ्वीमध्यें सर्वांत उत्तम असें क्षेत्र कोणतें? नंतर नारदऋषी म्हणतात; हे इंद्रा! क्षेत्रामध्यें उत्तम क्षेत्र प्रयाग हें होय, तथापि प्रयागाहूनहि महाकालवन नामक

क्षेत्र दसपटीनें अधीक श्रेष्ठ आहे. असें ऐकताच सर्व देव; व ऋषि ह्यांसह इंद्र विमानांत बसून महाकालवनक्षेत्राची शोभा पाहूं लागला असतां तेथील लोक देवांच्या निर्माल्याच्या उल्लंघनाचा मुळींच दोष मानीत नाहींत; हें पाहताच इंद्र देवांसह परत स्वर्गाला गेला. वाटेमध्यें इंद्रादिदेवांनीं चमत्कार पाहिला कीं, ज्यानें महाकालवनांत निर्माल्याचें बिनदिक्कत उल्लंघन केलें, तोच हा मनुष्य शिवगणासह विमानांत बसून शिवलोकीं जात आहे. नंतर इंद्र शिवगणांस त्या मनुष्याबद्दल विचारूं लागला असतां शिवगण इंद्रास म्हणतात कीं, ह्यानें महाकालदेवाचें पूजन केलें, त्यायोगें शंकरानें प्रसन्न होऊन ह्याला आपल्या गणामध्यें मेळवून ह्याचें नांव नागचंड असें ठेविलें. ह्याला निर्माल्योल्लंघनाचें जें पाप लागलें होतें, ते त्यानें ईशानेश्वराच्या ईशान्य दिसेला असणाऱ्या लिंगाच्या पूजनानें नाहींसें केलें आहे; आतां हा मनुष्य स्वतः निष्पाप झाल्यामुळें आम्ही ह्यास घेऊन जातो; व म्हणूनच आम्ही ह्या शिवलिंगाला नागचंडेश्वर हें नांव दिलें आहे. जे कोणी ह्याचें पूजन करितील त्यांना निर्माल्योल्लंघनाचा दोष लागणार नाहीं.

---

# अध्याय २० वा.

## प्रतिहारेश्वरमाहात्म्य.

प्रतीहारेश्वर हें विसावें शिवलिंग होय; ज्याच्या दर्शनानें मनुष्य श्रीमंत होतात. ज्यावेळीं तूं दक्षावर रागवून आपला देह नष्ट केलास; व हिमालयाचे पोटीं जन्म घेतलास; त्यावेळीं मी पुनः तुझ्याशींच विवाह लाविला. नंतर तूं व मी एकांतांत रमत असतां देवांचीं शंभर वर्षेपर्यंत ही रतिक्रीडा पुरी होईना, शेवटीं बृहस्पतीच्या सांगण्यावरून ती माझी रतिक्रीडा पुरी करण्याकरितां हंसाचें रूप घेऊन अग्नीला शिवाकडे पाठविण्याचें ठरलें. नंतर देवांचें सांगण्याप्रमाणें अग्नीनें हंसरूप घेतलें, व तो प्रतिहारीच्या म्हणजे द्वारपाळाच्या कामावर नेमलेला जो नंदी त्यास फसवून आंत शिवाकडे गेला. नंतर अग्नीच्या सांगण्याप्रमाणें मी आपली रतिक्रीडा पुरी करून नंदीजवळ आलों; व नंदीनें माझ्या हुकुमाशिवाय अग्नीला आंत पाठविलें, म्हणून त्यास रागवून प्रतिहारी जो नंदी त्याला शाप दिला; कीं तूं पृथ्वीवर जाशील. नंतर शापाप्रमाणें तो नंदी दुःखानं पृथ्वीवर पडता झाला. पृथ्वीवर पडलेला तो नंदी शोक करीत असतां लोकपाल त्यास म्हणतात कीं, तूं शोक कां करितोस. नंतर लोकपालांनीं नंदीला महाकालवनांस जाऊन शिवपूजन करावयास सांगितलें. नंदीनें त्याप्रमाणें महाकालवनांत जाऊन शिवलिंगाचें पूजन केलें. त्यावेळीं एकाएकीं त्या शिवलिंगांतून एक मोठा शब्द निघाला कीं, हें

नंदी ! तूं आतां शापमुक्त झाला आहेस. ह्या लिंगाचें पूजन प्रतिहारी जो नंदी त्यानें केल्यामुळें ह्यास प्रतिहारेश्वर हें नांव प्राप्त झालें आहे. जे ह्याचें पूजन करितील ते स्वस्थानापासून कधींहि भ्रष्ट न होतां शेवटीं शिवलोकाला जातील.

## अध्याय २१ वा.

### कुक्कुटेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती ! पूर्वी कौशिकनावाचा एक राजा होता. तो रात्रीं कोंबड्याप्रमाणें लोकांना दिसे; व दिवसा मनुष्याप्रमाणें दिसे. त्यानें आपलें राष्ट्र शत्रुरहित केलें होतें. त्या राजाची विशाला या नांवाची बायको होती. तिला चौसष्ट कलांचें ज्ञान असे. तो प्राणांहून आवडत्या अशा पत्नीसह आनंदानें राज्य करीत होता. तिला योग्य रतिसुखाचा लाभ कधींहि प्राप्त झाला नाहीं. ती विशाला एकेदिवशीं किड्यांचें दांपत्य रतिसुखांत निमग्न झालेलें पाहून; व आपणास सर्व अनुकूल असतांनासुद्धां हा सुखानुभव नाहीं, असेंहि पाहून तिला फारच वाईट वाटलें; व माझ्या राज्याला व ऐश्वर्याला धिक्कार असो, असें म्हणून ती दुःखानें गालवऋषीच्या आश्रमाला गेली. विशाला गालवास म्हणते; हे ऋषे ! मला एक संशय उत्पन्न झाला आहे कीं, माझा पति सर्व–ऐश्वर्यानें युक्त असतां व मला वश असतां त्याच्याशी रतिसुखाचा लाभ मला कां होऊं नये, हें समजत नाहीं. मी असें कोणतें पातक केलें आहे कीं, ज्या पापानें माझें तारुण्य फुकट चाललें आहे. पति माझ्याशी रममाण होत नाहीं, त्या योगें माझा जन्म व्यर्थ आहे, असें मला वाटूं लागलें आहे. नंतर गालव विशालेला म्हणतोः–हे मुली ! ह्या राजानें म्हणजे तुझ्या पतीनें पूर्वीचें जन्मीं शक्ती वाढण्याकरितां पुष्कळसें कुक्कुट म्हणजे कोंबडे भक्षण केले. अशातऱ्हेनें त्याचा नित्यक्रम चालू असतां ज्यावेळीं कोंबड्याच्या राजाला ही वार्ता समजली, तेव्हां कुक्कुटांचा म्हणजे कोंबड्यांचा राजा जो ताम्रचूड त्यानें तुझ्या नवऱ्यास शाप दिला कीं, तूं कोंबडा होशील. नंतर तुझ्या नवऱ्यानें उच्छाप मागितल्यावर ताम्रचूड बोलला कीं, तूं दिवसा मनुष्य होशील; व रात्रीं कोंबडा होशील; व तुझा व तुझ्या बायकोचा कधींहि समागम होणार नाहीं. त्या शापाच्या योगानें तुझा पति ह्या जन्मीं अशा दशेला प्राप्त झाला आहे. जर तो महाकालवनांत जाऊन ज्वालेश्वरलिंगाच्या पूर्वेस असणारें जें शिवलिंग त्याचें पूजन करील, तर शापमुक्त होईल. नंतर विशाला आपल्या पतीला महाकालवनांत नेऊन त्याच्याकडून शिवपूजन करविती झाली. नंतर तो राजा लिंगपूजनानें शापमुक्त होऊन सर्व ऐहिक भोग भोगून मोठ्या आनंदानें अंतकाळीं आपल्या पत्नीसह स्वर्गांत जाता झाला.

त्यादिवसापासून ह्या लिंगाला कुक्कुटेश्वर हें नांव प्राप्त झालें. जे कोणी ह्या कुक्कुटेश्वराचें पूजन करितील, त्यांना पशुपक्षि इत्यादि क्षुद्रजातीमध्यें कधींहि जन्म प्राप्त होणार नाहीं; आणि जर कदाचित् झालाच, तर तावडतोब मुक्ति मिळेल.

## अध्याय २२ वा.

### कर्कटेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती ! ह्या बाविसाव्या कर्कटेश्वराच्या दर्शनानेंहि पशुयोनी प्राप्त होत नाहीं. पूर्वी बृहत्कल्पामध्यें धर्ममूर्ति नांवाचा एक राजा होता. त्याची भानुमती नावाची बायको होती. एकंदर ह्या राजास दहा हजार बायका होत्या. त्यांत ही मुख्य होती.त्या राजाचे जवळ सतत एक हजार मांडलिक राजे राहत असत. असा सर्वैश्वर्यसंपन्न तो राजा एकांतामध्यें आपल्या वशिष्ठनामक उपाध्यायाला विचारिता झाला कीं, मी कोणतें पुण्य किंवा कोणचा धर्म पूर्वी केला होता कीं, ज्याचे योगें मला अपरिमित लक्ष्मी व सुख प्राप्त झालें आहे. नंतर वशिष्ठ म्हणतात; हे राजा, तूं पूर्वजन्मीं शूद्रजातींत उत्पन्न झाला होतास. तूं त्यावेळीं दुष्ट वर्तन करणारा, ब्राह्मणाचें द्रव्य चोरणारा असा होतास. नंतर तुला जेव्हां मृत्यु आला त्या वेळीं तुला यमदूतांनीं नरकांत नेऊन अनेक दुःखें दिलीं. ताम्रभ्रष्ट, रौरव, कुंभीपाक, इत्यादि नरकांत पातकादि दुष्कर्मानें दुःखें भोगल्यावर अवशिष्ट राहिलेलें पातक भोगण्याकरितां तुला यमदूतांनीं खालीं पृथ्वीवर ढकलून दिलें. त्या तुला कर्कट म्हणजे खेंकडा याचें रूप प्राप्त झालें असतां तूं पांच वर्षें महाकालवनांत असणाऱ्या रुद्रसरोवरामध्यें राहिलास. नंतर तुला कावळ्यानें आपल्या चोंचींत धरून नेलें; व आकाशमार्गानें तो जात असता त्यानें तुला पुष्कळ ताडण करून नंतर खालीं टाकलें तों तूं स्वर्गद्वारेश्वर लिंगाच्या समोर पडलास; व मृत झालास. त्यावेळीं तुला दिव्य देह प्राप्त झाला. व तूं गंधर्वाच्या कामग नांवाच्या विमानांत बसून स्वर्गाला गेलास. नंतर रुद्रगणांनीं तुला विमानांत बसून जातांना पाहून देवांना सांगितलें कीं, हा कर्कोटाच्या म्हणजे खेकड्याच्या जन्माला आलेला प्राणी स्वर्गद्वारेश्वराच्या लिंगासमोर असणारें जें दुसरें शिवलिंग त्याच्या संन्निध मृत्यु पावल्यामुळें ह्याची कर्कोटाच्या जन्मापासून मुक्ति होऊन तो स्वर्गाला गेला. म्हणून ह्या स्वर्गद्वारेश्वरासमोर असणाऱ्या शिवलींगाचें नांव कर्कोटेश्वर असें पडलें आहे, जे ह्याचें पूजन करतील, ते पशुयोनीपासून मुक्त होतील. स्वर्गाला कामग विमानांत बसून गेलेला तोच तूं कर्को-

टकेश्वराच्या प्रभावानें आज राजकुलांत जन्माला आला आहेस. आतां तूं त्याच कर्कोटकेश्वराचें पूजन कर. त्याप्रमाणें त्या राजानें केल्यावर तो राजा पत्नीसह शिवरूप होऊन शिवलोकीं गेला. ह्याप्रमाणें जे ह्या कर्कोटकेश्वराच दर्शन घेतील किंवा पूजन करितील ते सर्वपातकापासून मुक्त होऊन शेवटीं शिवलोकीं जातील.

## अध्याय २३ वा.

### मेघनादेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती ! आतां मेघनादेश्वराचें माहात्म्य सांगतों. द्वापर युग व कलीयुग ह्याच्या दरम्यान एक मदांध ह्या नांवाचा राजा होता. तो देव-ब्राह्मणांचा छल करणारा असल्यामुळें एकदां त्याच्या राज्यांत बारा वर्षेपर्यंत पाऊस पडला नाहीं. त्यायोगें सर्व प्राणिमात्रांचा नाश होऊं लागला. जेव्हां प्राण्यांचा नाश होऊं लागला त्यावेळीं इंद्रादिदेव भिऊन क्षीरसमुद्राच्या उत्तर तीरावर विष्णूकडे गेले; व त्याची स्तुति करूं लागले. नंतर विष्णूनें देवांस सांगितलें कीं, हे देवहो ! तुम्ही महाकालवनांत जाऊन तेथें पूर्वी मेघांनीं स्थापित केलेलें पर्जन्य पाडणारें असें लिंग प्रतिहारेश्वराच्या ईशान्यदिशेला आहे. त्याचें पूजन करा; म्हणजे तुमची कार्यसिद्धि होईल. नंतर इंद्रादिदेव विष्णूनें सांगितल्याप्रमाणें महाकालवनांत येऊन लिंगपूजन करिते झाले. नंतर देवांनीं त्या लिंगाची स्तुति केली. इतक्या अवकाशांत एकाएकीं तेजःपुंज असे पुष्कळ मेघ लिंगांतून बाहेर पडले, व त्यांनीं पृथ्वीवर पुष्कळ पाऊस पाडला. नंतर देवांना मोठा आनंद झाला; व कांहीं वेळानें मेघहि शांत झाले; व सर्व पृथ्वीवर जिकडे तिकडे आनंदीआनंद झाला. ह्या लिंगाच्या पूजनानें मेघ उत्पन्न होऊन त्यांनीं पाऊस पाडला; म्हणून ह्याचें नांव मेघनादेश्वर असें देवांनीं ठेवलें आहे. ह्या मेघनादेश्वराच्या पूजनानें दुर्भिक्ष कधींहि प्राप्त होत नाहीं. ह्या लिंगाला स्नान घातलें असतां अनंत कल्पपर्यंत रुद्र लोकांत राहावयास मिळतें; व पुष्कळ पाऊस पडून पृथ्वीवर जिकडे तिकडे शांतता व सुभिक्ष; आनंद; व सुख वगैरे प्राप्त होतें.

## अध्याय २४ वा.

### महालयेश्वरमाहात्म्य

शंकर म्हणतात; हे पार्वती ! पृथ्वीमध्यें जितके प्राणी आहेत, ते सर्व प्रलय-कालीं महालयेश्वराचेठिकाणीं येऊन राहतात. ब्रह्मादिलोकांत राहणाऱ्यांनाखुद्दां

हें महालयेश्वर स्थान आनंद देणारें आहे. त्या लिंगाचेठिकाणीं ब्रह्मादि देव व विष्णु हेहि स्वतः वास करितात. त्याच लिंगापासून विष्णु, शंकर; व ब्रह्मदेव ह्यांची उत्पत्ति झाली. तसेंच ह्या लिंगापासून पंचमहाभूतें व पशु, पक्षी, किडे; मुंग्या, ढेंकूण; पिसवा, रजोगुण, तमोगुण, सत्त्वगुण, विश्वेदेव, आदित्य, वसु, अश्विनौदेव, यक्ष, साध्य, पिशाच, गुह्यक, पितर, दिशा, संवत्सर, काल, ऋतु, मास, पक्ष, अहोरात्र वगैरे उत्पन्न झाले. हें महालयेश्वरस्थान मुक्तीश्वराच्या बाजूला आहे. जो प्राणी ह्या महालयेश्वराचें पूजन करील, त्यास त्रैलोक्यामध्यें विजय मिळून शेवटीं तो रुद्ररूप होत्साता शिवलोकीं जाऊन राहील. भक्तीनें एका महालयेश्वराचें पूजन केलें असतां सर्व देवांचें पूजन केल्याचें श्रेय ( फल ) प्राप्त होतें; करितां कल्याणेच्छु पुरुषानें ह्या महालयेश्वरलिंगाचें पूजन करावें.

---

## अध्याय २६ वा.

### मुक्तीश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वती ! पूर्वीं राथंतर कल्पामध्यें मुक्ति ह्या नांवाचा एक ब्राह्मण होता. त्यानें महाकालवनामध्यें जाऊन तेरा वर्षें तपश्चर्या केली. तपश्चर्या पुरी होताच तो शिप्रानदीचे ठिकाणीं स्नान करण्याकरितां गेला असतां तेथें त्यानें एक भयंकर व्याध आपणाकडे येत असतांना पाहिला. त्या ब्राह्मणानें व्याधाला भिऊन परमेश्वराचें चिंतन करण्यास प्रारंभ केला. व्याधानें भगवच्चिंतन करणाऱ्या ब्राह्मणाला पाहून भीतीनें आपल्या हातांतील धनुष्यबाण खालीं टाकलें; व तो व्याध त्या मुक्तिनामक ब्राह्मणास म्हणतो; हे ब्रह्मन् ! मी तुला मारण्याच्या इच्छेनें तुझ्याकडे आलो खरा, परंतु तुला पाहून माझी पापबुद्धि नष्ट होऊन निर्मळ झाली आहे. मी उदरनिर्वाहानिमित्त आजपर्यंत हजारो प्राण्यांचा वध केला आहे. आज मला पश्चात्ताप झाला आहे; व माझी इच्छा तुझ्या सांनिध राहून तपश्चर्या करावी; अशी आहे; करितां मला आपण उपदेश करून मजवर प्रसन्न व्हा. इतके सांगितलें तरी मुक्ति ब्राह्मण हा व्याध पापी आहे, असें समजून त्याजवळ कांहींहि बोलला नाहीं; तथापि तो व्याध शिप्रानदीवर स्नान करून मुक्तिनामक ब्राह्मणासंनिध बसून तप करिता झाला; त्यायोगें तो व्याध जवळच असणाऱ्या मुक्तिलिंगामध्यें गुप्त होऊन गेला. नंतर मुक्तिब्राह्मणाला वाईट वाटलें कीं, पापी व्याध मुक्त झाला; व मी आहे तसाच आहे. मी मुक्त कां होऊं नये. हा विचार उत्पन्न होऊन त्यानें पाण्यांत उभें राहून घोर तपश्चर्या आरंभिली. नंतर एक भुकेलेला वाघ तेथें येऊन मुक्ति-

ब्राह्मणाला भक्षण करणार इतक्यांत त्या ब्राह्मणानें "ॐ नमो नारायणाय" हा मंत्र म्हटला त्या मंत्राच्या श्रवणानें तो वाघहि मुक्त होऊन; व दिव्यरूप धारण करून स्वर्गाला गेला. नंतर मुक्तिब्राह्मणाला फारच वाईट वाटलें; व शंकराची प्रार्थना करूं लागला. त्यावेळीं आकाशवणी झाली कीं, तूं मुक्तीश्वराचें पूजन कर; म्हणजे मुक्त होशील. नंतर शिप्रानदीचे काठीं असणारें जें मुक्ती-श्वरलिंग, त्याचें पूजन केल्यामुळें मुक्तिब्राह्मणहि मुक्त होऊन शिवलोकीं राहता झाला. तपश्चर्या, दानधर्म, नियम इत्यादिकांचें फल एका मुक्तीश्वराच्या दर्श-नानें प्राप्त होतें, माझें स्वरूप ब्रह्मदेव, विष्णु ह्यांना सुद्धा समजणें कठीण आहे; मग सामान्य मुनींना तर माझ्या स्वरूपाचें ज्ञान काय होणार! शुकाचार्य वगैरे महान् तपस्वी लोक ह्या माझ्या तेजःपुंजलिंगाचें ध्यान करून मुक्त झाले.

---

# अध्याय २६ वा.

## सोमेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती! ब्रह्मदेवाचा मानस पुत्र जो अत्रि ऋषि त्याला सोम या नांवाचा एक मुलगा झाला. त्याला. दक्षानें आपल्या कन्यांपैकीं सत्ता-वीस कन्या दिल्या. त्यांपैकीं रोहिणी ही श्रेष्ठ होय. नंतर दक्षाला असें सम-जलें कीं, सोम हा रोहिणीवरच प्रेम करितो; व इतरांवर करीत नाहीं. दक्षानें सोमाला पुष्कळ उपदेश केला; परंतु फुकट. शेवटीं तूं नाहींसा हो, असा दक्षानें सोमाला शाप दिला. सोम नाहींसा झाला, हें पाहून सर्व देव ब्रह्मदेवाकडे जाऊन हा सर्व वृत्तांत त्यास निवेदन करिते झाले. ब्रह्मदेव देवांस म्हणतात कीं, त्याच्या कर्माचें फल त्यास मिळालें; तथापि विष्णु त्यास शापमुक्त करितील. नंतर देव विष्णूकडे जाऊन त्याची प्रार्थना करूं लागले; त्यावेळीं विष्णु देवांस म्हणतात; देवहो! तुम्ही क्षीरसमुद्राचें मंथन करा; म्हणजे तुम्हाला सोमाची प्राप्ती होईल. नंतर मंदरपर्वताची रवी केली; व वासुकीनामक सर्पाची दोरी केली; व देवांनीं समुद्रमंथनाला सुरवात केली. समुद्रमंथन सुरु असता तेथें मोठा शब्द उत्पन्न झाला. पुष्कळ काळानंतर त्यांतून सोम निघाला. त्या सोमावरच देव, मनुष्य, पितर, वृक्ष, औषधी यांचा निर्वाह चालला आहे. उत्पन्न झालेल्या सोमाला विष्णूनें सांगितलें कीं, तूं सर्व जगामध्यें श्रेष्ठ आहेस, करितां सर्वांचें पालन कर. नंतर पूर्वी दक्षशापानें नष्ट झालेला सोमहि विष्णूच्या कृपेनें मुक्तिलिंगाच्या उत्तर दिशेला आसणारें जें शिवलिंग त्याचें आराधन करून पूर्वस्वरूप प्राप्त करून घेता झाला. सोमानें त्याचें आराधन केल्यामुळें त्या लिंगास सोमेश्वरलिंग हें नांव प्राप्त झालें. जे कोणी ह्या सोमेश्वराचें पूजन करितात, ते श्रेष्ठ अशा शिव-

लोकाला प्राप्त होतात. सोमेश्वराच्या पूजनानें कुष्ठरोग नाश पावतात. ज्यानें सोमेश्वराचें पूजन केलें, तो आपल्या कुलांचा उद्धार करतो. जे कोणी सोमेश्वराचें पूजन करितात, ते त्रैलोक्यालाहि वंदनीय होतात. जो बिल्वपत्रानें सोमेश्वराचें पूजन करितो, तो ह्या लोकीं सुख भोगून अंतकाळीं शिवलोकीं राहतो.

## अध्याय २७ वा.

### अनरकेश्वरमाहात्म्य.

पूर्वी वाराहकल्पांतील कलियुगामध्यें सत्याचा नाश झाला असतां; व चारहि वर्ण व आश्रम यांतील लोक एकमेकास फसवूं लागले असतां सर्वलोक अधर्मप्रवृत्त झाले; व त्यामुळें लोकहि अल्पायुषी झाले. अशातऱ्हेचे अल्पायुषी पापीलोक आपआपल्या पापकर्माप्रमाणें नरकांतील दुःखें भोगूं लागले. कित्येक कुऱ्हाडीनें ज्यांचीं मस्तकें छिन्नभिन्न झालेलीं आहेत असे; कित्येक करवतीनें देह चिरून काढलेले; कित्येक तापलेल्या सळईनें डोळे फोडलेले; कित्येक रक्तादिकुंडांत खाली तोंड करून लोटलेले; कित्येक खाली तोंड करून लोखंडाच्या सांखळीनें टांगलेले; कित्येक किडे, भोंगे, डांस हे ज्यांना भयंकर दंश करीत आहेत असे; लोखंडाच्या चोंचींच्या पक्ष्यांकडून ज्यांचे मांस कुरतडून टाकलें आहे असे, अशातऱ्हेनें पापी लोक अनेक दुःखें भोगीत असतां एकदा निमि या नांवाचा राजा यमलोकाच्या मार्गानें यमदूतांसह जाऊं लागला. त्यावेळीं त्या मार्गांतील हाल पाहून तो यमदूतांना विचारतो कीं, आम्हाला आतां किती दूर जावयाचें आहे; व आपण ज्या प्रदेशांतून चाललों त्याचें नांव काय? नंतर यमदूत त्याच्या प्रश्नाचें उत्तर न देतांना पुढचा रस्ता दाखवून ह्या रस्त्यानें चला, एवढेंच निमीस म्हणता झाला. नंतर निमी म्हणतो कीं, मी निमिनांवाचा राजा आहे. मी विदेहनगरीमध्यें जनकाच्या वंशांत उत्पन्न झालेला आहे. धर्मशास्त्राला अनुसरून मी चातुवर्ण्याचें पालन उत्तमतऱ्हेनें केलें आहे. मी यज्ञयागादिहि पुष्कळ पुण्यकर्में केलीं आहेत. तेव्हां मी इतका सन्मार्गानें वागणारा असतांना तुम्ही मला नरकाकडे नेता, याचें कारण काय? नंतर यमदूत निमीस म्हणतात; हे निमे! तुम्ही जें सांगितलें तें सर्व खरें आहे; परंतु तूं थोडेसें पाप केलें आहेस, त्याची तुला आठवण करून देतो. तूं ब्राह्मणांना अमुक दक्षिणा देईन, असें वचन देऊन तूं तसें केलें नाहींस; हें तुझ्याकडून असत्यभाषण केल्याबद्धलचें तुला पाप लागलें आहे; दुसरें तुजजवळ कोणतेंहि पाप नाहीं. असें म्हणून यमदूत निमीला घेऊन जेथें पापी लोक नरक कुंडांत पाप भोगीत होते, तेथें नेऊन त्यांस सर्वांचें पाप निवेदन करून अमक्यानें अमुक

पाप केलें आहे, म्हणून त्यास अमुककुंडांत अमुक पाप भोगावें लागत आहे. असें सांगून ते यमदूत निमीला घेऊन पुढें चालले असतां नरककुंडांत पाप भोगीत असलेले लोक राजाला (निमीला) म्हणतात; हे राजा । तुझ्या दर्शनानें आमचीं सर्व दुखें नाहींशीं झालीं आहेत, करितां आणखी कांहीं वेळ तूं येथें राहावेंस अशी आमची इच्छा आहे.हा चमत्कार पाहून निमी दूतांना विचारतो कीं, मी असें कोणतें पुण्य केलें आहे, कीं ज्याच्या योगें माझ्या दर्शनामध्यें पापी लोकांचीं दुखें शांत करण्याचें सामर्थ्य प्राप्त झालें आहे. नंतर दूत निमीस म्हणतात; हे राजन् । तूं आश्विन वद्य चतुर्दशीला महाकालवनामध्यें जाऊन अनरकेश्वराचें पूजन केलें होतेंस, त्या पुण्यप्रभावानें ह्या पापी लोकांचीं दुखें नष्ट होत आहेत. नंतर तेथून तो निमि स्वर्गामध्यें निघून गेला. इंद्र निमीला म्हणतो; तुला परभारें स्वर्गांत न आणितां यमलोकांतून स्वर्गाला येणारा जो मार्ग त्या मार्गानें तुला आणलें आहे. ह्याचें कारण नरकयातना पापी लोकांना कशा भोगाव्या लागतात, हें राजे लोकानां अवश्य समजलें पाहिजे; तरी त्याबद्दल आपण मजला क्षमा करा. नंतर यमधर्म स्वतः निमीजवळ येऊन सांगतो कीं, जे कोणी महाकालवनामध्यें असणाऱ्या अनरकेश्वराचें पूजन करितील ते कितीहि पापी असले तरी नरकाला जाणार नाहींत; एवढेंच नव्हे तर अशा पुण्यपुरुषाच्या दर्शनानें पापीसुद्धां दुःखमुक्त होतील, असा अनरकेश्वराचा महिमा आहे.

---

## अध्याय २८ वा.

### जटेश्वरमाहात्म्य.

पूर्वीं राथंतर कल्पामध्यें वीरधन्वा नांवाचा एक राजा होता. तो मृगया करण्याकरितां अरण्यांत गेला असतां संवर्तनामक ब्राम्हणाचे पांच मुलगे हरिणाचें रूप घेऊन एका झाडाखालीं तप करीत बसले होते, त्यांस पाहून हे हरीण आहेत, असें समजून त्यांच्यावर बाण सोडले; व त्या पांच हरिणास ठार मारिलें. मागून राजास हे मृग नसून ब्राम्हण आहेत, असें समजल्यामुळें आपण ब्रह्महत्त्या केली, असें त्यास वाटून त्या राजास फारच वाईट वाटलें. नंतर तो राजा देवरातनामक ब्राह्मणाकडे येऊन सर्व वर्तमान त्यास सांगता झाला. ब्राह्मण राजास म्हणतो कीं, तूं वराह अवतार घेणाऱ्या विष्णूकडे जा,म्हणजे तो पृथ्वीप्रमाणें तुझा उद्धार करील. असें त्या ब्राम्हणाचे लपंडावीप्रमाणें भाषण ऐकून त्या राजाला राग आला; व त्यानें तरवारीनें त्या ब्राह्मणाचा प्राण घेतला. नंतर राजा अरण्यांत हिंडत असतां पापमोहित होऊन एका गाईचा वध करता झाला. अशा तऱ्हेचीं मोठमोठीं पातकें करीत तो अरण्यांत हिंडूं लागला. पुढें एका झाडाखालीं आपला

घोडा बांधून श्रमित झाल्यामुळें त्याला तेथें झोंप आली, तितक्यांत पुष्कळसे मुसलमान त्या राजाला पकडण्याकरितां आले असतां त्या राजाच्या शरीरांतून एक देवता उत्पन्न झाली; व तिनें मुसलमानांचा पराजय केला. हें पाहून राजाला आश्चर्य वाटलें; व तो वामदेवाच्या आश्रमाकडे गेला. त्या राजाला वामदेव म्हणतो कीं, हे राजा ! तूं सोमवंशांत उत्पन्न झाला असून इतकें दुःख भोगीत आहेस, हें पाहून मला फार वाईट वाटतें; आतां मी तुझा उद्धार करितों. तूं महाकालवनामध्यें जाऊन जटेश्वराचें पूजन कर; म्हणजे तुझें सर्व पाप नष्ट होईल. नंतर वामदेवाच्या सांगण्याप्रमाणें तो राजा जटेश्वराचें पूजन करून शिवाचें ध्यान व स्तुति करिता झाला. त्यायोगें शंकरानें प्रसन्न होऊन त्या वीरधन्वा राजास पुण्यलोकाला नेलें. जे कोणी जटेश्वराचें पूजन करितील ते मुक्त होतील.

---

## अध्याय २९ वा.

### रामेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती ! पूर्वी त्रेतायुगामध्यें विष्णूच्या अंशभूतानें परशुराम नांवानें जमदग्नीपासून रेणुकेचे ठिकाणीं जन्म झाला. तो बापाची आज्ञा पाळणारा असल्यामुळें कांहीं कारणामुळें रेणुकेचें मस्तक तोडण्याविषयीं जमदग्नीनें परशुरामास आज्ञा केली. नंतर बापाच्या आज्ञेप्रमाणें परशुरामानें आपली माता जी रेणुका तिचें मस्तक तोडलें. नंतर जमदग्नीनें प्रसन्न होऊन परशुरामास वर दिला कीं, तूं सर्व पृथ्वी जिंकिशील, कोणीहि तुझा पराजय करूं शकणार नाहीं, असें म्हणून जमदग्नीनें परशुरामास एक कुऱ्हाड दिली. कांहीं दिवसानीं कामधेनु हरण करण्याच्या इराद्यानें कार्तवीर्यानें जमदग्नीला ठार मारिलें; त्या वेळीं बापाला ठार मारल्याबद्दल परशुरामाला राग आला; व त्यानें कार्तवीर्याला ठार मारिलें; व पृथ्वी मरीचपुत्र जो कश्यप त्याला दिली. नंतर परशुरामानें एकवीस वेळा निःक्षत्रिय पृथ्वी केली, परशुरामाला अनेक प्राण्यांची हत्या केल्यामुळें पश्चात्ताप झाला; व त्या पातकांच्या नाशार्थ त्यानें अश्वमेध यज्ञ केले; तथापि त्याला पापमुक्त झालोंसें वाटेना, नंतर परशुराम महेंद्रपर्वत, सह्यपर्वत, हिमालयपर्वत, इतक्याठिकाणीं हिंडून शेवटीं नर्मदानदीचेकाठीं आला. पुढें तो यमुना, चंद्रभागा, गंगा, इरावती, वितस्ता वगैरे तीर्थें व नद्या हिंडून सुद्धा पापमुक्त झाला नाहीं; त्यायोगें परशुराम चिंतातुर असतां तेथें नारद ऋषि प्राप्त झाले. नारदऋषीला पाहून परशुराम त्यांस म्हणतात; हे ऋषे ! मी पुष्कळ तीर्थें व क्षेत्रें हिंडूनहि माझें प्राणि हत्येचें पातक नाहींसें

झालें नाहीं, करितां, पापमुक्त होण्याचा एकादा उपाय असल्यास आपण मजला सांगा. नारद म्हणतात; तूं महाकालवनांत जाऊन शिवलिंगाचें पूजन कर,म्हणचे पापमुक्त होशील.असें सांगताच परशुरामानें नारदाच्या भाषणाव विश्वास ठेवून महाकालवनामध्यें जाऊन शिवलिंगाचें पूजन केलें. त्या पूजना मी प्रसन्न होऊन परशुरामास बोललो कीं, तुझी पूजा पाहून मी प्रसन्न आहे तुझें आज सर्व पाप नाहीसें झालें आहे; व आजपासून हें लिंग तुझ्या नावा म्हणजे रामेश्वर या नावानें प्रसिद्ध होईल. जे कोणी ह्या रामेश्वराचें दर्शन घेतील ते सर्व पापापासून मुक्त होऊन शेवटीं माझ्या लोकाला म्हणजे शिवलोकाला प्राप्त होऊन पुष्कळकाळपर्यंत राहतील.

---

# अध्याय ३० वा.

## च्यवनेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती ! आतां तिसावें च्यवनेश्वराचें माहात्म्य सांगतों भृगूचा पुत्र च्यवनऋषी पुष्कळ वर्षें तप करता झाला. पुष्कळ वर्षें तप केल्यामुळें त्यावर वारुळें सुद्धां वाढलीं होतीं; व त्याच्या सभोंवार मुंग्याहि पस रल्या होत्या. एकेदिवशीं शर्याति राजा चार हजार बायकांना बरोबर घेऊन फिरत फिरत जेथें च्यवन बसला होता तेथें आला; त्या राजाला सुकन्या नांवाची मुलगी होती. तिनें वारुळांतून चमकत असलेले च्यवनाचे डोळे पाहि व कौतुकानें एक काटकी घेऊन च्यवनाच्या डोळ्यांत घातली; व त्याचे डोळे फोडले. त्याच्या डोळ्यांतून रक्त वाहूं लागलें असां तें रक्त पाहून शर्याती घाब रून जाऊन सर्व लोकांजवळ चौकशी करूं लागला, त्यावेळीं सुकन्येनें आपल्या बापास सांगितलें कीं, मी खेळत असतां वारुळांत काजव्यासारखें कांहीं चमकत होतें, तें पाहून मी सहज तेथें काटकी खुपसली; व त्यायोगें हा रक्तप्रवाह सुरू झाला आहे. नंतर शर्याती च्यवनऋषीची वारुळाजवळ येऊन प्रार्थना करूं लागला. शर्याति म्हणतो; हे ऋषे ! ह्या मुलीनें तुझा मोठा अपराध केला आहे, करितां त्या अपराधाची आपण क्षमा करा; व ही माझी मुलगी त्या अप राधाच्या मोबदला मी तुम्हाला अर्पण करितों; असें म्हणून शर्यातीनें आपली सुक न्यानांवाची मुलगी च्यवनाला देऊन त्याला प्रसन्न करून घेतलें. आपली मुलगी च्यवनाजवळ ठेऊन स्वतः सर्व मंडळीसह तो राजा आपल्या देशाला गेला पुढें सुकन्या आपला पति जो च्यवनऋषि त्याची एकनिष्ठ मनानें सेवा करीत असतां एके दिवशीं तिच्या घरीं अश्विनौदेव प्राप्त झाले. नंतर अश्विनौदेवांनी

सुकन्येला ‘ तूं कोण ? कोणाची मुलगी ?’ वगैरे प्रश्न केल्यावर सुकन्या म्हणते कीं, मी शर्यातीची मुलगी व च्यवनाची बायको आहे. नंतर अश्विनौदेव म्हणतात; तूं राजकन्या असतां ह्या म्हाताऱ्या नवऱ्यांशीं काय म्हणून लग्न लाविलेस, करितां आतां ह्याला सोडून दुसरा एकादा तरुण नवरा शोधून त्याच्यापाशीं लग्न लाव. ह्याप्रमाणें अश्विनौदेवांचें भाषण ऐकून सुकन्येनें अश्विनौदेवांची निर्भर्त्सना करून मी ह्या च्यवनाशिवाय दुसऱ्यांना कधींहि वरणार नाहीं, असा निश्चयाचा पण सांगितला. ही सुकन्येची श्रद्धा व पतिभक्ति पाहून अश्विनौदेव प्रसन्न झाले; व त्यांनीं च्यवनास नेत्रयुक्त व तरुण असा केला; व सुकन्या आणि च्यवन मोठ्या आनंदानें एकत्र राहतीं झालीं. पुढें च्यवनऋषि सुकन्येला घेऊन महाकालवनामध्यें जाऊन शिवालिंगाचें पूजन करिता झाला. त्याच्या पूजनानें मी प्रसन्न होऊन च्यवनास सांगितलें कीं, आजपासून ह्या लिंगास च्यवनेश्वर हें नांव प्राप्त होईल; असें म्हणून च्यवन व सुकन्या यांस मुक्त करून शिवलोकीं आणिलें. जें कोणीं ह्याचें पूजन करितिल, ते मुक्त होऊन शिवलोकीं जातील.

---

# अध्याय ३१ वा.

## खंडेश्वरमाहात्म्य.

पार्वतीच्या प्रश्नावरून शंकर सांगतात, कीं त्रेतायुगामध्यें एक भद्राश्वनांवाचा राजा होता. त्याचें घरीं अगस्त्यऋषि येऊन मी तुझ्या घरीं सात दिवस राहणार आहे, असें त्यास त्यानें सांगितलें. नंतर राजानें त्याची अर्घ्यपाद्यादिकांनीं पूजा केली; व आपण येथें हवेतितके दिवस राहा; असें तो ऋषीस म्हणाला. त्या राजाची कांतिमती नांवाची एक बायको होती. राजा हा सतत स्वस्त्रीचे ठिकाणीं आसक्त असलेला पाहून अगस्त्यऋषी मनांत म्हणतो कीं, पहा ! हा राजा किती मूर्ख आहे कीं, महाकालवनामध्यें असणाऱ्या शिवलिंगाचें दर्शन घेण्याची बुद्धि ह्या राजास होत नाहीं. नंतर ह्याप्रमाणें त्या राजाचें सात दिवसपर्यंतचें आचरण पाहून अगस्त्यऋषि राजास म्हणतात; हे राजा ! मी इतके दिवस तुझ्या घरीं कां राहिलों ? हे तुम्हांपैकीं कोणालाहि समजलें नाहीं, तूं, तुझे प्रधान, तुझे उपाध्याय किती मूर्ख आहेत. हे राजा ! ही तुझी बायको पूर्वी विदिशा नगरांतील एका वैश्याची दासी होती. नंतर तो वैश्य महाकालवनामध्यें आपल्या ह्या दासीसह जाऊन तेथें शिवलिंगाचें पूजन करिता झाला. त्याच पुण्यप्रभावानें तोच वैश्य सांप्रत प्रियव्रताच्या घराण्यांत तूं ( भद्राश्व या नांवानें ) उत्पन्न झाला आहेस; व तीच दासी तुझी बायको झाली आहे. त्याच पूर्वपुण्या-

ईनें तुला राज्य, पत्नी, व संतती वगैरे सर्व सुखकारक प्राप्त झालें आहे. ह्याप्रमाणें अगस्त्याचें भाषण ऐकून भद्राश्वाच्या मनांत महाकालवनांत जाऊन शिवपूजन करावें, असें वाटून तो अंतःपुरांत गेला; व पत्नीसह अगस्त्यऋषीला बरोबर घेऊन; व इतर परिवारहि बरोबर घेऊन महाकालवनांत प्राप्त झाला; व तेथें च्यवनेश्वराच्या संनिध असणारें जें लिंग त्याच पूजन केलें. तत्काळ मी तेथें प्रगट होऊन व राजास अनेकप्रकारचे आशीर्वाद दिले. त्या शिवलिंगाच्या प्रभावानें भद्राश्वाचीं आजपर्यंतची सर्व अर्धवट ( खंडित ) झालेलीं व्रतें पूर्णतेला पावून त्यांचेंहि पुण्य त्या राजास मिळाल्यामुळें तो तत्काल मुक्त होऊन शिवलोकीं जाऊन राहता झाला. त्या दिवसापासून ह्याला खंडेश्वर हें नांव प्राप्त झालें आहे. ह्याच्या दर्शनानें व पूजनानें कोणतेहि कर्म खंडित न होतां मोक्ष मिळतो.

## अध्याय ३२ वा.

### पत्तनेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वती ? तुझ्यासह मी मंदरपर्वतावर क्रीडा करीत असतां तूं मला विचारलेस कीं, सर्व गुणांनीं युक्त असा कैलासपर्वत सोडून आपण ज्याठिकाणीं कोणत्याही प्रकारची शोभा नाहीं, अशा महाकालवनामध्यें कां राहतां. नंतर त्यावेळीं मी तुला बोललों कीं, महाकालवन हें मला स्वर्गादि सुखाहून अधिक सुखकर वाटतें. त्याठिकाणीं एक पत्तनेश्वर नांवाचें स्थान आहे; तसें स्थान सर्व त्रैलोक्यांत मला कोठेंहि दिसत नाहीं. इतकें जो तुझें व माझें भाषण होत आहे, तोंच माझ्या दर्शनाकरितां नारदऋषि मंदरपर्वतावर आले. ते येतांच मी नारदास विचारलें कीं, आपण त्रैलोक्यांत हिंडतां तेव्हां कांहीं विशेष आश्चर्यकारक वर्तमान पाहिलें असल्यास सांगावें. तें माझें भाषण ऐकून नारदऋषि मला म्हणतात कीं, मी पुष्कळ पुण्यस्थानें हिंडलों; परंतु महाकालवनांत असणाऱ्या पत्तनेश्वराइतकें श्रेष्ठ स्थान मला कोठेंहि दिसलें नाहीं, असा पत्तनेश्वराचा महिमा अगाध आहे. पत्तनेश्वर प्रसन्न झाला असतां जन्म, मृत्यु, जरा ( वृद्धावस्था ) रोग, दुःखें सर्व नाश पाऊन आत्यंतिक असें सुख प्राप्त होतें.

## अध्याय ३३ वा.

### आनंदेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती ! पूर्वी राथंतर कल्पामध्यें अनमित्र नांवाचा राजा होता. त्यानें गिरिभद्रा नांवाच्या एका पर्वताच्या मुलीशीं आपलें लग्न

लाविलें. त्या राजाला तिचे ठिकाणीं एक आनंद नांवाचा पुत्र झाला. तो उत्पन्न होताच मातेच्या मांडीवर बसून मोठ्यांदा हास्य करिता झाला; व आपल्या मातेला आलिंगन देऊन ह्मणता झाला की, हे माते ! जो तो आपआपला स्वार्थ पाहात असतो, मी खरा तुझा मुलगा नसून मी विक्रांतनावाच्या ब्राह्मणाचा मुलगा आहे; व तुझा मुलगा चैत्रनांवाचा असून तो विक्रांताच्या घरीं आहे व त्यास वैदिक संस्कारहि झालेले आहेत. ही अदलाबदल दुःसह नांवाच्या ब्राह्मणाच्या जातहरिणी नावाच्या मुलानें केलेली आहे. हें सर्व कृत्य तुला माहित नाहीं; पण मला सर्व कांहीं माहित आहे. व त्यामुळें मला आश्चर्य वाटून हसूं आलें. आतां मी अरण्यांत तप करण्याकरितां जातो; व तूं चैत्रनावाच्या मुलाला इकडे आण. अशी सर्व हकीगत ऐकून अनमित्राला व त्याच्या गुरूला व इतर मंडळीला फार आश्चर्य वाटलें. नंतर त्यांनीं आनंदावरची ममता सोडून त्यास तपश्चर्येकरीतां अरण्यांत जाण्याची परवानगी दिली; व चैत्राला परत आणून अनमित्रानें आपल्या राज्यावर बसविलें, आनंद हा महाकालवनांत जाऊन मोठी तपश्चर्या करिता झाला, आनंदानें इंद्रेश्वराच्या पश्चिमदिशेला असणाऱ्या एका शिवालिंगाचें पूजन करून त्याची आराधना केली. आनंदाची भक्ति पाहून मी त्याला मनु हो, असा वर दिला. हाच सहावा मनु आनंदनांवाचा झाला. व आनंदानें महकालवनांत ज्या लिंगाचें पूजन केलें. त्यास आनंदेश्वर असें नांव प्राप्त झालें. जे कोणी आनंदेश्वराचें पूजन करतील किंवा दर्शन घेतील त्यांचीं सर्व पापें नाहींशीं होऊन ते अंतकाळीं शिवलोकीं गमन करितील.

---

## अध्याय ३४ वा.

### कंथडेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती ! आतां चौतिसाव्या कंथडेश्वराचें माहात्म्य सांगतो; ऐका. वितस्तानदीचेकाठीं पांडव नांवाचा एक दरिद्री ब्राह्मण राहत असे. तो दरिद्री असल्यामुळें इष्टमित्र बांधवांनीं; फारतर काय त्याच्या बायकोनें सुद्धा त्याला सोडून दिलें होतें. त्या ब्राह्मणाजवळ फक्त कंथा म्हणजे घोंगडी मात्र राहिली होती. त्या ब्राह्मणानें पुत्रप्राप्तीच्या इच्छेनें माझी तपश्चर्या केली. नंतर मी प्रसन्न होऊन तुला पुत्र होईल, असा वर दिला. अकस्मात् त्या ब्राह्मणाच्या घोंगडींतून ( कंथेंतून ) एक पुत्र उत्पन्न झाला. तो मुलगा साहा वर्षाचा झाल्यावर त्याची त्या ब्राह्मणानें मुंज लाविली; व ह्या माझ्या मुलाला दीर्घायुष्य प्राप्तीकरितां आशीर्वाद द्या, अशी ऋषींची प्रार्थना केली. ह्याप्रमाणें पांडवब्राह्मणाचे

भाषण ऐकून ऋषि कांहींहि प्रत्युत्तर न देते झालें. त्या वेळीं पांडवाला वाईट वाटलें; व तो ज्ञानदृष्टीनें पुत्राच्या आयुष्याबद्दल विचार करूं लागला; व पाहतों तों आपला पुत्र अल्पायु आहे, असें त्यास आढळून आलें. नंतर पांडव अल्पायु अशा पुत्राला अवलोकन करून फार शोक करूं लागला, त्या वेळीं तो पुत्र पांडवाला म्हणतो कीं, मी शंकराला प्रसन्न करून आपलें आयुष्य वाढवून घेईन, आपण बिलकूल काळजी करूं नका. नंतर पांडव पुत्राला म्हणतो कीं, तूं लहान आहेस, तुला रुद्राची अजून ओळखहि नाहीं, तूं शंकराला कसा प्रसन्न करून घेणार. नंतर तो पुत्र बापाला म्हणतो; मी येथें पूर्वी एकदा खेळत असतां एका सिद्धाची मला भेट झाली. त्यानें मी अल्पायु आहे, असें जाणून, प्रेमानें दीर्घायु होण्याचा मला एक उपाय सांगितला; तो असा कीं, महाकालवनामध्यें एक आनंदेश्वराच्या दक्षिणेस शिवलिंग आहे, त्याचें तूं पूजन कर; म्हणजे दीर्घायु होशील. करितां मी आतां तेथें जाऊन व शिवलिंगाचें पूजन करून दीर्घायुष्य मिळवितों. असें म्हणून तो तेथून निघून महाकालवनांत असणाऱ्या शिवलिंगाचें पूजन करिता झाला, त्यायोगें मी प्रसन्न होऊन त्या पुत्रास दीर्घायुष्य दिलें; व तो पुत्र कंथेपासून झाल्यामुळें त्याचें नांव कंथ असें ठेविलें व त्या कंथानें ज्या लिंगाचें पूजन केलें त्यास कंथडेश्वर असें नांव प्राप्त झालें. जे कोणी कंथडेश्वराचें पूजन करितील त्यांचीं सर्व पातकें नष्ट होऊन, ते दीर्घायुषी होतील.

---

## अध्याय ३९ वा.

### इंद्रेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पूर्वी त्वष्ट्याला कुशध्वज नांवाचा एक पुत्र झाला असता त्या कुशध्वजाचा इंद्रानें नाश केल्यामुळें त्वष्ट्याला राग आला; व आपल्या मस्तकांतील जटेचा एक केंस उपटून तो त्यानें अग्नींत टाकिला, त्याक्षणींच त्या अग्नींतून वृत्र नांवाचा एक दैत्य उत्पन्न झाला. आपल्याला मारण्याकरितां त्वष्ट्यानें अग्नीपासून उत्पन्न केलेल्या वृत्राला पाहून इंद्राला मोठी काळजी वाटूं लागली. वृत्र इंद्राला मारण्याकरितां स्वर्गांत येऊन देवांसह सभेंत बसलेल्या इंद्राला युद्धाकरितां बोलाविता झाला. नंतर वृत्राचें व इंद्राचें मोठें युद्ध सुरू झालें. शेवटीं देवांचा पराजय करून; व इंद्राला बंदिखान्यांत ठेऊन वृत्र स्वतः स्वर्गाचें राज्य करिता झाला. ही वार्ता बृहस्पतीला समजताच त्यानें इंद्राला वृत्राच्या बंधांतून मुक्त केलें. इंद्रानें वृत्राचा पराजय होण्याविषयीं बृहस्पतीला

उपाय विचारिला असतां बृहस्पति म्हणतो; हे इंद्रा ! तूं महाकालवनांत जाऊन खंडेश्वराच्या दक्षिणेस एक शिवलिंग आहे, त्याचें पूजन कर; म्हणजे तुझ्या सर्व इच्छा पूर्ण होतील. ह्याप्रमाणें बृहस्पतीचें भाषण ऐकून इंद्र तत्काळ महाकालवनांत जाऊन शिवलिंगाचे पूजन करिता झाला; व इंद्रानें पुष्कळप्रकारें माझी स्तुति केली. त्याच्या स्तुतीनें प्रसन्न होऊन मी इंद्राला सांगितलें कीं, हे इंद्रा ! तुझ्या स्तुतीनें मी प्रसन्न झालों आहे; वर माग. असें भाषण श्रवण करून इंद्राला आनंद झाला; व त्यानें वृत्राला मारण्याविषयीं माझी विनवणी केली. त्यानें माझ्या सांगण्याप्रमाणें हातांत समुद्राचा फेंस घेऊन वृत्रावर फेकला, त्यायोगें त्या वृत्राचा नाश झाला. नंतर इंद्रानें हळू हळू सर्व इतर दैत्यांचा नाश केला. इंद्रानें ह्या लिंगाचें पूजन केलें व त्यायोगें वृत्रासुराचा नाश केला; व सर्व देवहि सुखी झालें; म्हणून ह्याला इंद्रेश्वर हें नांव प्राप्त झालें आहे. इंद्रेश्वराचें पूजन करणारा कितीहि पापी असला, तरी तो निष्पाप होऊन; व ह्या लोकांत अखंड सुख भोगून अंतकालीं शिवपुराला गमन करितो. जे कोणी इंद्रानें पूजिलेल्या इंद्रेश्वरलिंगाचें पूजन करितील, ते चार कल्पपर्यंत श्रेष्ठ अशा मोक्षस्थानाला जाऊन राहतील. ज्यानें ह्या एका इंद्रेश्वराचें पूजन केलें असेल, त्याला विष्णु, इंद्र वगैरे देव, ऋषि, लोकपाल ह्यांचें पूजन केल्याचें श्रेय मिळतें.

## अध्याय ३६ वा.

### मार्कण्डेयेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती ! पूर्वी मृकंड या नांवाचा एक ब्राह्मण होता. त्याला पुत्र नसल्यामुळें पुत्रप्राप्तीकरितां तो घोर तपश्चर्या करिता झाला. नंतर मी संतुष्ट होऊन मृकंडास सांगितलें कीं, तूं महाकालवनामध्यें जाऊन पत्तनेश्वराच्या पूर्वेस पुत्रप्राप्ती करून देणारें शिवलिंग आहे, त्याचें पूजन कर; म्हणजे तुला लवकरच पुत्र होईल. नंतर तो माझ्या सांगण्याप्रमाणें महाकालवनांत जाऊन लिंगपूजन करिता झाला. त्याची ती माझ्याविषयीं भक्ती पाहून कांहीं काळानें तुझ्यासह मी त्या लिंगांतून उत्पन्न होऊन मृकंडाला दर्शन दिलें; व 'वर माग' असें आपण मृकण्डास विचारिलें. त्यावेळीं मृकंड म्हणतो कीं, मला पुत्र व्हावा एवढीच माझी इच्छा आहे; व तो तुझ्या कृपेनें होईल, अशी माझी खात्री आहे; व म्हणूनच मी ही तपश्चर्या करीत आहे. नंतर आपण मृकंडाला तुझ्या सर्व इच्छा पूर्ण होतील, असा वर दिला. नंतर त्या मृकंडाला मार्कण्डेय नांवाचा मुलगा झाला. मार्कण्डेयानेंहि तेथेंच म्हणजे महाकालवनामध्यें शिवलिंगाचें पूजन केलें. मार्कण्डेयानें केलेल्या लिंगपूजनानें मी संतुष्ट

झालो; व त्यास सांगितलें कीं, ज्यापेक्षां तूं ह्या लिंगाचें पूजन केलेस त्यापेक्षां हें लिंग तुझ्या नांवानेंच प्रसिद्ध होईल. त्या दिवसापासून त्या लिंगाला मार्कण्डेयेश्वर हें नांव प्राप्त झालें आहे. जे कोणी ह्या मार्कण्डेयेश्वराचें पूजन करितील ते सदा सुखांमध्यें राहून अंतीं शिवलोकाला प्राप्त होतील; व त्यांस दीर्घायुष्य मिळून ते दुःख, दारिद्र्य इत्यादिकानें रहित होतील. ह्याप्रमाणें मी मार्कण्डेयाला त्या लिंगाचा महिमा सांगितल्यावर मार्कण्डेय पुनः कांहीं काळपर्यंत तेथेंच तपश्चर्या करिता झाला; व त्यायोगें मार्कण्डेय ऋषी दीर्घायुष्य मिळवून सुखानें राहिला.

## अध्याय ३७ वा.

### विश्वेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पूर्वीं ब्रह्मकल्पामध्यें रिपुंजय नांवाचा एक राजा महाकालवनामध्यें राहत असे. एकदां मी त्या राजाचें सत्त्व पाहण्याकरितां किंवा त्या राजाची सदाचरण बुद्धि कसोटीला लावण्याकरितां भिक्षुकाचा वेष घेऊन; व पुष्कळ वनस्पती जवळ बाळगून मोठ्या थाटानें महाकालवनामध्यें प्रवेश केला. त्यावेळीं भिक्षुवेषधारी मी खांद्यावर नगारा घेऊन; व तो वाजवून 'मी वैद्य आहे, कोणाला औषध वगैरे पाहिजे असल्यास मजकडे या,' अशी गांवांतून दवंडी पिटविली. ती दवंडी ऐकून गांवांतील पुष्कळ लोक मजकडे येऊन औषध घेत असत. ह्याप्रमाणें मी चौदा वर्षे तेथें राहिलों; परंतु राजाच्या आचरणांत मला किंचित् सुद्धां फरक दिसला नाहीं. अखेर मी निराश होऊन परत जाणार इतक्यांत त्या राजाची एक संतानरहित अशी बायको होती. तिनें भिक्षु वेषधारी अशा माझ्याशीं संभोग करण्याची इच्छा मनांत धरून आपल्या एका दासीला मजकडे पाठविलें. नंतर मी सांगितलें कीं, राजाच्या सांगण्यावाचून किंवा परवानगीवांचून मी राजमंदिरांत येणार नाहीं. असा माझा निरोप ऐकून राजाच्या बायकोला फार वाईट वाटलें; व आतां राजाचें मन आपल्याकडे कसें वळवावें, ह्याबद्दल ती विचार करूं लागली, नंतर राजाच्या बायकोनें आजारीपणाचें सोंग घेतलें. बायको आजारी आहे, हें ऐकून राजा स्वतः तिच्या दर्शनाकरितां अंतःपुरांत गेला. तिची व्याधी दूर होण्याकरितां राजानें मला आपल्या घरांत बोलावून आणिलें. मी त्याठिकाणीं येतांच त्यांच्या आचरणानें संतुष्ट होऊन त्यांस त्याठिकाणीं शिवलिंगस्वरूपानें प्रगट झालो. तें पाहून राजाला; व इतरांना मोठा आनंद झाला; व मी भिक्षु नसून प्रत्यक्ष शिवच आहे, असें समजून राजा पत्नीसह माझ्या लिंगाची प्रार्थना करून पुत्रप्राप्तीची याचना करूं लागला. त्या वेळीं तुला पुत्र होईल, असा मी त्यास वर दिला. या प्रमाणें सर्व व्यवस्था झाल्या-

चर मी मंदरपर्वतावर निघून गेलों. त्या दिवसापासून ह्या लिंगाला विश्वेश्वर हें नांव प्राप्त झालें आहे. जे कोणी ह्याचें दर्शन घेतील, ते ज्ञानी होऊन मुक्त होतील; व त्यांस पुत्र, धन, धान्य वगैरेंहि मिळून अनंत यज्ञ केल्याचें पुण्यहि मिळेल.

## अध्याय ३८ वा.

### कुसुमेश्वराचें माहात्म्य.

शंकर म्हणतात; कुसुमेश्वर हें अडतीसावें लिंग आहे. पूर्वीं वैवस्वत मन्वंतरामध्यें वाराहनांवाच्या कल्पांत मी तुझ्यासह एके दिवशीं महाकालवनांत द्यूत खेळत असतां एक मोठा शब्द उत्पन्न झाला. त्यावेळीं तूं मला शब्दोत्पत्तीचें कारण विचारलें असतां मी तुला सांगितलें कीं, कुसुम म्हणजे फुलें यांनीं भूषित झालेले शिवगण क्रीडा करीत आहेत, त्यामुळें हा ध्वनि उत्पन्न होत आहे. नंतर शिवगणांशीसह क्रीडा करणाऱ्या वीरकाला पाहून हा आपला पुत्र असावा, अशी तुला इच्छा झाली. नंतर मी तुला पुत्ररूपानें वीरकनामक गणाला अर्पण केलें, तूं वीरकाचें मोठ्या प्रेमानें चुंबन घेतलेंस; व पुनः खेळावयास जा, असें म्हणून त्यास परत पाठविलेंस. तूं मला सांगितलेस कीं, ह्या माझ्या वीरक नामक पुत्राला आपलें ऐश्वर्य अर्पण करा. ह्याला लोकपाल करून सर्व गणामध्यें श्रेष्ठ करा, ह्याच्या नांवानें एक शिवलिंग ह्या महाकालवनामध्यें स्थापित करा; व ब्रह्मादि सर्व देव ह्याला वंदन करितील असें करा. असें सांगितल्यावर मी त्याप्रमाणें सर्व करून पुष्पा ( कुसुमा ) नें भूषित अशा वीरकाला आणून त्याच्याकडून एक शिवलिंग स्थापित कलें; व त्याचें नाम कुसुमेश्वर असें ठेविलें. जे कोणी कुसुमेश्वराचीं कुसुमांनीं म्हणजे पुष्पांनीं पूजा करितील, ते शिवलोकाला प्राप्त होतील. ह्याप्रमाणें कुसुमेश्वराचा प्रभाव फारच अवर्णनीय आहे.

## अध्याय ३९ वा.

### अक्रूरेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वती! तूं शक्तिस्वरूप धारण करून कल्पाच्या अगोदर सर्व त्रैलोक्य निर्माण केलेंस; त्यावेळीं सर्वांनीं तुझीं स्तुति केली; परंतु भृंगिरिटीनें तुझी स्तुति केली नाहीं. त्यावेळीं तुला राग आला; व तूं भृंगिरिटीला शाप

दिलास कीं, ज्यापेक्षां तूं आपल्या मनांत क्रूरबुद्धि निर्माण करून माझा अपमान केलास त्यापेक्षां तू मनुष्यजन्म धारण करून, मृत्युलोकांत राहशील. नंतर त्यास तात्काळ मनुष्य देह प्राप्त झाला. पुढें कांहीं काळानें पुष्करद्वीपामध्यें जाऊन तो भयंकर तपश्चर्या करूं लागला. त्याचा घोर तपश्चर्या पाहून ब्रह्मदेव विष्णु, व मी त्याचे जवळ जाऊन सांगितलें कीं, तूं पार्वतीची आराधना कर; म्हणजे तुझें कल्याण होईल. ह्याप्रमाणें सांगितल्यावर त्यानें तुझी प्रार्थना केली. नंतर तूं प्रसन्न होऊन मनुष्यजन्म घेतलेल्या भृंगिरिटीला सांगितलेंस कीं, तूं महाकालवनामध्यें अक्रूर नांवानें जन्म घेशील, व नंतर शिवलोकाला प्राप्त होशील, तुझ्या सांगण्याप्रमाणें त्याला अक्रूराचा जन्म प्राप्त झाला, व बलदेवादि यादवांसह तो अक्रूर महाकालवनामध्यें अंकपादेश्वराजवळ असणाऱ्या शिवलिंगाचें पूजन करिता झाला. त्यायोगें तुझ्या सांगण्याप्रमाणें तो अक्रूर मुक्त होऊन कैलासाला येऊन पुनः भृंगिरिटीगण ह्या नांवानें ईश्वररूप होऊन राहिला. अक्रूरानें ज्या लिंगाचें महाकालवनामध्यें पूजन केलें, त्याला अक्रूरेश्वर हे नांव प्राप्त झालें. जे कोणी ह्या अक्रूरेश्वराचें पूजन करितात, ते सर्व पापापासून व शापापासून मुक्त होऊन, व दिव्य विमानांत बसून शिवलोकीं गमन करितात.

---

## अध्याय ४० वा.

### कुण्डेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे देवी ! तूं मला एकदां वीरकनामक पुत्राला भेटण्याच्या इच्छेनें विचारिलें असतां तो महाकालवनामध्यें पाण्यात उभा राहून तप करीत आहे, असें मी तुला प्रत्युत्तर दिलें. नंतर तुझ्यासह मी बैलावर बसून; व आपलें शिवगण बरोबर येऊन वीरकाच्या दर्शनाकरितां निघालो. बैल (नंदी) वेगानें धांवत चालल्यामुळें तो वेग तुला सहन न होऊन तूं मला म्हटलेंस कीं, मी फार दमल्यें आहे, करितां आपण नंदीवरून उतरून थोडेंसें चालूं या; व मग आपण पुनः बैलावर बसूं. नंतर मी तुला बोललों कीं, ह्या पर्वताच्या पायथ्याशीं आपण जरा वेळ विश्रांति घेऊं. असें म्हणून मी तुला खाली उतरिलें; व तुझ्याजवळ आपलें गण ठेऊन मी जरा वनशोभा पाहण्याकरितां, व मृगया करण्याकरितां त्या पर्वतावर गेलो. तेथील वनशोभा पाहात पाहात फिरत असतां दहा वर्षें लोटलीं. मला येण्याला फार वेळ लागला, हें पाहून तूं माझ्याबद्दल काळजी करूं लागलीस. त्यावेळीं कुण्ड नांवाचा गणाध्यक्ष तुझी समजूत करूं लागला, कीं शंकर हे पहा ! इकडेच येत आहेत. थोड्याच वेळांत त्यांची गांठ पडेल. असें

कुण्डनामक गणाचें भाषण ऐकून पुन: बराच वेळ गेला, तरी शंकराचें दर्शन नाहीं असें पाहून व कुंडानें माझी समजूत घालण्याकरितां खोटेंच सांगितलें; असें समजून तूं कुंडाला शाप दिलास कीं, तूं ज्यापेक्षां खोटें बोललास त्यापेक्षां तुला मनुष्यजन्म प्राप्त होईल. इतकें तुझें व कुण्डाचें भाषण होतें न होतें तोंच मी तुझ्याजवळ प्राप्त झालों. तूं मला कुंडाला शाप दिल्याची हकीगत सांगितलीस. मी कुण्डाला बोललों कीं, तूं महाकालवनांत जाऊन भैरवेश्वराच्या उत्तरेला असणाऱ्या शिवलिंगाचें पूजन कर म्हणजे शापमुक्त होशील. कुण्डगणानें त्याप्रमाणें शिवलिंगाचें पूजन केल्यामुळें तो शापमुक्त होता झाला. त्याठिकाणीं गंधर्व, सिद्ध, ऋषि वगैरे येऊन तेहि शिवलिंगाचें पूजन करून कृतार्थ होते झाले. कुण्डानें पूजन केलल्या लिंगाला कुंडेश्वर हें नांव प्राप्त झालें. जे कोणी कुण्डेश्वराचें पूजन करतील, ते कुंडगणाप्रमाणें शापमुक्त होऊन अंती शिवलोकीं जातील.

---

## अध्याय ४१ वा.

### लुंपेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती ! मुसलमानी राज्यांत एक लुंपनांवाचा राजा होता. त्याची विशाला नांवाची सुंदर बायको होती. त्याला युद्ध करण्याची इच्छा असतां तो ब्राह्मणांना विचारिता झाला कीं, मी कोणाबरोबर युद्ध करावें. ब्राह्मणांनीं त्या राजास सांगितलें कीं, तूं सामगनांवाचा एक ब्राह्मण आहे, त्याच्यांबरोबर युद्ध कर नंतर तो लुंपराजा आपलें काहीं सैन्य बरोबर घेऊन सामगनांवाच्या ब्राह्मणाकडे गेला. नंतर सामगब्राह्मणानें त्या लुंपराजाचा मधुपर्कादिविधानें आदरसत्कार केला. राजानें तुझी होमाकरितां ठेविलेली जी गाय आहे ती मला दे अशी त्या ब्राह्मणाजवळ याचना केली. याचना ब्राह्मणानें अमान्य केल्यामुळें लुंपाला राग आला; व त्यानें सर्व आश्रमाचा विध्वंस करून ती गाय घेऊन तो राजा परत आपल्या राजधानीकडे जावयास निघाला. त्यावेळीं सामग ब्राह्मण राजास म्हणतो; हे राजा तूं गाय नेण्याचें साहस करूं नको; तुझें त्यांत कल्याण होणार नाहीं, हें ब्राह्मणाचें भाषण ऐकून राजाला पुनः राग आला; व रागानें त्या ब्राह्मणावर शेंकडों बाण सोडिले व त्या सामग ब्राह्मणाचा प्राण घेतला; तो राजा गायीला घेऊन आपल्या राजधानींत गेला असतां थोड्याच वेळांत सामगाचा मुलगा समिधा दर्भ आणण्याकरितां रानांत गेला होता. परत आश्रमांत येऊन पाहतो तो सर्व आश्रमाचा विध्वंस केला आहे; व कोणीतरी दुष्टानें माझ्या बापाला शेंकडों बाण मारून त्याचा प्राण

घेतला आहे; असें त्यास आढळून आले व तो फारच शोक करूं लागला. नंतर मुलानें आपला बाप जो सामग त्याचें प्रेतकार्य वगैरे यथोक्त केलें; व त्या मुलाला फारच अतिशय दुःख झाल्यामुळें दुःखाच्या आवेशांत त्यानें राजास शाप दिला कीं, ज्यानें माझ्या बापाला मारिलें, तो कुष्ठरोगी होऊन नाश पावेल. थोड्याच दिवसांत लुंपराजा कुष्ठरोगी झाला. त्यानें त्या रोगाच्या नाशार्थ पुष्कळ औषधोपचार केले, परंतु ब्राह्मणाच्या शापप्रभावानें गुण न येतां उलट तें कुष्ठ अधिकाधिक बलवान् होत चाललें. राजा त्या रोगाला कंटाळून; व आत्महत्त्या करण्याच्या उद्देशानें एक चिता तयार करून अग्नींत उडी टाकणार इतक्यांत नारदऋषि तेथें प्राप्त झाले. नंतर लुंपराजानें नारदाची स्तुति केली व यथाधिकार आदरातिथ्यहि केलें. राजा नारदास कुष्ठरोग प्राप्त होण्याचें कारण विचारीत असतां नारद म्हणतात; हे राजा ! तुला ब्राह्मणाचा शाप झाल्यामुळें हा रोग उत्पन्न झाला आहे. जर तूं महाकालवनामध्यें एक कुष्ठरोगाचा नाश करणारें लिंग आहे, त्याचें पूजन करशील तर ब्रह्मशापापासून मुक्त होशील; व त्यायोगें कुष्ठरोगहि तुझा नाहींसा होईल. याप्रमाणें नारदानें सांगितल्यावर लुंपराजा महाकालवनांत येऊन, व शिप्रानदीवर स्नान करून केशवार्केश्वराच्या पूर्वेस ह्या असणाऱ्या लिंगाच्या पूजनानें दिव्यदेही होता झाला. लुंपानेंच प्रथम ह्या लिंगाचें आराधन केलें; व त्यायोगें त्याचें कुष्ठहि नाहींसें होऊन तो दिव्यदेही झाला; म्हणून त्या लिंगाचें नांव लुंपेश्वर असें मी ठेविलें आहे. तो राजा सर्व ब्राह्मणांचा सत्कार करीत परत आपल्या घरीं आला. जे कोणी लुम्पेश्वराचें पूजन करीतील त्याचीं सर्व पापें नाहींशीं होऊन ते दिव्यदेही होतात अंतःकाळीं शिवलोकीं जातील.

---

## अध्याय ४२ वा.

—:०:—

### गंगेश्वरमहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वती ! जगताला उत्पन्न करण्यास कारणीभूत असे जे नारायणाचे पाय त्यापासून गंगेची उत्पत्ती आहे. गंगा प्रथम तीन मार्गानें वाहत जाऊन अमृताच्या उत्पत्तीला कारणीभूत असा जो सोम त्यामध्यें शिरली नंतर ती सूर्यप्रकाशानें वृद्धिंगत होऊन चार मार्गानें मेरुपर्वतावर पडली. मेरूमंदार वगैरे पर्वतांतून निरनिराळ्या तऱ्हेनें ती वाहूं लागली असतां तिचा एक प्रवाह सीता या नांवानें चैत्ररथवनांत वाहूं लागला, दुसरा प्रवाह गंधमादन पर्वतापासून निघून अलकनंदा या नांवानें दक्षिणदिशेकडे वाहूं लागला. व तोच प्रवाह पुढें मानससरोवराला वेढून त्रिशिखरपर्वताकडे वाहत

वाहत गेला. पुढें तिसरा प्रवाह मेरुपर्वतापासून जो निघाला तो थेट हिमालय पर्वतावर येऊन पोंहचला. तेथें तो प्रवाह मी आपल्या जटेंत धरून ठेविला. त्यामुळें गंगेला राग येऊन तिनें माझें शरीर भिजवून टाकिलें. पुष्कळ वर्षें लोटल्यावर भगीरथानें ज्या वेळीं माझी आराधना केली तेव्हां ती मी पुनः जटेंतून काढून सोडून दिली. ती गंगा पुनः तीन मार्गीनें वाहूं लागली. त्यापैकीं एक प्रवाह महाकालवनांत येऊन उत्तर देश व कुरुदेश ह्यांना व्यापून समुद्राला मिळता झाला. एके दिवशीं देव ब्रह्मदेवाची उपासना करीत असतां समुद्र आपली पत्नी जी गंगा तिला घेऊन स्वर्गाला गेला, त्यावेळीं मोठा वारा सुटून गंगेचें वस्त्र वर उडून गेलें असतां लाजेनें देवांनीं खालीं माना केल्या, परंतु महाभिष नांवाचा एक राजा होता, त्यानें गंगेचें निर्लज्जपणानें सर्व अवयव पाहिल्यामुळें ब्रह्मदेवाला तें दुष्ट कपट समजून तूं मनुष्यलोकांत जन्म घेशील, असा त्यास शाप दिला. समुद्रालाही गंगेच्या मनांत कपट उत्पन्न झालेलें पाहून तूंही मनुष्यलोकीं दुःख भोगशील, असा समुद्रानें गंगेला शाप दिला. त्यावेळीं गंगा समुद्राला म्हणते कीं, वाऱ्यानें माझें वस्त्र वर झालें त्यांत माझा कांहीं अपराध नाहीं, असें असतां मला शाप देण्याचें कारण काय? असें म्हणून गंगा फारच दुःख करूं लागली, नंतर ब्रह्मदेव गंगेला म्हणतात, कीं तूं महाकालवनांत जाऊन शिप्रानदीच्या दक्षिणेस एक लिंग आहे, त्याचें पूजन कर; म्हणजे शापमुक्त होशील. नंतर ब्रह्मदेवाच्या सांगण्याप्रमाणें गंगा शिप्रानदीवर येऊन शिवलिंगाचें पूजन करून शापमुक्त होती झाली. त्या दिवसापासून त्या लिंगाला गंगेश्वर नांव प्राप्त झालें. जे गंगेश्वराचें पूजन करितील, ते सर्व पापापासून; व शापापासून मुक्त होतील.

---

## अध्याय ४३ वा.

### आंगारेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वति! आदिकल्पामध्यें माझ्यापासून पृथ्वीचे ठिकाणीं लालवर्णाचा व वांकड्या अंगाचा असा अंगाऱ्या (निखाऱ्या) सारखा पुत्र झाला; म्हणून त्या पुत्राचें नांव अंगार असें ठेविलें, त्यालाच भूमिपुत्र, मंगळ अशीं अनेक नांवें आहेत. अंगाराची उत्पत्ति झाली, तेव्हां त्रैलोक्य कांपूं लागलें, व सर्व देवांना भीति वाटली. समुद्र आपली मर्यादा उल्लंघन करूं लागला; व पर्वत हलूं लागले, अशी जगाची भयंकर स्थिति होऊन गेली. नंतर ही स्थिति पाहून वालखिल्य ऋषि; व इंद्रप्रमुख देव बृहस्पतीला पुढें करून ब्रह्मदेवाकडे गेले; व त्यास सर्व हकीगत सांगते झाले. नंतर ब्रह्मदेव त्यांना घेऊन

मजकडे आले, व सर्व वृत्तांत सांगते झाले. ब्रह्मादि देवांच्या कल्याणाकरितां मी अंगाराला येथें बोलाविलें; व सांगितलें कीं, तुला लोकांचें मंगल व्हावें, एवढ्याकरितां उत्पन्न केलें असतां तूं सर्वांना पीडा कां देतोस? करितां तूं महाकालवनामध्यें जाऊन गंगेश्वराच्या पूर्वेस एक स्थान आहे; जेथें शिप्रानदी; व स्वर्गता नदी ह्याचा संगम झाला आहे, तेथें जाऊन राहा; व कोणालाहि तूं पीडा देऊं नकोस. अशाप्रकारें मी आपल्या मुलाला म्हणजे अंगाराला मांडीवर घेऊन उपदेश केला. मी स्वतः लिंगस्वरूप धारण करून स्वर्गता व शिप्रा यांच्या संगमावर जाऊन राहिलों. अंगारहि माझ्या सांगण्याप्रमाणें महाकालवनांत जाऊन माझ्या लिंगाचें पूजन करितां झाला. त्या दिवसापासून त्या लिंगाला लोक अंगारेश्वर या नांवानें पुजा करूं लागले. अंगारानें माझी पूजा केली; म्हणून प्रसन्न होऊन त्यास नवग्रहामध्यें तिसरे स्थान दिलें; तसेंच अंगाराला वर दिला कीं, तुझ्या वारी चतुर्थी तिथी आली असतां जे व्रतादि करतील व तुझे पूजन करितील ते सर्व मला पोंहोंचेल. जे कोणी तुझ्या वारीं नवीन वस्त्र नेसतील; अथवा विद्यारंभ करितील; किंवा तेल लावून स्नान करितील ते दरिद्री व निर्बल होतील; अशाप्रकारें सांगून मी स्वस्थानीं निघून गेलों. जे कोणी अंगारेश्वराचें पूजन करितील, त्यांस पुनः जन्म घ्यावा लागणार नाहीं. जे कोणी मंगळवारीं अमावास्या आली असतां अंगारेश्वराचें पूजन करितील त्यास काशीं, प्रयाग, कुरुक्षेत्र, गया, पुष्कर इत्यादि तीर्थें हिंडल्याचें पुण्य प्राप्त होतें; व ते ह्या लोकीं सुख भोगून अंतकाळीं शिवलोकीं प्राप्त होतील.

---

## अध्याय ४४ वा.

### उत्तरेश्वरमहात्म्य

शंकर म्हणतात; हे पार्वती! पूर्वी एकदा इंद्रानें पाऊस पाडण्याची आज्ञा मेघांना केली असतां त्या मेघांनीं इतका पाऊस पाडला कीं, त्यायोगीं सर्व जग पाण्यांत बुडून जाऊं लागलें; त्यावेळीं पृथ्वीवरील यज्ञयागादि कृत्यें बंद पडल्यामुळें देवांना हविर्भाग मिळेनासे झाले; देव भयभीत होऊन ब्रह्मदेवाकडे गेले. ब्रह्मदेवानें इंद्राला जलमय पृथ्वी करण्याचें कारण विचारिलें, इंद्रानें मेघांना आपल्याजवळ बोलावून गज नांवाच्या एका मेघाला पूर्वदिशेला नियोजित करून, त्याच्या साहाय्यार्थ दुसरे दहा हजार गजाकृति मेघ दिले; व ताकीद केली कीं, माझ्या आज्ञेशिवाय पृथ्वी जलमय होऊन लोकांना त्रास होईल इतका पाऊस कधींहि पाडावयाचा नाहीं. तसेंच साहाहजार मेघांसह गवयनावाच्या

मेघाची योजना दक्षिणदिशेकडे केली. त्याचप्रमाणें हजारों मेघांसह शरभ नांवाचा मेघ पश्चिमदिशेकडे पाठविला; व एक कोटीमेघांसह उत्तर नांवाच्या मेघाची योजना उत्तरदिशेकडे केली; व सर्वांस अधिक पाऊस न पाडण्याची सूचना केली. त्यायोगें सर्व जग सुखी झालें, असें पाहून शनि, मंगळ, रवि, व केतू यांनीं मेघांना पीडा दिली. नंतर मेघ इंद्राला शरण गेले. इंद्र मेघाला म्हणाला कीं, या क्रूरग्रहांचें निवारण करण्यास समर्थ नाहीं. पूर्वी एकदां मी क्रूरग्रहांनीं पीडित झाल्यामुळें राज्यभ्रष्ट झालों होतों, नंतर शुभग्रहानें मला पुनः राज्यारूढ केलें. करितां मी क्रूरग्रहांच्या वाटेस अगदीं जावयाचा नाहीं. याप्रमाणें इंद्राचें भाषण ऐकून क्रूरग्रहांच्या भीतीनें सर्व मेघ लपून गुहेंमध्यें जाऊन बसले, त्यामुळें शंभर वर्षें पृथ्वीवर पाऊस पडला नाहीं; व पृथ्वीवर दुष्काळ पडून पुनः यज्ञादि कृत्यें बंद पडलीं. इंद्रादि देव ब्रह्मदेवाकडे येऊन सर्व हकीकत निवेदन करिते झाले. ब्रह्मदेव म्हणाले कीं, मलाहि क्रूरग्रहांची फारच भीति वाटते. नंतर ब्रह्मदेव देवांना घेऊन मजकडे आले; व त्यांनीं सर्व वर्तमान मजला निवेदन केलें. सर्वांच्या दुःखनिवारणार्थ शंकरानें उत्तरदिशेकडे असणाऱ्या उत्तरनावाच्या मेघाला हांक मारून सांगितलें कीं, तूं महाकालवनांत जाऊन गंगेश्वराच्या दक्षिणेस असणाऱ्या शिवलिंगाचें पूजन कर; म्हणजे तुमची सर्वांची क्रूरग्रहपीडा दूर होईल. नंतर उत्तरनामक मेघानें माझ्या सांगण्याप्रमाणें लिंगपूजन करितांच त्या लिंगांतून एक अग्नियुक्त धूराचा लोटचा लोट बाहेर पडला, व त्यानें नवग्रहमंडळ दग्ध होऊं लागलें; व मागाहून त्याच लिंगापासून पाण्याचा लोट निघून सर्व पृथ्वीवर जिकडे तिकडे पाणीच पाणी झालें. लिंगापासून निघालेल्या धूरानें पीडित झालेले क्रूरग्रह लिंगाची अनेकप्रकारें स्तुति करूं लागले. त्या लिंगापासून मी उत्पन्न झालों; व त्यांस वर दिला कीं, प्रत्येक कर्मामध्यें तुमची पूजा केली जाईल, मात्र तुम्ही आजपासून मेघांना बिलकूल त्रास देतां कामा नये, मी तुम्हांला अभयवचन दिलें आहे; नंतर मी उत्तरनामक मेघाला 'वर माग' असें सांगितलें. तें ऐकून उत्तरमेघ म्हणतो कीं, आजपासून आम्हाला जर कोणी पीडा देईल, तर त्याचें तूं परभारें नाशन केलें पाहिजेस; व आमचें रक्षण करून पृथ्वीवर पाऊस पाडण्याची आमची शक्ति अकुंठित असली पाहिजे. ह्याप्रमाणें उत्तराचें भाषण ऐकून मी उत्तर नांवाच्या मेघाला बोललों कीं, तुमच्या सांगण्याप्रमाणें सर्व कांहीं तुम्हांला दिलें आहे. ह्या लिंगाचें तूं पूजन केलेंस; म्हणून आजपासून ह्या लिंगाला उत्तरेश्वर हें नांव लोकांत प्रसिद्ध होईल. जे कोणी उत्तरेश्वराचें पूजन करितील त्यांचे सर्व इच्छित मनोरथ सफल होतील. जे नम्र होऊन उत्तरेश्वराचें नित्य दर्शन घेतील, ते आठ कल्पपर्यंत विमानांत बसून स्वर्गलोकीं वास करून मुक्त होतील.

## अध्याय ४५ वा.

### त्रिलोचनेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती ! आतां पंचेचाळीसाव्या त्रिलोचनेश्वराचें माहात्म्य सांगतों. एकदां त्रिलोचनेश्वराच्या देवालयाच्या शिखरावर दोन पारवे बसले होते. पैकीं एक मादी व नर एक असें तें जोडपें होतें. तें शिखर इतकें उंच होतें कीं, तेथें इतर कोणाचीही म्हणजे कोणत्याही पक्षाची गति होत नसे. त्या पारव्यांनीं त्या शिखरावर आपलीं घरें बांधून ठेविलीं होतीं. दिवसा बाहेर फिरावयास जाऊन भक्ष्य शोधून आणावें; व संध्याकाळीं पुनः वस्तीला आपल्या डोलींत येऊन राहावें, असा त्यांचा क्रम चालू होता. एकेदिवशीं श्येनपक्ष्यानें त्या पारव्यांना पाहून त्यास पकडून खाण्याची इच्छा केली; परंतु पारवे फारच उच्चस्थानीं राहत असल्यामुळें श्येनाचा नाइलाज झाला; परंतु आशा सुटेना. शेवटीं पारव्याच्या स्त्रीनें आपल्या पतीला सांगितलें कीं, हा श्येन आपल्याला पकडण्याकरितां बसला आहे, आज ना उद्यां केव्हांतरी हा आपल्याला पकडून खाऊन टाकील, करितां आपण ही जागा सोडून दुसरीकडे जाणें चांगलें. नंतर पारवा आपल्या स्त्रीला म्हणतो कीं, आपण इतके उंच राहतों कीं, कितीहि बलाढ्य श्येन असला, तरी त्याला येथें येतां येणार नाहीं, असें म्हणून ते उभयतां तेथेंच राहिले. पुनः दुसऱ्या दिवशीं श्येन आला; व पारव्याला म्हणतो कीं, तुझ्यामुळें मी भुकेनें मरत आहें; एक मजबरोबर युद्ध करून माझा तरी पराजय कर, किंवा मी तुझा पराजय करून; व तुला भक्षण करून मी आपली क्षुधा निवारण करीन; व त्या योगें तुला सद्गति मिळेल. असें न करशील तर मला भुकेनें मारण्याला तूं कारणभूत झाल्यामुळें तुला माझ्या हत्येचें पातक लागून तूं घोर नरकांत पडशील. असें त्या श्येनपक्षाचें भाषण ऐकून पारव्याला दया आली; व उभयतां श्येनाबरोबर युद्ध करण्यास तयार झाले. कांहीं वेळ युद्ध झाल्यावर श्येनानें दोनहि पारव्यांचा पराजय करून एकाला चोंचेंत व दुसऱ्याला पायांत धरून निर्भय अशा; व जेथें दुसरे पक्षि येणार नाहींत, अशा एकांत स्थानीं बसून स्वस्थपणानें शिकार भक्षण करावी, व असा विचार करीत तो तशा स्थानीं जात असतां वाटेंत श्येनाला एक शिंक आली; व त्यायोगें चोंच उघडली जाऊन त्यांतून पारव्याची स्त्री निसटून गेली; व पायहि वाकडे तिकडे झाल्यामुळें तो पारवाहि निसटून गेला. नंतर ती दोघें जंबूमार्गामध्यें येऊन मृत झाली. जंबूमार्गांत मेलेल्यांना अक्षय्य स्वर्गप्राप्ति होते, असा नियम असल्यामुळें तो पारवा स्वर्गांत गेला व गंधर्वकुलांत मंदारदासाचा पुत्र मंदारदामी या नांवानें गंधर्व उत्पन्न

झाला तशीच त्या पारव्याची स्त्री पाताळांत रत्नद्वीपामध्यें नागराजाच्या घरीं रत्नावली या नांवानें उत्पन्न झाली. ती रोज आपल्या सखीसह त्रिलोचनेश्वराची पूजा करण्याकरितां महाकालवनांत येत असे. एके दिवशीं चतुर्थी तिथीला पिलपिल तीर्थावर स्नान करून रत्नावली सख्यांसह त्रिलोचनेश्वराची पूजा करून सभामंडपांत निद्रिस्त झाली असतां, इतक्यांत त्रिलोचनेश्वराचें प्रत्यक्ष दर्शन तिला घडलें; व ती तशीच खडबडून जागी झाली. त्रिलोचनाला पाहतांच त्याच्या सर्व लक्षणावरून हा ईश्वर आहे, असें समजुन रत्नावलीनें आपल्या दोन सख्यांसह त्याची अनेकप्रकारें स्तुति केली. नंतर त्रिलोचनेश्वर तिला म्हणतो; हे रत्नावली ! तूं पूर्वी ह्याच देवळांवर राहणारी पारवी होतीस; व त्या जन्मांतील तुझा पति पारवा हा मंदारदामी नांवाचा गंधर्व झाला आहे. त्याच्या पूर्वीहि तुम्हांला कोणते जन्म प्राप्त झाले होते, तें सांगतों. तूं नारायण ब्राह्मणाची कन्या होतीस; व तुझ्या बापानें आशुष्मायणाच्या पुत्र जो नारायण त्याच्याशीं तुझें लग्न लाविलें. नारायण हा समिधा आणण्याकरितां रानांत गेला असतां त्याला सांप चावला; व तो मृत झाला. तोच नारायण पुढील जन्मीं पारवत झाला; व तूं नारायणकन्या त्याची पुनः बायको झालीस. आतां हे रत्नावली ! तूं मंदारदाम गंधर्वाचा पुत्र जो मंदारदामी त्याच्याशीं विवाह कर; व अवन्तीनगरांत राहून त्रिलोचनेश्वराचें पूजन कर, म्हणजे तुझें कल्याण होईल; असें सांगून त्रिलोचनेश्वर गुप्त झाले. नंतर ही सर्व हकीकत रत्नावलीनें आपल्या आईबापास सांगितली असतां ते सर्व त्यांनीं मान्य करून रत्नावलीच्या बापांनीं रत्नावलीचा तिच्या सख्यांसह संधी साधून मंदारदामीगंधर्वाबरोबर विवाह लावून दिला. रत्नावली व मंदारदामी उभयतां अवन्तीनगरांत राहून; नित्य त्रिलोचनेश्वराचें पूजन करून शेवटीं शिवरूप झालीं. हें महात्म्य श्रवण करणारेहि मुक्त होतात.

## अध्याय ४६ वा.



### वीरेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वती ! पूर्वी अमित्रजित या नांवाचा एक राजा होता. तो मोठा शूर असून सदाचारसंपन्न होता; त्याच्या महालांत भिंतीवर जिकडे तिकडे ईश्वराच्या मूर्ति काढिल्या होत्या; व जिकडे तिकडे विष्णूचीं नांवेंहि लिहिलेलीं होतीं. ज्याच्या मंदिरांत भगवत्कथाशिवाय दुसरें कांहींहि ऐकावयास मिळत नसे, त्याच्या राष्ट्रांत एकदां अंत्यज जरी आला तरी तो विष्णुरूप होत असे. अशा पुण्यपुरुष राजाच्या दर्शनाकरितां एके दिवशीं नारदऋषि प्राप्त

झाले. राजानें मधुपर्कादि विधीनें नारदाचा उत्तम सत्कार केल्यावर नारदऋषि राजास म्हणतात; तूं धन्य आहेस. तुझ्यासारखा विष्णुभक्त मी त्रैलोक्यांत पाहिला नाहीं; व ह्यापुढेंहि एकादा उत्पन्न होईल, असें वाटत नाहीं. मी तुझ्याकडे कशाला आलों आहें, असें विचारशील तर सांगतो; ऐक. तूं विष्णुभक्ति करून आपलीं इंद्रियें संतुष्ट केलींस खरीं; परंतु आतां तूं गृहस्थाश्रम करून इंद्रियें तोषवावींस; अशी माझी इच्छा आहे. मला विद्याधर नांवाच्या गंधर्वांची मलयगंधिनी नांवाची मुलगी आहे. ती बापाच्या उपवनांत क्रीडा करीत असतां कपालकेतुराक्षसाचा पुत्र कंकालकेतु त्यानें तिचें हरण केलें; व पाताळांत तिला चंपकावती नगरीमध्यें नेऊन ठेविलें आहे. आतां मलयगंधिनीनें अशी प्रतिज्ञा केली आहे कीं जो कोणी ह्या राक्षसाचा वध करून मला सोडवील, त्याला मी माळ घालीन. अशी तिची प्रतिज्ञा ऐकून मी तिला सांगितलें कीं, एक विष्णुभक्त येथें येऊन राक्षसाचा नाश करून, तुला वरील; करितां हे राजा! माझें तुला एवढेंच सांगणें आहे. नंतर नारदानें त्याला मार्ग दाखवून तो निघून गेला. अमित्रजितानें नारदाच्या सांगण्याप्रमाणें कंकालकेतूचा नाश करून मलयगंधिनीशीं विवाह लाविला. नारदाच्या सांगण्याप्रमाणें आज तृतीयेच्याच दिवशीं माझीं सर्व संकटें नष्ट होऊन; व विवाहहि होऊन सर्वप्रकारचीं सुखें मला प्राप्त झालीं, असें समजून त्या मलयगंधिनीनें अभीष्ट तृतीया नांवाचें व्रत करण्यास प्रारंभ केला. हेंच व्रत पूर्वीं लक्ष्मीनें केलें होतें; व त्यायोगें तिला सर्व सौख्यांचा लाभ मिळाला. हें व्रत मार्गशीर्ष शुद्ध तृतीयेला करावयाचें असतें. नंतर मलयगंधिनीनें हें व्रत यथासांग करून चतुर्थीला पारणा केली; व उद्यापन करून पार्वतीची पुत्रप्राप्तिकरितां प्रार्थना केली. नंतर थोड्याच अवधींत मलयगंधिनीला वीर नांवाचा मुलगा झाला. तो सोळा वर्षांचा होतांच महाकालवनांत लिंग स्थापून; व त्याचें पूजन करून घोर तप करिता झाला. शंकर प्रसन्न होऊन वीराला इच्छित वर देऊन त्यानें स्थापिलेल्या लिंगाचें वीरेश्वर असें नांव ठेविलें. वीरेश्वराचें पूजन करणारे ह्या लोकीं सुख भोगून अंतकाळीं शिवलोकीं गमन करितात.

---

## अध्याय ४७ वा.

—:०:—

### नूपुरेश्वरमहात्म्य.

शंकर म्हणतात; हे देवी! पूर्वीं माझा नूपुरनांवाचा एक शिवगण होता. तो एकदां अप्सरांसह कुबेराच्या सभेमध्यें उत्सव पाहण्यास गेला असतां उर्वशी वगैरेंचें नृत्य चाललेलें पाहून; कामबाणानें पीडित होऊन अप्सरांच्यामध्यें नृत्य

करूं लागला. तितक्यांत नूपुरानें आपला हात उर्वशीच्या पाठीवर टाकिला, त्यायोगें उर्वशीला क्रोध आला; आपल्या हातांतील फुलांचा गजरा नूपुराच्या अंगावर मारून ती कुबेराकडे जाऊन नूपुराचें सर्व वर्तमान त्याला सांगती झाली. कुबेराला राग येऊन त्यानें नूपुराला शाप दिला कीं, ज्यापेक्षां तूं अप्सरांच्या नृत्यांत विघ्न उत्पन्न केलेंस, त्यापेक्षां तूं मनुष्यलोकीं जाऊन जन्म घेशील. कुबेराच्या शापाप्रमाणें नूपुरही पृथ्वीवर पडला; व फार शोक करून तुला शरण गेला. नंतर तूं प्रसन्न होऊन नूपुराला सांगितलेंस कीं, तूं महाकालवनांत जाऊन सरस्वती नदीचे काठीं एक शिवलिंग आहे, त्याचें पूजन कर; म्हणजे शापमुक्त होशील. नंतर नूपुरानें तुझ्या सांगण्याप्रमाणें शिवलिंगाचें पूजन करून माझी स्तुति केली. मी प्रसन्न होऊन नूपुराला शापमुक्त करून पुनः मी आपल्या गणांत आणून मिळविलें; व त्या लिंगाचें नूपुरेश्वर असें नांव ठेविलें. जे कोणी सरस्वती नदीचे कांठीं स्नान करून नूपुरेश्वराचें दर्शन घेतात ते मुक्त होतात. जे नूपुरेश्वराचें पूजन करितात, त्यांस वाजपेयादियज्ञांचें फल प्राप्त होतें; व ते सर्व दुःखापासून मुक्त होऊन, व ह्या लोकीं अखंड सौख्य भोगून शिवलोकीं जातात.

---

## अध्याय ४८ वा.

-----:०:-----

## अभयेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती ! ज्यावेळीं सर्व पृथ्वी जलमय होऊन चंद्र, सूर्य; व सर्व भुवनें नष्ट झालीं; व पुनः ब्रह्मदेवाला जेव्हां सृष्टि निर्माण करण्याचा प्रसंग प्राप्त झाला, त्यावेळीं कशी सृष्टि निर्माण करावी, अशी ब्रह्मदेवाला काळजी उत्पन्न झाली. नंतर ब्रह्मदेवाच्या डोळ्यांतून दोन अश्रूचे थेंब खालीं पडले, त्याबरोबर त्या थेंबापासून दोन राक्षस निर्माण झाले. पैकीं एकाचें नांव हारव व दुसऱ्याचें नांव कालकेली असें होय त्या राक्षसांना पाहून ब्रह्मदेव घाबरून गेला; व विष्णूला शरण जाऊन राक्षसांचा वध करण्याविषयीं युक्ति विचारिता झाला. नंतर ब्रह्मा व विष्णु हे दोघे दैत्यांचा वध होण्याकरितां महाकालवनांत येऊन शिवलिंगाचें पूजन करिते झाले. तात्काल त्या शिवलिंगांतून एक ज्योति उत्पन्न झाली; व तिनें त्या दैत्यांचें भस्म केलें. नंतर शंकर प्रसन्न होऊन ब्रह्मदेवास व विष्णूस म्हणतात; हे देवहो, ह्या लिंगाच्या पूजनानें तुम्हाला अभय प्राप्त झालें; म्हणून ह्या लिंगाचें अभयेश्वर हें नांव मी ठेविलें आहे. जे कोणी ह्या अभयेश्वराचें पूजन करितील, ते भीतीपासून मुक्त होऊन सौख्याप्रत प्राप्त होतील.

---

## अध्याय ४९ वा.

:o:

### पृथुकेश्वरमाहात्म्य

शंकर म्हणतात; हे देवी! आतां एकोणपंचेचाळीसावें पृथुकेश्वरमाहात्म्य सांगतों; ऐका. ज्याच्या श्रवणानें मनुष्य सार्वभौम होतो. पूर्वी स्वायंभूमन्वंतरामध्यें अंगनांवाचा एक राजा होता. त्याला वेन नांवाचा एक दुर्वर्तन करणारा असा मुलगा झाला. त्या वेनाच्या कारकीर्दीत पृथ्वीवर धर्मकृत्यें बंद पडून गेलीं. वेनराजा सर्वांना सांगूं लागला कीं तुम्हीं होमहवनादि कृत्यें करून विनाकारण पदार्थांची नासाडी करितां, तेव्हां तुम्हीं त्याच साहित्यानें माझी पूजा करा; मीच देव आहें. असें सांगून त्यानें सर्व प्रजाजनाला अधर्माकडे प्रवृत्त केलें. नंतर कांहीं तपस्वी ब्राह्मणांना वेनाचें दुराचरण न आवडून त्यांनीं वेनाला भस्म करून टाकलें. त्यानंतर वेनाच्या डाव्या मांडीचें मंथन करतांच त्यांतून असंख्य मुसलमान उत्पन्न झाले; व उजवी मांडी मंथन करतांच त्यापासून पृथुराजा उत्पन्न झाला. नंतर पृथुराजाला राज्याभिषेक केला असतां पृथ्वीनें सर्व धान्यें गिळून टाकल्यामुळें प्रजाजनांना दुःख प्राप्त होत आहे, हें जाणून पृथ्वीला जाळण्याच्या इच्छेनें पृथूनें पृथ्वीवर अग्न्यस्त्र टाकिलें. नंतर पृथ्वी घाबरून गाईचें रूप घेऊन पृथुराजाला शरण आली; व म्हणते कीं, मी गाईचें रूप घेतलें आहे, वासरूं निर्माण कर; व माझें दोहन कर; म्हणजे मी आजपर्यंत खालीं जीं बीजें तीं दुग्धरूपानें बाहेर निघतील, व सर्वांचें कल्याण होईल. नंतर पृथूनें हिमालयपर्वताला वासरूं करून सर्व रत्नें, धान्यें, वगैरे दुग्धरूपानें बाहेर काढिलीं; व त्यायोगानें सर्व प्रजा सुखी झाली. पृथूला पश्चात्ताप झाला कीं, स्त्रीवर शस्त्र उगारणें मोठें पाप आहे; व ही गोरूपी स्त्री हिला मारण्याकरितां मी अग्न्यस्त्राचा उपयोग केला, ही गोष्ट फार वाईट केली. आतां हा दोष गोवध केल्याप्रमाणेंच आहे; करितां त्या पापाच्या नाशनार्थ मी अग्निकाष्ठें भक्षण करणार, असा निश्चय करून काष्ठें वगैरे जमविणार इतक्यांत नारदऋषि पृथुराजाजवळ येऊन अग्निकाष्ठें भक्षण करण्याचें कारण विचारूं लागले. पृथु नारदांस म्हणतात; हे ऋषे! मी गाईला मारण्याची बुद्धि केली, हा दोष गोहत्येसारखाच आहे; व हा भयंकर दोष धुवून काढण्याकरितां मी अग्निकाष्ठें भक्षण करीत आहें, तेव्हां तो दोष दूर होण्यास जर एकादा उपाय असेल तर मला सांगा. नंतर नारद म्हणतात; हे राजा! महाकालवनामध्यें अभयेश्वर लिंगाच्या पश्चिमेस एक लिंग आहे, त्याचें पूजन कर; म्हणजे तूं पापमुक्त होशील. नंतर पृथुराजा त्याठिकाणीं जाऊन शिवलिंगाचें पूजन करिता झाला; व त्यायोगें तो राजा दोषमुक्त झाला. नंतर तेथें आकाशवाणी झाली कीं, हे राजा! तूं आज धन्य झाला आहेस, तुझें सर्व पाप ह्या शिवलिंगाच्या पूजनानें नष्ट झालें.

आहे, करितां ह्या लिंगास लोक पृथुकेश्वर नांवानें पूजितील; व जे कोणी त्याचें पूजन करितील, ते सर्व दोषांपासून मुक्त होऊन शेवटीं शिवलोकाला प्राप्त होतील.

---

## अध्याय ५० वा.

—— ——:०:——

### स्थावरेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती! सूर्याची संज्ञा नांवाची बायको होती. तिला सूर्याचें तेज सहन न झाल्यामुळें एक छाया नांवाची मूर्ति तयार करून तिला सांगितलें कीं, सूर्यानें माझ्याविषयीं कांहीं विचारलें, तरी तूं त्याबद्दल एक अक्षरही बोलूं नको; इतकें म्हणून छायेला सूर्याकडे पाठवून ती स्वतः बापाचे घरीं निघून गेली. एके दिवशीं हीच आपली संज्ञानामक पत्नी अशा समजुतीनें सूर्य छायेच्याठिकाणीं रममाण झाला; व त्यामुळें छायेला सूर्यापासून शनैश्चर नांवाचा मुलगा झाला. शनैश्चराला पाहून सर्व त्रैलोक्य घाबरून गेलें. नंतर देव व ब्रह्मदेव सूर्याकडे येऊन म्हणते झाले कीं, तुझ्या मुलानें सर्व त्रैलोक्य दग्ध करण्याचा विचार केला आहे; करितां आपल्या पुत्राचा बंदोबस्त कर. नंतर सूर्य म्हणाला; हा मुलगा माझें ऐकणार नाहीं; करितां आपणच त्याचा बंदोबस्त करावा. असें सूर्याचें भाषण ऐकून ब्रह्मादि देव विष्णूकडे गेले; व सर्व मंडळी मजकडे आली. नंतर सर्व वर्तमान विष्णुप्रमुख देवांनीं मला सांगितलें मी शनैश्चरास बोलावणें पाठविलें असतां शनैश्चर मजजवळ येऊन नम्रपणानें बोलता झाला कीं, हे देवा! मला काय आज्ञा आहे? आपण सांगाल त्याप्रमाणें मी वागेन नंतर मी त्यास बोललों; हे शनैश्चरा! तूं कोणालाहि पीडा देऊं नको. तुला राहण्यास स्थानें पाहिजे असतील तर मेषादि ज्या बारा राशी, त्या तुला दिल्या आहेत. तूं हल्लीं सर्वांना जी एकदम पीडा देतोस तशी न देतां क्रमाक्रमानें राशिपरत्वें लोकांना पीडा देतजा. प्रत्येक राशीला तूं तीस महिन्यांपेक्षां जास्ती राहूं नकोस. अकरा, सहा व तीन ह्या राशीला उन्नती करणारा होऊन पांच, नऊ व सात ह्या राशीला तूं उदासीन राहा; व इतर स्थानांचे ठिकाणीं असतांना जे तुझी पूजा करितील त्यास तूं सुख दे; ह्याप्रमाणें तुझी गति स्थिर असल्यामुळें तुला लोक स्थावरनांवानें जाणतील. हे शनैश्चरा! तूं महाकालवनांत जाऊन पृथुकेश्वराच्या पश्चिमेला एक शिवलिंग आहे, त्याचें पूजन कर; म्हणजे त्रैलोक्यांत तुझी कीर्ति वाढेल. ह्याप्रमाणें सर्व ऐकून घेऊन स्थावर नांव प्राप्त झालेला शनैश्चर शंकराच्या सांगण्याप्रमाणें शिवपूजन करिता झाला, त्यामुळें त्या लिंगाचें नांव स्थावरेश्वर असें पडलें; व शनैश्चराची कीर्ति सर्वत्र पसरली. जे कोणी स्थावरेश्वराची पूजा करितील त्यांना कधींहि शनैश्चराची पीडा होणार नाहीं; व ते मुक्त होतील.

---

## अध्याय ५१ वा.

### शूलेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे देवी! पूर्वी राज्यप्राप्तीकरितां देवाचें युद्ध झालें. दैत्यांचा राजा जंभासुर; व देवांचा राजा इंद्र असता झाला. नंतर जंभ व इंद्र यांचें युद्ध सुरू असतां त्यांत दैत्यांनीं देवांचा पराजय केला. त्यानंतर अंधकासुर मंदर-पर्वतावर येऊन आपला दूत मजकडे पाठविता झाला. तो दूत मजजवळ येऊन म्हणाला कीं, मला अंधकानें पाठविलें आहे; व निरोप सांगितला कीं, तुझी बायको जी पार्वती ती मला अर्पण कर; व मंदरपर्वतावरून दुसरीकडे निघून जा, असें दूताचें भाषण ऐकून मी त्यास बोललों कीं, माझा निरोप अंधकाला सांग कीं, तूं स्वतः येथें येऊन मला जिंकून पार्वतीला घेऊन जा. दूतानें अंधकाला माझा निरोप सांगितल्यावर अंधक मजबरोबर युद्ध करण्याकरितां आला असतां त्याचें व माझें मोठें युद्ध झालें. नंतर मी अंधकाचे अंगावर शूल फेंकला व त्यास ठार मारिलें. नंतर त्या अंधकासुराच्या शरीरांतून एक दिव्यमूर्ति प्रकट झाली; व तिनें शंकराची स्तुति केली. शंकरानें प्रसन्न होऊन दिव्यमूर्तिधारी अंधकाला आपल्या शिवगणांत मिळवून संतुष्ट केलें. नंतर शूलावर मी प्रसन्न होऊन बोललों कीं, तुझ्या कृत्यानें संतुष्ट होऊन तुला राहण्यास पवित्र असें स्थान देतों. तूं महाकाल-वनांत जाऊन पृथुकेश्वराचे पूर्वेस असणाऱ्या शिवलिंगाचें पूजन कर. नंतर शूलानें तेथें जाऊन लिंगपूजन करतांच तो पापरहित होऊन मोठ्या आनंदानें शिवाजवळ राहता झाला. त्या दिवसापासून त्या लिंगाचें नांव शूलेश्वर असें पडलें. अष्टमी, चतुर्दशी वगैरे तिथीला मंगळवारीं शूलेश्वराचें पूजन केलें असतां निर्भयता व निष्पापता प्राप्त होऊन शेवटीं शिवसायुज्यमुक्तीहि प्राप्त होते.

## अध्याय ५२ वा.

:o:

### ॐकारेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; आतां बावन्नाव्या ॐकारेश्वराचें माहात्म्य सांगतों. पूर्वी प्राकृतकल्पामध्यें मी आपल्या मुखांतून पिंगटवर्णाचा एक पुरुष निर्माण केला. तो पुरुष मजपुढें उभा राहून काय करूं असें विचारीत असतां, तूं आपल्या शरीराचे अनेक भाग पाड, म्हणजे सृष्टि निर्माण कर, असें सांगून मी गुप्त झालों. नंतर तो पुरुष शरीराचे भाग कसे पाडावे? हा विचार करीत असतां तेथें

ॐ असा ध्वनि उत्पन्न झाला. ज्या ॐकारांत असणाऱ्या अ, उ; व म् ह्या तीन अक्षरानें सत्त्व, रज व तम ह्या तीन गुणांचा, तसेंच ब्रह्मा, विष्णु व महेश ह्या तीन मूर्तींचा; व ऋक्, यजु व साम ह्या तीन वेदांचा बोध होतो; एवढेंच नव्हे तर ह्या एका ध्वनीनें संपूर्ण ब्रह्मांडांतील प्रत्येक वस्तूचें ज्ञान होतें. नंतर पुरुषाच्या आज्ञेवरून सर्व सृष्टि निर्माण करून ॐकार मजजवळ प्राप्त झाला; व प्रार्थना करूं लागला कीं, मी आपल्या कृपेनें सर्व सृष्टि निर्माण केली आहे. आतां मला विश्रांती घेण्यासाठीं एकादें स्थान द्या. ह्याप्रमाणें ॐकाराचें भाषण ऐकून मी त्यास म्हणालों कीं, तूं शूलेश्वराचे पूर्वेस असणाऱ्या लिंगाचें पूजन कर; म्हणजे तुझें कल्याण होईल; व तेंच स्थान तुला विश्रांती घेण्यास उत्तम आहे. ह्याप्रमाणें मी त्यास सांगितलें असतां तो ॐकार महाकालवनांत शिवलिंगाचें पूजन करून राहता झाला. त्या दिवसापासून त्या लिंगाला ॐकारेश्वर हें नांव प्राप्त झालें. त्याचें दर्शन घेणारास वेदांच्या अध्ययनाचें व सर्वप्रकारचे यज्ञ केल्याचें पुण्य प्राप्त होऊन; व ह्या लोकीं सुख मिळून अंतीं शिवलोक मिळेल.

---

## अध्याय ५३ वा.

### विश्वेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती! पूर्वी विदर्भनगरीमध्यें विदूरथ नांवाचा एक राजा होता. एके दिवशीं तो मृगया करण्याकरितां अरण्यांत गेला असतां तेथें चुकीनें एक ब्राह्मण मारला गेला. त्या ब्रह्महत्त्येच्या पापामुळें त्या राजाला शेवटीं रौरवनरकांत जावें लागलें. त्याला दुसरा जन्म सापाचा आला. त्या जन्मांत सुद्धां त्यानें एका ब्राह्मणाच्या पायाला दंश करून त्यास ठार मारिलें, नंतर लोकांनीं त्या सापाला काठीनें मारिलें. पुनः ह्या दुसऱ्या ब्रह्महत्त्येमुळें त्यास नरकांतच जावें लागलें. तेथून पुनः तिसरा जन्म सिंहाचा झाला. त्या जन्मांत त्यानें एका राजाला ठार मारलें, त्यावेळीं राजसेवकांनीं त्या सिंहावर बाण सोडून त्याचा प्राण घेतला. त्यास चवथा वाघाचा जन्म प्राप्त झाला. त्या जन्मांत त्यानें एका वैश्याचा प्राण घेतला. त्या वाघाला भिल्लानें ठार मारलें. नंतर त्यास हत्तीचा जन्म प्राप्त झाला. त्या हत्तीला सिंहानें मारिलें. त्यानंतर सुसर, पिशाच, ब्रह्मराक्षस, कुत्रा, कोल्हा, गिधाड, व चांडाळ इतके जन्म प्राप्त झाले. तो चांडाळ महाकालवनांत ब्राह्मणांच्या घरीं चोरी करण्यास गेला असतां, ब्राह्मणानें त्या चांडाळाला पकडून राजदूतांच्या हवालीं केलें. राजदूतांनीं त्याला ठार मारण्याकरितां एका झाडावर टांगून आतां मारणार इतक्यांत

त्या चांडाळाची दृष्टी महाकालवनांत शूलेश्वराच्या जवळ असणाऱ्या लिंगाकडे गेली; व तो चांडाळ राजदूतांकडून मारला गेला. त्या लिंगदर्शनानें त्याचें सर्व पाप दग्ध होऊन तो नरकांत न जातां स्वर्गांत गेला. नंतर पुढील जन्म त्यास राजकुलांत विश्वेशनांवानें प्राप्त झाला. तो अवन्तीनगरीत जाऊन शूलेश्वराजवळील लिंगाचें पूजन करिता झाला. नंतर त्यायोगें मी त्याच्या भक्तीनें प्रसन्न होऊन वर माग, असें त्यास सांगितलें. नंतर विश्वेशराजा म्हणतो; हे शंकरा, जे तुझें दर्शन घेतील त्यांचीं सर्व पापें नाहींशीं होऊन त्यास जन्ममरणाच्या दुःखांत लोटूं नको; एवढेंच माझें मागणें आहे. नंतर मी त्याच्या इच्छेप्रमाणें त्यास वर देऊन संतुष्ट केलें; व त्यास आपल्या विमानांत बसवून त्या राजास शिवलोकीं घेऊन आलों. त्या दिवसापासून तें लिंग विश्वेश्वर नांवानें प्रसिद्ध झालें आहे. जे कोणी विश्वेश्वराचें पूजन करितील किंवा अंतकाळीं दर्शन घेतील, त्यांचीं मागील सर्व पापें नाहींशीं होऊन ते शिवलोकीं प्राप्त होतील.

## अध्याय ५४ वा.

### कण्ठेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती! आद्यकल्पामध्यें सत्यविक्रम नांवाचा एक राजा होता, शत्रूंनीं त्याचें सर्व राज्य हरण केल्यामुळें तो रानांत फिरत असतां वसिष्ठऋषीचा आश्रम त्याला दिसला. वसिष्ठानें सत्यविक्रमाची अर्घ्यादि मधुपर्कविधीनें पूजा केली. नंतर वसिष्ठानें त्या राजास इकडे येण्याचें कारण विचारलें. सत्यविक्रम वसिष्ठास म्हणतो कीं, माझें राज्य शत्रूंनीं हरण केलें आहे; म्हणून मी असा इकडेतिकडे हिंडत आहें. पुनः माझें राज्य शत्रुरहित असें प्राप्त होण्यास काय उपाय योजावा? हें आपण मला सांगा. नंतर राजाचें भाषण ऐकून वसिष्ठ राजास म्हणतात; तूं महाकालवनांत जाऊन शिप्रानदीचे काठीं पृथुकेश्वराच्या दक्षिणेस एक संन्यासी आहे, त्याचें दर्शन घे; म्हणजे तुझें तुला निष्कंटक असें राज्य प्राप्त होईल. नंतर तो राजा त्या संन्याशाजवळ जातांच संन्याशानें त्यास कुशलप्रश्न विचारिले. त्याच्या सांगण्यावरून हा राजा राज्यभ्रष्ट म्हणजे शत्रूंनीं राज्य हरण केलेला आहे, असें पाहून संन्याशाला राग आला, व त्यानें एक मोठा श्वास टाकिला. त्याबरोबर पाताळ फोडून पांच मुली वरती आल्या. एक सोन्याचें आसन हातांत घेतलेली मुलगी निघाली. तशाच कांहीं पाण्यानीं भरलेल्या झाऱ्या घेऊन, कोणी पंखे घेऊन अशा बाहेर पडल्या- नंतर त्या संन्याशानें पुनः हुंकार केला. त्याबरोबर स्वर्गांतून अप्सरा प्राप्त

झाल्या; व तेथें एक शिवलिंग प्राप्त झालें. तें सर्व पाहून राजाला आश्चर्य वाटलें, व लिंगाला नमस्कार करून राजा संन्याशाला म्हणतो. ही सर्व मी माया दाखविली. ह्याच लिंगाच्या प्रभावानें माझें सामर्थ्य किती वाढलें आहे, हे सर्व तुला दाखविलें आहे, तुसल्या हुंकारानें सामर्थ्यवान पुरुषाला पाहिजे तें करतां येतें. मला हें सामर्थ्य ह्याच लिंगपूजनानें प्राप्त झालें आहे; करितां तूंहि ह्याचें पूजन कर; म्हणजे तुझे सर्व शत्रु नाश पावून तुला निष्कण्टक असें राज्य प्राप्त होईल. नंतर राजानें कंट म्हणजे शत्रु ज्याच्या पूजनानें नाश पावतात; त्याचें नांव कण्टेश्वर असें ठेविलें आहे. जे कोणी कण्टेश्वराचें पूजन करितील, त्यांस ह्या लोकीं सुख प्राप्त होऊन अंतकाळीहि स्वर्ग लोक प्राप्त होईल. पूर्वी देवांनीही ह्या लिंगाचें पूजन केले होतें; व त्यायोगें अंधकासुराचा नाश झाला.

## अध्याय ५५ वा.

### सिंहेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती! ह्याच कल्पामध्यें तू माझ्या प्राप्तीकरितां तपश्चर्या केलीस. तुझी घोर तपश्चर्या पाहून ब्रह्मदेव तुजजवळ येऊन तपाचें कारण विचारता झाला. त्यावेळीं शंकर मला 'तू काळी आहेस,' असें म्हणतात; म्हणून तो दोष दूर करून गौरवर्ण प्राप्त करून घ्यावा; एवढ्याकरितां मी तप करीत आहे, असें तूं ब्रम्हदेवास सांगितलेस. नंतर ब्रम्हदेवानें तुला म्हटलें कीं, तुझ्या इच्छेप्रमाणें सर्व घडून येईल. नंतर पार्वती म्हणाली; माझी इच्छा किती दिवसांनी पूर्ण होईल. तेव्हां ब्रम्हदेव म्हणतात; तुझी गौरीनांवानें एक मूर्ती तयार होईल; व ती कांतीमान् अशी होईल. असें अर्धवट ब्रम्हदेवाचें भाषण ऐकून पार्वतीला राग आला; व रागापासून एक भयंकर सिंह पार्वतीच्या मुखातून निघाला. तूं त्या सिंहाच्या मुखांत शिरून मरण्याचा निश्चय केलास. तुझी तपश्चर्या पाहून सिंह घाबरून जाऊन तुला शरण आला. तूं त्याच्यावर दया केली असतां तुझ्या स्तनापासून दूध उत्पन्न झालें; व तें तूं त्या भुकेलेल्या सिंहाला पाजिलेंस. नंतर सिंह म्हणतो. हे माते! तुझें तपस्तेज पाहून मी घाबरून गेलों आहे. मी भुकेला असल्यामुळें तुला खाण्याकरितां आलों, ही मी मोठी चूक केली. मी मोठा पापी आहे. मी नरकांत जाणार, करितां माझें पातक नष्ट होण्यास जर कांहीं उपाय असेल तर सांगा. असें सिंहाचें भाषण ऐकून तूं त्या सिंहाला सांगितलेस कीं तूं महाकालवनांत जाऊन कटेश्वराजवळ असणाऱ्या शिवलिंगाचें पूजन कर. तें शिवलिंग ज्यावेळीं शंकर व अंधकासुर यांचें

युद्ध झालें, त्यावेळीं शंकरानें मोठा सिंहनाद केला; त्या सिंहनादापासून हें शिवलिंग उत्पन्न झालें आहे. ह्याप्रमाणें तुझें भाषण ऐकून सिंह महाकालवनांत जाऊन शिवलिंगाचें पूजन करिता झाला; त्यामुळें त्या लिंगाला सिंहेश्वर हें नांव प्राप्त झालें. तूंहि सिंहिकेचें रूप घेऊन महाकालवनांत आलीस. नंतर ब्रह्मदेव महाकालवनांत येऊन तुला म्हणतो कीं, हे पार्वती! हा सिंह तुझ्यापाहून उत्पन्न झाल्यामुळें तुझेंच वाहन होईल. जे कोणी ह्या सिंहेश्वराचें दर्शन घेतील; किंवा पूजन करितील, ते जन्ममरणरूपी संसारापासून मुक्त होऊन; व क्लेश, दुःख दारिद्र्य इत्यादिकांनीं रहित होऊन; व सुख भोगून अंतीं मुक्त होतील.

---

## अध्याय ५६ वा.

### रेवंतेशमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती! संज्ञा नांवाची सूर्याची बायको सूर्यतेज सहन होईना, म्हणून घोड्याचें रूप घेऊन उत्तर दिशेला तप करण्याकरितां गेली. आपल्या बायकोनें घोडीचें ( वडवाचें ) रूप घेतलें, असें पाहून सूर्य घोड्याचें रूप घेऊन संज्ञेच्या मागोमाग चालला, उभयतांचा समागम होताच वडवारूप धारण केलेल्या संज्ञेच्या नाकांतून एक व घोड्याचें रूप घेतलेल्या सूर्याचे नाकांतून एक असे दोन घोड्याप्रमाणें मुख असणारे अश्विनीकुमार उत्पन्न झाले; व शेवटीं एक रेवंत नांवाचा हातांत खड्ग घेतलेला पुरुष उत्पन्न झाला. रेवंतानें घोड्यावर बसून सर्व जगत् जिंकून टाकिलें; व शेवटीं रेवंतानें पराभूत केलेले असे इंद्रादि देव ब्रह्मदेवाकडे जाऊन सर्व वर्तमान त्यास निवेदन करिते झाले. नंतर ब्रह्मदेवासह सर्व इंद्रादि देव मजकडे आले; व रेवंतानें केलेल्या दुष्कृत्याचा पाढा मजजवळ वांचला. तेव्हां मी रेवंताला सांगितलें कीं, तूं त्रैलोक्य जिंकण्याचा जो मार्ग काढिला आहेस तो फार वाईट आहे. करितां तूं महाकालवनांत जाऊन कंसेश्वराच्या पूर्वेस एक पवित्र स्थान आहे, तेथें राहून माझ्या लिंगाची पूजा कर; व ह्या योगें सर्व देव तुला मान देतील; व तुझ्या आज्ञेंत वागून स्वर्गांतील देवांत श्रेष्ठ असा तूं होशील; व जर असें न करिशील तर फुकट अपकीर्ति मिळवुन नाश पावशील. नंतर ह्याप्रमाणें रेवंत माझ्या आज्ञेस मान देऊन व महाकालवनांत जाऊन माझ्या लिंगाच्या पूजनानें सद्गतीला प्राप्त होता झाला. ह्या दिवसापासून ह्या लिंगाला रेवंतेश्वर हें नांव प्राप्त झालें. जे कोणी रेवंतेश्वराचें पूजन करितील ते निष्पाप होऊन अंतकाळीं शिवलोकाला प्राप्त होतील.

---

# अध्याय ५७ वा.

## घंटेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती! एक घंट नांवाचा माझा प्रिय असा गण होता. तो चाक्षुषमन्वन्तरामध्यें ब्रह्मदेवाच्या दर्शनाकरितां ब्रह्मलोकीं जाण्यास निघाला असतां वाटेंत चित्रसेनगंधर्वाची गांठ पडली, त्यास पाहून घंट त्यास विचारितो कीं, ब्रह्मदेवाच्या सभेंत मला जावयाचें आहे, तेव्हां आतां ब्रह्मदेवाची व माझी एकांतांत गांठ होईल कीं नाहीं, असें घंटाचें भाषण ऐकून चित्रसेन म्हणाले; हे घंटा! हल्लीं ब्रह्मदेव देवांसह कांहीं विचार करीत एकांतात बसले आहेत, तेव्हां त्यांची तुझी गांठ इतक्यांत पडेल असें मला वाटत नाहीं, तथापि तुला जर जावयाचें असेल तर आमची कांहीं हरकत नाहीं, असें सांगून चित्रसेन-गंधर्व आपल्या घरीं आला; व घंट हा ब्रह्मदेवाकडे जाण्यास निघाला, ब्रह्म-देवाच्या सभेच्या द्वारावर द्वारपाळ होते; त्यांनीं घंटाला ब्रह्मसभेंत जाण्याचा मज्जाव केला. अशातऱ्हेनें घंट हा एक वर्षपर्यंत ब्रह्मदेवाच्या दरवाज्यांत बाहेर उभा होता. तितक्यांत नारद ऋषि घंटाजवळ येऊन त्यानें त्यास सर्व कुशलप्रश्न विचारिले असतां घंट म्हणाला, हे नारदा! माझा ब्रह्मसभेंत प्रवेश होईल असें कर, तें ऐकून नारद ऋषि घंटाला म्हणाले कीं, मला ब्रह्मदेवानें कांहीं कामाकरितां बृहस्पतीकडे पाठविलें आहे, तेव्हां तिकडून परत येईपर्यंत घटकाभर येथें राहा, असें सांगून नारद ऋषि तेथून जे निघाले ते माझ्याकडे येऊन ब्रह्मसभेच्या द्वारावर तुमचा गण जो घंट तो ब्रह्मसभेंत प्रवेश न झाल्यामुळें एक वर्षभर उभा राहिला आहे असें मला म्हणाले. असें नारदाचें भाषण ऐकून मला घंटाचा राग आला व त्याला तूं जमिनीवर जाऊन पड, असा शाप दिला. नंतर घंट तत्काळ पृथ्वीवर पडला. त्याला वाईट वाटलें व तो म्हणाला कीं, जे कोणी आपल्या स्वामीचा त्याग करून दुसऱ्या स्वामीची सेवा करण्याला जातात, त्यांस अशा-तऱ्हेचीं माझ्यासारखीं दुःखें भोगावीं लागतात; व त्यांस शेवटीं नरकवास पत्क-रावा लागतो. इतका जों विचार करतो तों नारद ऋषि जेथें घंट पडला होता तेथें आले. नारद घंटाला म्हणाले कीं, तूं महाकालवनांत रेवतेश्वराचे पूर्वेस एक लिंग आहे, त्याचें पूजन कर; म्हणजे तुझें सर्व पाप नष्ट होऊन, हें लिंग तुझ्या नांवानेंच सर्व जगांत प्रसिद्ध होईल; नंतर घंट हा नारदाच्या सांगण्या-प्रमाणें महाकालवनांत जाऊन शिवलिंगाचें पूजन करिता झाला; त्यामुळें घंट शापमुक्त होऊन शिवलोकाला प्राप्त झाला. त्या दिवसापासून त्या लिंगाला घंटेश्वर हें नांव प्राप्त झालें. जे लोक घंटेश्वराचें पूजन करितील, ते गंधर्व व

अप्सरा यांच्यामध्यें विराजमान होऊन व त्यांचे सर्व इच्छित मनोरथ पूर्ण होऊन ते शिवलोकाला प्राप्त होतील. ह्याच लिंगाचें पूजनानें जरी कदाचित् दुसरा जन्म प्राप्त झाला तरी तो राजकुळांत प्राप्त होऊन, त्यास सार्वभौम राज्यांचा सुखोपभोग मिळेल; व तो शेवटीं श्रेष्ठ अशा शिवस्थानाला प्राप्त होईल.

## अध्याय ५८ वा.

### प्रयागेश्वराचें माहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वति ! पहिल्या कल्पांत स्वायंभूव मनूला प्रियव्रत नांवाचा एक पुत्र झाला. प्रियव्रतानें पुष्कळ यज्ञ करून सप्तद्वीपाचें सार्वभौम राज्यहि केलें. नंतर भरतादि पुत्रांना राज्याचे भाग वाटून दिले; व स्वतः बद्रिकाश्रमांत तप करण्याकरितां गेला. तेथें नारदाची व प्रियव्रताची गांठ पडली. प्रियव्रतानें नारदाची पूजा केली; व कांहीं विशेष आश्चर्यजनक वृत्तांत जगांत घडला आहे काय ? असा नारदास प्रश्न केला. नंतर नारद म्हणतात; हे राजा ! मी श्वेतद्वीपामध्यें एका सरोवरावर एक कन्या पाहिली. नंतर मी तिला विचारिलें कीं, तूं ह्या एकांत अरण्यांत कां राहत्येस ? तुझें कांहीं काम करावयाचें असल्यास मला सांग, तें मी करीन. ह्याप्रमाणें मी तिला विचारिलें असतां ती कन्या डोळे मिटून क्षणभर स्तब्ध राहिली. त्या वेळीं माझें इतकें अज्ञान व्यक्त झालें कीं, मी सर्व वेद, व सर्व शास्त्रें विसरून गेलों; ह्याचें मला मोठें आश्चर्य वाटलें; आणि काळजी उत्पन्न होऊन मी वेडा बनलों व तिलाच शरण जावें असा जो मी विचार करणार इतक्यांत तिचें शरीरांत एक पुरुष दिसूं लागला. त्या पुरुषाच्या शरीरांत दुसरा, त्याच्यांत पुनः तिसरा असें एकांत एक तीन पुरुष दिसूं लागले. त्या कन्येला वेद नष्ट होण्याचें कारण विचारिलें, त्या वेळीं ती कन्या नारदास म्हणाली. मी सर्व देवांची आई असून माझें नांव सावित्री आहे. मी कोण ? हें तुला समजलें नाहीं; म्हणून मी तुझे वेद हरण केले आहेत. माझ्या शरीरांत जे तीन पुरुष पाहिलेस ते ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद, असे हे तीन पुरुष होत, इतके सांगून ती देवी गुप्त झाली. नंतर माझें वेदशास्त्राचें ज्ञान नष्ट झाल्यामुळें मी काय करूं ? कोणत्या प्रभूला शरण जाऊं ? माझीं वेदशास्त्रें पुनः मला कशीं मिळतील ? असा विचार करीत करीत प्रयागाचें ठिकाणीं असणाऱ्या कामिक नामक तीर्थाकडे गेलों; व तेथें तपश्चर्या केली; त्यायोगें मूर्तिमान् प्रयाग माझ्याजवळ येऊन उभा राहिला; व म्हणाला कीं, तूं महाकालबनांत जाऊन शिवलिंगाचें

पूजन कर म्हणजे तुझी कार्यसिद्धि होईल. इतक्यांत प्रत्यक्ष विष्णुहि तेथें आले; व प्रयागाला; व मला घेऊन महाकालवनांत गेले. तेथें घंटेश्वराच्या पूर्वेस असणाऱ्या शिवलिंगाचें प्रयागानें पूजन केलें नंतर तें शिवलिंग प्रसन्न होऊन प्रयागाच्या प्रार्थनेप्रमाणें तें मला ज्ञानदान करतें झालें. त्या दिवसापासून ह्या लिंगाला प्रयागेश्वर असें नांव प्राप्त झालें. ह्या प्रयागेश्वराचें पूजनानें शंभर अश्वमेधयज्ञाचें फल प्राप्त होऊन त्यास स्वर्ग व मोक्ष मिळतो, असें नारदाचें भाषण ऐकून प्रियव्रतहि महाकालवनांत जाऊन प्रयागेश्वराचें दर्शन घेता झाला. त्या दर्शनाच्या प्रभावानें प्रियव्रत माझ्या स्थानाला प्राप्त झाला. जे माघमासीं ह्या लिंगाचें पूजन करितात, त्यांस अश्वमेधाचें पुण्य प्राप्त होतें.

---

## अध्याय ५९ वा.

### सिद्धेश्वरमाहात्म्य.

अश्वशिरा नांवाचा एक राजा होता. त्यानें अश्वमेधयज्ञ करून शेवटीं ब्राह्मणांस पुष्कळ दक्षिणाहि दिल्या. नंतर कपिल; व सिद्धराट् असे दोन ऋषि राजाकडे आले. राजानें त्या दोघांचें आदरातिथ्य केल्यावर त्या दोन ऋषींस प्रश्न केला कीं, हे महर्षिहो, अनेक पातकें नाहींशी होण्यास काय केलें पाहिजे ? हें सांगा. मी असें ऐकिलें आहे कीं, इंद्रादि देव नारायणाचें पूजन करून आनंदानें स्वर्गांत राहतात, असा नारायणाचा प्रभाव आहे; तेव्हां त्याबद्दल मला उलगडा करून सांगा. नंतर ते दोन ऋषि म्हणतात; हे राजा ! जो तूं विष्णु म्हणून म्हणतोस ते आम्ही आहोंत, असें म्हणून कपिल हा विष्णु झाला; व सिद्धराट् जैगिषव्य गरुड झाला. नंतर गरुडावर बसलेल्या विष्णूला पाहून राजाला आश्चर्य वाटलें; व तो म्हणतो; हे सिद्धहो ! तुम्ही जरी विष्णु झाला तरी खरे विष्णु नव्हे; कारण विष्णूच्या नाभिकमलापासून ब्रह्मदेव उत्पन्न झाला आहे; व तो तर येथें दिसत नाहीं, अर्थात् विष्णु हा तुमच्याहून निराळा आहे. नंतर त्या ऋषींनीं शेषशायी ब्रह्मदेवासह विष्णूचें स्वरूप राजास दाखविलें. तरी सुद्धां राजा म्हणतो कीं, तुम्ही योगी आहां, योगसामर्थ्यानें असली माया आमच्यासारख्यांना दाखवून तुम्ही आम्हास मोहित करूं शकाल; म्हणजे तेवढ्यानेंच तुम्ही विष्णु व्हाल; असें मात्र सिद्ध होत नाहीं. तुम्ही खरे विष्णु नव्हे; कारण विष्णूच्या शरीरांत अनेक ब्रह्माण्डें असतात. नंतर ऋषींनीं आपलें विष्णुरूप अनंत ब्रह्मांडांनीं युक्त आहे,

असें दाखविलें. त्यावेळीं राजा हात जोडून त्यांची प्रार्थना करूं लागला असतां ऋषी राजास म्हणतात; तूं महाकालवनांत सिद्धेश्वर नांवाचें लिंग आहे, त्यांचें पूजन कर; म्हणजे तुलाहि सर्व सिद्धि प्राप्त होतील. तूं जातांच तेथें तुला विष्णुमूर्ति दिसेल; व त्यांचें तूं पूजन कर. त्या राजानें त्याप्रमाणें त्या सिद्धेश्वराचें पूजन करून सर्व सिद्धी प्राप्त करून घेतली ह्याच्या पूजनानें सर्व सिद्धि व पुरुषार्थ साध्य होतात.

## अध्याय ६० वा.

### मतंगेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वति! एक सुगति नांवाचा ब्राह्मण द्वापारांत होऊन गेला. त्याला मतंग नांवाचा पुत्र होता. मतंग लहान असतांना एकदां त्यानें गाढवीणीच्या मुलास काठीनें मारलें. त्या वेळीं गाढवीण आपल्या मुलाला म्हणते, हे पुत्रा! तूं शोक करूं नकोस. तुला मारणारा मूर्तिमान् चांडाळ आहे, ब्राह्मण नव्हे; कारण ब्राह्मण कधींहि निर्दय नसतात. ह्याप्रमाणें गाढविणीनें पुत्राला केलेला उपदेश मतंगानें ऐकिला; व तो गाढवीणीला म्हणतो कीं, मी ब्राह्मणाचा मुलगा असतां मला चाण्डाळ कां म्हणतेस? नंतर गाढवीण मतंगाला म्हणते; उन्मत्त अशा न्हाव्याकडून किंवा शूद्राकडून ब्राह्मणस्त्रीचे ठिकाणीं होणारा पुत्र चांडळ होत असतो. तुझा जन्म तशाप्रकारचा असल्यामुळें तुला चांडाळ म्हटलें. ह्याप्रमाणें गाढविणीचें भाषण ऐकून तसाच मतंग बापाकडे येऊन गाढविणीनें सांगितलेली हकीगत निवेदन करिता झाला; व मतंग तप करण्याकरितां गेला. त्याची तपश्चर्या पाहून इंद्र पुढें येऊन उभा राहिला. नंतर मतंग म्हणतो; ब्राह्मणत्व प्राप्त करून घेण्याकरितां मी तप करीत आहे; तेव्हां मला ब्राह्मणत्व देण्यास आपण समर्थ आहां. इंद्र म्हणतो कीं, चांडाळाला ब्राह्मणत्व कसें प्राप्त होईल, तेव्हां तूं तप करण्याच्या भानगडींत पडूं नकोस, त्यायोगें उगीच नाश पावशील; असें सांगून इंद्र निघून गेला. नंतर मतंगानें पुनः एका आंगठ्यावर उभें राहून शंभर वर्षें गयेचेठिकाणीं जाऊन तप केलें. त्याची तपश्चर्या पाहून पुनः इंद्र त्याचे जवळ येऊन सांगतो कीं, तूं महाकालवनांत जाऊन सिद्धेश्वराच्या पूर्वेस ब्रह्मदेवानें स्थापित केलेलें एक लिंग आहे; त्याचें पूजन कर; म्हणजे तूं ब्राह्मण होशील. नंतर मतंग हा महाकालवनांत येऊन शिवलिंगाचें पूजन करिता झाला. नंतर ते शिवलिंग प्रसन्न होऊन मतंगाला म्हणालें कीं, हे मतंगा! तूं धन्य आहेस; तुला ब्राह्मणत्व दिलें आहे. नंतर तत्काल तो ब्राह्मणत्वाला प्राप्त होऊन शेवटीं ब्रह्मलोकाला प्राप्त होता झाला. तेव्हांपासून ह्या

लिंगाला मतंगेश्वर हें नांव प्राप्त झालें आहे. ह्या मतंगेश्वराच्या पूजाप्रभावानें ब्राह्मणत्व प्राप्त होऊन उत्तम गतीहि प्राप्त होते. जे अशुद्ध अंतःकरणाचे आहेत, त्यांनीं मतंगेश्वराचें पूजन केल्यास ते निर्मलांतःकरणाचे होऊन मुक्त होतात.

---

# अध्याय ६१ वा.

## सौभाग्येश्वरमाहात्म्य.

पूर्वीं प्राकृतकल्पामध्यें अश्ववाहन नांवाचा एक राजा होता. त्याच्या बायकोचें नांव मदनमञ्जरी होतें. ती जरी सर्व गुणानें युक्त होती, तरी राजाला अप्रिय वाटत होती. एके दिवशीं राजानें आपल्या दूताला बोलावून त्याच्याकडून मजनमञ्जरीला अरण्यांत सोडिलें. मदनमञ्जरी पतिव्रता असल्यामुळें, ती पतिविरहामुळें फार शोक करूं लागली व एक एक दिवस वर्षाप्रमाणें तिला वाटूं लागला. तेथें एक ऋषि प्राप्त झाला, त्याला पाहून मदनमञ्जरी म्हणाली, मला पतीनें कां टाकिले, हें सांगा. नंतर ऋषि म्हणाला, तुझें ज्या वेळीं लग्न लागलें त्या वेळीं तुझा पति पापग्रहानें दूषित होता; त्यामुळें तुझा पति तुझ्यावर प्रेम करीत नाहीं. नंतर मदनमंजरी म्हणाली; हे ऋषे ! माझें सौभाग्य अक्षय्य होऊन माझा पति मजवर प्रेम करील, असा कांहीं तरी उपाय सांगावा. नंतर ऋषि म्हणाला कीं, तूं महाकालवनांत जाऊन मतंगेश्वरासन्निध असणाऱ्या लिंगाचें पूजन कर; म्हणजे तुझ्या सर्व इच्छा पूर्ण होतील. मदनमंजरीनें त्याप्रमाणें पूजन करतांच राजाच्या बुद्धीला पत्नीचें स्मरण झालें; व तो जमदग्नीजवळ येऊन मदनमंजरी कोठें आहे ? व्याघ्रादि दुष्ट प्राण्यांनीं तिला मारिलें तर नसेल ना ? असे तर्कवितर्क मनांत आणून जमदग्नीला विचारिता झाला. जमदग्नी अश्ववाहन राजास म्हणाला, तुझी स्त्री सौभाग्य वाढून पतीची आपल्यावर प्रीति असावी, एवढ्याकरितां महाकालवनांत जाऊन शिवलिंगाचें पूजन करीत आहे. हें ऐकून राजा महाकालवनांत शिवपूजा करीत बसलेल्या स्त्रीस पाहून व तिला आलिंगन देऊन आपल्या महालांत परत आणिता झाला. हें लिंग सौभाग्य देणारें असल्यामुळें त्यास सौभाग्येश्वर हें नांव प्राप्त झालें आहे. जे कोणी सौभाग्येश्वराचें दर्शन घेतील किंवा पूजन करतील, त्यांचीं सर्व पातकें व दुर्दैवें नष्ट होऊन व ते सौभाग्यादि प्राप्त करून घेऊन; ह्या लोकीं अत्यंत सुख व ऐश्वर्य भोगून अंतकाळीं शिवलोकीं माझ्या स्वरूपाला येऊन मिळतील. या लिंगाच्या पूजनानें ग्रहपीडा दूर होऊन सार्वभौम राज्य प्राप्त होतें.

---

# अध्याय ६२ वा.

## रूपेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पाद्मकल्पामध्यें कमळापासून पद्म नांवाचा एक महापराक्रमी राजा उत्पन्न होता झाला. एकेदिवशीं तो आपलें सैन्य घेऊन रानांत मृगया करण्याकरितां गेला असतां मृगादिकांचा वध करून दमून गेल्यामुळें त्यास फार तहान; व भूक लागली. पुढें मोठें अरण्य लागून त्यांत एक सुंदर आश्रम राजाच्या दृष्टीस पडला. सैन्य बाहेरच उभें करून एकटा राजा आश्रमांत शिरला व आंत कोणीही नाहीं, असें पाहून " कोणी ह्या आश्रमांत नाहीं काय ? " अशी त्यानें मोठी आरोळी मारली. तो शब्द ऐकतांच आश्रमांतून एक कन्या राजाजवळ येऊन त्याचें आदरातिथ्य करती झाली. तेव्हां राजा म्हणतो; मी ऋषीच्या दर्शनाकरितां येथें आलों आहे. ते कोठे गेले आहेत ? सांग. नंतर ऋषिकन्या म्हणते; मी ब्रह्मचारी अशा कण्वाची मुलगी आहे. तें तिचें भाषण ऐकून राजा आपली पत्नी होण्याविषयीं तिची प्रार्थना करितां झाला. सर्व विवाहांत गांधर्वविवाह श्रेष्ठ आहे, तेव्हां गांधर्वविधीनें तूं माझी पत्नी हो, असें तिला म्हणाला. कन्या म्हणते; आपण दोन घटिका थांबा; म्हणजे कण्वच स्वतः हा संस्कार यथासांग पुरा करितील. राजा म्हणतो; आपणच आपला बंधु, मित्र वगैरे आहोंत, तूं स्वतःचा देह मला दान देण्यास पूर्ण अधिकारी आहेस. असें राजवाक्य ऐकून ऋषिकन्येनें राजाच्या आज्ञेला हुकार दिल्याबरोबर पद्मराजानें तिच्याशी गांधर्वविधीनें विवाह लावून व संभोगसुरताचाहि अनुभव घेतला; व तो राजा परत आपल्या सैन्याजवळ आला. नंतर कण्वऋषी आश्रमांत आले; व त्याला पाहून ती कन्या लाजली. ऋषीनें अंतर्दृष्टीनें सर्व प्रकार जाणून; व कन्येनें व्यभिचार केला, असें पाहून त्यानें कन्येला तूं काळी होशील, असा शाप दिला; व ज्याच्याशीं तूं रममाण झालीस तो राजाही दुष्टरूपाचा होईल. असें म्हणतांच कन्येला कृष्णस्वरूप व राजाला कुरूपत्व हीं प्राप्त झालीं. नंतर कन्येनें क्षमा मागितल्यावर कण्व तुष्ट होऊन सांगता झाला कीं, हे कन्ये ! तूं त्या राजाला घेऊन महाकालवनांत जाऊन पशुपेश्वराच्या पूर्वेस एक शिवलिंग आहे. त्यांचें तूं पूजन कर; म्हणजे तुला पूर्वीप्रमाणें स्वरूप प्राप्त होईल. पद्मराजानें व कण्वाच्या कन्येनें तेथें जाऊन शिवपूजन केल्यामुळें तात्काळ त्यास दिव्य देह प्राप्त झाला. तें लिंग रूपप्राप्ती करून देणारें असल्यामुळें त्यास रूपेश्वर हें नांव प्राप्त झालें आहे. जे कोणी रूपेश्वराचें पूजन करितील, ते अंतकाळीं शिवलोकीं जातील.

## अध्याय ६३ वा.

### धनुःसहस्रेश्वरमहात्म्य.

पूर्वी विदूरथ नांवाचा एक राजा होता. तो मृगया करण्याकरितां अरण्यांत गेला असतां, तेथें त्यानें एक मोठा खळगा पाहिला. तो खळगा म्हणजे जणुं काय पाताळांत शिरण्याचा रस्ताच होता! असें राजास वाटलें. नंतर तेथें सुव्रत नांवाच्या ब्राह्मणाला पाहून राजा त्यास विचारतो कीं, हे ब्राह्मणा! हा एवढा खळगा कसला आहे; ते सांगा. तें ऐकून सुव्रत ब्राह्मण म्हणतो. पृथ्वीवर कुजंभ या नांवाचा एक दैत्य आहे. तो ही पृथ्वी खणीत आहे. त्याला न जिंकितां तूं पृथ्वीवर सुखानें राज्य कसें करणार? नंतर राजानें सैन्य तयार करून व आपले दोन मुलगे बरोबर देऊन तें सैन्य कुजंभ दैत्याला मारण्याकरितां पाताळांत पाठविलें. दैत्यानें राजाचें सर्व सैन्य जिंकून राजपुत्रांनाहि पकडून नेलें. हें वर्तमान राजास समजतांच राजा शोक करूं लागला असतां मार्कण्डेय ऋषी विदूरथ राजाकडे येऊन राजास म्हणतात; हे राजा! तूं शोक करूं नको. महाकालवनांत रूपेश्वराच्या जवळ दक्षिणदिशेला एक लिंग आहे. त्याचें तूं पूजन कर; म्हणजे तुझें कार्य सफल होईल. नंतर मार्कंडेयाच्या सांगण्याप्रमाणें राजा तेथें जाऊन लिंगपूजन करितां झाला. तत्काळ तें लिंग प्रसन्न होऊन त्यानें राजास एक धनुष्य दिलें. तें धनुष्य सहस्र म्हणजे हजार धनुष्यांचें कार्य करीत असे. नंतर ह्या धनुष्याच्या जोरावर कुजंभाचा पराजय केला; व आपल्या सैन्यासह पुत्रांना बंदिखान्यांतून मुक्त केलें. सहस्र धनुष्यांची बरोबरी करणारे धनुष्य त्या शिवलिंगपूजनानें प्राप्त होऊन शत्रुनाश झाला, म्हणून त्या लिंगास धनुःसहस्रेश्वर हें नांव प्राप्त झालें. जे कोणी ह्या धनुःसहस्रेश्वर लिंगाचें पूजन करितील त्यांचे शत्रु नाश पावून ते मुक्त होतील.

## अध्याय ६४ वा.

### पशुपतीश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे देवि! पूर्वीं पशुपाल नांवाचा एक पशूंचें पालन करण्याविषयीं उत्सुक असा राजा होता. तो समुद्रस्नानाला जात असतां वाटेंत दहा पुरुष व एक स्त्री त्याच्या दृष्टीस पडलीं. त्या सर्वांनीं राजाला वेढा दिला. राजाला त्यांचा राग येऊन त्यानें त्या दहा पुरुषांना मारून टाकिलें, तरीसुद्धां

ते दाहा पुरुष पुनः जिवंत होऊन राजाला गराडा घालते झाले. त्या दाहांनीं राजाचें धैर्य पाहून आश्चर्य केलें; व ते राजाच्या देहांत गुप्त झाले; नंतर पशुपाल राजा फार दुःख करूं लागला असतां, नारद ऋषि त्याजवळ येऊन म्हणाले कीं, हे राजा! तूं भिऊं नको, तुला जे दाहा पुरुष भेटले, तीं पांच कर्मेंद्रियें व पांच ज्ञानेंद्रियें मिळून दाहा इंद्रियें पुरुषस्वरूप घेऊन तुला भेटलीं, असें समज; व जी एक स्त्री दिसली ती स्त्रीस्वरूप घेतलेली बुद्धि होय. आतां तूं त्या सर्वांना जिंकलें आहेस. ज्या ब्रह्मादि देवांच्या आज्ञेंत वागणारीं इंद्रियें ब्रह्मादिकांस मोहित करून खड्ड्यांत टाकतात, तीं हीं पाहा इंद्रियें होत. उदाहरणार्थः—एकदां दक्षानें यज्ञ केला असतां तो इंद्रियलोलुप होऊन त्यानें शंकराला हविर्भाग अर्पण केला नाहीं; तेव्हां शंकरहि इंद्रियाधीन होऊन त्यानें क्रोधानें पूषाचे दांत पाडिले, सूर्याला मोहित केलें, भगाचे डोळे फोडले, असा अनर्थ सुरू केला. त्या वेळीं ब्रह्मादि देवहि गुप्तपणानें पशूंचीं रूपें घेऊन कांहीं दिवस राहते झाले. नंतर पशुपाल राजानें विचारलें कीं, देव पशुत्व टाकून पुनः देवत्व कसें मिळविते झाले, तें सांगा. तेव्हां नारद म्हणाले, हे राजा! एकदां पशुरूप घेतलेले ब्रह्मादि देव शंकराजवळ जाऊन व त्याची प्रार्थना करून पशुत्व नष्ट होण्याचा उपाय त्यास विचारते झाले, तेव्हां शंकर ह्मणाले, हे ब्रह्मादि देवहो! तुम्हीं महाकालवनांत जाऊन पशुत्व दूर करणारें एक लिंग आहे, त्याचें पूजन करा; म्हणजे तुमचें पशुत्व दूर होईल; तेव्हां सर्व देव तेथें जाऊन व लिंगपूजा करून पशुभावापासून मुक्त झाले; म्हणून त्या लिंगाला पशुपतीश्वर हें नांव प्राप्त झालें. तात्पर्य; इंद्रियलोलुप अशा देवांना अशीं दुःखें भोगावीं लागतात; व तीं सर्व इंद्रियें तूं जिंकीलीं आहेस; करितां हे पशुपाल राजा! तूंहि त्या लिंगाचें पूजन कर; म्हणजे मुक्त होशील. नंतर तो पशुपाल राजा त्या लिंगाचें पूजन करून मुक्त झाला.

---

## अध्याय ६५ वा.

### ब्रह्मेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती! पूर्वीं पुलोमा नांवाचा एक दैत्य होता. त्यानें सर्व देवांना पादाक्रांत करण्याचा विचार करून समुद्रकाठीं आगमन केलें. नंतर पुलोमा दैत्याची व शेषशायी विष्णूची गांठ पडली. विष्णूला पाहून दैत्य आपल्या सैनिकांस म्हणतो कीं, हाच विष्णु आम्हां सर्व दैत्यांचा नाश कर-

ण्याला कारणीभूत आहे, करितां ह्याचा प्रथम फडशा उडविला पाहिजे. असें म्हणून सैन्यासह दैत्य विष्णूवर धाऊन जाऊं लागले, तोंच विष्णूच्या नाभिकमलापासून उत्पन्न झालेले ब्रह्मदेव त्याचे दृष्टीस पडले. विष्णु म्हणतात; हे ब्रह्मदेवा ! ह्या दैत्याचा नाश करण्याविषयीं प्रयत्न करा. ह्याला वर मिळाला असल्यामुळें हा मला सहज जिंकील; करितां तूं महाकालवनांत जाऊन च्यवनेश्वराच्या उत्तरेस असणारें जें शिवलिंग आहे त्याचें पूजन कर; म्हणजे तूं ह्या दैत्याला मारूं शकशील. नंतर ब्रह्मदेव महाकालवनामध्यें जाऊन, लिंगाचें पूजन करून; व शंकराची प्रार्थना करून इच्छित वर मागता झाला. शंकराच्या वरप्रसादानें ब्रह्मदेवानें पुलोमादैत्याचा नाश केला विष्णु; व ब्रह्मदेव महाकालवनांत ज्या लिंगाचें ब्रह्मदेवानें पूजन केलें होतें तेथें आले. विष्णूनेंहि त्याच लिंगाचें पूजन करून त्या लिंगाचें नांव ब्रह्मेश्वर असें ठेविलें; व सांगितलें कीं, जे कोणी ह्या ब्रह्मेश्वराचें पूजन करितील ते ब्रह्मलोकीं कांहीं काळ राहून नंतर माझ्या लोकाला म्हणजे विष्णुलोकाला प्राप्त होतील. ह्याप्रमाणें ब्रह्मेश्वराचें माहात्म्य वर्णन करून विष्णु वैकुंठाला; व ब्रह्मदेव ब्रह्मलोकाला निघून गेले. हें आख्यान जे श्रवण करितील; किंवा जे कोणी ह्याचें दर्शन घेतील त्यांस पंचमहापातकांची बाधा होणार नाहीं; व ते सर्व पापापासून मुक्त होतील.

---

## अध्याय ६६ वा.

### जल्पेश्वराचें महात्म्य.

शंकर म्हणतात; पूर्वीं जल्प या नांवाचा एक राजा होता. त्याला पराक्रमी असे पांच पुत्र झाले. त्यांचीं नांवें अनुक्रमें सुबाहु, शत्रुमर्दी, जय, विजय; व विक्रांत अशीं असतीं झालीं. जल्पानें आपल्या पांच पुत्रास निरनिराळ्या प्रदेशाचें राज्य अर्पण केलें; म्हणजे पूर्वप्रदेशाचें राज्य सुबाहूला दिलें, दाक्षिण देश शत्रुमर्दीला दिला, पश्चिमदेशाचें राज्य जयाला; व उत्तरेकडील विजयाला देऊन आपल्या गादीवर विक्रांताला बसविलें; व तो स्वतः अरण्यांत निघून गेला. विक्रांताचा जो प्रधान होता, तो विक्रांताला म्हणतो, हे राजा ! तूं जें राज्य करितोस तें फक्त एकच देशाचें करीत आहेस, करितां तुला जर लोकांत मानमान्यता मिळावी, कीर्ति प्राप्त होऊन सर्वत्र आपलाच जयजयकार व्हावा, अशी इच्छा असेल तर आपल्या चारहि बंधूंचा पराजय करून सर्व पृथ्वीचा सार्वभौम असा राजा हो. विक्रांतानें बरें आहे, असें म्हटल्यावर प्रधानानें पुरोहिताकडून अथर्वणमंत्रानें जारणमारण विधि करवून एक कृत्या

( राक्षसी ) उत्पन्न केली. विक्रान्ताचें व त्याच्या प्रधानाचें हें कृत्य इतर सुबाहुप्रमुख बंधूंस समजतांच त्यांनींहि आपल्या पुरोहिताकडून यज्ञादि विधी करवून चार कृत्या ( राक्षसी ) निर्माण केल्या, ह्या चार कृत्यांनीं विक्रांताच्या राज्याचा फडशा पाडला, व विक्रांताच्या एक कृत्येनें सुबाहुप्रमुख चारीहि बंधूंचा नाश केला. तात्पर्य; आपले पांचहि पुत्र आपापसांत दुष्कृत्यें करवून राज्यासह नष्ट झाले, ही हकीगत जल्पाला समजल्यावर त्याला फार वाईट वाटलें; व ह्या पांच पुत्रांना मारण्याला कारण माझे पांच मुख्य प्रधान कारणीभूत झाले, अर्थात् त्याचा संबंध माझ्याकडे असल्यामुळें मीच सर्वांचा नाश करण्यास कारणीभूत आहे, असें समजून त्या दोषाच्या निवारणार्थ वशिष्ठानें सांगितल्याप्रमाणें तो महाकालवनांत जाऊन कुक्कुटेश्वराच्या पश्चिमेस असणाऱ्या लिंगाचें पूजन करिता झाला. त्याच्या पूजनानें मी प्रसन्न होऊन त्यास पापमुक्त करून त्या लिंगाचें जल्पेश्वर असें नांव ठेविलें. ह्याचें पूजनानें सर्व पातकें नष्ट होऊन अखंड शिवलोक प्राप्त होतो.

---

## अध्याय ६७ वा.

### केदारेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती! सृष्टीच्या आरंभीं सर्व देव थंडीनें व्याकुळ होऊन ब्रह्मदेवाला शरण गेले. नंतर ब्रह्मदेव सर्व देवांना घेऊन कैलासपर्वतावर मजकडे आले, व ब्रह्मदेवानें मला सर्व हकीगत सांगितली. देवांना झालेल्या थंडीपासून त्यांचें निवारण व्हावें, एतदर्थ मी हिमालय पर्वताला बोलावून सांगितलें कीं, आजपासून तूं देवांना थंडीपासून होणारी पीडा देवूं नको; व हिमालयपर्वताला राहण्याकरितां एक जागा नियमित करून स्वतः मी त्याच्या शिखरावर लिंगस्वरूप घेऊन राहिलों. तेंच लिंग त्रैलोक्याचें ठिकाणी केदारेश्वर या नांवानें प्रसिद्ध झालें. त्याचठिकाणीं मी एक जलाशय निर्माण केलें. ब्रह्मादि सर्व देव त्या पुण्यकारक जलाशयांत स्नान करून लिंगदर्शन घेतात. केदारेश्वराच्या दर्शनानें सर्व देवांची पीडा नष्ट झाली, ही वार्ता सर्वत्र पसरल्यामुळें कित्येक रजोगुणी व तमोगुणी लोक केदारेश्वर लिंगाच्या दर्शनाकरितां हिमालयपर्वतावर आले. त्यांस पाहून मी आपलें स्वरूप नाहींसें केलें. माझें दर्शन त्यांस न झाल्यामुळें ते फारच काळजी करूं लागले. सरते शेवटीं आकाशवाणीकडून मी त्यांस सांगितलें कीं, ह्याठिकाणीं तुम्हाला माझें दर्शन होणार नाहीं, तर तुम्ही महाकालवनांत शिप्रानदीचे काठीं जाऊन तेथें स्नान करा; म्हणजे तेथें तुम्हास केदारे-

श्वराचें दर्शन होईल. ह्या माझ्या वचनाप्रमाणें सर्व लोक महाकालवनांत शिप्रानदीवर स्नान करतात तोंच तेथें त्याचे समोर शिवलिंग उत्पन्न झालें. त्यांनीं शिवलिंगाचें दर्शन घेऊन मोठ्या आनंदानें त्याची पूजा केली. नंतर मी प्रसन्न होऊन त्या सर्वांस मुक्त करून कैलासपर्वतावर आणिलें. त्या दिवसापासून त्या लिंगाला केदारेश्वर हें नांव प्राप्त झालें. जे कोणी ह्या केदारेश्वराचें दर्शन घेऊन पूजन करितील, त्यांचीं सर्व पातकें नष्ट होतील; व ते ह्या लोकीं सुख भोगून शेवटीं माझ्याच लोकाला प्राप्त होतील.

---

## अध्याय ६८ वा.

### पिशाचेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात, हे पार्वती! कलियुगाचे आरंभीं सोम नांवाचा श्रीमान् पण नास्तिकमताचा असा एक शूद्र होता. तो कांहीं काळानें मृत झाल्यावर दुष्कर्माच्या प्रभावानें त्यास मारवाड देशात पिशाच जन्म प्राप्त झाला. एके दिवशीं शाकटायन नांवाचा ऋषि बैलाच्या गाडींत बसून मारवाड देशांतून जात असतां तेथें पिशाचाची व शाकटायनाची गांठ पडली. पिशाच फारच भुकेनें पीडित झाल्यामुळें शाकटायनाला खाण्याकरितां त्याच्या अंगावर धावून आला. बराचसा पुढें आल्यावर बैलाच्या गाडीचा आवाज पिशाचाच्या कानीं पडल्यामुळें तो बहिरा झाला; व तो वेड्यासारखा भटकूं लागला; त्या वेळीं शाकटायन पिशाचाजवळ जाऊन म्हणाले कीं, हे पिशाचा! तूं असा भटकतोस कां? तुला कोणी त्रास दिला किंवा काय? तें मला सांग. तेव्हां पिशाच म्हणालें, मी तुमच्या गाडीचा शब्द ऐकून बहिरा झालों; व तुह्माला पाहतांच वेडा होऊन भटकत आहे, त्यामुळें काय करावें? हें मला सुचतच नाहीं. पिशाचयोनी मला कां प्राप्त झाली, व आतां ह्या पिशाचजन्मापासून मी कसा मुक्त होईन, तें मला सांगा. हें ऐकून शाकटायन पिशाचास म्हणाला, जे कोणी ब्राह्मणाचें धन हरण करितात; आई, बाप, स्त्री, लहान, गरीब इत्यादिकांना फसवून व राजाला फसवून जे द्रव्य लुबाडतात, जे दुसऱ्याचा विश्वासघात करितात, किंवा जे परस्त्रीचा अभिलाष करितात, जे पुराण, धर्मशाळा वगैरेची निंदा करितात, ते पिशाचजन्माला प्राप्त होतात. आतां जर तुला पिशाचयोनीपासून मुक्त व्हावें, अशी इच्छा असेल, तर तूं महाकालवनांत जाऊन ढुंढेश्वरांच्या दक्षिणेस एक शिवलिंग आहे, त्याचें दर्शन घे; म्हणजे तूं पिशाचजन्मापासून मुक्त होशील. पिशाच शाकटायनाला नमस्कार करून महा-

कालवनांत जाऊन पिशाचेश्वराचें दर्शन घेतां झाला. तत्काळ तो पिशाच दिव्य देह धारण करून व सर्व कुलांचा उद्धार करून शिवलोकाला गेला. जे गयेला गेल्यानेंहि पुण्य मिळत नाहीं, तें एका पिशाचेश्वराच्या दर्शनानें मिळतें. वैशाखीचतुर्दशीस पिशाचश्वराचें दर्शन घेतल्यास अनंत पुण्य मिळतें.

---

# अध्याय ६९ वा.

## संगमेश्वराचें माहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती। पूर्वी कलिंगदेशांत सुबाहुनांवाचा धार्मिक असा राजा राहत असे. त्याचें मस्तक दोनप्रहरच्या वेळीं दररोज फारच दुःखत असे. त्यानें मोठमोठे वैद्य बोलावून पुष्कळ औषधोपचार केले; परंतु गुण न येऊन उलट हें दुखणें दिवसेंदिवस अधिकाधिक वाढूं लागलें. एकेदिवशीं त्या राजाच्या विशालाक्षी नामक पत्नीनें राजास विचारिलें कीं, आजपर्यंत शेंकडो वैद्य आपणास औषधें देऊन गेले; परंतु एकाहि औषधानें आपणास गुण कां येत नाहीं, तें सांगा. नंतर राजा स्मित हास्य करून आपल्या पत्नीला म्हणतो; हे विशालाक्षी! ह्याचें कारण मी आतां सांगत नाहीं, तर आपण महाकालवनांत जाऊं; व तेथें गेल्यावर मी तुला सर्व कारण निवेदन करीन. नंतर दुसरे दिवशीं तो राजा पत्नीसह महाकालवनांत जाऊन शिप्रानदीवर आला. ज्याठिकाणीं शिप्रा, गंगा; व नीलगंगा ह्या तीन नद्या एकत्र मिळाल्या आहेत, व ज्याठिकाणीं संगमेश्वराचें पवित्र लिंग आहे, त्या लिंगाशेजारी सुबाहु पत्नीसह बसला असता पुनः विशालाक्षीनें राजाला पूर्वीचाच प्रश्न करून तुमची व्याधी दूर न होण्याचें कारण विचारिलें. राजा पत्नीला म्हणतो; हे प्रिये! तूं फार दमली आहेत, आतां येथें शयन कर; व उद्या सकाळीं तुला सर्व कांहीं सांगेन. दुसरे दिवशीं सकाळीं सुबाहु पत्नीस म्हणतो; मी पूर्वी शूद्रजन्माला प्राप्त झालों होतों; व त्या जन्मांत मी फारच वाईट कृत्यें आचरण केलीं. त्या पापाच्या योगें मृत झाल्यावर मला नरकांत जावें लागलें. दुसरा जन्म मत्स्ययोनींत प्राप्त झाला. त्या जन्मामध्यें एका कोळ्यानें मला धरून ह्याच संगमेश्वराजवळ आणिलें. मला संगमेश्वराचें दर्शन घडल्यामुळें त्या पुण्यप्रभावानें मी आतां राजकुलांत जन्मलों आहे. पूर्वी केलेल्या दुराचरणामुळें मला ही व्याधी जडली आहे, असें म्हणून त्या दोघांनीं संगमेश्वराचे दर्शन घेतलें; व त्याचें पूजन केलें, त्यायोगें सुबाहु राजाची सर्व व्याधी दूर होऊन तो पत्नीसह

पुष्कळ दिवसपर्यंत राज्यसुखाचा उपभोग घेऊन अंतकाळीं शिवलोकाला प्राप्त होता झाला. जे कोणी श्रावणमहिन्यांत संगमेश्वराचें दर्शन घेतील, ते शिवलोकीं निष्पाप होऊन गमन करितील.

---

## अध्याय ७० वा.

### दुर्द्धर्षेश्वराचें माहात्म्य.

शंकर म्हणतात हे पार्वती! आतां दुर्द्धर्षेश्वराचें माहात्म्य सांगतों; ऐका. पूर्वी नेपाळदेशांत दुर्द्धर्षनांवाचा एक राजा होता. त्याला तीन बायका होत्या. तो राजा अरण्यांत मृगया करण्याकरितां गेला असतां जणुं वनदेवताच कीं काय अशी एक सुंदर मुलगी राजाच्या दृष्टीस पडली. तिला पाहतांच राजा कामपीडित होऊन स्तब्ध असा तेथेंच उभा राहिला. ती लगी राजाजवळ येऊन त्यास म्हणते; मी कल्पनांवाच्या विप्राची मुलगी आहे. माझा बाप तप करीत आहे, त्याजवळ येऊन आपण मजविषयीं त्यास प्रश्न केल्यास तो मला आपल्या हवाली करील. नंतर त्या मुलीच्या सांगण्यावरून तो राजा कामपीडितच असल्यामुळें कोणताहि विचार न करितां एकदम कल्पविप्राजवळ येऊन तिच्याबद्दल याचना करिता झाला. त्याच्या मागणीप्रमाणें त्या विप्रानें आपली मुलगी राजाला दिली. राजा तिच्यासह त्याच अरण्यांत लतामंडपामध्यें रममाण होत आहे, इतक्यांत एक राक्षस येऊन; व राजाला मोहित करून कल्पाच्या मुलीला दूर नेता झाला. आपल्याला नवीन मिळविलेल्या पत्नीच्या नाशामुळें तो फारच शोक करू लागला असतां येथें कल्पविप्र येऊन दुर्धर्ष राजास म्हणतो कीं, हे राजा तूं शोक कां करितोस? सर्व जग मिथ्या आहे. तुझा नेपाळ देश, तशीच तुझी प्रजा, बायका व पुत्र वगैरे कोणीहि ह्यांपैकीं अक्षय्य टिकणारें नाहीं, करितां तूं आतां महाकालवनांत जाऊन शिप्रानदीचे काठीं ब्रह्मेशाचे पश्चिमेस एक शिवलिंग आहे, त्याचें दर्शन घे; म्हणजे तुझ्या सर्व इच्छा पूर्ण होतील. नंतर तो राजा कल्पविप्राच्या सांगण्याप्रमाणें महाकालवनांत जाऊन शिप्रानदीवर स्नान करिता झाला. दुर्धर्षराजा शिवलिंगाचें दर्शन घेऊन, व पूजन करून इच्छित वस्तु प्राप्त होण्याकरितां लिंगाची स्तुति करिता झाला. स्तुति करितांच एकाएकीं त्या लिंगातून एक ध्वनि उत्पन्न झाला कीं, ही तुझी राक्षसानें पळवून नेलेली बायको त्याचा नाश करून येथें आणिली आहे, आतां हिच्यासह तूं खुशाल राज्योपभोग घेऊन राहा. नंतर तो राजा तिला

घेऊन आनंदानें राज्य करितां झाला. त्या लिंगाचें दुर्धर्षानें पूजन केलें; म्हणून त्याचें नांव दुर्धर्षेश्वर असें प्राप्त झालें. जे कोणी ह्या लिंगाचें पूजन करितात ते सर्व पापापासून मुक्त होऊन अंतीं अखंड अशा शिवलोकाला प्राप्त होतात.

---

## अध्याय ७१ वा.

### प्रयागेश्वरमाहात्म्य.

नगरींत र म्हणतात; हे पार्वती ! वैवस्वतमन्वंतरामध्यें द्वापारयुगांत हस्तिनापुर पराक्रमी होतनु नांवाचा राजा राहत होता. तो शस्त्रास्त्रविद्येंत कुशल असून महा-श्वापदांचा वा. तो मृगया करण्याच्या उद्देशानें मोठ्या अरण्यांत जाऊन मृगादि नूच्या दृष्टीस ध करिता झाला. त्या अरण्यांत सुंदर, व तरुण अशी स्त्री शंत-प्रार्थना केली पडली. शंतनु कामपीडित होऊन तिची त्यानें बायको होण्याविषयीं तो तिच्याशी रसतां, त्या स्त्रीनें ठीक आहे, असें अनुमोदन दिलें. नंतर ती स्त्री पुत्र उत्पममाण होऊन त्यास आठ पुत्र झाले. प्रत्येक खेपेला आठव्या पुत्राला न्न होताच, त्याला गंगाप्रवाहांत सोडीत असे. ज्या वेळीं ती वाटलें; व तो त्या गंगाप्रवाहांत टाकूं लागली त्यावेळीं शंतनु राजाला फार वाईट तूं विनाकारण त्या स्त्रीला विचारतो कीं, तू कोण आहेस ? कोणाची आहेस ? व टाकलेस; ती न पुत्रांना गंगाप्रवाहांत कां टाकतेस ? आजपर्यंत टाकलेस ते मी जन्मपरतु ह्याला तरी टाकूं नको. नंतर ती स्त्री शंतनूला म्हणते, हे राजा, ऋषींची मुलगी आहे; व मला गंगा असें म्हणतात. हे जे आतां पर्यंत आठ पुत्र झाले, ते आठ वसू होत.त्यांना वसिष्ठऋषींनी शाप दिल्यामुळें त्यांस हा मनुष्य-जन्म प्राप्त झाला आहे, असें सांगून मनुष्यधर्माला अनुसरून स्त्रीरूपी गंगा पुत्रशोकानें रडूं लागली; इतक्यांत नारद ऋषि येऊन तीस विचारतात, हे गंगे, तूं कां रडतेस ? गंगा म्हणते, हे नारदा, मी आपल्या हातानें सात पुत्र गंगाप्रवाहांत टाकिले; व त्या वियोगानें व ह्या पुत्रहत्यारूप महापातकानें मी फार दुःखी आहे; म्हणून मी रडतें. नारद म्हणतात, हे गंगे, जे तूं सात वसु पुत्रत्वाला प्राप्त झालेले असे गंगाप्रवाहांत टाकलेस, ते तर शापमुक्त होऊन स्वस्थानाला गेले, तेव्हां त्याबद्दल तुला शोक करण्याचें कारण नाहीं. आतां तुला जे पुत्रहत्येचें पाप लागलें आहे, त्याबद्दल जर तूं शोक करून रडत असशील, तर तूं अवंतीनगरांत जाऊन दुर्धर्षेश्वराच्या दक्षिणेस शिव लिंग आहे, त्याचें पूजन कर; म्हणजे पापमुक्त होशील; नंतर गंगा नार-

द्राच्या सांगण्याप्रमाणें तेथें जाऊन शिवलिंगदर्शनानें पापमुक्त झाली. गंगेच्या दर्शनाला यमुना नदीहि तेथें आली; व त्या दोहोंचा जेथें संगम झाला तेथें असणाऱ्या शिवलिंगाला प्रयागेश्वर हें नांव प्राप्त झालें.

---

## अध्याय ७२ वा.

### चंद्रादित्येश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणाले, हे पार्वति ! पूर्वी शंबर नांवाच्या दैत्यानें सर्व देवांचा पराभव केला. चंद्राला जरी राहूनें ग्रासलें होतें, तरी तो तसाच बृहस्पतीजवळ येता झाला. इंद्राचाहि पराजय झालेला पाहून राहूच्या कचाट्यांतून सुटून दैत्याचें रूप घेऊन चंद्र गुप्तवेषानें पळून गेला, तो सूर्याजवळ आला; तेव्हां चंद्र व सूर्य हे रथांत बसून जिकडे शंबर नाहीं, तिकडे अरुणाला रथ हांकण्यास सांगितलें. आडमार्गानें विष्णूकडे जाऊन चंद्रसूर्यांनीं विष्णूची पुष्कळप्रकारें स्तुति केली असतां, विष्णु प्रसन्न होऊन चंद्र व सूर्य ह्यांस म्हणाले, हे देवहो, तुम्ही दोघे येथें कशाकरितां आलां, तें सांगा; तेव्हां ते म्हणाले, हे विष्णो ! शंबरदैत्यानें सर्व देवांचा व आमचा पराजय करून आम्हास देशोधडीस लावलें आहे; व ह्याकरितां आम्ही आमचें रक्षण व्हावें; म्हणून तुझ्या आश्रयाला आलों आहों. ह्याप्रमाणें त्यांचें भाषण ऐकून, विष्णु म्हणतात, तुम्ही दोघे महाकालवनांत जाऊन महाकालेश्वरलिंगाच्या उत्तरेस एक शिवलिंग आहे, त्याचें पूजन करा; म्हणजे शंबराचा नाश होईल व तुमचा विजय होऊन तुमच्या इच्छित वासना सफल होतील. याप्रमाणें विष्णूचें भाषण ऐकून चंद्र व सूर्य हे महाकालवनांत जाऊन महाकालेश्वराच्या उत्तरेस असणाऱ्या शिवलिंगाचें पूजन मोठ्या मनोभावानें करते झाले. तत्काल त्या लिंगांतून एक वाणी उत्पन्न झाली कीं, तुमच्या सर्व इच्छा सफल झाल्या आहेत. शंबराचा नाश होऊन इंद्राला इंद्रपदावर बसविलें आहे; व तुम्हाला पीडा देणारे जे राहु व केतु यांस नवग्रहांच्या शेवटीं स्थापित करून नियमित कालावांचून ते तुम्हाला कधींहि पीडा देऊं शकणार नाहींत. तुम्ही उभयतांनीं ह्या लिंगाचें पूजन केलें; म्हणून ह्या लिंगाचें नांव चंद्रादित्येश्वर प्राप्त होईल. जे कोणी चंद्रादित्येश्वराचें पूजन करितील, ते चंद्रलोकाला व सूर्यलोकाला प्रथम जाऊन शेवटीं माझ्या ठिकाणीं शिवलोकामध्यें आनंदानें राहतील.

---

# अध्याय ७३ वा.

## करभेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; अयोध्येमध्यें वरिकेतु नांवाचा राजा राज्य करीत होता. तो एकदां मृगया करण्याकरितां मोठ्या अरण्यांत जाऊन मृगया करीत असतां एक बाण उंटाच्या मुलाला; म्हणजे करभाला लागला; परंतु त्यायोगें तो करभ ( उंट ) मृत झाला नाहीं; व मोठ्या वेगानें पुढें धांवत सुटला. राजाहि त्याचे मागून त्यावर बाण सोडीत सोडीत पाठलाग करूं लागला. तो करभ दुसऱ्या एका मोठ्या अरण्यांत घुसला; व नाहींसा झाला. नंतर करभ कुठेंहि त्यास दिसेना; मात्र एक जवळच ऋषींचे आश्रम त्याच्या दृष्टीस पडले. राजा फारच दमला असल्यामुळें तो त्या आश्रमांत शिरला. राजा आलेला पाहून ऋषींनीं राजाचें आदरातिथ्य करून राजाला सर्व हकीगत विचारिली असतां राजा म्हणतो; हे ऋषिवर्य ! मी मृगया करीत असतां एका करभाच्या (उंटाच्या) मागोमाग धांवत मी येथें आलों. आपण त्रिकालज्ञानी आहां, तेव्हां तो करभ कोठें गेला, हे मला सांगा. नंतर ऋषी म्हणतात; हे राजा, तो करभ महाकालवनांत गेला आहे; व तेथें लिंगरूप घेऊन क्षेत्रपालेश्वराच्या पश्चिमेस करभेश्वर नांवानें राहिला आहे. आतां तूं तेथें जाऊन करभेश्वराचें पूजन कर; म्हणजे मुक्त होशील. नंतर ब्राह्मणांच्या सांगण्याप्रमाणें वीरकेतू राजा महाकालवनांत जाऊन करभेश्वराचें पूजन करून मुक्त होता झाला. हाच करभ पूर्वी धर्मध्वज नांवाचा राजा होता, व तो एका कृश शरीराच्या ऋषीला हसल्यामुळें त्या ऋषीनें त्या धर्मध्वजास शाप दिला होता कीं, तूं करभ ( उंट ) जन्माला पावशील; व जेव्हां वीरकेतू राजा तुला बाण मारून तुझा पाठलाग करील, तेव्हां तूं महाकालवनांत येऊन शिवलिंगपूजन केल्यामुळें शापमुक्त होशील, असा उच्छाप दिला होता. तेव्हां त्या शापाप्रमाणें करभहि मुक्त झाला, व वीरकेतु राजा करभाच्या संगतीनें ऋषींच्या सांगण्यावरून करभेश्वराचें पूजन केल्यामुळें तोहि मुक्त झाला. जे कोणी करभेश्वराचें पूजन करितील ते अक्षय्य अशा शिवलोकाला प्राप्त होतील.

# अध्याय ७४ वा.

## राजस्थलेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पूर्वी विष्णुकल्पामध्यें मन्वन्तराच्या आरंभीं पृथ्वीवर कोणीहि राजा नाहीं, व राजावाचून जगाची व्यवस्था सुरळीत लागणें अशक्य

आहे, असा विचार ब्रह्मदेव करीत असतां रिपुंजयनामक राजर्षीची व ब्रह्मदेवाची गांठ पडली. नंतर ब्रह्मदेव रिपुंजयास म्हणतो, हे पुत्रा ! तूं एक कल्पपर्यंत पृथ्वीचें राज्य सुरळीत करावेंस, अशी माझी इच्छा आहे. आतांपर्यंत तूं तपश्चर्या केलीस ती पुष्कळ झाली. तूं सर्व लोक धर्मयुद्धानें पादाक्रांत केलेस, आतां सुखानें राज्य कर. नंतर रिपुंजय ब्रह्मदेवास म्हणतो, जर मी पृथ्वीचें राज्य करावें, अशी तुझी इच्छा असेल तर मला राहण्याकरितां सात कल्पपर्यंत सतत अस्तित्वांत असणारी अवन्तीनगरी पाहिजे; ती जर देशील तर मी राज्यकारभार हातीं घेतों. असें रिपुंजयाचें भाषण ऐकून ब्रह्मदेवानें सांगितलें कीं, तुझ्या इच्छेप्रमाणें सर्व कांहीं सिद्ध होईल, असें म्हणून ब्रह्मदेव स्वस्थानीं निघून गेले. नंतर रिपुंजय देवांना दवंडी पिटवून सांगता झाला कीं, देवहो ! तुम्हाकरितां स्वर्ग निर्मिला आहे. तुम्ही स्वर्गांतच राहिले पाहिजे. पृथ्वीवर कधींहि येणें उपयोगी नाहीं. पृथ्वी ही मनुष्यांकरितां आहे, देवांकरितां नव्हे हें रिपुंजयाचें वाक्य ऐकून आम्हाला ताकीद देणारा हा कोण असें समजून रागानें इंद्रानें पृथ्वीवर पाऊसच पाडला नाहीं, त्या वेळीं रिपुंजय स्वतःच्या तपःसामर्थ्यानें मेघ उत्पन्न करून पृथ्वीवर पर्जन्य पाडता झाला. पर्जन्य न पाडण्यानें पृथ्वीचा संहार होत नाहीं, हें पाहून इंद्रानें कांहीं काळ पुष्कळ पाऊस पाडून पृथ्वी जलमय केली; त्या वेळीं रिपुंजयानें स्वतः वाऱ्याचें रूप घेऊन पाऊस उडवून लाविला; व पृथ्वीचें रक्षण केलें. नंतर यज्ञादि कर्में बंद करण्याकरितां इंद्रानें पृथ्वीवरचा अग्नि बंद करून टाकिला, तेव्हांहि त्याच राजानें स्वतः अग्नि बनून पूर्ववत्, यज्ञादि कर्में चालविलीं. शेवटीं इंद्रादिदेवांचा नाइलाज होऊन ते मजकडे प्राप्त झाले. नंतर मी रिपुंजय स्वस्थानीं नाहीं, असें पाहून मी त्याच्या स्थानांवर जाऊन बसलों. नंतर रिपुंजयानें आपल्या स्थानावर बसलेल्या मला पाहून व माझ्या तेजानें दिपून जाऊन तो भयभीत झाला. त्या नंतर तूं कोण आहेस? वगैरे मला विचारून रिपुंजय माझी स्तुति करिता झाला. रिपुंजय मला म्हणतो कीं, मी या स्थलाचा राजा आहें. ह्या स्थलाचें राज्य ब्रह्मदेवानें मला दिलें आहे, असें सांगून त्यानें माझी स्तुति केल्यावर मी त्यास बोललों कीं, तुला कांहीं इच्छा असल्यास वर माग. रिपुंजय म्हणतो; हे शंकरा ! आपण मला आपली भक्ति द्यावी, व ह्या स्थलाचें नांव राजस्थलेश्वर असें ठेवावें; एवढीच माझी इच्छा आहे. नंतर मी त्याला त्याप्रमाणें वर देऊन गुप्त झालों. इंद्रादि देवांना स्वस्थानीं जाण्यास सांगून रिपुंजयापासून त्यांना पीडा होणार नाहीं, असा बंदोबस्त केला. जे कोणी दशमीला ह्या राजस्थलेश्वराचें दर्शन घेऊन त्याचें पूजन करितील त्यांस अखंड राज्यादि सुख व शिवलोक प्राप्त होईल.

---

# अध्याय ७५ वा.

## वडलेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात, हे पार्वति, कुबेराचा मणिभद्र नांवाचा एक मित्र होता. त्या मणिभद्राला वडल नांवाचा एक रागीट असा पुत्र उत्पन्न झाला. तो वडल एकदां कुबेराच्या नलिनीनामक स्त्रीजवळ क्रीडा करण्याकरितां गेला असतां तेथें कुबेराच्या पत्नीला पाहून आनंदित होत्साता तिच्याशीं क्रीडा करूं लागला. शेवटीं ही वार्ता मणिभद्राला समजली; व आपला पुत्र अत्याचार करीत आहे, असें पाहून मणिभद्रानें पुत्र जो वडल त्याला शाप दिला कीं, ज्यापेक्षां माते-प्रमाणें पूज्य अशा कुबेरपत्नीशीं रममाण झालास. त्यापेक्षां तूं पांगळा, अंधळा, दरिद्री व क्षयी असा होशील. असा शाप होतांच वडल तात्काल पृथ्वीवर येऊन पडता झाला, व शाप दिल्याप्रमाणें अंधळा, क्षयी वगैरेप्रकारानें दुःखी होऊन व फारच चिंता करून शापमुक्त कसा होईन ? असा विचार करूं लागला. नंतर मणिभद्र आपल्या पुत्राजवळ येऊन म्हणाला, हे पुत्रा ! तूं अत्याचार केल्यामुळें हा तुला शाप झाला आहे, तरीसुद्धां जर तुला शापमुक्त व्हावें, अशी इच्छा असेल तर मी सांगतें तें कर. मी एकदां इंद्रलोकांमध्यें स्कंदानें ( कार्तिकस्वामीनें ) सांगितलेलें पुराण श्रवण केलें होतें. त्यांत महा-कालवनाचा प्रभाव वर्णन केला होता, तो असा कीं, महाकालवनांत स्वर्ग-द्वारेश्वराच्या दक्षिणेस एक शिवलिंग आहे, त्याचें पूजन केलें असतां सर्व-प्रकारच्या व्याधी नष्ट होऊन व मातृगमनादि दोष दूर होऊन रूप, कांति, सौभाग्य वगैरे प्राप्त होतें. आतां मी तुला माझ्या विमानांत बसवून महाकालवनांत घेऊन जातों तेथें तूं त्या लिंगाचें पूजन केलेंस, म्हणजे शापमुक्त होऊन कृतार्थ होशील. असें सांगून मणिभद्र वडलाला आपल्या विमानांत बसवून तत्काळ महाकालवनांत घेऊन जाता झाला, व तेथें वडलकडून मणिभद्रानें शिवलिंगाचें पूजन करविलें. पूजन करताच वडल पूर्वीप्रमाणें स्वरूपवान् व शापमुक्त होऊन सर्वव्याधींपासून मुक्त झाला. त्या लिंगाचें वडलानें पूजन केलें; म्हणून त्याचें नांव वडलेश्वर असें त्यादिवसापासून प्राप्त झालें. जे कोणी कार्तिक शुद्ध द्वाद-शीला वडलेश्वराचें पूजन करितील, त्यांना इतर प्रयागादि सर्व तीर्थांचें स्नान केल्याचें पुण्य प्राप्त होऊन पुनः जन्ममरणाचा त्यांस प्रसंग येणार नाहीं; व तो सर्वैश्वर्यसंपन्न होऊन, व ह्या लोकीं सुख भोगून अंतकाळीं शिवलोकाला प्राप्त होईल.

# अध्याय ७६ वा.

## अरुणेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वति ! पूर्वी देवयुगामध्यें प्रजापतीला कद्रू व विनता अशा दोन मुली होत्या, त्या दोन्ही प्रजापतीनें कश्यपाला दिल्या; आपल्याला बापप्रमाणेंच योग्य अधिकारी पति मिळाला, हें पाहून कद्रू व विनता ह्यांना मोठा आनंद झाला, व त्या उभयतां मनोभावानें पतिसेवा करूं लागल्या. कश्यप प्रसन्न होऊन त्यांस वर मागण्याविषयीं सूचना करिता झाला. कद्रूनें एक हजार पुत्र मागितले; व विनतेनें दोनच परंतु कद्रूच्या सर्व पुत्राहून बलवान् असे पुत्र मागितले. त्यांच्या मागण्याप्रमाणें कश्यप बरें आहे, असें म्हणून अरण्यांत निघून गेला. नंतर कद्रू एकहजार अंडीं व विनता दोन अंडीं निर्माण करिती झाली; कद्रूनें आपलीं हजार अंडीं पांचशें वर्षें ठेविल्यानंतर त्यांतून एकहजार सर्प उत्पन्न झाले; व विनतेनें आपलें अंडें अगोदरच फोडून पाहिलें असल्यामुळें त्यांतील गर्भ अपूर्णावयवी असा निर्माण झाला, तोच अरुण होय. नंतर त्या गर्भानें मातेला शाप दिला कीं, ज्याअर्थी तूं लोभाविष्ट होऊन अंडें फोडण्याची घाई केलीस; व मला पांगळा केलेंस त्या अर्थी तूं कद्रूची दासी होशील; परंतु ह्या दुसऱ्या अंड्यापासून उत्पन्न होणारा पुत्र तुला दास्यापासून मुक्त करील असें सांगितल्यावर अरुण म्हणजे विनतेचा अपूर्णावयवी पुत्र दुःखानें शोक करूं लागला. कांहीं काळानें मातेला शाप दिल्याबद्दल अरुणाला पश्चात्ताप होऊन तो फारच दुःख करूं लागला नंतर नारद तेथें येऊन अरुणास म्हणतो; हे अरुणा ! तूं महाकालवनांत जाऊन यज्ञेश्वराच्या उत्तरेस एक शिवलिंग आहे, त्याचें पूजन कर; म्हणजे तुझे सर्व दोष नाहींसे होऊन तुला उत्तम सुखाची प्राप्ती होईल; नारदाच्या सांगण्याप्रमाणें अरुण महाकालवनांत जाऊन लिंगपूजन करिता झाला. त्या लिंगांतून एक असा ध्वनि उत्पन्न झाला कीं, हे अरुणा ! मी तुला सूर्यतेजास सहन करण्याची शक्ति देतो. तूं सर्व सारथ्यामध्यें श्रेष्ठ होशील, व तुला कोणत्याहि प्रकारचें दुःख आजपासून होणार नाहीं. तूं सूर्याच्या रथाचें सारथ्यकर्म कर. तूं ह्या लिंगाचें पूजन केलेंस म्हणून ह्याला आजपासून अरुणेश्वर हें नांव प्राप्त होईल. जे कोणी कृष्णपक्षांतील चतुर्दशीस अरुणेश्वराचें पूजन करितील त्यांच्या पितरांचा उद्धार होऊन ते मुक्त होतील. असा ध्वनि ऐकून अरुण सूर्याकडे सारथ्यकर्म करण्यासाठीं प्राप्त झाला.

## अध्याय ७७ वा.

### पुष्पदंतेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वति ! आतां सत्त्याहत्तरावें पुष्पदंतेश्वराचें माहात्म्य सांगतों पूर्वी शिनि नावाचा ब्राह्मण संतति होण्याकरितां पुष्कळ वर्षे तप करिता झाला. त्याची ती भयंकर तपश्चर्या पाहून तूं मजशी शिनीला पुत्र देण्याबद्दल पुष्कळ प्रार्थना केलीस. नंतर मी पुष्पदंत नामक माझ्या एका गणाला आज्ञा केली कीं, तूं पृथ्वीवर शिनीचा पुत्र या रूपानें उत्पन्न हो. पुढें ह्याप्रमाणें माझें भाषण ऐकून पुष्पदंताला फार वाईट वाटलें; व तो मला म्हणाला कीं, आपण स पृथ्वीवर शिवलोक सोडून जाणें परंतु नाहीं; कारण ती भूमि पापकृत्य करण्यास प्रवृत्त करणारी आहे; तेव्हां कदाचित् माझ्याकडून जर दुराचरण घडलें, तर पुनः मला शिवलोकप्राप्ति न होता नरकप्राप्ति होईल, तेव्हां मी पृथ्वीवर जन्म घेऊं इच्छित नाहीं, हें पुष्पदंताचें भाषण ऐकून मला त्याचा राग आला; व त्यास शाप दिला कीं, ज्यापेक्षां तूं माझी आज्ञा मोडलीस त्यापेक्षां तूं मनुष्यलोकींच जाऊन पडशील. नंतर मी वीरक नामक गणाला हुकूम करून शिनीचा पुत्र होण्यास सांगितलें. त्याप्रमाणें वीरक हा शिनीचा पुत्र झाला. पुष्पदंताला मी शाप दिल्यामुळें त्यास फारच वाईट वाटलें व केलेल्या कर्माचा पश्चात्तापहि त्यास झाला. नंतर पुष्पदंत माझ्या आज्ञेप्रमाणें पृथ्वीवर येऊन पडला; व शोक करूं लागला. त्याचा तो शोक पाहून तूं माझी विनवणी केलीस कीं; पुष्पदंताचा आपण उद्धार करा. मी पुष्पदंताजवळ येऊन त्यास सांगितलें कीं, तूं महाकालवनांत जाऊन माझ्या लिंगाचें पूजन कर; म्हणजे तेंच लिंग तुझ्या नावानें प्रसिद्ध होईल; व त्या पूजनाच्या योगें तूं मुक्तहि होशील. पुष्पदंतानें त्या लिंगाचें पूजन केलें; व त्यायोगें तो शापमुक्त होऊन शिवलोकीं जाऊन राहिला. त्या दिवसापासून त्या लिंगाला पुष्पदंतेश्वर हें नांव प्राप्त झालें. जे ह्याचें पूजन करितील ते पुष्पकविमानांतून शिवलोकीं प्राप्त होतील.

---

## अध्याय ७८ वा.

### अविमुक्तेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणाले, शाकल देशांत चित्रसेन नांवाचा एक राजा होता. त्या राजाची चंद्रप्रभा नांवाची प्रिय अशी बायको होती. त्या राजाला पुत्र नव्हता;

परंतु मनोरमा नांवाची एक कन्या होती. ती मुलगी वैराग्यशील व ब्रह्मचर्याचरण करणारी असून तिला पूर्वपुण्याईनें मागील जन्माची आठवण होती. चित्रसेन एके दिवशीं आपल्या मुलीला मांडीवर घेऊन व ही लग्नाला योग्य झाली आहे, असा मनांत विचार करून त्यानें तिला विचारलें कीं, हे मुली! तुझें लग्न एकाद्या राजाशीं लावूं किंवा राजपुत्राशीं किंवा एकाद्या ब्राह्मणाशीं लावूं तें सांग; नंतर आपल्या प्रश्नाला आपली मुलगी उत्तर देत नाहीं, व लज्जित होत आहे, हें पाहून चित्रसेन पुनः म्हणाला कीं जर माझें हें भाषण तुला पसंत नसेल, तर तुला जो पति आवडेल त्याचशीं तूं लग्न लाव; म्हणजे स्वयंवर कर, असें सांगितलें. हें बापाचें भाषण ऐकून मनोरमा मोठमोठ्यानें रडूं लागली. ही आपल्या मुलीची स्थिति पाहून चित्रसेन म्हणाला कीं, हें एकाएकीं असें काय झालें? हिला पिशाच्चानें किंवा यक्षानें तर झडपली नाहींना? असे तर्कवितर्क चालू आहेत तोंच मुलगी म्हणाली, अहो बाबा! मला भूतानें किंवा पिशाच्चानें धरलें नाहीं. मला माझ्या पूर्वपुण्यानें मागील जन्माचें स्मरण झालें आहे. पूर्वीच्या जन्मीं मी हरिस्वामी ब्राह्मणाची बायको होत्यें; नंतर त्या जन्मांत तो पति अल्पायु होऊन मरण पावला, व मला वैधव्य प्राप्त झालें; पुढें मी पुष्कळ व्यभिचार करून पापाचरण केलें. शेवटीं मृत होऊन नरकलोकांतील सर्व यातना माझ्या पापकर्मानें मला भोगाव्या लागल्या. पुढें पशु, पक्षी इत्यादि कोट्यावधि जन्म मला प्राप्त झाले. शेवटीं मला चांडाळणीचा जन्म प्राप्त झाला. त्या जन्मामध्यें व्रणादिकांनीं पीडित व कोल्हे, कुत्रे, लांडगे इत्यादि श्वापदांनीं त्रस्त केलेली मी फिरत फिरत महाकालवनांत आल्यें. तेथें पिप्पलादेश्वराच्या जवळ एक शिवलिंग माझ्या दृष्टीस पडलें. तेवढ्याच लिंगदर्शनाच्या पुण्यप्रभावानें मी विमानांत बसून दिव्य देह धारण करून इंद्रलोकीं गेल्यें. त्या ठिकाणीं सर्व देवांनीं माझी स्तुति केली. ज्या लिंगाचें मी दर्शन घेतलें होतें त्याच लिंगाचें माहात्म्य श्रवण करतांच मला मोठा आनंद झाला. त्या लिंगाच्या दर्शनप्रभावानें आज मला तुझ्या पोटीं जन्म प्राप्त झाला आहे, व मला आतां त्याच महाकालवनांतील लिंगाचें पुनः दर्शन घ्यावें, अशी इच्छा झाली आहे. ह्याप्रमाणें मनोरमेचें भाषण ऐकून चित्रसेन परिवारासह महाकालवनांत येऊन त्याच लिंगाचें दर्शन घेता झाला; पुढें दिव्य लिंगदर्शनाच्या प्रभावानें चित्रसेनाला पुत्रप्राप्तीहि झाली; व स्वायंभूव मनूप्रमाणें सर्वत्र कीर्ति व जय ह्यानें तो राजा युक्त होता झाला. मनोरमा तेथें शिवलिंगांतच सर्वांसमक्ष गुप्त झाली, हें पाहतांच सर्वांना आश्चर्य वाटलें, व म्हणून त्या लिंगाचें नांव अविमुक्तेश्वर असें ठेविलें. जे कोणी अविमुक्तेश्वराचें दर्शन घेतील ते ब्रह्महत्यादि पातकापासून मुक्त होऊन अंतीं शिवलोकीं प्राप्त होतील.

---

# अध्याय ७९ वा.

## हनुमत्केश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वति, रावणादि राक्षसांचा वध करून रामचंद्र अयोध्येंत राज्यावर बसल्यानंतर रामचंद्राला वंदन करण्याकरितां अनेक ऋषि त्याजवळ प्राप्त झाले. रामचंद्रानें अगस्त्यप्रमुख ऋषींची अर्घ्यादिकांनीं पूजा केल्यावर ते ऋषि संतुष्ट होऊन रामचंद्राला म्हणतात. हे रामचंद्रा ! आमच्या सुदैवानें आज पुत्रपौत्रांसह रावणाचा नाश झाला व विजयी होऊन पत्नीसह राज्यारूढ झालेल्या आपणाला आम्ही पाहत आहों; खरोखरच आम्हीं आज कृतार्थ झालों आहों. तुझें मारुतीनें ( हनुमंतानें ) पुष्कळ कार्य करून तुला साहाय्य केलें आहे. तो चिरंजीव होवो, असें आम्ही इच्छितों. हनुमान् (मारुती) हा एकादश रुद्रांपैकीं अकरावा जो रुद्र त्याचा अवतार होय, त्याचें इंद्रादि दिक्पाल रक्षण करोत. ह्याप्रमाणें ऋषींचें भाषण ऐकून रामाला आश्चर्य वाटलें; व ऋषींस म्हणतात; तुम्ही लक्ष्मणाचें वर्णन न करितां ह्या वानराचेंच वर्णन कां केलेंत. नंतर ऋषि म्हणतात; हे रामा ! हनुमंताचा पराक्रम किती वर्णन करावा ! मी जें वर्णन केलें तें यथार्थ आहे. हाच हनुमान् चारशें कोश समुद्राचें उल्लंघन करून, लंकेंत जाऊन, व अंगठ्याएवढें रूप घेऊन रावणाच्या अंतःपुरांत शिरला. ह्यानेंच सीतेचें दर्शन घेऊन रावणाचे पराक्रमी प्रधानमंडळास खूप ताडण केलें, व रावणाजवळ पुष्कळ संभाषण करून सर्व लंका भस्म केली. हनुमंताचा पराक्रम प्रत्यक्ष काळ, इंद्र किंवा ब्रह्मदेव कोणीहि वर्णन करूं शकणार नाहीं. नंतर रामचंद्र म्हणतात; ऋषिहो ! तुम्ही म्हणतां हें सर्व खरें आहे. आम्हाला जयप्राप्ती होण्यास हनुमानच कारणीभूत आहे. ह्यांत शंका नाहीं. असें रामभाषण ऐकून ऋषि म्हणतात; हे रामचंद्रा ! ह्यानें तर मोठमोठाले पराक्रम केलेच आहेत; परंतु हाच हनुमान् लहानपणीं म्हणजे उपजतांच पक्क फळाच्या कल्पनेनें सूर्यबिंबाला धरण्याकरितां गेला असतां ही बातमी इंद्राला समजून इंद्रानें हनुमंतावर वज्रप्रहार केला. नंतर तें वज्र हनुमंताच्या हनुवटीखालीं लागून हनुवटीचा डावा भाग तुटून गेल्यामुळें हनुमान मूर्च्छा येऊन एका पर्वतावर पडला. हनुमंताची अशी स्थिति पाहून वायूनें आपल्या मुलाला म्हणजे हनुमंताला महाकालवनांत नेऊन व त्याच्या आरोग्यप्राप्ती करितां तेथें एक लिंग स्थापित करून त्याची पूजा केली. तत्काल हनुमान् पूर्वाप्रमाणें निरोगी झाला; व त्यामुळें वायूला आनंद झाला. ह्या लिंगाचें पूजन केल्याबरोबर हनुमंताला चेतना येऊन तो निरोगी झाला; म्हणून वायूनें ह्या लिंगाचें

हनुमत्केश्वर हें नांव ठेविलें. त्याठिकाणीं इंद्रादि देव येऊन हनुमंताला शस्त्रास्त्रें व उत्तम आशीर्वाद देते झाले. ऋषि म्हणतात, हे रामा ! ह्या हनुमंताला हा जो पराक्रम प्राप्त झाला आहे, तो हनुमत्केश्वराच्याच कृपेनें होय. असें सांगून व रामाची आज्ञा घेऊन ऋषि आपापल्या आश्रमाला निघून गेले. जे कोणी ह्या हनुमत्केश्वराचें पूजन करितील, त्यांचीं सर्व दुःखं नष्ट होऊन व ते अप्रतिहत-गति होऊन अंतकालीं शिवलोकीं प्राप्त होतील.

---

## अध्याय ८० वा.

### स्वप्नेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणाले, हे पार्वती ! कल्माषपाद नांवाचा एक इक्ष्वाकुवंशांत उत्पन्न झालेला राजा होता. तो एकदां अरण्यांत मृगया करण्याकरितां गेला असतां वाटेंत बसलेल्या वसिष्ठ ऋषींच्या मुलाला पाहून त्यास बाजूला होण्याविषयीं सांगता झाला; परंतु वशिष्ठपुत्रानें कल्माषपादाचें वचन अमान्य करून, तो तेथेंच बसला असतां कल्माषपादाला फार राग आला व त्यानें वशिष्ठपुत्राला बाण मारून त्याचा नाश केला. वशिष्ठपुत्रानें मरतां मरतां क्रोधानें राजाला शाप दिला कीं, तूं ज्यापेक्षां अविचारानें मला बाण मारून राक्षसाप्रमाणें दुष्ट वर्तन केलेंस, त्यापेक्षां तूं राक्षस होशील. असा वशिष्ठपुत्रानें दिलेला शाप ऐकून राजा त्यास शरण गेला; परंतु त्याला फार राग आल्यामुळें वशिष्ठपुत्रानें उच्छाप दिला नाहीं; नंतर राजाचाहि राग अनावर होऊन त्यानें वशिष्ठाचे दुसरेहि पुत्र मारून टाकिले. त्या वेळेपासून कल्माषपाद हा राक्षस झाला. राक्षसरूपी त्या राजाला रात्रीं वाईट स्वप्नें पडत असत. त्याच्या राज्यांत उल्कापातादि अपशकून होऊं लागले. त्या राजानें सर्व हकीगत आपल्या प्रधानास सांगून निश्चय केला कीं, असे दुःखांत दिवस काढण्यापेक्षां अग्निकाष्ठें भक्षून आत्महत्या करणें चांगलें; नंतर प्रधानांनीं राजास आश्वासन देऊन ते वशिष्ठ-ऋषींच्या आश्रमांत गेले. तेथें वशिष्ठ ऋषींची सून (ज्या वशिष्ठपुत्राचा नाश कल्माषपादानें केला त्याची बायको) वशिष्ठ ऋषींस काकुलतीस येऊन स्वरक्षणार्थ वशिष्ठाची प्रार्थना करीत होती; व वशिष्ठ भिऊं नको, असें म्हणून तिचें सांत्वन करीत होते, इतक्यांत कल्माषपाद व प्रधान वशिष्ठाजवळ येतांच वशिष्ठानें आपल्या कमंडलूंतील उदक कल्माषपादावर शिंपडलें, त्याबरोबर त्याला पूर्वज्ञान होऊन तो वसिष्ठास म्हणाला, मी आपला दास आहे, व मी पुष्कळ ब्रह्महत्या केल्या आहेत; आणि अज्ञानानें मोहित होऊन तुझ्या

पुत्रांचा नाशही मीच केला; करितां आपण मला केलेल्या अपराधांची क्षमा करून आपण माझा उद्धार करावा. ह्याप्रमाणें पश्चात्तापानें युक्त असें कल्माषपादाचें दीन भाषण ऐकून वशिष्ठ ऋषीस दया उत्पन्न झाली व ते कल्माषपादास म्हणतात. हे राजा! महाकालवनांत एक महाकालेश्वराजवळ शिवलिंग आहे, त्याचें तूं पूजन कर; म्हणजे तूं सर्व पापापासून मुक्त होऊन; व ह्या लोकीं आनंदांत राहून अंतीं मोक्षाला जाशील. नंतर वशिष्ठाच्या सांगण्याप्रमाणें कल्माषपाद हा महाकालवनांत जाऊन लिंगपूजन करिता झाला; व त्यायोगें तो निष्पाप होऊन पुष्कळ वर्षें अयोध्येंत आनंदानें राज्य करूं लागला. ह्या लिंगाच्या पूजाप्रभावानें कल्माषपादाला जीं वाईट स्वप्नें पडत होतीं, तीं पडेनाशीं होऊन चांगलीं स्वप्नें म्हणजे सुस्वप्न पडूं लागलीं; म्हणून ह्या लिंगास स्वप्नेश्वर हें नांव त्या दिवसापासून प्राप्त झालें. जे कोणी ह्या स्वप्नेश्वराचें पूजन करितील त्यांचीं सर्व पापें नष्ट होऊन; व त्यांचीं दुःस्वप्नेंहि लयाला जाऊन ते अंतीं शिवलोकीं प्राप्त होतील.

---

## अध्याय ८१ वा.

### पिंगलेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती! तूं मला एके दिवशीं एकादें रमणीय स्थान दाखविण्याविषयीं आग्रह धरून विचारलें असतां मी तुला महाकालवनाचें माहात्म्य वर्णन करून सांगितलें. महाकालवनामध्यें प्राप्त होऊन तेथील तीर्थादिकांत स्नान करणारांचीं सर्व पापें दग्ध होऊन, ते मुक्त होतात. महाकालवनालाच श्मशान हें दुसरें नांव पडलें आहे. जर तुला महाकालवनाची शोभा पाहण्याची असेल, तर माझ्याबरोबर चल; मी तुला महाकालवनांतील सर्व शोभा दाखवितों; असें म्हणून मी तुला घेऊन महाकालवनांत गेलों. त्या वेळीं तूं मला सांगितलेंस कीं, ह्या महाकालवनाच्या रक्षणार्थ चार दिशेला चार लिंगें स्थापित करा. त्या सांगण्याप्रमाणें मी चार दिशेला चार लिंगें स्थापित केलीं; पैकीं पूर्व दिशेला पिंगलेश्वर, दक्षिणदिशेला कायावरोहणेश्वर, पश्चिमेला बिल्वेश्वर व उत्तरदिशेला दुर्दर्शेश्वर अशीं त्यांचीं नांवें देऊन द्वाररक्षक अशीं तीं चार लिंगें स्थापित करून त्यांचीं माहात्म्येंही लोकांत द्योतित केलीं. पहिल्या पिंगलेश्वर लिंगाला पिंगलेश्वर हें नांव पडण्याचें कारण त्या लिंगाचें पिंगला नामक कान्यकुब्ज देशांत उत्पन्न झालेल्या कन्येनें पूजन केलें होतें. एकदा पिंगलेच्या बापानें आपली मुलगी जी पिंगला तिला बरोबर घेऊन तो पिंगल विप्र अरण्यांत तपश्चर्येकरिता निघून गेला.

पुष्कळ दिवस झाल्यानंतर पिंगलाचा अंत झाला; व ती एकटी पिंगल-विप्राची कन्या पिंगला मातापितारहित अशी अरण्यांत भटकूं लागली; व मातृपितृदुःखानें फारच शोक करूं लागली. ऋषींनीं; व ऋषिपत्न्यांनीं पिंगलेची पुष्कळ समजूत घातली तरी तिला शांतता न वाटून तिचा शोक दूर झाला नाहीं. शेवटीं यमधर्मानें ब्राह्मणाचें रूप घेऊन पिंगलेची पुष्कळप्रकारें समजूत करून तिचा पूर्वजन्मीचा सर्व वृत्तांत पिंगलेला सांगितला; हे पिंगले ! तूं मागील जन्मीं सुंदरीनांवाची वेश्या असून तुझ्याशीं एक ब्राह्मण रममाण झाला व त्याच्याशीं तूं चार मासांनीं कालक्रमणा केलीस, तुझ्याशीं रममाण होणाऱ्या ब्राह्मणाला एका शूद्रानें ठार मारिलें, व तो शूद्रहि तुझ्याशीं क्रीडा करून काळ घालवूं लागला. तात्पर्य; तूं पूर्वी केलेल्या ह्या व्यभिचारजन्य पापानें ह्या जन्मीं मातापितृहीन अशी दुःखानें व्याकुळ होऊन भटकत आहेस. पिंगला म्हणते; ब्राह्मणा! आपण आतां माझी ह्या पातकापासून मुक्ति कशी होईल तें सांगा. नंतर ब्राह्मण म्हणतो, हे पिंगले! मी यमधर्म तुझी परीक्षा पाहण्याकरितां ब्राह्मणाचें रूप घेऊन तुझेजवळ आलों आहें. आतां तूं महाकालवनांत जाऊन तेथें पूर्वद्वारावर एक लिंग आहे त्याचें पूजन कर, म्हणजे तूं सर्व पातकापासून मुक्त होऊन शिवलोकाला प्राप्त होशील, असें सांगून ब्राह्मणस्वरूपी यमधर्म निघून गेला. नंतर पिंगला न काल महाकाल-वनांत जाऊन यमधर्मानें सांगितलेल्या लिंगाचें पूजन करतांच ती त्या लिंगांतच लीन होऊन गेली. पिंगलेनें या लिंगाचें पूजन केलें म्हणून त्यास पिंगलेश्वर हें नांव प्राप्त झालें. पिंगलेश्वराच्या पूजनानें सर्व पितर तृप्त होऊन त्यांचा उद्धार होतो, व एक हजार अश्वमेधाचें पुण्य त्यास प्राप्त होतें. केवल पिंगलेश्वराच्या दर्शनानें सर्व लिंगाच्या पूजनाचें फल मिळून शेवटीं शिवलोक प्राप्त होतो.

## अध्याय ८२ वा.

### कायावरोहणेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती वैवस्वतमन्वन्तरामध्यें सृष्टि उत्पन्न करण्याची इच्छा करणाऱ्या ब्रह्मदेवाच्या अंगठ्यापासून दक्षप्रजापति उत्पन्न झाला. त्या दक्षप्रजापतीला एकावन्न मुली झाल्या; परंतु पुत्र झाला नाहीं. त्या एकावन्न मुलींपैकीं दहा धर्माला, सत्तावीस चंद्राला, तेरा कश्यपाला व एक पूर्वजन्मीं दक्षाचे पोटीं उत्पन्न झालेली तूं मला अशा दक्षानें देऊन टाकिल्या. चंद्र हा सव्वीस बायकांवर प्रीति करीत नसे; व फक्त एका रोहिणीवरच तो प्रीति करीत असे. हें

वर्तमान दक्षास समजतांच दक्षानें रागावून चंद्राला शाप दिला, व चंद्रानें उलट दक्षाला शाप दिला. पुढें दक्षानें अश्वमेध यज्ञाला सुरवात केली. त्यामध्यें माझ्या-वांचून सर्वांना दक्षानें आमंत्रण दिलें. मला आमंत्रण जरी दिलें नव्हतें, तरी तुझी दक्षयज्ञ पाहण्याची उत्कट इच्छा असल्यामुळें तूं माझी दक्षाकडे जाण्या-बद्दल प्रार्थना केलीस; परंतु मी तुला दक्षाकडे जाण्याची परवानगी दिली नाहीं. शेवटीं तूं मला म्हणालीस कीं, माझें एवढें तरी एक कार्य करा कीं, जे दक्षयज्ञ पाहण्याकरितां गेले असतील ते सगळे कायरहित म्हणजे देहरहित होवोत; असें म्हणून तूं रागानें आपल्या भुंवया वर चढवून व मोठमोठे श्वासोच्छ्वास टाकून आपल्या क्रोधापासून एक सशस्त्र स्त्री उत्पन्न केलीस; व तिचें नांव भद्र-काली असें ठेविलेंस; नंतर मींहि वीरभद्र नांवाचा एक पुरुष उत्पन्न करून त्यास सांगितलें कीं, तूं भद्रकालीसह दक्षयज्ञांत जाऊन तेथील सर्व गणांसह यज्ञाचा विध्वंस कर; नंतर माझ्या सांगण्याप्रमाणें वीरभद्रानें भद्रकालीसह, दक्षयज्ञांत जाऊन सर्वांचा विध्वंस केला. दक्षयज्ञामध्यें वीरभद्राचें व दक्षाचें मोठें युद्ध झालें; व त्या युद्धांत वीरभद्रानें सर्व देव देहरहित केले, हें पाहून ब्रह्मदेवाला वाईट वाटून तो मंदरपर्वतावर मजकडे आला; व प्रार्थना करूं लागला कीं, आपण कसेंहि करून देव जे कायरहित म्हणजे शरीररहित झाले आहेत, ते पूर्ववत् शरीरयुक्त होतील, असें करा; नंतर मी ब्रह्मदेवास बोललों कीं, तुम्ही सर्व महाकालवनांत जाऊन दक्षिण दिशेच्या द्वारावर असणारा जो कायाव-रोहणेश्वर त्याचें दर्शन घ्या; म्हणजे तुमचीं कायें म्हणजे शरीरें अवरोहण म्हणजे पूर्ववत् उत्पन्न होतील; नंतर माझ्या सांगण्याप्रमाणें ब्रह्मादि सर्व देवांनीं त्या ठिकाणीं जाऊन कायावरोहणाचें पूजन करतांच त्यांचीं शरीरें पूर्ववत् सतेज व निरोगीं बनलीं. ह्या कायावरोहणेश्वराचें दर्शन घेणारांचीं कोट्यवधि जन्माचीं पातकें नाश पावतात; व ते उत्तम शरीर धारण करणारे होऊन व ह्या लोकीं सुख भोगून अंतकाळीं शिवलोकाला प्राप्त होतात. कायावरोहणेश्वराचें दर्शन घेणारांना पुनः जन्ममरणादि संसृति प्राप्त होण्याची भीति उरत नाहीं. काया-वरोहणेश्वराच्या नुसत्या स्पर्शानेंहि सर्व पाप नाशाला पावून मुक्ति प्राप्त होते. जे कोणी द्वादशीला कायावरोहणेश्वराचें दर्शन घेतात, ते श्रेष्ठ पदाला प्राप्त होतात.

---

# अध्याय ८३ वा.

## बिल्वेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती, आदिकल्पामध्यें लोकांवर उपकार करावा, या इच्छेनें ब्रह्मदेवापासून कल्पवृक्ष उत्पन्न झाले. त्यामध्येंच बेल नांवाचा एक वृक्षहि उत्पन्न झाला. त्या बेलासच श्रीवृक्ष असें म्हणतात. ब्रह्मदेवानें बेलाच्या वृक्षाच्या मूळाशी सुवर्णरूप धारण केलेला असा एक पुरुष अवलोकन केला. तो पुरुष नित्य बिल्ववृक्षाचीं फळें व पानें खाऊन मोठ्या आनंदानें तेथें राहत असे. त्या पुरुषालाही बिल्व असेंच नांव ब्रह्मदेवानें ठेविलें. इंद्रानें बिल्वाजवळ येऊन राज्य करण्याबद्दल त्याची प्रार्थना केली. बिल्व इंद्राला म्हणतो कीं, मी जर पृथ्वीचें राज्य करावें, अशी तुझी इच्छा असेल, तर मला तुझें वज्र नांवाचें आयुध दे. नंतर इंद्र म्हणतो कीं, तूं ज्या वेळीं वज्राचें स्मरण करिशील त्या वेळीं तें वज्र तुझ्या हातीं येईल, असें इंद्रानें सांगितल्यावर बिल्वपुरुषानें पृथ्वीचा राज्यकारभार आपल्या हातीं घेतला. नंतर कपिल नांवाच्या ऋषीचें व बिल्वाचें सख्य जडलें. कपिल व बिल्व हे एके दिवशीं गोष्टी बोलत बसले असतां वेद व तप हें सर्व श्रेष्ठ आहे, असें कपिलानें प्रतिपादन केलें. तेव्हां बिल्व त्यास म्हणतो कीं, दानाच्या योगें राज्य, सुख, भोग, ऐश्वर्य व स्वर्ग प्राप्त होत असतांना तुम्ही वेदाचेंच वर्णन कां करितां. नंतर कपिल म्हणतो:- वेदापासून यज्ञ, इष्टि; व सर्व फलें प्राप्त होतात. संपूर्ण जग वेदमूल आहे. ब्राह्मण व वेद हे सर्व श्रेष्ठ आहेत, हें तुला अजून कसें समजत नाहीं. असें कपिलाचें भाषण ऐकून बिल्वाला राग आला, व त्यानें कपिलाचे मस्तकावर वज्रप्रहार केला. जरी वज्रानें कपिलाच्या मस्तकाचे दोन तुकडे झाले, तरीसुद्धां कपिलानें आपला देह तपःसामर्थ्यानें धारण करून तो मजकडे प्राप्त झाला; व त्यानें माझी स्तुति केली. मी कपिलाचें शरीर पुर्ववत् करून तुला वज्रापसून भिती प्राप्त होणार नाहीं, असा कपिलास वर दिला. पुनः कपिलाचें व बिल्वाचें पुनः सख्य झालें. पुनः पूर्वीप्रमाणें वाद होऊन बिल्वाकडून शास्त्रनाहि त्यास झालें शेवटीं कपिलाचें बोलणें कितपत खरें आहे, ह्याची परीक्षा पाहण्याकरितां बिल्व विष्णूकडे गेला; व त्यानें झालेलें सर्व वर्तमान सांगितलें. नंतर बिल्वानेंहि विष्णूजवळ वर मागितला कीं, सर्वांनीं मी तुला भितों असें म्हणावें, एवढा

वर द्या. नंतर विष्णु बरें आहे. असें म्हणून ते कपिलाच्या आश्रमांत आले; व कपिलाला म्हणतात कीं, मी बिल्वाला वर दिला आहे, करितां तो जर तुझे जवळ येईल, तर त्यास मी तुला भितों, असें कबूल कर. कपिल म्हणतो कीं, मी कधीं कबूल करणार नाहीं. नंतर विष्णूनें सुदर्शन चक्र कपिलास दाखवून भीति दाखविली कीं, जर तूं कबूल केलें नाहींस, तर मी तुला ह्या चक्रानें मारून टाकीन. नंतर कपिल म्हणतो कीं, शंकराच्या कृपेनें मी तुझ्या चक्राला मुळींच भीत नाहीं; नंतर कपिल हातांत दर्भाची मुष्टी घेऊन तपःसामर्थ्यानें विष्णूजवळ युद्ध करूं लागला. कपिल व विष्णू ह्यांचें हें भयंकर युद्ध पाहून ब्रह्मदेव विष्णूला म्हणतात, तुमच्यापासूनच सर्व सृष्टि उत्पन्न झाली आहे, ब्राह्मण हे तुमचे परम भक्त असतां तुम्ही त्यांच्याशीं युद्ध करितां, हें बरें नव्हे. कपिलानें शंकरापासून अमरत्व प्राप्त होण्याबद्दल वर मागितला आहे, हें तुम्हाला माहीत नाहीं काय? आतां तुम्ही कपिलाबरोबर युद्ध करण्याचें सोडून द्या. हा सर्व प्रकार पाहून बिल्वाला वाईट वाटलें; व तो शोक करूं लागला, त्या वेळीं इंद्र बिल्वाजवळ येऊन त्याचें सांत्वन करिता झाला. इंद्र बिल्वाला म्हणाला कीं, जर तुला तुझी इच्छा पूर्ण करून घ्यावयाची असेल तर तूं महाकालवनांत जाऊन पश्चिमद्वारावर असणाऱ्या लिंगाचें पूजन कर; म्हणजे कपिल हा तुझ्या सांगण्याप्रमाणें मी तुझ्याकडून जिंकिलों गेलों, असें कबूल करील. नंतर बिल्व हा महाकालवनांत जाऊन इंद्राच्या सांगण्याप्रमाणें शिवलिंगपूजन करिता झाला. तेथें कपिल येऊन त्यानें बिल्वाला पाहतांच बिल्व हा शिवस्वरूपी आहे, असें समजून तूं मला जिंकिलेंस, असें कपिल कबूल करिता झाला. त्या वेळीं बिल्वालाहि कृतकृत्य झालों, असें वाटून तो कपिलाचा तपःप्रभाव जाणून त्या बिल्वानें कपिलाला साष्टांग नमस्कार घातला. नंतर कपिल व बिल्व हे मोठ्या आनंदानें पुष्कळ दिवस मित्रभावानें राहते झाले. ह्या लिंगाचें बिल्वानें पूजन केलें म्हणून त्याचें नांव बिल्वेश्वर असें ठेविलें. जे कोणी बिल्वेश्वराचें दर्शन घेतात, किंवा पूजन करितात, त्यांच्या सर्व इच्छा पूर्ण होऊन, ते तेवटीं शिवलोकीं प्राप्त होतात.

# अध्याय ८४ वा.

## उत्तरेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात, हे पार्वती, उत्तरेश्वराचें माहात्म्य श्रवण केलें असतां सर्व पापें नष्ट होऊन मोक्ष मिळतो. अयोध्या नगरींत परीक्षित् या नांवाचा एक राजा होता. तो मृगया करण्याकरितां अरण्यांत गेला असतां, फार थकून गेल्यामुळें एका झाडाखालीं विश्रांति घेण्याकरितां बसला. तेथून जवळच दक्षिण बाजूला एक सरोवर होतें, तेथें तो घोड्यावर बसून पोहत असतां त्यास तेथून जवळच एक गायन ऐकूं येऊं लागलें. हें कोण गात आहे? ह्याचा शोध करीत असतां परीक्षिताला पुष्पें वेंचित असलेली एक कन्या दिसली. ती कन्या राजाजवळ येऊन मी अविवाहित कन्या आहे, असें राजास म्हणती झाली; नंतर परीक्षित् म्हणतो कीं, मी तुझ्याविषयीं कामुक आहें, माझ्याशीं विवाह लाव. अशा त्या राजाच्या भाषणाप्रमाणें ती कन्या राजाबरोबर पुष्कळ दिवस रममाण होती झाली. एके दिवशीं राजा कन्येला म्हणतो, येथून जवळच एक सरोवर आहे, तेथें आपण क्रीडा करूं या; नंतर राजा तिच्यासह क्रीडा करीत असतां, ती कन्या तेथेंच नाहींशी झाली. राजा कन्येला पुष्कळप्रकारें शोधूं लागला; परंतु तिचा पत्ता लागेना. त्या सरोवरांत पुष्कळ बेडूक होते व त्यांनींच सुंदरीचा नाश केला असावा, असें समजून आपल्या सेवकांना बेडूक मारण्याची आज्ञा केली. एक मोठा बेडूक राजाजवळ येऊन म्हणतो कीं, विनाकारण तूं आमचा नाश कां करितोस? तुझी कन्या नागलोकांमध्यें पाताळांत गेली आहे, असें म्हणून बेडुकानें ती कन्या राजाजवळ आणून दिली. त्या वेळीं बेडूक राजाला म्हणतो, मी पूर्वजन्मीं गालव ऋषीची चेष्टा केली, त्या वेळीं गालवानें मला शाप दिला कीं, तूं बेडूक होशील व ज्या वेळीं तूं एकादी कन्या परीक्षित् राजाला आणून देशील; व महाकालवनांत जाऊन उत्तरेश्वराचें पूजन करशील, तेव्हां ह्या माझ्या शापापासून तूं मुक्त होशील, असें राजास सांगून तो बेडूक उत्तरेश्वराचें पूजन करून विमानांत बसून शापमुक्त होत्साता रुद्रलोकाला जाता झाला. ह्या त्या लिंगाचा प्रभाव जाणून परीक्षित् राजा उत्तरेश्वराचें पूजन करून व ह्या लोकीं सुख भोगून अंतकालीं शिवलोकाप्रत प्राप्त झाला. जे कोणी कृष्णपक्षांतील चतुर्दशीस उत्तरेश्वराचें दर्शन घेतील, ते

कलियुगांत कृतकृत्य असे होत्साते ह्या लोकांत सुख भोगून शेवटीं मुक्त होतील. ह्या जन्मीं केलेलें सर्व पातक उत्तरेश्वराच्या दर्शनानें नाश होतें. याप्रमाणें हें पार्वती तुला चौऱ्यांशी लिंगाचें माहात्म्य सांगितलें.

ह्या ' चतुरशीतिलिंगाचें ' ( चौऱ्यांशीं लिंगाचें ) माहात्म्य अत्यंत पुण्यकारक आहे. ह्या माहात्म्याच्या श्रवणानें सर्व मनोरथ सफल होतात. जो कोणी बंधनांत सांपडलेला मनुष्य हें माहात्म्य श्रवण करील तो बंधनापासून मुक्त होईल. जो कोणी भयानें व्याकूळ झाला असेल तो ह्या माहात्म्यश्रवणानें भयमुक्त होईल. ज्याला पुत्रप्राप्तीची इच्छा असेल त्यानेंही हें माहात्म्य श्रवण करावें; म्हणजे त्यास एक वर्षाच्या अवधींत पुत्रप्राप्ती होईल, ह्यामध्यें बिलकूल शंका करण्याचें कारण नाहीं. हें चौऱ्याशीं लिंगाचें माहात्म्य चौऱ्यांशी लक्ष योनींच्या जन्ममरणरूप चक्रांतून मुक्त करून नेणारें व शिवलोकप्राप्ति करून देणारें आहे. सूत शौनकादि ऋषींना म्हणतात कीं, हे शौनकादि ऋषि हो ! ह्याप्रमाणें शंकरानें पार्वतीला व स्कंदानें ( कार्तिकस्वामीनें ) देवांना जें चौऱ्यांशी लिंगाचें माहात्म्य सांगितलें, तेंच मी तुम्हांस सांगितलें आहे. हें माहात्म्य सर्व सिद्धि देणारें व मोक्षप्राप्ति करून देणारें असल्यामुळें त्याचें नित्य पठण करावें. ह्याच्या पठनानें शंकर संतुष्ट होतो.

चतुरशीतिलिंगमाहात्म्य समाप्त ॥ २ ॥

# स्कंदपुराण.

## अवन्तिखण्ड ५ (रेवाखण्ड ३).

### अध्याय १ ला.

#### पुराणसंहितावर्णन.

श्रीमद्वेदव्यास मंगलाचरणरूपानें नर्मदेची स्तुति करितात. ज्या नर्मदेच्या कांठीं स्नान करणाऱ्या हत्तींच्या गंडस्थलांपासून निघणाऱ्या दानोदकानें मोहित झालेले भोंगे तेथें आल्यामुळें नर्मदेचें पाणी कृष्णवर्ण झालें आहे. तसेंच ज्या नर्मदेचे कांठीं सिद्ध पुरुषांच्या स्त्रिया स्नान करीत असल्यामुळें व त्यांच्या स्तनाला लाविलेली केशराची उटी धुवून पाण्यांत पडल्यामुळें ज्या नर्मदेचें पाणी पिंगट-वर्णाचें झालें आहे. ज्या नर्मदेच्या तीरावर अनेक फुलझाडें लाविलीं असून तीं फुलें वेंचण्याकरितां सकाळसंध्याकाळ ऋषि तेथें जमत असतात; त्यामुळें त्या स्थानाला एकप्रकारची शोभा प्राप्त झाली आहे. ज्या नर्मदेच्या उदकांत मोठमोठ्या सुस्वरी राहतात, असें त्या नर्मदेचें उदक आमचें रक्षण करो; व आमचें पाप दूर करो, तसेंच नरनारायण, सरस्वती देवी इत्यादि देवतांहि आमचें कार्य निर्विघ्नपणें संपूर्ण करोत. अशातऱ्हेनें देवतांची स्तुति झाल्यावर व्यास मुनि ग्रंथाला प्रारंभ करितात.

एके दिवशीं पुण्यकारक अशा नैमिषारण्यामध्यें शौनकादि ऋषि सूताला प्रश्न करिते झाले कीं, हे सूता! आपण अनेक पुराणें व कथा व्यासापासून श्रवण केल्या आहेत; म्हणून मी आपणास एक प्रश्न विचारतों. एक ब्राह्मी नदी व दुसरी विष्णु नदी ह्यांचीं माहात्म्यें मीं ऐकिलीं आहेत; परंतु तिसरी जी रौद्री नदी म्हणजे रुद्रा ( शंकरा ) पासून उत्पन्न झालेली नर्मदा ( रेवा ) नदी तिचें महात्म्य मी ऐकिलें नाहीं, करितां नर्मदानदीचें माहात्म्य आपण मजला सांगावें. ह्याप्रमाणें शौनकादि ऋषींचा प्रश्न ऐकून सूत म्हणतात, हे शौनकादि

ऋषीहो ! व्यासांनीं तयार केलेलीं जीं अठरा महापुराणें त्यांना वंदन करून मी आपणांस नर्मदामहात्म्य सांगतों. श्रुति व स्मृति हे ब्राह्मणाचे दोन डोळे होत. ह्या दोहोंपैकीं ज्याला एकहि अवगत नाहीं, त्यास एकाक्ष ( काणा ) म्हणतात, ज्याला दोनहि अवगत नाहींत त्यास अंध असें म्हणतात. श्रुति, स्मृति व पुराण हे विद्वानांचे तीन डोळे आहेत, ते तीन डोळे ज्याला आहेत म्हणजे ज्याला श्रुति, स्मृति व पुराणें हीं तीन अवगत आहेत, त्यास प्रत्यक्ष शंकरच म्हणावें. पुराणें हा पांचवा वेद आहे. जो पुराणें जाणत नाहीं, तो अज्ञ समजावा. पुराणांत अमुक एक सांगितलें नाहीं, असें नाहीं. प्रत्येक गोष्ट पुराणांत साकल्यानें सांगितली आहे. ब्रह्मदेवाच्या मुखापासून प्रथम ब्रह्मपुराण उत्पन्न झालें; नंतर चार वेद उत्पन्न झाले; नंतर परमेश्वरानें व्यासरूप घेऊन एका ब्रह्मपुराणाचीं अठरा लहान लहान महापुराणें निर्माण केलीं. देवलोकांत जीं पुराणें आहेत त्यांची संख्या शंभर कोटी आहे. मात्र व्यासांनीं भूलोकांतील अल्पवयस्क प्राण्यांकरितां परोपकारबुद्धीनें शंभर कोटी पुराणांतून सारभूत असें चार लक्ष पुराण निवडून काढिलें. तीच हीं अठरा महापुराणें होत. आतां त्या अठरा महापुराणांचीं नांवें सांगतों. १ ब्रह्मपुराण, श्लोकसंख्या १००००, २ पद्मपुराण ५५०००, ३ वैष्णवपुराण २३०००, ४ वायुपुराण २४०००, ५ भविष्यपुराण १४५००, ६ मार्कंडेयपुराण ९०००, ७ अग्निपुराण १६०००, ८ नारदपुराण २५०००, ९ भागवतपुराण १८०००, १० ब्रह्मवैवर्तपुराण १८०००, ११ लिंगपुराण ११०००, १२ वाराहपुराण १२०००, १३ स्कंदपुराण ८१०० , १४ वामनपुराण १००००, १५ कूर्मपुराण १७०००, १६ मत्स्यपुराण १४०००, १७ गरुडपुराण १९०००, १८ ब्रह्माण्डपुराण १२०००, ह्याप्रमाणें हीं अठरा महापुराणांचीं नांवें व त्यांची श्लोकसंख्या सांगितली. आतां उपपुराणें सांगतों. ब्रह्ममहापुराणापासून सौर नांवाचें उपपुराण निर्माण झालें. सौरपुराणांत शंकरासंबंधीं सर्व कथा वर्णिल्या आहेत. त्याप्रमाणेंच दुसरें नारसिंहपुराण, ३ शुक्रपुराण, ४ बृहस्पतिपुराण, ५ दुर्वासपुराण, ६ कपिलपुराण, ७ वरुणपुराण, ८ कालिकापुराण, हें भविष्य पुराणापासून निर्माण झालें आहे. व दुसरें एक कालिकापुराण नारदपुराणापासून निर्माण झालें आहे, तें कालिकापुराण ९ वें होय. १० माहेश्वरपुराण, ११ सांबपुराण, १२ पराशरपुराण, १३ देवीभागवतपुराण १४ कूर्मपुराण, १५ ब्रह्माण्डपुराण, १६ स्कंदपुराण, हें पुराणासंहितावर्णन जो पठण करील किंवा श्रवण करील त्यास अनंत पुण्य प्राप्त होऊन अंतकालीं ते ब्रह्मलोकाला प्राप्त होतील.

---

# अध्याय २ रा.

## रेवा ( नर्मदा ) माहात्म्यवर्णन.

सूत म्हणतात, हे शौनकादि ऋषिहो! व्यासांनीं जें मला नर्मदामाहात्म्य सांगितलें तेंच मी तुम्हाला सांगतों. नर्मदेच्या कांठीं किती तीर्थें आहेत, ह्याचें वर्णन प्रत्यक्ष शेषाला सुद्धां करितां येणें अशक्य आहे. असाच प्रश्न पूर्वी जनमेजयानें वैशंपायनाला केला होता. पूर्वी जनमेजयानें यज्ञाला प्रारंभ केला असतां तेथें वैशंपायन मुनि प्राप्त झाले. जनमेजयानें वैशंपायनाचें आदरातिथ्य केल्यावर प्रश्न केला कीं, आमचे पूर्वज जे पांडव त्यांनीं तीर्थयात्रा कशा केल्या ! त्यांना कौरवांनीं द्यूतांमध्यें कसें जिंकिलें वगैरे सर्व वर्तमान आपण मजला सांगा; कारण हें सर्व आपण व्यासांचें तोंडून ऐकिलें आहे. ह्याप्रमाणें जनमेजयाचें भाषण ऐकून वैशंपायन जनमेजयास म्हणतात. हे जनमेजय, मी व्यासांना वंदन करून त्यांच्याच कृपेनें आपणांस यथाशक्ति पांडवांनीं जीं तीर्थें केलीं तीं सर्व सांगतों, तुम्ही सावधानपणें श्रवण करा.

पूर्वी आपले पूर्वज जे पांडव ते द्रौपदीसह काम्यकनांवाच्या अरण्यांत राहून ऋषींसह तेथें भगवंताचे गुणानुवाद गात गात कांहीं काळ त्या ठिकाणीं आनंदांत घालविते झाले. एके दिवशीं उद्दालक, कश्यप, विभांडक, पुलस्त्य, लोमेश इत्यादि अनेक ऋषींसह पांडव तीर्थयात्रा करण्याकरितां निघाले. पुष्कळशीं तीर्थें हिंडून त्या त्या ठिकाणीं स्नानादि कर्मे केल्यावर ते विंध्य पर्वतावर गेले. त्या ठिकाणींही मार्कण्डेयादि ऋषींचे आश्रम पाहून व तेथील अरण्याची शोभा पाहून पांडवांना मोठा आनंद झाला; नंतर धर्मराज मार्कण्डेयांना नमस्कार करून प्रश्न करितात कीं, मी धर्मराज आपणाला गंगादि सर्व नद्यांमध्यें प्रलयकालींही अवशिष्ट राहणारी नदी कोणती व मुख्य तीर्थें कोणतीं हें विचारण्याची इच्छा धरून आपल्याजवळ आलों आहे; कारण आपण पुष्कळ प्रलय पाहिलेले आहेत; आणखी आपणाला इतकें पुष्कळ आयुष्य कशानें प्राप्त झालें, तेंहि श्रवण करण्याची माझी इच्छा आहे. धर्मराजानें आपणास केलेले अशातऱ्हेचे प्रश्न ऐकून मार्कण्डेयाला मोठा आनंद झाला व त्यानें आदरपूर्वक सर्व ऋषींसह धर्मराजाचें व भीमादि पांडवांचेंहि आदरातिथ्य केलें; पुढें मार्कण्डेय धर्मराजास म्हणतात, हे धर्मराजा ! तूं जो प्रश्न केलास तो फार चांगला असून ज्याच्या श्रवणानें सर्व पापें दग्ध होतात, असें कथानक तूं मला विचारलें असल्यामुळें मला मोठा आनंद झाला आहे. गंगा, कावेरी, सरस्वती, देविका, सिंधु, सालकुटी, सरयू, शतरुद्रा, मही, चार्मिला, गोदावरी, यमुना, पयोष्णी, शतद्रू, धर्मनदी

त्याप्रमाणें दुसऱ्याहि पुष्कळ नद्या श्रेष्ठ असून सर्व पापांचें क्षालन करितात; परंतु ह्या गंगादि सर्व नद्या प्रत्येक कल्पा ( प्रलयकाला ) मध्यें नाश पावतात व पुनः सृष्टि उत्पन्न झाली कीं, उत्पन्न होतात. नर्मदा नदी ही मात्र आज सात कल्पपर्यंत नष्ट झाली नाहीं. नर्मदा नदी सात कल्पपर्यंत अवशिष्ट राहिलेली पाहून आम्हां सर्वांना फारच आश्चर्य वाटलें.

---

# अध्याय ३ रा.

## मार्कण्डेयाचें नौकारोहण.

धर्मराज म्हणतात, हे मुने ! आपण मागील सातहि कल्प ( प्रलय ) पाहिलेले असून, समुद्रामध्यें शयन करणाऱ्या शेषशायी परमात्म्यालाहि पाहिलें आहे. सर्व त्रैलोक्य नष्ट झालें असतांहि आपला नाश कां झाला नाहीं ? प्रलयकालची एकंदर स्थिती कशी असते ? प्रलय कसा होतो ? वगैरे ऐकण्याची इच्छा मला झाली आहे; असा धर्मराजाचा प्रश्न ऐकून मार्कण्डेय म्हणतात; हे धर्मराजा ! हेंच कथानक पूर्वी शंकरानें वायूला व वायूनें स्कंदा ( कार्तिकस्वामी )ला, स्कंदानें वशिष्ठाला, वशिष्ठानें पराशराला व पराशरानें जातूकर्ण्याला व जातूकर्ण्यानें मोठमोठ्या ऋषींना सांगितलें होतें, तेंच मी तुला सांगतों, ऐक. विष्णूच्या कृपेनें मी भयंकर असे सात कल्प पाहिले आहेत. त्यांचें तुला यथार्थ वर्णन करून सांगतों. प्रथम प्रलय होण्याचे वेळीं प्रखर असे बारा सूर्य तप्त होऊन सर्व त्रैलोक्य बहुतेक नष्ट होतें. नंतर चारहि समुद्र क्षुब्ध होऊन सर्व जग जलमय होऊन जातें; व समुद्रावांचून कांहींहि दिसत नाहीं. अशा वेळीं मी आपल्या हातानें पोहत पोहत कांहीं काळ समुद्रांतच घालविला. शेवटीं मी थकून गेलों; माझ्या पुढें एक पुरुष मी अवलोकन केला. त्याच समुद्रामध्यें पुत्रपौत्रांसह मनु माझ्या दृष्टीस पडला. मी तसाच पुढें पोहत पोहत चाललों असतां माझ्या दृष्टीस एक नौका पडली. ती नौका मत्स्यरूप घेतलेल्या परमेश्वरानें युक्त अशी होती. त्या वेळीं त्या मत्स्यानें मला हाक मारून आपल्या नौकेंत घेतलें असतां तेथें विश्रांती मिळाली. नंतर ती नौका ज्या वेळीं समुद्राच्या काठीं आली त्या वेळीं एक नदी माझ्या दृष्टीस पडली. त्या नदीमध्यें उभी असलेली एक स्त्री मी पाहिली. नंतर मनु त्या स्त्रीला कोण ? कोठील ? वगैरे प्रश्न विचारून म्हणतो कीं, हे स्त्रिये ! सर्व त्रैलोक्याचा क्षय झाला असतां तूं एकटी जिवंत कशी राहिलीस ? असा मनूचा प्रश्न ऐकून ती स्त्री मनूस म्हणते; ईश्वराच्या

शरीरापासून नर्मदा नांवाची नदी उत्पन्न झाली. ती मी तुझें रक्षण करण्याकरितां येथें आल्यें आहे. आतां तूं ह्या जवळ असलेल्या नौकेवर आरोहण कर. असे त्या स्त्रीचें भाषण ऐकून मनु ज्या नौकेंत मी बसलों होतों त्याच नौकेंत बसण्याकरितां प्राप्त झाला; व तो परिवारासह त्याच नौकेंत बसला. नंतर मनूला मोठें आश्चर्य वाटलें; व तो ईश्वराची स्तुति करूं लागला. त्यायोगें ईश्वर त्या ठिकाणीं आम्हाला दर्शन देऊन आमच्या सर्व इच्छा पूर्ण करिता झाला.

---

## अध्याय ४ था.

### नर्मदानाममाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात; हे धर्मा ! नंतर आम्ही त्रिकूट पर्वताचे पायथ्याशी नौकेंतून खालीं उतरलों; व मनूसह त्रिकूटपर्वताच्या शिखरावर असणाऱ्या शंकराला जाऊन भेटलों; आणि त्यास आम्ही साष्टांग नमस्कार करून प्रश्न केला कीं, आम्हीं जी एक स्त्री पाहिली ती कोण ? हें आम्हाला सांगा. आम्हीं तिला विचारिलें असतां, तिनें सांगितलें कीं, मी रुद्रापासून उत्पन्न झाल्यें आहे; व मला नर्मदा नदी म्हणतात; करितां ती कोण ? हें आपण मला सविस्तृत सांगा. नंतर शंकर म्हणतात, हे मार्कण्डेया ! पूर्वीं मी ऋक्ष पर्वतावर तपश्चर्या करीत असतां मला पुष्कळ घाम आला; तो इतका घाम आला कीं, त्या योगें सर्व पर्वत बुडून गेला. त्या घामापासून एक नदी उत्पन्न झाली. ती नदी स्त्रीचें रूप घेऊन माझी आराधना करूं लागली. तिनें कृतयुगांत दहा लक्ष वर्षें घोर तपश्चर्या केल्यामुळें मी प्रसन्न झालों; व वर माग असें बोललों. त्या वेळीं नदी म्हणते; हे देवा ! मला एवढाच वर पाहिजे कीं, प्रलयकाळींसुद्धां माझा नाश होऊं नये. सर्व नद्या, समुद्र, पर्वत इत्यादिकांमध्यें मी अधिक पुण्यवान् होऊन कायम राहावें, असे करा; व माझेठिकाणी स्नानादि करणारे लोक महापातकापासून व क्षुद्रपातकापासून मुक्त होवोत, अशी माझी इच्छा पूर्ण करा. जशी उत्तर दिशेला गंगा तशीच दक्षिणदिशेला मी प्रसिद्ध व्हावें. पृथ्वीवरील सर्व तीर्थांचे ठिकाणीं स्नान करून जें फल मिळत नाहीं, तें फल माझ्या उदकानें एकदां स्नान केलें असतां मिळावें. ब्रह्महत्यादि पातकें एक मास माझ्या उदकानें स्नान केलें असतां नाश पावतील, असें करा. ह्याप्रमाणें त्या नदीनें मजजवळ अनेक वर मागितले असतां मी बोललों कीं, हे देवी ! तूं मागितल्याप्रमाणें सर्व कांहीं तुझे मनोरथ सफल होतील. तुझ्याशिवाय आम्हाला योग्य वर देणारे तरी कोण भेटणार

आहे ! मी सुद्धां तुझे काठीं येऊन कांहीं कारणामुळें राहणार आहे, व त्यायोगें तुझें माहात्म्य ह्याहूनही श्रेष्ठपणाला पावेल. ब्रह्म, इंद्र, चन्द्र, वरुण व विष्णु वगैरे देव माझ्या आज्ञेनें तुझ्या काठीं नित्य येऊन राहतील. तूं आतां येथून जाऊन दक्षिण दिशेला वास्तव्य कर; व सर्व पातकी मानवांचा उद्धार कर. तुझे काठीं ऋषि, सिद्ध, देव व दैत्य येऊन मोठमोठ्या तपश्चर्या करितील. ह्याप्रमाणें सांगून झाल्यावर ती नदी आपल्या निश्चित स्थानाला जाऊन राहती झाली; व मीहि आपली तपश्चर्या पुरी करून स्वस्थानीं आलों; आतां ही जी नदी माझ्या आज्ञेनें दक्षिणदिशेला राहिली आहे, ती पंधरा प्रवाहांनीं सर्व दिशा व्यापून टाकिती झाली. त्या पंधरा प्रवाहांची पंधरा निरनिराळी नांवें त्या नदीला प्राप्त झाली. मोठा जो नदीचा प्रवाह निघाला त्याला शोणनद हें नांव प्राप्त झालें; व बाकीच्या प्रवाहांना नर्मदा, सुरसा, कृता, मंदाकिनी, दशार्णा, चित्रकूटा, तमसा, विदशा, करभा, यमुना, चित्रोत्पला, विपाशा, रंजना, वायुवाहिनी ह्या सर्व नद्या ऋक्षपर्वतापासून उत्पन्न झाल्या. याप्रमाणें मला शंकरानें नर्मदानदीचीं नांवें सांगून तिचें माहात्म्यहि सांगितलें. ही नर्मदेचीं पंधरा नांवें जे प्रातःकाळीं स्मरतील, त्यांचीं सर्व पापें नष्ट होऊन ते शिवलोकीं प्राप्त होतील.

---

## अध्याय ५ वा.

### नर्मदोत्पत्ति.

धर्मराज म्हणतात, हे मार्कण्डेय मुने ! तुम्ही सांगितलेलें कथानक ऐकून आम्हां सर्वांस मोठें आश्चर्य वाटत आहे; कारण नर्मदा नदी ही शंकरापासून उत्पन्न झालेली असून सात कल्पपर्यंत ही अजर व अमर झाली आहे. आतां ते सात कल्प कोणते ? आपण व ही नर्मदा कल्पप्रसंगीं कोठें असते, शंकर सृष्टीचा नाश करून व कोणतें स्वरूप धारण करून कोठें वास्तव्य करितो ? नर्मदेला रेवा हें नांव कां प्राप्त झालें ? तशींच पूर्वीं सांगितलेलीं पंधरा नांवेंही प्राप्त होण्यास काय कारणें आहेत ? व नर्मदेकाठची कोणकोणतीं स्थानें व तीर्थें विशेषतः पुण्यकारक व पवित्र आहेत ? वगैरे सविस्तृत मजला सांगा. अशातऱ्हेनें केलेले धर्मराजाचे प्रश्न ऐकून मार्कण्डेय म्हणतात, हे धर्मा ! मी तुला आतां हळूहळू सर्व तुझ्या प्रश्नांचीं उत्तरें देतों. एकाग्र अंतःकरणानें श्रवण कर. जें शंकरानें वायूला व वायूनें मला नर्मदामहात्म्य सांगितलें आहे, तें मी तुला सांगतों. मायूर, कौर्म, कौशिक, ब्राह्म, मात्स्य, विरज, वाराह, न्यग्रोध,

आकांक्ष, पाद्म, तामस, संवर्त, उद्वर्त हे सर्व महाप्रलय म्हणजे कल्प होत. ह्यांपैकीं सात कल्प हे फारच भयंकर होत. ज्या वेळीं संपूर्ण जगताचा नाश होतो, त्या वेळीं एकटा विराट् पुरुष सर्वत्र पर्यटण करीत फिरतो; नंतर विराट् पुरुषापासून गायत्री व एक पुरुष निर्माण होतो, तोच ईश्वर होय. तो ईश्वर गायत्रीसह क्रीडा करीत असतां एक अंड निर्माण होतें. तें अंड फोडून ब्रह्मदेव उत्पन्न होतो व हा ब्रह्मदेव सर्व स्थावरजंगमात्मक विश्व ( सृष्टि ) उत्पन्न करितो. हेंच प्रथम ( पहिलें ) अंड होय. एकदां शंकर पार्वतीसह क्रीडा करीत असतां ज्या वेळीं शंकरानें कामाच्या भरांत येऊन पार्वतीच्या स्तनाचें मर्दन केलें; त्या वेळीं शंकराला श्रम झाले; व त्याला अत्यंत घाम आला; आणि घामापासून एक कन्या उत्पन्न झाली. हा नर्मदेचा पहिला जन्म होय. आतां हिला नर्मदा नांव पडण्याचें कारण हें आहे कीं, त्या कन्येला पाहून देव व दैत्य मोहित झाले; परंतु तिनें सर्वांला मोहित करून लज्जित केलें. 'नर्म' म्हणजे लज्जा व 'दा' म्हणजे देणारी, सर्वांना लाज उत्पन्न करून मोहित करणारी असल्यामुळें हिला नर्मदा हें नांव पडलें आहे. सात कल्पपर्यंत ही नष्ट न झाल्यामुळें हिची सर्व त्रैलोक्यांत ख्याती झाली आहे; नंतर शंकरानें आपल्या नर्मदा नामक कन्येचा विवाह समुद्राशीं लाविला आहे; म्हणून ती नर्मदा नदी ऋक्षपर्वतापासून निघून मोठ्या आनंदानें समुद्राला जाऊन मिळती झाली. नर्मदेची उत्पत्ती ब्राह्मकल्पांत झाली.

---

# अध्याय ६ वा.

---

## नर्मदेचीं अन्वर्थ नांवें.

मार्कण्डेय म्हणतात; हे धर्मा ! पुनः तिसऱ्या प्रलयाच्या वेळीं शंकर लाल स्वरूप घेऊन सर्व जगत् पूर्वीप्रमाणें नष्ट करून जलामध्यें शयन करिता झाला. नंतर मी प्रलयकालच्या मोठ्या भयंकर समुद्रांत हजारों वर्षें फिरत असतां ॐ ह्या शब्दांनीं ईश्वराचें ध्यान करूं लागलों. नंतर मी सुवर्णाचे पंख असलेला असा मयूर ( मोर. ) पाण्यांत पाहिला; व समुद्राच्या तीरावर एक मोठी नदी पाहिली. पुढें मोराचें रूप घेतलेला शंकर त्या नदीला म्हणतो; तूं कोण आहेस ! सर्व जगताचा नाश झाला असतां तूं अजून नष्ट कां झाली नाहींस, असें मोराचें भाषण ऐकून नदी म्हणते; मी आपल्याच प्रसादानें अजर व अमर आहे. मला नर्मदा म्हणतात. आतां प्रलयकाळ संपत आला आहे, करितां आपण पुनः जगत् निर्माण करावें, असें नर्मदेचें भाषण ऐकून मोराचें रूप घेतलेल्या ईश्वरानें आपलें

पंख फडफडविले; त्याबरोबर त्या पंखापासून देव व दैत्य निर्माण झाले. हीच नर्मदा त्रिकूट पर्वताच्या शिखरापासून निर्माण झाली; म्हणून तिला त्रिकुटी हें नांव आहें. ही नर्मदा सर्वठिकाणीं पसरली म्हणून हिला गंगा हें नांव प्राप्त झालें. ह्याच मयूरा ( मोरा ) पासून सर्व सृष्टी निर्माण झाली. शंकरानें नर्मदेला दक्षिणदिशेकडे जाण्यास सांगून पातकी लोकांना पवित्र करण्याचीहि आज्ञा केली. नर्मदा ही ऋक्षपर्वतापासून मोठ्या वेगानें निघाली म्हणून तिला महती असें नांव प्राप्त झालें. कांहीं बिंदु शंकराच्या शूळापासून निघून शोण म्हणजे किंचित् लाल वर्णाचे असे नर्मदेंत पडले; म्हणून हिला शोण हें नांव प्राप्त झालें आहे. शोण, महती इत्यादि इतर प्रवाहापेक्षां नर्मदाप्रवाहाचें माहात्म्य विशेष आहे. नर्मदा ही सर्व पातकें नष्ट करणारी आहे. त्याच नर्मदेचा एक प्रवाह कलुष ( गढूळ ) झाला म्हणून तिला सुरसा हें नांव प्राप्त झालें. पापी लोकांना अभय देऊन त्यांवर कृपा करिते; म्हणून तिला कृपा असें म्हणतात. पूर्वी कृत-युगामध्यें ही नर्मदा मंदार ( पारिजातक ) पुष्पानीं सुशोभित दिसणारी व मंद ( हळू ) वाहणारी असल्यामुळें हिला मंदाकिनी म्हणतात. महार्णवा ( मोठ्या समुद्रा ) ला उल्लंघून पृथ्वीवर प्राप्त झाली म्हणून हिला महार्णवा म्हणतात. नर्मदा वाहतांना रव ( मोठा शब्द ) करिते; म्हणून हिला रेवा हें नांव प्राप्त झालें. ही पापी लोकांचें पाप नाहीसें करिते, म्हणजे लोकांना विपाप करिते. म्हणून हिला विपापा हें नांव प्राप्त झालें. जन्ममरणाच्या पाशापासून ही नदी मोकळी करिते; म्हणजे विपाश करिते; म्हणून हिला विपाशा हें नांव प्राप्त झालें. नर्मदेचें पाणी विमल ( स्वच्छ ) असल्यामुळें हिला विमला हें नांव प्राप्त झालें. ही नदी कर ( किरण ), भा ( दीप्ति ); म्हणजे चंद्रकिरणाप्रमाणें लोकांना आनंद देणारी व सूर्याच्या दीप्ती म्हणजे कांतीप्रमाणें ज्ञान देणारी असल्यामुळें हिला करभा हें नांव प्राप्त झालें. ही लोकांच्या मनाचें रंजन करिते; म्हणून रंजना व वायुप्रमाणें वाहते म्हणून वायुवाहिनी हें नांव प्राप्त झालें आहे.

---

## अध्याय ७ वा.

### कूर्मकल्पाचें वर्णन.

मार्कंडेय म्हणतात; धर्मा ! एकदां सर्व सृष्टि जलमय झाली असतां ब्रह्मदेव पाण्यामध्यें हजारों वर्षें राहता झाला. नंतर कूर्मा ( कासवा )चें रूप घेतलेले परमेश्वर ब्रह्मदेवाच्या दृष्टीस पडले. त्या कासवापासून ब्रह्मदेवाला आश्चर्य वाटलें; व त्याची स्तुति करण्यास ब्रह्मदेवानें सुरुवात केली. ब्रह्मदेव

कूर्माला म्हणतात; आतां प्रलयकाल संपत आला आहे करितां आपण पूर्वीप्रमाणें पुनः जगत् निर्माण करावें. नंतर कूर्मरूपी ईश्वरानें ब्रह्मदेवाच्या सांगण्याप्रमाणें पुनः सर्व सृष्टी निर्माण केली; व कूर्म ( कासव ) आपल्या पाठीवर पृथ्वीला धारण करिता झाला. ह्या सृष्टीमध्यें एकच सर्वव्यापी अशी नर्मदा नदी वास्तव्य करीत असते. नंतर मी त्या नदीवर जाऊन स्नान केलें; व तिची स्तुति केली. अशाप्रमाणें ही नदी कूर्मकल्पामध्येंहि असती झाली. हिच्या माहात्म्याचें श्रवण केल्यास शिवलोकाची प्राप्ती होतें.

---

## अध्याय ८ वा.

### बककल्पाची उत्पत्ति.

पूर्वीप्रमाणेंच योग्य काळीं प्रलयसमयाला सर्व जगत् जलमय झालें असतां मी एकटा पाण्यामध्यें शेंकडों वर्षें हिंडून हिंडून दमून गेलों; व स्वतःच्या रक्षणाकरितां परमेश्वराचा धावा केला. ध्यान करितांच एक बगळा ( बक ) माझ्या दृष्टीस पडला. त्याला पाहून मी असा निश्चय केला कीं, हा बगळा नसून परमेश्वरच असावा. नंतर मी बगळ्याला बोललों कीं, तूं मला मोहित करून असा कां हिंडतोस ? असा माझा प्रश्न ऐकून बगळ्याचें स्वरूप घेतलेला परमेश्वर मला म्हणतो; मीच सर्व जगत् नष्ट केलें आहे, हें तुला माहीत नाहीं काय ? तुझा आईबाप सर्व कांहीं मीच आहे . मी तुझें रक्षण करण्याकरितां येथें आलों आहे. असें बगळ्याचें भाषण ऐकतांच मी त्या बगळ्याच्या पंखांत लपून राहिलों असतां समुद्राच्या काठाला एक मोठा ध्वनी मला ऐकूं येऊं लागला. नंतर इकडेतिकडे मी पाहूं लागलो तों समुद्रकाठीं आलेल्या दहा कन्या माझ्या दृष्टीस पडल्या. पुढें हिंडत असतां एक मोठें भूमंडळ माझ्या दृष्टीस पडलें. त्या भूमंडळांत एक नगर असून त्या नगरांत एक मोठी नदी मला दिसली; व त्या नदीचे काठीं सर्व गुणांनीं मंडित असें एक शिवलिंग आहे; व त्या लिंगाच्या सभोंवार सर्व देव निजले आहेत, असें मी पाहिलें. त्या वेळीं त्या दहा कन्या त्या नदीवर स्नान करून शिवलिंगाचें पूजन करित्या झाल्या. नंतर बगळ्यानें मला त्या शिवलिंगाजवळ सोडिलें; व तो गुप्त झाला. त्या ठिकाणी नर्मदा ही स्त्रीरूप घेऊन शिवलिंगाचें पूजन करीत होती. त्या स्त्रीचें सांगण्यावरून तेथें वाहणाऱ्या नर्मदानदीवर स्नान केलें. मी नर्मदेंतून स्नान करून जों बाहेर येतो तों पूर्ववत् सर्व सृष्टी माझ्या दृष्टीस पडली; व नदी, शिवलिंग, दहा कन्या, नगर व बगळा ह्या

पैकीं एकहि तेथें नसून समुद्र हा आपल्या मर्यादेनेंच राहिलेला आहे; व पर्वत अरण्यें वगैरे स्थावरजंगमात्मक सृष्टि उत्पन्न झालेली आहे, असें मी पाहिलें; व आश्चर्यचकित होऊन परमेश्वरी अगाध लीलेचें कौतुक करूं लागलों. ह्याप्रमाणें, बककल्पामध्येंहि मी नर्मदा नदी अवलोकन केली आहे; ह्याकरितां ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र ह्या चारहि वर्णांतील लोकांनीं चारहि पुरुषार्थ मिळविण्याकरितां नर्मदानदीवर स्नान करून शिवलिंगाचें पूजन करावें; म्हणजे त्यांचीं सर्व पापें दग्ध होऊन ते अखंड शिवलोकाला जाऊन राहातील.

---

# अध्याय ९ वा.

## नर्मदास्थानमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात, हे धर्मा! नित्यनियमाप्रमाणें प्रलयकाल प्राप्त झाला असतां व सर्व पृथ्वि जलमय झाली असतां भगवान् शंकर एकटेच पाण्यामध्यें वास करून राहिले. ब्रह्मादि देव सुद्धां हजारों वर्षेंपर्यंत शिवस्वरूपांत लीन झाले; नंतर मी पाण्यामध्यें शयन केलेल्या शंकराला पाहून व शंकराचे पाय चेपीत असलेली एक कन्या पाहून; व ही कन्या प्रत्यक्ष नर्मदाच होय असें जाणून; व चार वेद त्याठिकाणीं शंकराची स्तुति करीत आहेत, असें पाहून माझ्या मनाला अत्यंत समाधान वाटलें. सृष्ट्युत्पत्तीचा काळ जवळ आला असतां ब्रह्मदेव जागृत होऊन शंकराला उठवून सांगतात कीं, हे चार वेद आपण जागृत व्हावें एवढ्याकरितां आपली स्तुति करीत आहेत. वेदांनीं सर्व जगत् व्यापून टाकिलें आहे. मी आपणाजवळ हे चार वेद मागण्याकरितां आलों आहे. वेदांच्या साहाय्यानें मी त्रिकालज्ञ होऊन सर्व सृष्टि निर्माण करण्यास समर्थ होईन. वेदाध्ययनानें सर्व पातकें नष्ट होऊन ज्ञानप्राप्ति होते. ही जी कन्या आपली पादसंवाहनादि सेवा करीत आहे, ती नर्मदानदी असल्यामुळें तिला स्वस्थानीं जाऊन स्नानदानादि पुण्यकर्में करणारांचीं पातकें दूर करण्याची आपण आज्ञा करावी. हा मार्कण्डेय मुनि लोकोपकारार्थ सतत तपश्चर्या करीत असतो. नंतर शंकराच्या सांगण्याप्रमाणें विष्णूनें चारहि वेद दुष्ट दैत्यांचा नाश करून ब्रह्मदेवाला आणून दिले. नंतर ब्रह्मदेवानें वेदांच्या साहाय्यानें संपूर्ण स्थावरजंगमात्मक ब्रह्माण्ड निर्माण केलें. नर्मदानदीहि शंकराच्या आज्ञेप्रमाणें स्वस्थानीं जाऊन जलरूपानें वाहूं लागली असतां सर्व ऋषी नर्मदानदीचे काठीं येऊन आपआपले आश्रम बांधून स्नानसंध्यादि कर्में करीत सुखानें काळ कंठून कृतकृत्य होते झाले. जे कोणी नर्मदा नदीचे ठिकाणीं स्नान करून त्याठिकाणीं असणाऱ्या शिवलिंगाचें पूजन करि-

तात ते सर्व पापापासून मुक्त होतात. ही एक नदी तीन प्रकारानें प्रसिद्ध झाली. गंगा, सरस्वती व नर्मदा ह्या तीन नद्या ह्मणजे ब्रह्मा, विष्णु व महेश ह्यांचीं प्रत्यक्ष स्वरूपेंच होत. ह्या तीनहि नद्यांचे ठिकाणीं स्नान करण्याचें फळ सारखेंच आहे; कारण ह्या तीन नद्या नर्मदेचे अंशाच मानले गेले आहेत. जे कोणी नर्मदातीरीं असणाऱ्या शिवलिंगाचें पूजन करतात त्यांस प्रत्यक्ष शंकराचें पूजन केल्याचें पुण्य लाभून मोक्षप्राप्तीहि होते. जे कोणी हें नर्मदास्नानमाहात्म्य श्रवण करितील ते गंधर्व व यक्ष यांच्यासह विमानांत बसून रुद्रलोकीं मोठ्या आनंदानें प्राप्त होतील.

---

## अध्याय १० वा.

### नर्मदास्नानाचें फळ.

मार्कण्डेय ह्मणतात; हे धर्मा ! प्रलयकाल समीप आला असतां सनकादि तसेंच इंद्रादि लोकपाल परमेश्वराचें ध्यान करीत व अंतकाळाची अपेक्षा करीत असतां ईश्वर स्वेच्छेनें सर्व सृष्टि जलमय करितो. प्रलयकाळीं सर्वांचें आयुष्य क्षीण होतें. भुर्लोक, भुवर्लोक, स्वर्लोक, जनोलोक, महर्लोक, तपोलोक व सत्यलोक हे सातहि लोक सत्यलोकामध्यें प्रलयकाळीं जाऊन राहतात. नंतर सर्व जगत् नष्ट करण्याकरितां शंभर वर्षें पाऊस मुळींच पडत नाहीं, त्या वेळीं सर्व प्राणी भुकेनें व तहानेनें व्याकूळ होऊन जिकडेतिकडे फिरतात. फार तर काय समुद्रसुद्धा सुखूं लागतो; परंतु जे नर्मदानदीचे काठीं राहणारे लोक आहेत. त्यांना प्रलयकाळीं किंवा कधींहि भीति उरत नाहीं; भुकेची व तहानेची त्यांस पीडा होत नाहीं. नंतर एकदां प्रलयकाळीं मी ऋषींजवळ नर्मदातीरीं जाऊन त्यांस उपदेश केला कीं, तुह्मी नर्मदातीरीं जोंपर्यंत राहत आहां तोंपर्यंत तुह्मी निर्भय व पिडारहित व्हाल, यांत शंका नाहीं; व तुम्हीं नित्य नर्मदास्नान करून शिवलिंगपूजन करावें; ह्मणजे कृतार्थ होऊन मुक्त व्हाल, इतकें जों मी ह्मणतों तों एक मला विचित्रकारक आश्चर्य करण्याजोगी गोष्ट दिसली; ती ही कीं, संपूर्ण जगत् नष्ट झालें तथापि नर्मदेला किंचित्सुद्धा धक्का पोंचला नाहीं; व तेथील सर्व लोक मोठ्या आनंदानें स्वस्व कर्मे करीत काळ घालवीत आहेत. स्वर्गलोकांतील अमरावतीप्रमाणें; व मंदाकिनीप्रमाणें ही नर्मदा सर्व गुणानें भूषीत झालेली अशी, व जिचे काठीं कोट्यावधि ऋषी तपश्चर्या, जप होम इत्यादि पुण्यकर्में करीत आहेत अशी त्रैलोक्यामध्यें श्रेष्ठपणानें वास्तव्य

करीती झाली. ह्या नर्मदानदीचें स्नान कलियुगामध्यें इच्छित फळ देणारें आहे. कांहीं ऋषी बारा वर्षें, कांहीं सहा वर्षें, कांहीं तीन वर्षें, कांहीं एक वर्ष, कांहीं सहा महिनें, कांहीं तीन महिनें तपश्चर्यादि करून व आपआपल्या अधिकारपरत्वें संसारबंधनांचा उच्छेद करून मुक्त होतात. जे कोणी नर्मदातीरीं स्नान करून शिवव्रतें आचरितात ते संसारसमुद्राचें उल्लंघन करून मुक्त होतात. जे कोणी नर्मदातीरीं राहून शंकराचें ध्यान, पूजन वगैरे करून शंकराचीं व्रतें आचरितात; किंवा विष्णुस्मरण करितात ते पापमुक्त होऊन शिवलोकीं प्राप्त होतात. जे नित्य नर्मदेच्या कांठीं वास्तव्य करून सत्य बोलतात, विष्णुस्मरण करितात, व एक किंवा अर्धामासपर्यंत तरी शिवपूजन करितात; ते प्रत्यक्ष शिवरूपच होतात ह्यांत संशय नाहीं. जे कोणी नर्मदेच्या पाण्यांत आपला देह विसर्जितात, मग ते किडे असोत पक्षी असोत, मुंग्या असोत किं दुसरे कोणतेहि क्षुद्रप्राणी असोत; ते सुद्धां मोठमोठ्या पातकापासून मुक्त होऊन शिवलोकीं जातात. केवळ नर्मदास्नानानें जें पुण्य मिळतें तें इतर ठिकाणीं कितीहि यज्ञ, दान इत्यादि क्रिया केल्या तरी मिळत नाहीं. जे लोक नर्मदेच्या उदकानें आपलें शरीर पवित्र करीत नाहींत ते खरोखर आंधळ्या; व पांगळ्या लोकांप्रमाणें दुर्दैवी समजावे. भृगु, अत्रि वगैरे ऋषि सुद्धां नर्मदास्नानानें कृतकृत्य झाले. जे कोणी निदान हे नर्मदास्नानाचें फळ श्रवण करितात ते सर्व लोकांना मान्य होऊन व ऐहिक सुख भोगून अंतकाळीं शिवलोकीं जातात.

---

## अध्याय ११ वा.

### भक्तीचें श्रेष्ठत्व.

मार्कण्डेय ह्मणतात; हे धर्मा ! नर्मदेचें माहात्म्य वर्णन करावें तितकें थोडेंच आहे. खरोखर पूर्वपुण्य बलवत्तर असेल तरच मनुष्यजन्म प्राप्त होऊन नर्मदा स्नानाचा; व नर्मदामाहात्म्यश्रवणाचा अलभ्य लाभ होतो. मनुष्यानें ईश्वराचा साक्षात्कार करून घेण्याकरितां आस्तिक्यबुद्धि ठेऊन नर्मदामाहात्म्य श्रवण करावें अंतःकरणांत जर भक्तीचा उमाळा आला नाहीं तर सर्व कृत्यें निष्फळ होतात. भक्ति तीनप्रकारची असते; ती सात्त्विकी, राजसी व तामसी होय. ज्ञानी लोकांनाहि शेंकडो जन्म वेदादिकांवर भक्ति उत्पन्न होण्याकरितां घ्यावे लागतात- वेदांवर भक्ति उत्पन्न झाल्याशिवाय नर्मदास्नानादि पुण्यकृत्यामध्यें व नर्मदामाहात्म्य श्रवणामध्यें भक्ति उत्पन्न होत नाहीं; व भक्तीशिवाय मुक्ति नाहीं, हा

सिद्धांत आहे; करितां भक्तियुक्त अंतःकरणानें नर्मदातीरीं स्नान करून शिवलिंगाचें पूजन करितांच शिवलोक प्राप्त होतो. प्रत्येकानें नर्मदानदीचे कांठीं स्नान करून " **सद्योजातं प्रपद्यामि** " इत्यादि मंत्रांनीं अंगाला भस्म लावावें; व पाशुपतव्रत आचरावें, कधींहि शूद्रान्नाशीं स्पर्श करूं नये; ह्मणजे तत्काळ मुक्ति मिळते. जे कोणी नर्मदानदीचे काठीं स्नानादि करून उभें राहून शिवध्यान करितात, त्यांस साहा महिन्यांत शिवदर्शन होतें. जे कोणी नर्मदेचे काठीं शिवसंहिता अगर विष्णुसंहिता पठण करितात; ते कल्पपर्यंत शिवलोकीं जाऊन राहतात. जे कोणी नर्मदानदीचे काठीं नंदीगीता पठण करितात किंवा हें नर्मदामाहात्म्य भक्तिपुरःसर श्रवण करितात; किंवा पठण करितात त्यांचीं सर्व पापें नाहींशी होऊन व ते जन्ममरणाच्या चक्रापासून मुक्त होऊन अनेक कल्पपर्यंत शिवलोकीं जाऊन राहतात. जे कोणी नर्मदेचे काठीं " **अग्निमीळे** " " **इषे त्वोर्जे त्वा** " " **अग्न आयाहि वीतये** " इत्यादि मंत्रांचें अध्ययन करून गायत्रीचा जप करितात ते मुक्त होतात. जे कोणी रुद्राध्यायाचा जप करितात ते विष्णुलोकाला प्राप्त होतात. जें कांहीं नर्मदेच्या सन्निध जप, दान, होम वगैरे कोणतेंहि कर्म केलें असेल तें सर्व अक्षय्य फल देणारें होतें. याप्रमाणें व्रतनियमादि कृत्यें करणारे विष्णुलोकीं प्राप्त होतात. अशातऱ्हेचा नर्मदेचा महिमा श्रवण करून कोट्यावधि कुरुक्षेत्रांत राहणारे ऋषि माझ्यासह नर्मदाकाठीं येऊन राहते झाले; व ते कंदमूलादि फलें भक्षण करून शिवपूजन करते झाले. जे ऋषि पूर्वीं नर्मदानदीचे काठीं राहून शुभ कर्में करितात त्यांच्या पुण्यानें इंद्र सर्वत्र पाऊस पाडून लोकरक्षण करितो. तुझे पितरसुद्धा ह्याच नर्मदानदीचा आश्रय करून शेवटीं स्वर्गाला प्राप्त झाले. तसेच भृग्वादि ऋषि, माझी धौमृणी नांवाची पत्नी, मनस्वती नांवाची माता, तसेच भार्गव ऋषि, आंगिरा ऋषि हे सर्व ह्याच नर्मदेचे काठीं राहून मुक्त झाले. तसेच दुसरेहि सहस्रावधि ऋषि नर्मदामाहात्म्यश्रवणानें मुक्त होऊन शिवलोकाला प्राप्त झाले.

---

# अध्याय १२ वा.

## नर्मदास्तोत्र.

मार्कण्डेय ह्मणतात; हे धर्मा! ह्याप्रमाणें नर्मदेचे काठीं स्नानदानादि कर्में करून शेवटीं नर्मदेच्या प्रसन्नतेकरितां तिची स्तुति करण्यास सर्व ऋषींनीं प्रारंभ केला. ऋषी ह्मणतात; हे नर्मदे! तुझें उदक सर्व प्राणिमात्रास पवित्र

करणारें आहें; तुझे काठीं सिद्ध, गंधर्व, देव, ऋषी वगैरे सर्व लोक वास करितात. तुझ्या तीर्थामध्यें इतर सर्व तीर्थांचा अंतरभाव होतो; तुला वरण्याकरितां मोठमोठे देव व दैत्य आले असतां त्यांना झिटकारून तूं समुद्रालाच माळ घातलीस; तूं सर्व नद्यांमध्यें श्रेष्ठ आहेस. तुझे पाणी पिण्याकरितां मोठमोठे हत्ति, महिष, वराह इत्यादि येऊन; व पवित्रतेला प्राप्त होऊन मुक्त होतात, मुक्ति हेंच तुझें स्वरूप आहें. जे लोक तुझ्या उदकामध्यें स्नान करतात, ते चंद्रलोकाला व सूर्यलोकाला प्राप्त होतात; जोंपर्यंत जे प्राणी तुझ्या उदकाचा आश्रय करीत नाहींत, तोंपर्यंत ते नरकादि दुःखाच्या यातना भोगतात; मुसलमान असोत किंवा चाण्डाळादि महापातकी लोक असोत, केवळ नुसत्या तुझ्या उदकाच्या स्पर्शानें तत्काळ पापमुक्त होऊन शिवलोकीं वास करितात. प्रलयकाळीं सर्व नद्यांचा जरी नाश झाला तरी तुझा कधींहि नाश होत नाहीं; ज्याप्रमाणें तूं अक्षय फल देणारी असून अमरत्वाला प्राप्त झाली आहेस, त्याप्रमाणें आह्मांलाही अक्षयत्व व अमरत्व प्राप्त करून दे; तूंच आह्मांला श्रेष्ठगति आहेस. तूंच आमची माता व पिता असून सर्व कांहीं तूंच आहेस. जे कोणी नर्मदानदीवर स्नान करून प्रातःकाळीं ह्या स्तोत्राचें पठण करितात, त्यांस तूं तात्काळ श्रेष्ठ गति देतेस; अशा तुला आह्मी साष्टांग नमस्कार करितों.

---

## अध्याय १३ वा.

### एकवीसकल्प.

मार्कण्डेय ह्मणतात; याप्रमाणें सर्व ऋषींनीं वर्णन करून प्रसन्न करून घेतलेली नर्मदा सर्व ऋषींना वर देऊन त्यांच्या सर्व इच्छा पूर्ण करिती झाली. नंतर नर्मदा ऋषींना ह्मणते कीं, जर तुह्माला सिद्धिप्राप्तीची इच्छा असेल तर माझ्या शरीरांत निमग्न होऊन तद्रूप व्हा. मी पूर्वी एकच होते त्या वेळीं सर्व जगाचा नाश झाला होता. ईश्वराच्या कृपेनें मला अमरत्व प्राप्त झालें आहे. ह्याप्रमाणें सांगून नर्मदा पाण्यांत गुप्त झाली.

मार्कण्डेय ह्मणतात; हे धर्मा ! मी आजपर्यंत चौदा कल्पांचा अनुभव घेतला आहे; व माझे पूर्वीचे सात कल्प मिळून एकंदर आजपर्यंतचे एकवीस कल्प मी तुला सांगतों. पैकीं पहिला कापील नांवाचा कल्प, दुसरा प्राजापत्य, तिसरा ब्राह्म, चौथा सौम्य, पांचवा सावित्र, साहावा बार्हस्पत्य, सातवा प्राभासक, आठवा माहेंद्र, नववा अग्नि, दहावा जयंत, अकरावा मारुत, बारावा वैष्णव,

तेरावा बहुरूप, चौदावा ज्योतिष, पंधरावा मायूर, सोळावा कौर्म, सतरावा बक, अठरावा मात्स्य, एकोणिसावा पाद्म, विसावा वटकल्प व सांप्रत चालू असलेला हा वाराहकल्प होय. मी व नर्मदा उभयतां हे एकवीस कल्प एकठिकाणीं राहून पाहिले आहेत. नर्मदामाहात्म्य व एकवीस कल्पांचें माहात्म्य श्रवण करणारांचीं सर्व पापें नष्ट होऊन त्यांस शिवलोकप्राप्ति होते.

---

## अध्याय १४ वा.

---

### कालरात्रीवर्णन.

मार्कण्डेय ह्मणतात, हे धर्मा ! एकदां ब्रह्मादि देव शिवाकडे कैलासपर्वतावर जाऊन शंकराला प्रश्न करिते झाले कीं, आतां प्रलयकाल समीप आला आहे; करितां आपण सर्व जगाचा संहार करावा. तूंच माझ्या रूपानें सृष्टि उत्पन्न करतोस, विष्णुरूपानें सृष्टीचें पालन करतोस. तूंच स्वतः तीन मूर्ति धारण करून जगाचें सुरळीत व्यवहार चालवितोस. आतां संहार करणें हें आपलेंच कृत्य आहे. अशातऱ्हेनें सांगून झाल्यावर ब्रह्मादि देवानीं शंकराची पुष्कळप्रकारें स्तुति केली. नंतर शंकरानें "हुं फट्" असा शब्द उच्चारितांच कालरात्री नांवाची जगत्प्रलय करणारी अशी स्त्री शंकरापासून निर्माण झाली. ती स्त्री विजेप्रमाणें तेजस्वी, वाघाचें कातडें पांघरलेली, कृष्णवर्णाची असून ती सर्व जगाला व्यापून राहती झाली; व जणुं काय ती सर्व जगत् नष्टच करीत आहे कीं काय ? असें पाहणारास वाटूं लागलें. ती कालरात्री नांवाची देवी सर्व जगतांचा क्षय करूं लागली असतां जिकडेतिकडे हाहाःकार होऊं लागला. कित्येक मातृगण विनायकादि गणांसह क्रुद्ध होऊन व तमोरूप धारण करून सर्व त्रैलोक्य दग्ध करूं लागले. जिकडे तिकडे उत्पात होऊन सर्वांचा नाश होऊं लागला. अरण्य, पर्वत, दगड, तसेच हिमवान्, हेमकूट, निषध, गंधमादन, माल्यवान्, नीलश्वेत, मेरु, इला, व सात द्वीपें व सात समुद्र हे कालरात्रीच्या दाढेंत अदृश्य झाले. नंतर ती कालरात्री सर्व जगामध्यें संचार करून प्रत्येक प्रलयकाळीं ह्याप्रमाणें नाश करिती झाली. कालरात्रीचा महिमा अवर्णनीय आहे. कालरात्रीच्या सपाट्यांतून मुक्त झाला असा एकहि प्राणी मिळणार नाहीं. याप्रमाणें हे धर्मा ! तुह्मांला कालरात्रीचा महिमा वर्णन करून सांगितला आहे.

---

## अध्याय १५ वा.

### मृत्यूचें स्वरूप.

मार्कण्डेय ह्मणतात; हे धर्मा ! मृत्यूचें स्वरूप फारच भयंकर आहे. ज्या वेळीं प्रलयकाळ प्राप्त होतो, त्या वेळीं असंख्य मातृदेवतांनीं परिवेष्टित अशी कालरात्री सर्व त्रैलोक्याचा क्षय करिते. प्रलयकाळीं सर्वत्र हाहाःकार होतो; व मृत्यूचें हें भयंकर स्वरूप पाहून लोक घाबरून जातात. मृत्यूच्या मुखांत सर्व प्राणी पडून कालरात्रीच्या ताब्यांत जातात. ज्या कालरात्रीचें स्वरूपहि मृत्यूचें स्वरूप आहे. कालरात्र ही हातांत कपाल ( नरकपाल ) घेऊन भयंकर व विस्तृत स्वरूप धारण करिते. सर्व जगत् नष्ट झाल्यावर कालरात्री पुनः शंकराकडे कैलास-पर्वतावर येऊन स्वस्थ बसते; व शंकराची अनेकप्रकारानें स्तुति करिते. ती स्तुति ऐकून शंकर प्रसन्न होऊन नाचूं लागतात; शंकराला नाचतांना पाहून मृत्यु सुद्धां त्याप्रमाणेंच नाचूं लागतो; व इतर मातृगणही आनंदित होऊन नाचावयास लागतात. नंतर कालरात्री ऐश्वर्यानुरूप शंकराचें पूजन करण्यास आरंभ करिते; व शंकराची स्तुतिहि करून त्यास प्रसन्न करून घेते.

## अध्याय १६ वा.

### शिवस्तुति.

सर्व जगत् नष्ट झालेले पाहून अवशिष्ट राहिलेले ऋषि ब्रह्मदेवाला जगद्रक्षणार्थ शरण गेले. असतां ब्रह्मदेव ऋषींना ह्मणतात कीं, हा सांप्रतचा काल प्रलयाचा असल्यामुळें त्रैलोक्य जलमय झालें आहे, तरी सुद्धां मी सनकादि मुनींना घेऊन शंकराकडे जातों; व त्याला प्रसन्न करून तुह्माला सुख होईल, असा उपाय योजतो. असें ऋषींना आश्वासन देऊन; व ब्रह्मदेव सनकादिकांसह कैलासपर्वतावर येऊन शंकराची स्तुति करितात, ब्रह्मदेव ह्मणतात; हे शंकरा ! आपण सर्व जगाचें रक्षण करणारे आहां, आपली मूर्ति शांत आहे. आपण सर्वव्यापी असून सत्त्व, रज; व तम हे तीनहि गुण आपल्यापासून निर्माण झाले आहेत, आपण ॐकारस्वरूपी; व हुंकारानें शोभायमान असें आहां. आपण लोकांचें कल्याण करणारे असून सर्व देवांमध्यें श्रेष्ठ आहां; विष्णु व मीहि आपलेच अंश आहोंत. अग्नि व शेष हींहि तुझींच स्वरूपें आहेत;

उत्पत्ति, स्थिति; व लय हे तीनहि तुझेच धर्म आहेत; तूंच त्रैलोक्याला पूज्य असून मोठमोठे ऋषि तुला सर्वज्ञ, श्रेष्ठ, सूक्ष्म इत्यादिशब्दानें संबोधितात; अशा हे ईश्वरा ! तुला साष्टांग नमस्कार असो. ह्याप्रमाणें ब्रह्मदेवानें केलेली स्तुति ऐकून; व शंकर प्रसन्न होऊन ब्रह्मदेवास ह्मणतात; हे ब्रह्मदेवा ? तुझी स्तुति ऐकून मी प्रसन्न झालों आहे. सांप्रतचा प्रलयकाळचा समय असल्यामुळें ही सृष्टि जलमय झाली आहे, तथापि जे लोक नर्मदानदीचे काठीं राहतात, त्यांस प्रलयकाळची भीति उरत नाहीं, करितां तुह्मीं ऋषींना नर्मदातीरीं जाण्यास सांगा, ह्मणजे ते निर्भय होतील. अशातऱ्हेनें ब्रह्मदेवानें शंकराचा निरोप ऋषींना सांगितल्यानंतर त्याप्रमाणें सर्व ऋषी नर्मदातीरीं जाऊन निर्भयपणें राहते झाले. मार्कण्डेय ह्मणतात; हे धर्मा ! हें स्तोत्र पठण करणारे पुरुष सर्वपापापासून मुक्त होऊन निर्भय होत्साते शेवटीं सुखानें शिवलोकीं प्राप्त होतात.

---

# अध्याय १७ वा.

## द्वादशादित्यप्रभाव.

मार्कण्डेय ह्मणतात; ते धर्मा ! नंतर प्रलयकाळीं बारा सूर्य कशातऱ्हेनें त्रैलोक्य दग्ध करितात, तें तुह्मास सांगतों. प्रथम सर्व नद्या, समुद्र वगैरे नष्ट होऊन सर्व जगत् कालरात्रीच्या मुखांत गेलें असतां शंकर सूर्याला आपलें खरें स्वरूप प्रगट करून जगत् दग्ध करण्याची आज्ञा करितो. सूर्य स्वतः बारा रूपें धारण करून वृक्ष, तृण इत्यादि पदार्थ तसेच पर्वत, पाषाणादि अभेद्य पदार्थ सुद्धां नष्ट करतो. ह्याप्रमाणें सृष्टीचा लय करून सूर्यहि स्वतः शंकराच्या शरीरांत प्रविष्ट होतो. मात्र नर्मदा नदी एकच ह्या सर्व प्रलयभीतीपासून मुक्त होते. महेंद्र, मलय, सह्य, हेमकूट, माल्यवान्, विंध्य, पारियात्र, हे सर्व कुलपर्वत प्रलयकाळीं सूर्यकिरणानें दग्ध होऊन नाश पावतात. सूर्याच्या प्रकाशाचा प्रभाव अतुल आहे. सूर्य हा तेजाचा स्वामी असून अग्नीचें रूप तेंच सूर्याचें रूप होय. सूर्य हाच ब्रह्मस्वरूप व त्रिगुणरूप असून जगाचे प्रलयादि करण्यासहि कारणीभूत आहे. मार्कण्डेय ह्मणतात; हे धर्मा ! ज्या तऱ्हेनें मी प्रलयकाळाचें स्वरूप प्रत्यक्ष पाहिलें, त्याप्रमाणें वर्णन केलें आहे. नर्मदा नदी सर्वांहून श्रेष्ठ व पुण्यप्राप्ती करून देणारी असून अमरलोकाची प्राप्ति करून देणारी आहे.

---

## अध्याय १८ वा.

### नर्मदामाहात्म्यवर्णन.

मार्कण्डेय ह्मणतात; हे धर्मा ! ज्या वेळीं प्रलयकाळ प्राप्त होतो त्या वेळीं शंकराच्या मुखांतून मेघ उत्पन्न होऊन ते हत्तीच्या शुण्डेप्रमाणें शोभायमान अशा जलधारा जमीनीवर पर्जन्यरूपानें पाडतात. नंतर सर्व पृथ्वी जलमय होते. ह्यासच दैनंदिन प्रलय ह्मणतात. त्या वेळीं कित्येक मेघ नीळवर्णाचे, कित्येक कृष्णवर्णाचे, कित्येक शुभ्र, कित्येक ताम्रवर्णाचे, कित्येक धुरासारखे असे अनेकप्रकारचे मेघ उत्पन्न होऊन पृथ्वी जलमय होते. प्रलयकाळीं कोठेंहि पाण्यावांचून कोणतीहि चराचर वस्तु दिसत नाहीं. त्या वेळच्या मेघांना सांवर्तक मेघ ह्मणतात. ज्या वेळीं असा प्रसंग प्राप्त झाला त्या वेळीं मी नर्मदेची स्तुति करून स्वतःचें संरक्षण करून घेतलें. ज्या नर्मदेच्या कृपाप्रसादानें श्रमादिकांचा व पातकांचा परिहार होऊन अखंड सुखाचा लाभ होतो, अशा नर्मदेच्या संनिध मी वास्तव्य करून सुखानें पुष्कळकाळपर्यंत राहिलों.

## अध्याय १९ वा.

### वाराहकल्पवर्णन.

मार्कण्डेय ह्मणतात; हे धर्मा ! एकदां वाराहकल्पामध्यें जेव्हां प्रलयकाळ प्राप्त झाला, त्या वेळीं मी निराधार होऊन मृत्यूचीच केवळ इच्छा करणारा असा त्या प्रलयकालीन समुद्रांतून दोन दोन हातांनीं पोहत जात असतां एक गाय माझ्या दृष्टीस पडली. ती गाय मला धीर देऊन ह्मणाली कीं, तूं घाबरू नकोस; तुझा नाश कधींहि होणार नाहीं. तूं व मी उभयतां आपण शंकराच्या कृपेनें अमर आहोंत. तूं माझ्या शेंपटीचा आश्रय धरून राहा; व भूक लागल्यास माझ्या स्तनांतील दूध प्राशन कर. याप्रमाणें गायीचें वाक्य श्रवण करून मी त्या गायीचें दूध प्राशन केलें; व तिचाच आश्रय करून राहिलों. नंतर मी त्या गायीला तूं कोण? व अशी कां हिंडतेस ? वगैरे विचारिलें असतां गाय मला ह्मणते कीं, मला नर्मदा ह्मणतात; व मी शंकराच्या सांगण्यावरून तुझें रक्षण करण्याकरितां आल्यें आहे. नंतर मी ह्याप्रमाणें त्या गोरूपधारी नर्मदेचें भाषण ऐकून तिच्या सांगण्याप्रमाणें सहस्रावधी वर्षें तसाच तिच्या

आश्रयाखालीं राहिलों. पुढें घोर अशा समुद्रामध्यें शयन केलेल्या शंकरपार्वतीला पाहून; व त्यांस नमस्कार करून मी त्यांची स्तुति केली. नंतर शंकरानें पुनः सृष्टि निर्माण करण्याकरितां वराहरूप धारण केलें; व स्वतःच विष्णु व ब्रह्मदेव हींहि स्वरूपें घेतलीं. वराहानें समुद्रांत निमग्न झालेली पृथ्वी आपल्या दाढेवर धारण करून पूर्ववत् स्थापित केली; त्यायोगें जिकडेतिकडे शांतता झाली; व ब्रह्मदेवांनीं सर्व इंद्रादि देव निर्माण करून स्थावरजंगमात्मक प्राणीहि निर्माण केले. इन्द्रादि देवांनीं शंकर, विष्णु, ब्रह्मदेव व वराहावतार ह्यांची अनेकप्रकारें स्तुति केली त्या वेळीं गायीनें आपलें स्वरूप गुप्त करून नर्मदा ही नदीरूपानें भूमीला पावित्र्य आणणारी अशी वाहूं लागली, हा सर्व चत्मकार पाहून मी थक्क होऊन विस्मय करूं लागलों; व भगवल्लीलेचें कौतुक करून आनंद मानूं लागलों. जे कोणी हें वाराहकल्पवर्णन श्रवण करून नर्मदामाहात्म्यवर्णन करितात, ते कोट्यावधि वर्षेपर्यंत सर्व दुःखापासून मुक्त होऊन व ऐहिक सुख भोगून अंतकाळीं शिवलोकीं प्राप्त होतात.

---

## अध्याय २० वा.

### प्रलयकाळाचें पूर्वरूप.

मार्कण्डेय ह्मणतात; हे धर्मा ! ज्या वेळीं आकाशांतून अग्नीचे गोळे पृथ्वीवर पडतात, पृथ्वी कांपूं लागते ( भूकंप होतो ), धुरळ्याचा पाऊस पडतो, भयंकर शब्द ऐकूं यतात, त्या वेळीं प्रलय होणार असें समजावें. पर्वत, समुद्र, नद्या; व वृक्षादि पदार्थ शुष्क होतात, दुपारच्या वेळीं अग्नीप्रमाणें प्रखर उन्हाळा भासमान होतो, चारहि दिशेला दोन दोन सूर्य मधून मधून दिसतात. त्या वेळीं प्रलयकाळ समीप आला, असें समजावें. नर्मदा व मी मात्र प्रलयकाळीं नष्ट होत नाहीं. शंकरच स्वतः सर्व त्रैलोक्याची उत्पत्ति, स्थिति, व लय करण्यास समर्थ आहे. शंकर हा प्रलयकाळीं सद्रूप धारण करून समुद्रामध्यें शयन कारितो. नर्मदा ही शंकराला फारच प्रिय असल्यामुळें तिला अविनाशित्व प्राप्त झालें आहे. नर्मदेचे काठीं राहून स्नानदानादि करणारांच्या सर्व पातकांचा नाश होतो. नर्मदा ही सर्व प्राण्यांवर उपकार करणारी आहे. तिच्या काठीं राहून नर्मदामाहात्म्य श्रवण करणारा शिवलोकीं प्राप्त होतो.

# अध्याय २१ वा.

## कपिलानदीची उत्पत्ति.

नर्मदा नदी ही सर्व नद्यांमध्यें श्रेष्ठ आहे. कनखलक्षेत्रांमध्यें गंगा व कुरुक्षेत्रामध्यें सरस्वती श्रेष्ठ होय; परंतु नर्मदा ही सर्व क्षेत्रांमध्यें पूज्य व श्रेष्ठ मानिलेली आहे. सरस्वती ही पापी मनुष्यास तीन दिवसांत मुक्त करिते; यमुना सात दिवसांत, गंगा एका दिवसांत व नर्मदा दर्शन घेतांच पापी मनुष्यास मुक्त करिते. विशेषतः अमरकंटक पर्वत सर्वक्षेत्रांत श्रेष्ठ होय; कारण त्या पर्वतावर नर्मदा नदी वाहत असून तिचे काठीं सिद्धविद्याधरादि देवगण मोठ्या आनंदानें क्रिडा करीत असतात. तें क्षेत्र फारच रमणीय आहे. त्या अमरकंटक पर्वतावर अनंत तीर्थें व क्षेत्रें नर्मदाकाठीं आहेत; त्यांच्या दर्शनानें; व स्नानानें तत्काळ मुक्ति प्राप्त होते. त्याच पर्वतावर दारुवनक्षेत्र आहे. तेंही सर्वश्रेष्ठच आहे. ज्वालेश्वरादि तीर्थें पितरांना तृप्ति देणारीं अशीं त्या पर्वतावर नर्मदेकाठीं आहेत. नर्मदेच्या उत्तरेस चरुकेश्वर, दारुकेश्वर, । व्यतिपातेश्वर, पाताळेश्वर, कोटियज्ञ इत्यादि तीर्थें आहेत. अमरेश्वर तीर्थाजवळ एकशें आठ तीर्थें आहेत. मांधातृनगराजवळ सिद्धेश्वर व यमेश्वर अशीं तीर्थें आहेत. ॐकारेश्वराच्या पूर्वेस केदारतीर्थ आहे. त्याचे जवळ स्वर्गद्वारेश्वर आहे. हीं व अशींच असंख्य तीर्थें नर्मदेच्या काठीं आहेत. जे कोणी अमरकंटकपर्वतावर असलेल्या अमरेश्वरतीर्थाजवळ त्याच्या दक्षिणेस अग्नीमध्यें आत्महवन करितील त्यांचें सर्वपाप लयाला जाऊन ते स्वर्गाला प्राप्त होतील. नर्मदानदीच्या दक्षिण तीरावर कपिला नांवाची एक मोठी पुण्यकारक नदी आहे. त्या नदीचे काठीं कोट्यावधि ऋषि तपश्चर्या करीत बसलेले असतात. आजपर्यंत कित्येक ऋषि त्याठिकाणीं तपादि पुण्यकर्मे करून मुक्त झाले आहेत. ह्याच नदीचे काठीं कपिलमहामुनींनें घोर तपश्चर्या केली; ह्मणून त्या नदीला कपिलानदी हें पूर्वी नांव प्राप्त झालें आहे. तेथें दुसरींहि अनंत तीर्थें आहेत. कपिला नदीचे काठीं असणाऱ्या वृक्ष, पशु, पक्षी, वेली, जलचर; व इतर सर्व स्थावरजंगमात्मक प्राण्यांना अंतकाळीं मोक्ष प्राप्त होतो. पूर्वी एकदा शंकर पार्वतीसह नर्मदानदीवर जलक्रीडा करण्याकरितां गेले असतां पार्वतीनें क्रीडा झाल्यावर आपलें नेसलेलें व ओलें झालेलें वस्त्र नर्मदेच्या तीरावर येऊन पिळून टाकिलें, त्या वेळीं पार्वतीनें पिळलेल्या वस्त्रापासून जो प्रवाह उत्पन्न

केला त्यासच आपण कपिलानदी ह्मणतों. त्या नदीचें उदक कपिल ( पिंगट ) वर्णाचें असल्यामुळें तिला कपिला हें नांव प्राप्त झालें आहे.

# अध्याय २२ वा.

## विशल्या नदीची उत्पत्ति.

मार्कण्डेय ह्मणतात; हे धर्मा ! आतां विशल्या नदीची उत्पत्ति सांगतों, ब्रह्मदेवाला अग्नि ह्या नांवाचा पुत्र झाला. त्या अग्नीची स्वाहा नांवाची पत्नी असती झाली. त्या अग्नीला स्वाहेचे ठिकाणीं तीन मुलगे झाले; ते अनुक्रमें आह्वनीय, दक्षिणाग्नि व गार्हपत्य ह्या नांवाचे होत. गार्हपत्याला दोन मुलगे झाले; त्यांची नांवें पद्मक व शंकु अशीं होत. नंतर अग्नि नर्मदानदीचे काठीं येऊन शंकराची आराधना करूं लागला असतां, शंकर प्रसन्न होऊन अग्नीला वर मागण्याविषयीं सुचविता झाला. अग्नि शंकराला ह्मणतो कीं, ही नर्मदा नदी व अशाच दुसऱ्या ज्या सोळा नद्या आहेत त्या सर्व माझ्या बायका व्हाव्यात, अशी माझी इच्छा आहे; व तसें होण्याविषयीं मला वर द्या. नंतर शंकर अग्नीला ह्मणतात; हे अग्ने, ह्या सर्व नद्या 'धिष्णि' नांवानें प्रसिद्ध होऊन तुझ्या बायका होतील; व त्यांस धिष्ण्य नांवाचे अग्नि पुत्ररूपानें उत्पन्न होतील, असें सांगून शंकर गुप्त झाले. नंतर नर्मदा, कावेरी, कृष्णावेणी, रेवा, यमुना, गोदावरी, वितस्ता, चंद्रभागा, इरावती, विपाशा, कौशिकी, सरयू, शतरुद्रिका, शिप्रा, सरस्वती व ह्लादिनी, अशा सोळा नद्या अग्नीच्या बायका झाल्या, नंतर नर्मदेला अग्नीपासून धिष्णीन्द्र नांवाचा पुत्र झाला. नंतर एकेदां मय व तारक इत्यादि दैत्यांबरोबर देवांचें युद्ध होऊन त्यांत देवांचा पराजय झाला; व ते विष्णूला शरण गेले. नंतर अग्नीपासून उत्पन्न झालेल्या धिष्णींद्र नांवाचा नर्मदेच्या मुलाला हांक मारून विष्णु ह्मणाले; हे धिष्णीन्द्रा, तूं वायूला मदतीला घेऊन दैत्यांचा पराजय कर. नंतर धिष्णींद्रानें आपल्या स्वसामर्थ्यानें दैत्यांना पराजित करून सोडलें; व कांहीं अवशिष्ट राहिलेले दैत्य पाताळांत जाऊन राहते झाले. दैत्य पराजित होतांच देवांना आनंद झाला; व ते धिष्णींद्राची स्तुति करूं लागले. तो धिष्णींद्र युद्ध केल्यामुळें अंगाला जखमा झालेला पाहून सशल्य होत्साता आपली माता जी नर्मदा तिला भेटण्याकरितां प्राप्त झाला. नर्मदेनें आपला पुत्र धिष्णीन्द्र सशल्य झालेला पाहून त्यास आलिंगन दिलें व त्या पुत्राला घेऊन ती नर्मदा कपिला नांवाच्या सरोवराजवळ प्राप्त झाली. नर्मदा

पुत्रासह कापिला नांवाच्यां सरोवरांत स्नान केल्यामुळें नर्मदेचा पुत्र जो सशल्य ( जखमा झालेला ) होता तो विशल्य ( जखमारहित ) झाला; व त्या सरोवरापासून एक नदीचा प्रवाह सुरू झाला; त्या प्रवाहाला त्या दिवसापासून विशल्या नदी हें नांव प्राप्त झालें. जे कोणी विशल्यानदीचे काठीं स्नान करतात. ते सर्व पापापासून मुक्त होऊन अंतकाळीं शिवसायुज्यतेला प्राप्त होतात.

## अध्याय २३ वा.

### विशल्यासंगममाहात्म्य.

मार्कण्डेय ह्मणतात; हे धर्मा ! ज्याठिकाणीं विशल्या व नर्मदा यांचा संगम झाला आहे, त्याठिकाणीं स्नान करणारांचीं सर्व पातकें नष्ट होतात; व ते उच्च गतीला प्राप्त होतात. जो सर्व संकल्पविकल्प सोडून ह्या संगमामध्यें प्राण टाकील, तो स्वर्गसुखाचा अनुभव घेऊन निरंतर त्याठिकाणीं वास करील. जो कोणी अमरकंटकपर्वतावर आपला देह विसर्जन करील तो सूर्याप्रमाणें तेजस्वी अशा विमानांत बसून इंद्रलोकाला प्राप्त होईल; व हाच आपला पति व्हावा, अशी स्वर्गांत राहणाऱ्या अप्सरा इच्छा करितील; असा विशल्यासंगमाचा महिमा अगाध आहे. सरस्वती; व गंगा ह्यांच्या संगमाचें माहात्म्य सारखेंच आहे; परंतु रेवा (नर्मदा) व विशल्या ह्या उभयनंदीच्या संगमाचें माहात्म्य मात्र फारच अवर्णनीय व अतुल आहे. गंधर्व, किन्नर वगैरे पुण्य लोकांनीं रेवानदीचा ह्मणजे नर्मदाविशल्यासंगमाचा आश्रय केल्यामुळें त्यांस इंद्राजवळ सतत राहण्याचा अधिकार प्राप्त झाला. ह्या संगमाचें माहात्म्य किती वर्णन करावें ? ह्या संगमाचे ठिकाणीं स्नान केल्यानें त्रैलोक्य पवित्रतेप्रत प्राप्त होतें. ह्या संगमाचे ठिकाणीं स्नान करणारांना अश्वमेधयज्ञाचें पुण्य प्राप्त होतें. सर्व पृथ्वीमध्यें असणाऱ्या तिर्थांचेठिकाणीं स्नान केल्यानें जें फल प्राप्त होतें, तेंच फल ह्या संगमस्नानानें प्राप्त होतें; व स्नान करणारांचीं सर्व पातकें नष्ट होऊन ते ऐहिक सुखाचा उपभोग घेऊन अंतकाळीं शिवलोकाला प्राप्त होतात.

## अध्याय २४ वा.

### करनर्मदास्नानमाहात्म्य

मांधाता नांवाच्या नगरामध्यें कर व नर्मदा ह्या दोन नद्यांचा संगम झालेला आहे. त्या संगमाचे ठिकाणीं स्नान केल्यानें व तपश्चर्या केल्यानें सर्व पितरांचा

उद्धार होतो; व ते वैकुंठाला प्राप्त होतात. पूर्वीं विष्णूनें दैत्यांना मारण्याकरितां त्याठिकाणीं आपले दोन कर ह्मणजे हात मर्दन करून व दंड थोपटून हातांतील सुदर्शनचक्रानें दैत्यांचा नाश केला. त्या वेळीं विष्णूच्या करां ( हातां ) पासून घाम निघून तो नदीच्या प्रवाहाप्रमाणें वाहूं लागला; ह्मणून त्या प्रवाहाला कर नांवाची नदी ह्मणतात. ती कर नदी व नर्मदा नदी ह्यांचा पुढें संगम झाला. त्याठिकाणीं स्नानादि केल्यानें मनुष्य सर्व पापांपासून मुक्त होतो.

## अध्याय २९ वा.

### नीलगंगासंगममाहात्म्य.

ॐकारतीर्थाच्या पूर्वेस नीलगंगा व नर्मदा यांचा संगम झाला आहे. त्याठिकाणीं स्नान, जप, तप, इत्यादि करणारांना सर्व कांहीं अलभ्य वस्तु प्राप्त होतात; व ते साठ हजार वर्षें शिवलोकीं राहतात. जे कोणी येथें पितृश्राद्धादि करितात, त्यांचे सर्व पितर एकवीस कुळांसह उद्धरून जातात.

## अध्याय २६ वा.

### मधूकतृतीयाव्रतविधि

मार्कण्डेय ह्मणतात; धर्मा ! सर्वतीर्थांमध्यें व क्षेत्रांमध्यें जालेश्वर तीर्थ सर्वांत श्रेष्ठ आहे. पूर्वीं बाणासुर, जम्भ, शुम्भ वगैरे दैत्यांनीं देव व ऋषी यांना त्रास दिला असतां ते ब्रह्मदेवाला शरण गेले. ब्रह्मदेवानें सर्वांची प्रार्थना ऐकून दैत्यांचा नाश करण्याबद्दल विचार चालविला. नंतर ब्रह्मदेवादि देव व ऋषी यांना घेऊन शंकराकडे गेले; व सर्वांनीं ब्रह्मदेवाची स्तुति करण्यास प्रारंभ केला. शंकर ब्रह्मादि देवांस ह्मणतात; देवहो ! तुमचें कल्याण असो. तुह्मी येथें कां आळा आहां; व तुह्माला कोणी त्रास दिला किंवा काय ? तें सर्व सांगा. मी तुमच्या दुःखांचा नाश करीन. याप्रमाणें शंकराचें भाषण श्रवण करून ब्रह्मादि देव लज्जेनें खालीं मान घालून शंकरास ह्मणतात; हे महादेवा ! एक बाण या नांवाचा दुष्ट दैत्य आहे; व तो आह्मांला वारंवार पीडा देतो. करितां आपण त्याचा नाश करावा; ह्मणजे आह्मास सुख मिळेल. ह्याप्रमाणें ब्रह्मादि देवांची प्रार्थना; व विनंति श्रवण करून शंकर ह्मणतात; हे देवहो ! तुह्मीं

आतां परत आपआपल्या स्वस्थानाला जा. मी लवकरच तुमच्या दुःखांचा परिहार करून तुमच्या इच्छा सफल करितों. नंतर प्रथम दैत्यांना साहाय्यक असे जे त्रिपुर त्यांचा नाश करावा, अशी शंकरास इच्छा होऊन ते त्याबद्दल विचार करूं लागले, इतक्यांत नारद ऋषि शंकराजवळ आले; व त्यानें शंकराची स्तुति केली. त्या स्तुतीनें शंकर प्रसन्न होऊन; व त्यांनीं नारदाची प्रशंसा करून एक कामगिरी त्यास सांगितली कीं, बाणासुराच्या तपःप्रभावामुळें सर्व देवांना पीडा देणारीं व सर्वत्र भ्रमण करणारीं त्रिपुरें जिंकण्यास अशक्य झालीं आहेत; व मला तर त्रिपुरांचा नाश करावयाचा आहे; तर तूं बाणासुराच्या धार्मिक कृत्यांत व तपादि कर्मांमध्यें विघ्न उत्पन्न कर; व असें केलेंस ह्मणजे माझें इच्छित कार्य सहज सफळ होईल. अशी शंकराची आज्ञा मान्य करून नारद-ऋषि बाणाचें घरीं प्राप्त झाला. बाणासुरानें नारद ऋषीची अर्घ्यपाद्यादिकांनीं उत्तमप्रकारें पूजा करून त्यास संतुष्ट केलें. नारद ऋषी बाणासुराला ह्मणतात कीं, तूं मोठा पराक्रमी असून सद्वर्तन करणारा आहेस. माझी धनादिकाच्या योगें जशी पूजा केलीस तशी दुसरा कोण बरें करणार आहे? जी तुझी बायको पतिव्रता असल्यामुळें हीं त्रिपुरें अबाधित अशीं सर्वत्र फिरत आहेत; अशा पतिव्रतापरायण स्त्रीला पाहण्याची माझी इच्छा आहे. नंतर बाणासुर स्वतः नारद ऋषीला घेऊन अंतःपुरांत गेला. तेथें त्या स्त्रीनें नारद-ऋषीची उत्तमतऱ्हेनें मधुपर्कादिविधीनें पूजा केली. नंतर ती बाणासुराची स्त्री नारदाला धर्म विचारती झाली. तसेंच उपवास कोणकोणते करावे? स्त्रीधर्म कसा आचरण करावा? वगैरे सांगा. असा तिचा प्रश्न ऐकून नारद तिला ह्मणतात; हे पतिव्रते! धर्म जाणण्याची इच्छा विशेषतः स्त्रियांना होणें दुर्लभ आहे; व ती ज्यापेक्षां तुला झाली आहे, त्यापेक्षां तूं पुण्यवती आहेस, ह्यांत शंका नाहीं. आतां तुला धर्माचें स्वरूप सांगतों. जे कोणी तिलधेनु, सुवर्ण, रौप्य, गाई, वस्त्रें, उदक, भूमि, गंधादि उपचार, जोडे, छत्री, पंखे, अभ्यंगादि पदार्थ ब्रह्मणाला दान करितात ते निष्पाप होऊन मुक्त होतात. जे कोणी ललितापंचमीचे दिवशीं मध, उडीद, दूध, तूप, मीठ, गुळ, औषधें, उदक, व भूमि इत्यादिकांचें दान करतात, त्यांस सौंदर्य, लक्ष्मी व ऐश्वर्यादि प्राप्त होऊन; व ह्या लोकीं सुख भोगून अंतकालीं ते शिवलोकीं जातात. ज्या स्त्रिया प्रतिपदेला काष्ठें ( लांकडें ) द्वितीयेला लोणी, तृतीयेला मीठ, चतुर्थीला नक्त आचरून मोदक, पंचमीला तीळ, षष्ठीला ज्येष्ठमध, सप्तमीला सुवर्ण, अष्टमीला कृष्णवर्णाची गाय, नवमीला गन्धपुष्पादि, दशमीला उसाचा रस, एकादशीला फक्त उपोषण करून द्वादशीला उदकदान, त्रयोदशीला अभ्यंगादि, चतुर्दशीला एक भांडें व दोन जोडे; व पौर्णिमेला आणि अमावास्येला पितृकृत्य

करून अनेक दानें वगैरे विद्वान् ब्राह्मणास देतात त्यांना सौभाग्य, ऐश्वर्य, पुत्रपौत्रादि संतति, वगैरे सर्व कांहीं इच्छित प्राप्त होऊन शेवटीं मोक्षसुखाचाही लाभ मिळतो. जांबूळ, कडुनिम्ब. ज्येष्ठमध, आंबा, आंवळा, सांवरी, वड, पिंपळ, शमी, बेल, चिंच, केळ व पाडळ हे पुण्यवृक्ष असल्यामुळें त्यांच्या पूजनानेंहि मोक्षप्राप्ति होते. ज्या स्त्रिया चैत्रमहिन्यांत व्रतें करितात त्यांच्या फलाचा विस्तार कोणाला वर्णन करिता यावयाचा नाहीं. त्यांपैकीं एक मधूकतृतीया व्रत मी तुला सांगतों, ऐक. चैत्रशुक्ल तृतीयेला स्नान करून ज्येष्ठमधाच्या काष्ठाची शंकरपार्वतीची मूर्ति तयार करावी. नंतर त्या प्रतिमेची स्थापना करून षोडशोपचारांनीं पूजा करावी. शेवटीं अर्घ्यदान करून ब्राह्मणांना पाण्यांनीं भरलेलीं भांडीं दान द्यावीत; व शंकरपार्वतीची स्तुति करावी. ह्याप्रमाणें हें व्रत प्रत्येक महिन्याच्या शुक्लतृतीयेला करावें; व शेवटीं फाल्गुन शुक्लतृतीयेला ह्या व्रताची समाप्ती करून उद्यापनादि विधी करावे. याप्रमाणें जी स्त्री मधूकव्रत आचरण करील. तिला जसा इंद्राणीला इंद्र हा उत्तम पति मिळाला तसा पति मिळेल; व सौभाग्य, पुत्रपौत्रादि प्राप्त होऊन तिला मोक्षसुखाचीहि प्राप्ती होईल. जी स्त्री हें व्रत करील तिला स्वर्गसुख मिळून यदाकदाचित् पुनः जन्म प्राप्त झाला, तरी राजकुळांतच जन्म येऊन तीस सर्व राजसुखाचा अनुभव मिळेल. असा ह्या व्रताचा महिमा अवर्णनीय आहे.

---

# अध्याय २७ वा.

## पातिव्रत्यभंग.

मार्कण्डेय ह्मणतात; हे धर्मा ! ह्याप्रमाणें नारदानें सांगितलेलें व्रतानिधान ऐकून बाणासुराची स्त्री नारदास ह्मणाली कीं, मी आपणाला सुवर्ण, रत्नें वगैरे दानें देणार आहे. तीं आपण घ्यावींत. नंतर नारद ह्मणतो हे प्रतिव्रते ! तूं जें मला दान देणार आहेस, तें एकाद्या गरीब ब्राह्मणाला दिलेंस तर बरें, असें मला वाटतें. नारदाच्या सांगण्याप्रमाणें त्या स्त्रीनें विद्वान् ब्राह्मणांस आमंत्रण करून अनेक दानें दिलीं; व प्रार्थना केली कीं, हाच बाणासुर मला जन्मोजन्मीं पति होवो; व या दानानें शंकरपार्वतीहि संतुष्ट होवोत. नंतर नारद सर्वांच्या मनाला दुष्कर्माची भुरळ पाडून तो शंकरपार्वती जेथें क्रीडा करित होती तेथें प्राप्त झाला. हा प्रकार पाहून बाणासुराच्या स्त्रियांनाहि नारदरूपी निघून गेल्यामुळें फारच दुःख होऊं लागलें; व आपलें पातिव्रत्य नष्ट झालें कीं काय ! असा त्यांस भास होऊन त्या फारच शोक करूं लागल्या.

---

# अध्याय २८ वा.

## ज्वालेश्वरमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात; हे धर्मा! नारद शंकराजवळ येऊन; व त्याची स्तुति करून झालेलें सर्व वर्तमान निवेदन करिते झाले. नंतर शंकरानें त्रिपुरांचा नाश करण्याकरितां मंदरपर्वताचें धनुष्य, पृथ्वीची दोरी; व त्याला विष्णु हा बाण लावून व बाणाच्या टोंकाला अग्नीची योजना करून. बाणाच्या पंखांचे जागीं गरुडाची योजना करून ज्या रथाला अश्विनौदेव हे घोडे जुंपिले होते त्यावर सर्व अष्टौदिक्पालांची स्थापना केली. अशा रथांत बसून शंकरानें विष्णुरूपी बाण त्रिपुरनाशार्थ सोडिला. त्या वेळीं त्या बाणतेजानें सर्व त्रैलोक्य दग्ध होण्याचा प्रसंग प्राप्त झाला. जणुं काय प्रलयच होतो कीं काय! असा भास होऊं लागला. हा सर्व प्रकार पाहून बाणासुर आपल्याशींच म्हणतो कीं, हा जगन्नाशाचा प्रसंग माझ्या दुराचरणानेंच ओढवला आहे. मी जेर दुर्वर्तन केलें नसतें तर शंकरानें माझ्या त्रिपुरांचा नाश करण्याकरितां अग्निस्वरूपी विष्णुबाण सोडिला नसता; व हा प्रलयप्रसंगहि आला नसतां. सर्व जगाचा नाश केल्याचें भयंकर पातक आतां माझे माथीं खात्रीनें पढणार; एवढेंच नव्हे तर माझाहि नाश ह्या अग्निबाणानें लवकरच होईल असें वाटतें. आतां आपण शंकरालाच शरण जावें, असा विचार करून बाणासुर मस्तकावर शिवलिंग धारण करून घराच्या बाहेर पडला, तो अमरकंटकपर्वतावर जाऊन तेथें शंकराची स्तुति करूं लागला असतां शंकर प्रसन्न व शांत होऊन बाणासुरास म्हणतात; हे बाणासुरा! तूं भिऊं नकोस. तूं माझा आजपासून पार्षद्गण झाला आहेस. तूं संतत माझ्याजवळ राहशील. आजपासून तुझा कोणीहि पराजय करूं शकणार नाहीं. ह्याप्रमाणें बाणासुराची समजुत घालून शंकरानें सोडलेल्या अग्निस्वरूपी जगत्प्रलय करणाऱ्या विष्णुबाणाचें सांत्वन केलें. त्रिपुरांपैकीं एका पुराचें शंकरानें रक्षण केलें. दुसरें पुर अमरकंटकपर्वतावर पाडिलें; व तिसरें श्रीशैलपर्वतावर पाडिलें. अशातऱ्हेनें त्रिपुरांची व्यवस्था लाविली. श्रीशैलपर्वतावर जें पुर पडलें, तें ज्वालायुक्त होतें; व त्या पुराच्या योगें जगाला त्रास होऊं नये; म्हणून तेथें शंकरानें स्वतः येऊन वस्ती केली; म्हणून त्या तेथील शिवालिंगाला ज्वालेश्वर हें नांव प्राप्त झालें; व दुसरें पुर जें अमरकंटकपर्वतावर पडलें तेथेंहि शंकरानें वास्तव्य केल्यामुळें त्यांना अमरेश्वर हें नांव प्राप्त झालें. ज्वालेश्वराजवळ ज्वाला नांवाची नदी निर्माण

होऊन ती नर्मदानदीला मिळाली ह्मणून त्या तीर्थाला ज्वालेश्वरतीर्थ ह्मणतात. त्या ठिकाणीं स्नानदानादि करून तिलोदकानें पितृश्राद्ध केलें असतां सर्व पितरांचा उद्धार होऊन स्वतःला शिवलोकप्राप्तिहि होते. जे कोणी अमरकंटक पर्वताला प्रदक्षिणा करून व अमरेश्वरतीर्थांत स्नान करून अमरेश्वराचें पूजन करितात ते सर्व पापापासून मुक्त होऊन; व इहलोकीं अत्यंत सुख भोगून अंतीं शिवलोकीं प्राप्त होतात. त्याप्रमाणेंच अमरेश्वराच्या संनिध असणाऱ्या कुशावर्त, ब्रह्मकुंड, अंबरीषतीर्थ, महाकाळेश्वर, मातृकेश्वर वगैरे तीर्थांमध्यें स्नानादि करणारांनाहि अंतीं शिवलोकप्राप्ति होते, हें निःसंशय होय.

---

# अध्याय २९ वा.

---

## कावेरीसंगममाहात्म्य.

धर्मराजानें कावेरीसंगमाचें माहात्म्य मार्कण्डेय ऋषीस विचारल्यावरून मार्कण्डेय ह्मणतात; हे धर्मा ! ह्याच कावेरीनर्मदासंगमावर स्नान करून यक्षाधिपति कुबेर सर्वैश्वर्यसंपन्न होता झाला. कुबेरानें ह्याच ठिकाणीं शंकराची आराधना करून; व घोर तपश्चर्या करून शंकरास प्रसन्न करून घेतलें. शंकरानें वर माग असें कुबेरास ह्मटलें असतां कुबेर शंकरास ह्मणतो; हे शंकरा ! मला दुसरी कशाचीहि इच्छा नाहीं. फक्त यक्षांचें आधिपत्य, तुझेठिकाणीं भक्ति व धर्माविषयीं श्रद्धा एवढेंच मला पाहिजे. नंतर शंकरानें कुबेराच्या वचनाप्रमाणें त्यास सर्व देऊन शंकर स्वस्थानीं निघून गेले. कुबेरही स्वस्थानाला प्राप्त झाला. ज्यांनीं कावेरीसंगमावर स्नान करून पितरांना तिलोदकानें तृप्त केलें व ज्यांनीं त्याकरितांच श्राद्धादिकर्में केलीं ते धन्य होत, व ते सर्व पितरांसह उद्धरून शिवलोकीं गमन करितात. ज्याला मोक्षप्राप्ती व्हावी, अशी इच्छा असेल त्यानें कावेरीनर्मदासंगमावर एकदां तरी स्नान करावें; व शंकराची पूजा करावी. त्या संगमावर स्नानादि सत्कर्में केलीं असतां अश्वमेधादि यज्ञ केल्याचें पुण्य प्राप्त होतें; यज्ञादि कर्में केलीं असतां अक्षय्य स्वर्ग प्राप्त होतो; जपादि कर्में केलीं असतां आयुर्वृद्धि होतें; शिवध्यान केलें असतां शिवलोक प्राप्त होतो; त्या संगमतीर्थाचे ठिकाणीं अग्नीमध्यें देह त्याग केला असतां प्रलयकालपर्यंत अग्निलोकांत राहावयास मिळतें. जे कोणी ह्या संगमावर उपोषण करितील त्यांस अप्सरादि लोक प्राप्त होऊन ते अप्सरांसह अनेक सुखांचा उपभोग

घेतील. अशातऱ्हेनें हें कावेरी-नर्मदा-संगममाहात्म्य त्रैलोक्यामध्यें प्रसिद्ध आहे. गंगा व यमुना यांच्या संगमावर स्नान केल्यानें जें फल मिळतें तेंच फल केवळ कावेरीस्नानानें प्राप्त होतें. कावेरीनर्मदासंगमाचे कांठीं असणारें जें अमरेश्वरतीर्थ त्याच्या दक्षिणदिशेस चपलेश्वर व चंडहस्तेश्वर अशीं दोन लिंगें या तीर्थाचे रक्षणाकरितां स्थापित झालीं आहेत. दुसऱ्या क्षेत्रांत केलेलें पाप कावेरीसंगमावर नष्ट होतें; पण कावेरीसंगमावर केलेलें पाप कधींहि नष्ट होत नाहीं, ह्याकरितां ह्या संगमावर केव्हांही पापाचरण करूं नये.

## अध्याय ३० वा.

### दारुतीर्थमाहात्म्य.

धर्मराजानें दारुतीर्थाचें माहात्म्य मार्कण्डेय ऋषीस विचारल्यावरून मार्कण्डेय ह्मणतात; हे धर्मा ! भृगुवंशामध्यें देवशर्मानांवाचा एक ब्राह्मण होता. त्यास दारु ह्या नांवाचा एक मुलगा झाला. तो दारु वेदशास्त्रांत निष्णात असून पहिले तीनही आश्रम त्यानें यथाविधि पाळिले होते. शेवटीं दारूनें संन्यासदीक्षा घेतली; व तो शंकराची आराधना करूं लागला. शेवटीं प्रसन्न होऊन शंकरानें त्या दारुनामक संन्याशाचा उद्धार केला. तो ज्या नर्मदातीरावर तप करीत होता त्या तीराला दारुतीर्थ हें नांव प्राप्त झालें. त्या दारुतीर्थावर स्नान करून पितरांना तृप्त करणारांचे सर्व पितर मुक्त होऊन शिवलोकीं जातात. जे दारुतीर्थावर स्नान करून खरें बोलण्याचा नियम धरितात; व षड्रिपूंना जिंकून इंद्रियनिग्रह करितात, त्यांच्या सर्व इच्छा पूर्ण होतात. जे कोणी ह्या तीर्थावर उपवास करून सत्कर्माचरण करितात. त्यांना सौत्रामणि कर्माचें फल मिळतें. जो ऋग्वेदी ब्राह्मण ऋग्वेदाचें, सामवेदी सामवेदाचें, यजुर्वेदी यजुर्वेदाचें पठण ह्या तीर्थावर येऊन करील त्यास उत्तम गति प्राप्त होईल. जे कोणी ह्या तीर्थावर प्राणत्याग करितील ते शिवलोकीं जाऊन राहतील.

## अध्याय ३१ वा.

### ब्रह्मावर्ततीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय ह्मणतात; हे धर्मा ! दारुतीर्थाचे ठिकाणीं स्नानादि केल्यानंतर ब्रह्मावर्ततीर्थावर जावें. ब्रह्मावर्ततीर्थावर ब्रह्मदेव स्वतः नित्यवास करीत

असतात. ह्या तीर्थाचे ठिकाणीं यथाविधि स्नान केल्यावर शंकराची आराधना करावी; व पितृश्राद्धादि कर्में करावींत; ह्मणजे त्यायोगें सर्व पितरांचा उद्धार होतो; व आपणास अखिल यज्ञ केल्याचें पुण्य प्राप्त होतें. देव, दैत्य; किंवा ब्राह्मण कोणीहि असो; तो ज्याज्या तीर्थाचे ठिकाणीं स्नानादि करील त्याच्या त्याच्या नांवानें तीं तीं तीर्थें प्रसिद्धीस येतात. पराक्रमावांचून कोणालाहि श्रेष्ठत्व येत नसतें. जर आपण ब्रह्मावर्ततीर्थाचे ठिकाणीं असभ्य व असद्वर्तन केलें, तर आपणास नरकप्राप्ती होईल; करितां आपण सर्वांनीं ब्रह्मावर्ताचे ठिकाणीं जाऊन व इंद्रियनिग्रह करून सत्कर्माचरण करावें; ह्मणजे सर्व दुःखापासून आपली मुक्तता होऊन आपणास शिवलोकाची प्राप्ती होईल.

---

## अध्याय ३२ वा.

### पत्रेश्वरतीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय ह्मणतात; धर्मा ! नंतर पत्रेश्वरतीर्थाचे ठिकाणीं चित्रसेनाचा मुलगा पत्रेश्वर ह्यास सिद्धि प्राप्त झाली. पूर्वी चित्रसेन नांवाचा इंद्राचा अतिप्रिय असा एक गंधर्व होता. त्याला पत्रेश्वर नांवाचा पुत्र झाला. तो रूपवान् असून पराक्रमी होता. तो पत्रेश्वर इंद्राच्या सभेंत बसला असतां तेथें नृत्य करणाऱ्या मेनकेला पाहून मोहित झाला. हा प्रकार पाहून इंद्राला राग आला; व त्यानें पत्रेश्वरास शाप दिला कीं, तूं मृत्युलोकामध्यें जाऊन पडशील. नंतर पत्रेश्वराला फार वाईट वाटलें; व तो इंद्राला शरण गेला. इंद्रानें प्रसन्न होऊन पत्रेश्वरास उच्छाप दिला कीं, ज्या वेळीं तूं नर्मदातीरीं जाऊन शंकराची आराधना करिशील त्या वेळीं तूं ह्या शापापासून मुक्त होशील. नंतर पत्रेश्वर इंद्राला नमस्कार करून पृथ्वीवर प्राप्त झाला; व नर्मदानदीचे काठीं येऊन व स्नान करून शिवाराधना करूं लागला; व तेथें त्यानें घोर तपश्चर्याहि केली. पचाग्निसाधनानें शंकराला प्रसन्न करून घेतांच शंकर पत्रेश्वराजवळ येऊन त्यास वर माग असे ह्मणाला. नंतर पत्रेश्वर ह्मणतो; हे देवा ! आपण ह्याचठिकाणीं राहून हें तीर्थ माझें नांवानें प्रसिद्ध करावें. शंकरानें त्याप्रमाणें वर देऊन ते स्वस्थानीं निघून गेले. त्या दिवसापासून त्या तीर्थाला पत्रेश्वर हें नांव प्राप्त झालें; व पत्रेश्वर शापमुक्त होऊन इंद्रलोकाला निघून गेला. जे कोणी येथें स्नानादि करितात ते अक्षय्य अशा शिवलोकीं जाऊन राहातात.

---

# अध्याय ३३ वा.

## अग्नितीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय ह्मणतात; हे धर्मा ! पूर्वी कृतयुगामध्यें एक दुर्योधन नांवाचा राजा होता. त्याची नर्मदा नांवाची बायको होती. नर्मदेला एक सुंदर कन्या झाली. तिचें नांव सुदर्शना असे होतें. एके दिवशीं ती सुदर्शना उपवर झाली असत अग्नि ब्राह्मणाचें रूप घेऊन दुर्योधन राजाजवळ प्राप्त झाला; व त्यानें सुदर्शना मला दे, अशी याचना केली. नंतर दुर्योधन ब्राह्मणरूपधारी अग्नीस ह्मणतो कीं, मी आपली मुलगी दरिद्री अशा तुला देऊं इच्छित नाहीं. करितां तूं आल्या वाटेनें परत जा. ह्याप्रमाणें दुर्योधनाचें भाषण ऐकून ब्राह्मणाला वाईट वाटलें; व तो गुप्त झाला. त्या वेळीं त्या राजाच्या राज्यांत कोठेंच अग्नि दिसेनासा झाला. अग्निकुंडांतील अग्नि गुप्त झाल्यामुळें ब्राह्मणांना आश्चर्य वाटलें; व ते सर्व राजाकडे येऊन झालेलें वर्तमान सांगते झाले. हें ब्राह्मणांचें वाक्य ऐकून राजा मूर्च्छित होऊन ब्राह्मणांस ह्मणतो कीं, अशातऱ्हेनें सर्व राज्यांतील अग्नि गुप्त होण्याचें कारण काय आहे ? तें आपणच शोधून काढावें. नंतर ब्राह्मण ह्मणतात, आह्मी यथोक्तविधीनें व्रतपूर्ण असतां अग्नि कां नष्ट झाला, हें कारण आह्माला समजणें शक्य नाहीं, ह्या बाबतींत आपलें कांहीं तरी दुष्कृत्य असावें, अशी आमची समजूत आहे, करितां आपण कोणतें विशिष्ट पाप केलें आहे, तें आपणच शोधून काढा. त्या वेळीं अग्नि राजाच्या स्वप्नांत येऊन सांगतो कीं, मी तुझ्याजवळ मुलगी मागण्याकरितां आलों असतां तू माझ्या वचनाला मान दिलास नाहीं, ह्मणून मी रागावून तुझ्या राज्यांतून निघून गेलों आहे. पुनः जर तूं मला आपली मुलगी देशील तर मी पूर्ववत् तुझ्या राज्यांत वास करीन. नंतर अग्नीच्या वचनाप्रमाणें राजानें आपली मुलगी देण्याचें कबूल केलें. नंतर सुमुहूर्त पाहून राजानें आपली मुलगी अग्नीला दिली; त्यायोगें अग्नि प्रसन्न होऊन पूर्वीप्रमाणें राज्यांत राहूं लागला. ज्या ठिकाणीं सुदर्शना व अग्नि यांचा विवाह झाला, तेथें माहिष्मती नामक नगरीजवळ एक तीर्थ निर्माण झालें, त्या तीर्थाचें नांव अग्नितीर्थ होय. जे कोणी प्रत्येक पर्वणीला अग्नितीर्थामध्यें स्नान करून योग्य ब्राह्मणाला दानादि देतील व पितृश्राद्धादि कर्म करितील. त्यांना पृथ्वी दानाचें पुण्य प्राप्त होईल. जे कोणी येथें उपोषण करितील ते अग्निलोकाला प्राप्त होतील.

---

## अध्याय ३४ वा.

### रवितीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय ह्मणतात; हे धर्मा! अतां प्रत्यक्ष सूर्यानें अवतार घेऊन नर्मदानदीचे काठीं असणाऱ्या लोकांचा उद्धार केला, हें कथानक मी तुह्माला सांगणार आहे. कोणी एक ब्राह्मण सूर्याचें प्रत्यक्ष दर्शन घ्यावें, असा उद्देश मनांत धरून कांहीं एक न खातां उपोषित असा चारशे कोस प्रवास करिता झाला. नंतर सूर्याला त्या ब्राह्मणाची दया येऊन तो त्यास स्वप्नांत सांगता झाला कीं, मी सर्व जगताला व्यापून राहिलेला आहे; तेव्हां विनाकारण प्रवास करून तूं श्रमित होऊं नको; तुला काय वर पाहिजे असेल ते माग. नंतर ब्राह्मण सूर्याला ह्मणतो कीं, तूं सतत नर्मदानदीचे कांठीं रहावेंस, अशी माझी इच्छा आहे; नंतर सूर्यानें बरें आहे, असें ह्मणून स्वस्थानाला प्रयाण केलें; व आपल्या तेजांपैकीं शंभरावा भाग नर्मदानदीचे काठीं रवितीर्थ या नांवानें स्थापित केला. जे लोक नर्मदेच्या काठीं असणाऱ्या रवितीर्थावर स्नान करून देव व पितर यांना संतुष्ट करितात, त्यांस अग्निलोक प्राप्त होतो. जे कोणी ह्याठिकाणीं संन्यासाश्रम घेऊन देहत्याग करितात त्यांस साठ हजार वर्षेंपर्यंत स्वर्गलोक प्राप्त होतो. जे कोणी ह्या तीर्थाचे ठिकाणीं कांहीं कालपर्यंत वास करितील त्यांस दीर्घायु, संपत्ति, आरोग्य व संतत्यादि प्राप्त होतील. सकाळीं सूर्यस्मरण केल्यानें सर्व पापें नष्ट होऊन ते सूर्यलोकीं जातात.

## अध्याय ३५ वा.

### मेघनादतीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय ह्मणतात; हे धर्मा! पूर्वी त्रेयुगामध्यें रावण या नांवाचा त्रैलोक्याला पीडा देणारा असा एक राक्षस होता. तो रावण एकदा विमानांतून बसून फिरावयास निघाला असतां त्यानें विंध्यपर्वताच्या गुहेंत तपश्चर्या करीत असलेल्या मयदैत्याला पाहिलें; व त्याच्याजवळ असलेल्या एका मुलीला पाहून रावण मयदैत्याला ह्मणतो; ही कोण आहे? असें विचारूं लागला. नंतर मयदैत्य रावणाला ह्मणतो कीं, ही मंदोदरी नांवाची माझी मुलगी, चांगला पति मिळावा ह्याकरितां तप करीत आहे. नंतर मयानें आपली मुलगी मंदोदरी रावणाला

दिली. पुढें कांहीं काळानें त्याला एक मुलगा झाला. तो उपजतांच मेघाप्रमाणें ओरडूं लागला ह्मणून त्याचें नांव मेघनाद असें ठेविलें. नंतर त्या मेघनादानें शंकराची आराधना केली; व शंकराला प्रसन्न करून नर्मदानदीचे काठीं मेघनादेश्वर या नांवानें एक शिवलिंग स्थापित केलें, व तेथील तीर्थाचें नांव मेघनादतीर्थ असें ठेविलें. जे कोणी मेघनादतीर्थाचे काठीं स्नान करून; व मेघनादलिंगाचें पूजन करून उपोषणादि करितात त्यांचीं सर्व पापें नाहिंशीं होतात.

---

## अध्याय ३६ वा.

### दारुकतीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय ह्मणतात; हे धर्मा! अतां तुह्माला दारुकतीर्थाचें माहात्म्य सांगतों. इंद्राचा मातली नांवाचा एक सारथि होता. त्यानें कांहीं कारणानें आपल्या मुलाला शाप दिला. नंतर त्याच्या प्रार्थनेवरून त्याला उच्छाप मिळाला कीं, ज्या वेळीं तूं नर्मदेच्या काठीं येऊन शंकराची अराधना करिशील त्या वेळीं तूं शापापासून मुक्त होशील. याप्रमाणें उच्छाप मिळाल्यावर तो पृथ्वीवर जन्म घेता झाला. नंतर त्यानें नर्मदेच्या तीरीं आपला देह तपश्चर्येनें झिजवून शंकराची आराधना केली. त्याचें नांव दारुक असें होतें. तोच पुढें श्रीकृष्णाचा सारथी झाला. शेवटीं तो नर्मदेकाठीं येऊन; व तेथें स्वतःच्या पुण्यप्रभावानें एक दारुक नांवाचें तीर्थ निर्माण करून आणि शिव व विष्णू ह्या उभयतांना संतुष्ट ठेऊन शापमुक्त होत्साता स्वस्थानीं निघून गेला. त्या दारुकतीर्थाचें ठिकाणीं स्नान करून; व उपोषण करून जो कोणी ब्राह्मणभोजन घालील त्याला सर्वप्रकारचीं फलें प्राप्त होऊन व ह्या लोकीं तो सुख भोगून अंतकाळीं शिवलोकला प्राप्त होईल; तसेंच त्यास अश्वमेध यज्ञाचें फलही त्यास प्राप्त होईल; असा ह्याचा महिमा अवर्णनीय व अगाध आहे.

---

## अध्याय ३७ वा.

### देवतीर्थमाहात्म्य.

त्यानंतर देवतीर्थाला जावें. त्याच तीर्थाचे ठिकाणीं स्नान करून तेहतीस कोटी देव सिद्धीप्रत प्राप्त होते झाले. पूर्वी एकदां देव व दैत्य यांचें युद्ध होऊन

त्यांत इंद्रादि देवांचा पराजय झाला. नंतर सर्व देव ब्रह्मदेवाला शरण गेले असतां ब्रह्मदेव इंद्रादि देवांस ह्मणतो कीं, तुह्मी सर्व नर्मदानदीचे काठीं जाऊन तपश्चर्या करा; ह्मणजे तुमची कार्यसिद्धि होईल. याप्रमाणें ब्रह्मदेवानें भाषण ऐकून सर्व देव नर्मदातीरीं प्राप्त झाले; व त्यानें घोर तपश्चर्या केली. शेवटीं त्याच तपश्चर्येच्या प्रभावानें शत्रूंचा पराजय होऊन इंद्रादि देवांना पूर्वीप्रमाणें सिद्धि व स्वर्गलोक प्राप्त झाला. त्या दिवसापासून त्या तीर्थाला देवतीर्थ हें नांव प्राप्त झालें. त्याठिकाणीं जे स्नान करितील; व ब्राह्मणपूजनादि करितील त्यांना ह्या लोकीं सर्व सुखें प्राप्त होऊन ते अंतकाळी विमानांत बसून आनंदानें शिवलोकाला प्राप्त होतील.

---

## अध्याय ३८ वा.

### नर्मदेश्वरमाहात्म्य.

मार्कण्डेय ह्मणतात; हे धर्मा ! पूर्वी कृतयुगामध्यें दारुवन या नांवाचें एक अरण्य होतें. त्या अरण्यांत चारहि आश्रमाचे लोक राहत असत. कोणी एके दिवशीं शंकर पार्वतीसह विमानांत बसून दारुवनावरून आकाशमार्गानें जात असतां दारुवनांतील अरण्यशोभा; व तेथील लोकांचे आचारविचार पाहून पार्वतीनें त्या आश्रमाबद्दल माहिती विचारिली असतां शंकर पार्वतीला ह्मणतात. ह्या दारुवनांत राहणारे लोक फारच पुण्यवान् आहेत; व ह्याठिकाणीं राहणाऱ्या स्त्रिया फारच पतिव्रता आहेत कीं, ज्यांची बरोबरी कोणीहि करणार नाहीं, अशाप्रकारें शंकरमुखानें तेथील स्त्रियांच्या पातिव्रत्याचें वर्णन ऐकून व तें पार्वतीला सहन न होऊन पार्वती शंकराला ह्मणते; हे देवाधिदेवा; त्या स्त्रियांचें जर खरोखरच उत्कृष्टतऱ्हेचें पातिव्रत्य असेल तर आपण मदनाचें स्वरूप घेऊन त्यांच्या पातिव्रत्याच्या विघातार्थ त्यांच्या मनाला भुरळ घालून त्यांची परीक्षा पाहावी; आपणाला कांहीं एक अशक्य नाहीं. असें पार्वतीचें भाषण ऐकून शंकर पार्वतीला ह्मणतात; हे पार्वति ! तूं या भानगडींत पडूं नकोस; कारण सद्धर्मानें वागणारे पुरुष; व पतिव्रता स्त्रिया फारच रागीट असतात. त्यांचा अपमान झाल्यास त्या काय करितील याचा नियम नाहीं. अशातऱ्हेनें पार्वतीला जरी पुष्कळप्रकारें सांगितलें, तरी तिचा अतिशय आग्रह दिसल्यामुळें शंकरानें सुंदर मदनाप्रमाणें असें भिक्षुरूप धारण करून व दुसरीहि मंडळी बरोबर घेऊन ते दारुवनांत येते झाले. असें सुंदर तें भिक्षुरूप पाहून तेथील स्त्रिया मोहित होऊन; व सर्व कर्में

सोडून त्यांचें सर्व लक्ष्य भिक्षुकाकडे लागलें. त्या स्त्रियांचे पति बाहेर गेले होते, ते घरी येऊन पाहतात तों आपल्या स्त्रिया स्वकर्तव्यपराङ्मुख होऊन चंचल मनाच्या झाल्या आहेत. हा प्रकार कां झाला, असा विचार करीत असतां ज्ञानदृष्टीनें सर्वांनीं जाणिलें कीं, हें कृत्य शंकराचें आहे. नंतर त्या ब्राह्मणांनीं क्रोधाविष्ट होऊन शंकरास शाप दिला कीं, तुझें लिंग गळून पडेल. असा ब्रह्मशाप होताच लिंग तत्काळ भूमीवर गळून पडलें; व त्यामुळें त्रैलोक्यांत मोठा हाहाःकार उडून गेला. सर्व देव ब्रह्मदेवाकडे जाऊन झालेलें वर्तमान निवेदन करिते झाले. नंतर ब्रह्मदेव देवांना घेऊन शंकरासह वशिष्ठादि ऋषींकडे गेले; व सर्वांनीं प्रार्थना करून झालेल्या अपराधाची क्षमा करण्यास सांगितलें. वशिष्ठादि ऋषींनीं देवांस सांगितलें कीं, तुह्माला भिण्याचें कांहीं कारण नाहीं. जें लिंग खालीं पडलें, तेंच नर्मदेश्वर या नांवानें प्रसिद्ध होऊन सर्वांचा उद्धार करील. जे कोणी नर्मदेश्वराचें पूजन करितील त्यांस अश्वमेध यज्ञाचें फळ प्राप्त होईल.

---

## अध्याय ३९ वा.

### कपिलातीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय ह्मणतात; हे धर्मा ! पूर्वी कृतयुगाच्या आरंभीं ब्रह्मदेवानें चारप्रकारची ( जरायुज, अण्डज, स्वेदज, व उद्भिज्ज ) सृष्टि उत्पन्न केली. नंतर ब्रह्मदेव होम करीत असतां ब्रह्मदेवाच्या प्रज्वलीत अग्निकुंडांतून कपिला उत्पन्न झाली. ब्रह्मदेव कपिला गाईला पाहून; व साष्टांग नमस्कार करून तिची स्तुति करूं लागले. ब्रह्मदेवाची स्तुति ऐकून कपिला ब्रह्मदेवाला ह्मणते; हे देव ! आपण केलेल्या स्तुतीच्या योगें मी प्रसन्न झाल्यें आहे; आपलें मी कोणतें कार्य करावें, तें सांगा. नंतर ब्रह्मदेव ह्मणतात; तूं मृत्युलोकाचे ठिकाणीं जाऊन प्राणिमात्रांचा उद्धार कर. जे कोणी यथाशक्ति भक्तिपुरःसर तुझी पूजा वगैरे करितील त्यांना स्वर्गलोक प्राप्त होईल. त्याप्रमाणें ब्रह्मदेवाचें भाषण ऐकून कपिला भूलोकांवर येती झाली. तात्काळ कपिला नर्मदानदीचे काठीं येऊन; व तपश्चर्या करून ती सर्व पृथ्वीवर भ्रमण करूं लागली. त्या दिवसापासून जेथें कपिला तप करीत होती त्या स्थानास कपिलातीर्थ हें नांव प्राप्त झालें. जे कपिलातीर्थाचें दर्शन घेतात, त्यांचीं शंभर वर्षांचीं पातकें नष्ट होतात. १ भुर्लोक, २ भुवर्लोक, ३ स्वर्लोक, ४ जनोलोक, ५ महर्लोक, ६ तपोलोक व ७ सत्यलोक हे सात लोक कपिलागाईचे पाठीवर वास करितात. मुखाचे ठिकाणीं

अग्नि, दांताचे ठिकाणीं सर्प, दोन ओंठावर धाता व विधाता, नेत्रांवर चंद्रसूर्य, नाकाचे ठिकाणीं वायू, कपाळावर शंकर, कानांवर आश्विनौदेव, शिंगांवर नरनारायण, दोन शिंगांच्या मध्यभागीं ब्रह्मदेव, चर्मावर वरुण, उदरामध्यें यम, खुराचे ठिकाणीं सर्प, शेपटीच्या टोंकावर सूर्यकिरण अशातऱ्हेनें तेहतीस कोटी देव कपिलागाईचे ठिकाणीं वास करितात. जे कोणी कपिलेला प्रातःकाळीं प्रदक्षिणा करितात; त्याला पृथ्वीप्रदक्षिणेचें पुण्य प्राप्त होऊन ते मुक्त होतात. जे कोणी कपिलागाईचें दूध, तूप दहीं, शेण, व मूत्र, यानें शंकराला स्नान घालून उपोषण करितात; व कपिलातीर्थाचे ठिकाणीं स्नान करून पितरांना तृप्त करितात त्यांचे सर्व पितर उद्धरून जातात. जे कोणी हें कपिलामाहात्म्य श्रवण किंवा पठण करितात ते सर्व पापापासून मुक्त होतात.

---

## अध्याय ४० वा.

### करञ्जेश्वरतीर्थमाहात्म्य.

पूर्वीं कृतयुगामध्यें ब्रह्मदेवाचा मानसपुत्र मरीचि नांवाचा ऋषि होता. त्याला कश्यप नांवाचा एक मुलगा झाला. नंतर कश्यपाला दक्षप्रजापतीनें आपल्या तेरा कन्या दिल्या. कश्यपापासून अदितीला इंद्रादि देव उत्पन्न झाले. नंतर कश्यपापासून दनूला करंजनामक असुर उत्पन्न झाला. तो करंज लक्षानपर्णाच तप करूं लागला. तो नर्मदानदीचे काठीं येऊन देवांचीं हजार वर्षेपर्यंत चान्द्रायणव्रत करिता झाला. त्याची ती तपश्चर्या पाहून शंकर प्रसन्न झाले.; व वर माग असें करंजास ह्मणाले. नंतर करंज ह्मणतो कीं, मला पुत्रपौत्रादि ऐश्वर्य प्राप्त व्हावें. नंतर शंकर त्यास वर देऊन गुप्त झाले. त्या दिवसापासून त्या तीर्थाला करंजेश्वरतीर्थ हें नांव प्राप्त झालें. जे कोणी ह्या तीर्थाचे काठीं उपोषण करून शिवाराधना करितात; ते शिवलोकाप्रत प्राप्त होतात.

---

## अध्याय ४१ वा.

### कुण्डलेश्वरमाहात्म्य.

मार्कंण्डेय ह्मणतात; धर्मा ! त्रेतायुगामध्यें पुलस्त्याला विश्रवानांवाचा एक पुत्र असता झाला. त्यानें पुष्कळ तपश्चर्या केली. नंतर कुबेर नांवाचा

त्यास एक पुत्र झाला. ब्रह्मदेवानें प्रथम त्याचें नांव वैश्रवण असें ठेविलें. नंतर ब्रह्मदेवानें त्यास धनरक्षक केल्यामुळें पुढें त्यास कुबेर असें दुसरें नांव प्राप्त झालें. त्या वैश्रवणानें ( कुबेरानें ) पुष्कळ तपश्चर्या केली. कुबेराला कुण्डल नांवाचा मुलगा झाला. त्यानेंही ४०० वर्षेपर्यंत तपश्चर्या केल्यावर शंकर प्रसन्न झाले, व कुण्डलास वर माग असें ह्मणते झाले. कुण्डल ह्मणतो; शंकरा ! मी नित्य कुबेराच्या नगरीमध्यें शत्रुरहित असें हिंडावें; व मला शत्रूपासून भय असूं नये, असा वर द्या. नंतर शंकर कुण्डलाला वर देऊन निघून गेल्यावर कुण्डलानें तेथेंच नर्मदाकाठीं शिवलिंगाची स्थापना करून त्याचें नांव कुण्डलेश्वर असें ठेविलें. नंतर कुण्डल आपल्या घरीं निघून गेला. त्या दिवसापासून कुण्डलतीर्थ व कुण्डलेश्वरलिंग हें सर्वत्र प्रसिद्ध झालें. कुण्डलेश्वरतीर्थाचे ठिकाणीं स्नान करून; व उपोषण करून कुण्डलेश्वराचें पूजन करणारांचीं सर्व पापें नाहींशीं होतात. ह्याच तीर्थाचे ठिकाणीं सोनें, रुपें, रत्नें, मणि वगैरे ब्राह्मणास दान देणारांना स्वर्गलोकांमध्यें पुष्कळ काळपर्यंत आनंदानें राहावयास मिळतें. जे कोणी ह्या तीर्थामध्यें वेदाध्ययन करितात, त्यांस सर्व इच्छित फळें प्राप्त होतात. ह्या तीर्थामध्यें गोप्रदान दिल्यास गाईच्या आंगावर जितके केस असतील तितकीं हजार वर्षे स्वर्गांत राहावयास मिळतें. हें महात्म्य श्रवण करणारांचींहि सर्व पापें नाहींशीं होतात.

---

## अध्याय ४२ वा.

### पिप्पलादितीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय ह्मणतात; धर्मा ! मिथिलानगरीमध्यें राहणारा याज्ञवल्क्य नांवाचा एक ऋषि पुष्कळ तपश्चर्या करिता झाला. त्याची बहीण पूर्वजन्मांतील पातकाच्या प्रभावानें आई, बाप व पति यांनीं विरहित असती झाली. ती फिरत फिरत जेथें आपला भाऊ याज्ञवल्क्य राहत होता तेथें आली. एके दिवशीं ती भावाच्या समीप राहत असतां रजस्वला झाली. त्याच दिवशीं रात्रीं याज्ञवल्क्य मुनींचें स्वप्नामध्यें रेतस्खलन झालें. जागा झाल्यावर आपलें वस्त्र खराब झालेलें पाहून त्यानें तें सोडून दिलें; व दुसरें वस्त्र नेसून शुचिर्भूत होऊन तो पुनः निजला. याज्ञवल्क्यानें सोडून टाकिलेलें वस्त्र नकळत याज्ञवल्क्याचें बहिणीनें परिधान केलें. सकाळीं याज्ञवल्क्य रात्रीं सोडिलेलें वस्त्र शोधूं लागला असतां तिनें आपल्या भावाला काय शोधतां ह्मणून विचारिलें; व नंतर सांगितलें कीं, जें

वस्त्र आपण टाकिलें होतें तेंच मी परिधान केलें आहे. तें बहिणीचें वाक्य ऐकून याज्ञवल्याला फार वाईट वाटलें. नंतर याज्ञवल्क्याचें रेत अमोघ असल्यामुळें व जिनें वस्त्र परिधान केलें ती रजस्वला असल्यामुळें तत्काळें ती याज्ञवल्क्याची बहीण गरोदर राहती झाली. पुढें नऊ महिने पूर्ण होतांच पुत्र उत्पन्न झाला; परंतु लोकोपवादामुळें तिनें तो गर्भ पिप्पलाच्या ( पिंपळाच्या ) झाडाखालीं नेऊन ठेविला; व ह्मणाली कीं, जितक्या स्थावरजंगमात्मक देवता आहेत त्या सर्व तुझें रक्षण करोत. असें ह्मणून ती स्वस्थानीं निघून गेली. नंतर तें मूल पिंपळाच्या झाडाखालीं रडूं लागलें. अरण्यांतील पशु, पक्षी; व वनस्पति ह्यांना दया येऊन त्यांनीं त्या मुलाचें पोषण केलें. पुढें तें मूल थोडें मोठें झाल्यावर त्यांनीं आपल्याला दुःख होण्याचें कारण पाहिलें असतां आपणास शनि ग्रह वाईट असल्यामुळें आपल्याला हें दुःख भोगावें लागत आहे, असा विचार करून त्यानें आकाशांतून संचार करणाऱ्या शनैश्चराला रागानें खालीं पाडलें. नंतर शनि हात जोडून त्या बालकाला ह्मणतो कीं, मी तुझा काय अपराध केला आहे. माझा स्वभावच क्रूर असल्यामुळें माझ्या दृष्टीचीं फळें लोकांना तशीं मिळतात, त्याला मी काय करणार ! नंतर तें बालक शनैश्चराला ह्मणतें कीं, तूं आजपासून बारा वर्षांचे आंतील बालकांस पीडा देऊं नको. याप्रमाणें बालकाचें भाषण ऐकून शनिदेव निघून गेलें. शनि निघून गेल्यावर पिंपळाच्या झाडाखालीं असलेल्या बालकाला बापाचा राग आला; व रागानें लाल डोळे करून एक अग्निकुंडांतून कृत्या निर्माण केली; व सांगितलें कीं, माझा बाप जो याज्ञवल्क्य त्याच्यावर तूं जाऊन पड. नंतर ती मिथिला नगरीमध्यें तप करणाऱ्या याज्ञवल्क्याकडे जाऊं लागली असतां त्या कृत्येला पाहून याज्ञवल्क्य घाबरून जनकराजाकडे गेला. जनकानें सांगितलें कीं, मी ब्रह्मकोपापासून तुझें रक्षण करण्यास असमर्थ आहेस. नंतर याज्ञवल्क्य स्वसंरक्षणार्थ तेथून निघाला तो ब्रह्मदेव; विष्णु यांचेंकडेहि जाऊन तेथें रक्षण न झाल्यामुळें तो शंकराकडे गेला. शंकरानें कृत्येला सांगितलें कीं, तूं ह्याला सोड. कृत्या शंकरास ह्मणते, मी याज्ञवल्क्याला ठार मारल्याशिवाय सोडणार नाहीं. शंकरानें स्वतःच्या मंत्रसामर्थ्यानें कृत्येचा नाश केला; व याज्ञवल्क्याची व पिंपळाच्या झाडाखाली ठेविलेल्या मुलाची गांठ घालून दिली. शंकरानें त्या मुलाचें नांव पिप्पलाद असें ठेविलें. नंतर पिप्पलादानें नर्मदेकाठीं पुष्कळ तपश्चर्या केली. त्या दिवसापासून त्याला पिप्पलादतीर्थ ह्मणतात. त्याठिकाणीं स्नानादि करणारांचीं सर्व पातकें नष्ट होतात.

---

# अध्याय ४३ वा.

## विमलेश्वरमाहात्म्य.

मार्कण्डेय ह्मणतात; धर्मा! पिप्पलाद तीर्थावर स्नान केल्यानंतर विमलेश्वर-तीर्थाचे ठिकाणीं स्नान करावें. त्या ठिकाणीं देवांनीं एक शिळा स्थापन केली आहे. त्यास देवशिळा असें ह्मणतात. त्या देवशिलेचें पूजन करणाराचीं सर्व पातकें दग्ध होतात. त्या देवशिळेसंन्निध ब्राह्मणांना यथाशक्ति सोनें, रुपें, तांबें, मणि, मोती, भूमि, गाई, वगैरे दान देणारांचीं सर्व पापें नष्ट होऊन त्यांस सायुज्यमुक्ति प्राप्त होते. ह्या तीर्थाचे काठीं प्राणत्याग करणाराला अक्षय शिवलोकाची प्राप्ती होते. ह्या तीर्थासन्निध एक मंत्र जरी पठण केला, तरी त्यास सर्व वेदाच्या पठणाचें श्रेय मिळतें. जो ब्राह्मण ह्या तीर्थाचे काठीं तिलो-दकानें स्नान करतो; व कामक्रोधादि षड्रिपूंचा जय करितो, तो अंतकाळीं शिवलोकीं जातो. त्याप्रमाणें क्षत्रिय असो, वैश्य असो; किंवा शूद्र असो; ह्या तीर्थाचे काठीं स्नान करणारा मुक्त होतो. जे शास्त्रविधीला सोडून वर्तन करितात; व ह्या तीर्थाची नास्तिकभावनेनें निंदा करितात; ते कर्मासारख्या निंद्य योनींत जन्माला येऊन अनेकप्रकारचीं दुःखें भोगितात. जे प्राणि दुर्लभ अशा मनुष्यजन्माला येऊनहि दुर्वर्तन करितात; व इंद्रियादि-कांचा निग्रह न करितां सद्धर्मानें वागत नाहींत, ते अनेकप्रकारच्या नरक यातना भोगीत राहतात, व त्यांस पुनः मनुष्यजन्म कधींहि प्राप्त होत नाहीं; करितां प्रत्येक प्राणिमात्रानें मनुष्यजन्म प्राप्त झाला असतां त्याचा दुरुपयोग कधींहि करूं नये. प्रत्येकाने ज्ञानार्जनानें; व विमलेश्वराच्या तीर्थोदकानें आपला देह शुद्ध करून व सर्व दुष्कृतांचा नाश करवून अंतीं शिवलोकीं जाण्यास चुकूं नये, नर्मदा ही प्रथम सर्व नद्यांमध्यें श्रेष्ठ आहे; अर्थात् तिचे काठीं असणारीं तीर्थें-हि सर्वतीर्थांहून श्रेष्ठ आहेत; हें आतां नवीन सांगण्याची जरूर नाहीं. ही नर्मदानदी लोकांना पावन करण्याकरितां रुद्रानें आपल्या देहापासून निर्माण केली आहे. प्रत्येक मनुष्यानें सकाळीं उठून "**नमः पुण्यजले देवि नमः सागरगामिनि ॥ नमोऽस्तु पापनिर्मोचे नमो देवि वरानने;**" हा श्लोक ह्मणून नर्मदेची प्रार्थना केली असतां त्यांस प्रत्यक्ष नर्मदेचें स्नान केल्याचें पुण्य प्राप्त होतें. असा ह्या नर्मदेचा व विमलेश्वरतीर्थाचा महिमा अगाध आहे; व ह्या तीर्थांत स्नान केल्यानें शिवलोकप्राप्ति होते.

---

## अध्याय ४४ वा.

### शूलभेदमाहात्म्य.

मार्कण्डेय ह्मणतात; धर्मा ! नर्मदानदीच्या दक्षिणतीरावर शूलपाणि जो शंकर त्यानें एक तीर्थ निर्माण केलें आहे, त्याला शूलभेदतीर्थ असें ह्मणतात. त्या तीर्थावर स्नानादि करणारास मोक्षप्राप्ती होते. आतां हें तीर्थ कसें निर्माण झालें ! तें सांगतों; ऐका. नर्मदेच्या दक्षिण बाजूला एक भृगु नांवाचा पर्वत आहे. त्या पर्वताच्या शिखरावर शंकरानें हें शूलभेद नांवाचें तीर्थ स्थापित केलें. त्या स्थानाचें माहात्म्य इतकें आहे कीं, त्याचे आसपासचे वृक्षसुद्धां उपटून पडेल असतां ते शिवलोकाला जातात; मग तर प्रत्यक्ष मनुष्य जर त्या स्थानाचे ठिकाणीं आपला देह टाकील तर ते शिवलोकाला जातील हें सांगणें नको. पाताळांतून भोगवती नामक जी गंगा बाहेर पडली ती ह्या शूलभेदतीर्थापासूनच बाहेर आलेली आहे; असें समजावें. प्रयाग वगैरे तीर्थें आहेत त्यांची योग्यता ह्या शूलभेदतीर्थाच्या षोडशपटीनेंसुद्धा नाहीं; इतका ह्या तीर्थाचा महिमा आहे. ह्या तीर्थाचे सन्निध एक मार्कण्डह्रद नांवाचें तीर्थ आहे. प्रथम शूलभेदतीर्थाचे ठिकाणीं स्नान करून नंतर मार्कण्डह्रदावर स्नान करावें; नंतर कंबलेश्वराचें दर्शन घ्यावें; व शंकरपार्वतीची तेथें पूजा करावी. अशा-तऱ्हेनें हा तीर्थविधि आचरण केला असतां सर्व पातकें नष्ट होऊन अंतकाळीं शिवलोक प्राप्त होतो. ह्या शिवलिंगाचे ठिकाणीं अजून अग्नीच्या ठिणग्या प्रत्यक्ष दृष्टिगोचर होतात; व शूलभेदतीर्थाचे उदकांत तेलाचा थेंब टाकिला असतां ज्याप्रमाणें इतर पाण्यांवर तेलाचा थेंब पसरतो तसा पसरत नाहीं; हा साक्षात्कार अजून लोकांच्या दृष्टोत्पत्तीस येत आहे; असा दैवी प्रकार इतर कोणत्याही तीर्थांत प्रत्यक्ष पाहावयास मिळत नाहीं. सर्व इतर तीर्थांहून शूलभेदतीर्थ हें तत्काळ मुक्ति देणारें आहे; व सर्वश्रेष्ठ आहे.

## अध्याय ४५ वा.

### अंधकासुरवरदान.

मार्कण्डेय ह्मणतात; हे धर्मा ! शूलभेदतीर्थाची उत्पत्ति कशी झाली ! असा पूर्वी उत्तानपाद राजानें शंकराला प्रश्न केला होता. त्या वेळीं शंकरानें उत्तान-

याद राजाला तें आख्यान कथन केलें आहे; तें असें:—पूर्वी कश्यपाला अंधक या नांवाचा एक पुत्र दितीचे ठिकाणीं झाला. तो मोठा पराक्रमी होता. आजपर्यंत अंधकाच्या इतका महापराक्रमी दैत्य दुसरा उत्पन्नच झाला नाहीं. त्या अंधकानें माझी आराधना करून अभूतपूर्व तपश्चर्या केली. नंतर मी पार्वतीला घेऊन अंधक जेथें तप करीत होता तेथें गेलों; व वर माग असें त्यास सांगितलें. त्या वेळीं अंधक माझी प्रार्थना करून व हात जोडून वर मागता झाला कीं, सर्व देवांना मी जिंकीन असा वर मला द्या. नंतर मी त्यास बोललों कीं, हा भलताच तूं काय वर मागतोस ? दुसरा कांहीं तरी माग. अशाप्रमाणें माझें भाषण ऐकून अंधकाला फारच वाईट वाटलें; व आपली तपश्चर्या निष्फळ होणार असें समजुन तो मूर्च्छित होऊन जमिनीवर पडला. ही स्थिति पाहून पार्वतीला अंधकाची दया आली; व अंधकाला इच्छित वर देण्याविषयीं तिनें माझी विनवणी केली. नंतर पार्वतीचा फारच आग्रह झाल्यामुळें मी अंधकाला वर दिला कीं, विष्णु व मी ह्या दोघांशिवाय तूं सर्व देवांना जिंकिशील. असे माझे मुखांतून निघालेले शब्द अंधकाचे कानीं पडताच त्याला मोठाच आनंद झाला; व तपश्चर्येचें साफल्य झालें, असें अंधकास वाटूं लागलें. ह्याप्रमाणें वर मी देऊन कैलासाला प्राप्त झालों.

---

## अध्याय ४६ वा.

### इंद्रस्त्रीहरण.

मार्कण्डेय ह्मणतात; हे धर्मा ! याप्रमाणें शंकरापासून इष्ट वर मिळाल्यानंतर अंधकासुर सर्वप्रकारें सुशोभित केलेल्या अशा आपल्या राजधानींत प्रवेश करिता झाला. ज्या नगरांत त्यानें आपल्या आनंदानें तोरणें, गुढ्या वगैरे उभारल्या आहेत. मध्यंतरीं पुष्कळ काळ गेल्यानंतर अंधकासुराला शंकरानें वर दिला; व त्यायोगें आज ना उद्यां केव्हां तरी आपणाला स्वर्गांतून पळून जावें लागणार, असा सर्व देवांनीं विचार करून ही बातमी इंद्राला कळविली. इतक्या अवकाशांत अंधकासुर कांहीं ठळक ठळक सैन्य बरोबर घेऊन इंद्राच्या अमरावती नगरींत निर्भीडपणें घुसला. त्या अंधकाच्या आगमनानें इंद्र घाबरून गेला; व त्यानें आपलें सिंहासन अंधकाला बसण्याकरितां दिलें; व इंद्र स्वतः हात जोडून अंधकाची प्रार्थना करूं लागला कीं, आपण येथें कशाकरितां आला ? आपणाला कांहीं हवें असल्यास मागा; तें मी देण्यास तयार आहें. याप्रमाणें इंद्राचें भाषण ऐकून अंधकासुर ह्मणतो; हे इंद्रा ! मला तुझें द्रव्य

नको व तुझे दुसरे हत्तीहि मला नकोत. स्वर्गांतील उत्तम अलंकारांनीं भूषित केलेला तुझा ऐरावत नांवाचा चार सोंडेचा व शुभ्रवर्णाचा हत्ति व उच्चैःश्रवा नांवाचा घोडा कोठें आहे; तो मला दाखीव. त्याचप्रमाणें उर्वश्यादि स्त्रिया, पारिजातक वृक्ष व त्यांचीं पुष्पें; तसेंच स्वर्गांतील दुसरीं अनेक फुलझाडें; वाद्यें वगैरे स्वर्गांतील महत्त्वाच्या वस्तु मला दाखीव. नंतर इंद्रानें अंधकाचें भाषण ऐकून मनांत विचार केला कीं, ह्याचा पराजय करणें कठीण आहे; करितां हा जें मागेल तें त्याला खुशीनें देणें हेंच आपणास श्रेयस्कर आहे; असा निश्चय करून त्या अंधकाला सर्व स्वर्गीय वस्तु अर्पण केल्या. कांहीं काळानें अंधकाचें चित्त इंद्राची पत्नी जी इंद्राणी ( शची ) तिचे ठायीं वेधून गेल्यामुळें तो इंद्राणीला घेऊन व इतर स्वर्गीय वस्तुहि घेऊन आपल्या नगराला परत येता झाला. ज्या वेळीं अंधक इंद्राणीला घेऊन चालला, त्या वेळीं इंद्रादि देवांना त्वेष येऊन त्यांनीं अंधकाबरोबर निकराचें युद्ध केलें; पण त्यामध्यें देवांना यश आलें नाहीं; व अंधक देवांचा पराजय करून व इंद्राणीला घेऊन तिच्यासह कांहीं काळ आनंदांत घालविता झाला.

---

## अध्याय ४७ वा.

### इंद्रादिदेवांचें स्वस्थानीं गमन.

सूत ह्मणतात; ऋषिहो ! पूर्वीं सांगितल्याप्रमाणें अंधकानें देवांचा पराजय केल्यानंतर इंद्रादिदेव ब्रह्मदेवाला शरण गेले; व हात जोडून प्रार्थना करूं लागले कीं, हे ब्रह्मन् अंधक या नांवाचा एक दैत्य शंकराच्या वरानें उन्मत्त होऊन; व आमचा पराजय करून इंद्राणीला बळकावून बसला आहे. आतां आह्माला राहण्याला थारा नसल्यामुळें आह्मी आपणाला शरण आलों आहों; आपण आमचें रक्षण करा. अशाप्रमाणें देवांचें भाषण ऐकून अंधकाचा नाश करण्याच्या उद्देशानें ब्रह्मदेव इंद्रादिदेवांना घेऊन विष्णूला शरण गेला; व सर्व अंधकासुराचा वृत्तांत त्यांस निवेदन केला. नंतर विष्णु ब्रह्मदेवास आश्वासन देऊन सांगते झाले कीं, हे देवहो ! मी लवकरच त्या अंधकाचा, तो कोठेंहि असो, पाताळांत असो किंवा स्वर्गांत असो, नाश करितो; आपण निष्काळजी असावें. याप्रमाणें आश्वासन मिळाल्यावर देव स्वस्थानीं निघून गेले.

---

# अध्याय ४८ वा.

## अंधकासुरवध.

उत्तानपादराजा शंकरास विचारतो; हे देवाधिदेवा ! सर्व देवांना जिंकल्यावर दैत्य कोठें राहत होता; व त्याचा वध कसा झाला ? हें सांगा. याप्रमाणें उत्तानपादराजाचा प्रश्न ऐकून शंकर ह्मणतात; हे राजा अंधकासुरानें आपलें कायमचें ठाणें पाताळांत केलें होतें, विष्णूनें अंधकाचा नाश करावा, ह्या बुद्धीनें हातांत धनुष्यबाण घेऊन व बाणावर आग्नेयास्त्राचा प्रयोग करून तो बाण पाताळांत जेथें अंधक राहत होता तेथें सोडिला. नंतर अंधकाचे नगर जळूं लागलें असतां अंधकानें वारुणास्त्रानें तो अग्नि शांत केला. आग्नेयास्त्र कोणी सोडिलें वें असा कोणता पुरुष यमलोकाला जाण्याची इच्छा करीत आहे, असा विचार करित अंधकासुर क्रोधानें जिकडून आग्नेयास्त्र आलें त्या मार्गानें शत्रूचा शोध करीत पाताळांतून बाहेर आला. बाहेर येऊन पाहतो तों हातांत धनुष्यबाण घेऊन प्रत्यक्ष विष्णु युद्धाला तयार झाले आहेत, असे त्याच्या दृष्टीस पडलें. विष्णूला पाहून अंधक ह्मणतो कीं, तुला जिवंत राहण्याची इच्छा असेल तर तूं माझ्याशीं युद्ध न करितां परत निघून जा; नाहीं तर उगीच नाशाप्रत पावशील. अशातऱ्हेनें अंधक विष्णूजवळ बोलत आहे. तोंच विष्णूनें धनुष्याला बाण लावून कांहीं एक न बोलतां युद्ध करण्याला सुरवात केली. उभयतांचें पुष्कळ युद्ध झालें. शेवटीं अंधकाजा पराजय झाला. अंधक विष्णूला शरण येऊन त्याची अनेकप्रकारें स्तुति करूं लागला. अंधकाची प्रार्थना ऐकून विष्णु अंधकास वर मागण्याविषयीं सूचना करिता झाला. अंधक विष्णूला ह्मणतो कीं, शंकराबरोबर युद्ध करण्याची माझी इच्छा आहे. मी त्याबद्दल पुष्कळ खटपट केली; परंतु त्यांत यश आलें नाहीं, करितां तो योग घडून कसा येईल ? याबद्दल आपण मजला एकादा उपाय सांगावा. ह्याप्रमाणें अंधकाचें भाषण ऐकून विष्णु त्यास ह्मणतात; हे अंधका ! तुला मी एक युक्ति सांगतों, ती युक्ति उपयोगांत आणिलीस तर त्यायोगें शंकराला पुष्कळ राग येऊन तो तुजबरोबर युद्ध करण्यास तयार होईल; व त्यामुळें तुझी इच्छा सिद्धीस आईल. ती युक्ति ही कीं, तूं शंकराचा कैलासपर्वत स्वसामर्थ्यानें गदगदा हालवून सोड; ह्मणजे शंकर तुजबरोबर क्रोधाविष्ट होऊन युद्ध करील. याप्रमाणें विष्णूचें भाषण ऐकून अंधक तेथून निघाला तों कैलासपर्वताजवळ येऊन वारंवार तो पर्वत हालवूं लागला. कैलासपर्वताचीं शिखरें अंधकाच्या हल-

वण्यानें खालीं पडूं लागलीं, चारहि समुद्रांना तुफान झालें, विस्तवाचे गोळे आकाशांतून खालीं पडूं लागले, असे जिकडेतिकडे अनर्थ होऊन त्यामुळें त्रैलोक्याला त्रास होऊं लागला. हा सर्व प्रकार पाहून मला मोठें आश्चर्य वाटलें; व पार्वती भिऊन मला दृढ आलिंगन देती झाली; व हा पर्वत कां हलत आहे, असें मला ती विचारती झाली. नंतर मी पार्वतीला बोललों कीं, ज्यानें कैलास-पर्वत हालविला त्या अंधकाचा मी नाश करून टाकितों, असें ह्मणत आहे, तोंच ब्रह्मादि देवहि मजकडे अंधकाचीं गाऱ्हाणीं सांगण्याकरितां प्राप्त झाले. नंतर मी एक नवीन रथ निर्माण करून अंधकाला मारण्याकरितां त्या रथांत बसून निघालों. अंधकालाहि मोठा आनंद होऊन तोहि मजबरोबर युद्धास तयार झाला. प्रथम मी त्याचें धनुष्य व बाण तोडून टाकिले. माझें व अंधकाचें शस्त्रास्त्रांनें घनघोर युद्ध झालें. ज्या वेळीं शस्त्रास्त्रयुद्धानें माझा पराजय होईना त्या वेळीं अंधकानें मजबरोबर बाहुयुद्ध करण्यास प्रारंभ केला. मार्कण्डेय ह्मणतात, धर्मा! शेवटीं अंधकाच्या नाशाची इच्छा मनांत धरून शंकरानें अंधकाला उचलिलें व खालीं डोकें करून जमिनीवर हापटिलें; तथापि अंधकाचा नाश झाला नाहीं; व अंधक पुनः क्रोधानें शंकराबरोबर द्वंद्वयुद्ध करून त्यास मूर्च्छित पाडिता झाला. शंकराला मूर्च्छित केल्याबद्दल अंधकास वाईट वाटलें व तो शंकराला घेऊन कैलासपर्वतावर गेला; व त्यास मंदिरांत नेऊन बिछान्यावर निजविलें; व अंधक स्वनगराला निघून आला. कांहीं वेळानें शंकर शुद्धीवर येऊन पाहतात, तों आपण कैलासपर्वतावर स्वमंदिरांत आहों, अंधक तर कोठें दिसतच नाहीं. अंधकानें आपला पराजय केला; व तो स्वस्थानीं निघून गेला. हा प्रकार ओळखून शंकराला फारच वाईट वाटलें व तो पुनः अंधकाबरोबर मल्लयुद्ध करूं लागला. प्रथम शंकरानें अंधकाचे छातींत मुष्टिप्रहार केला, त्याबरोबर अंधक रक्त ओकूं लागला. त्यानंतर शंकरानें आपल्या हातांतील शूलानें अंधकावर प्रहार करून त्याचीं दोन शकलें केलीं, व त्याला आपल्या शूलावर धरून गरगर फिरविलें. त्या वेळीं त्याच्या शरीरांतून जितके रक्ताचे थेंब भूमीवर पडले तितके नवीन दैत्य निर्माण झाले. त्या अनेक दैत्यांना अवलोकन करून शंकर घाबरून गेले; व त्यानें चामुंडा देवीची प्रार्थना केली. तात्काळ चामुंडा तेथें प्रगट होऊन त्या अंधकदैत्याचें रुधिर ( रक्त ) प्राशन करिती झाली. रक्तबिंदूपासून उत्पन्न झालेल्या दैत्यांचा नाश केल्यावर हा प्रकार पाहून अंधकाला मोठें आश्चर्य वाटलें, व तो शंकराची अनेकप्रकारें स्तुति करूं लागला. त्या वेळीं अंधकाची प्रार्थना ऐकून शंकर प्रसन्न झाले; व इच्छित वर माग, असें अंधकास ह्मणते झाले. अंधक ह्मणतो कीं, जर आपण मजला वर देणार असाल; तर मला तुमच्यासारखें करा. आपले जसें स्वरूप आहे, असेंच स्वरूप मजला प्राप्त

होईल, असा वर मजला द्यावा. नंतर शंकरानें त्यास इच्छित वर देऊन त्यांची भृंगीश या नांवानें आपल्या शिवगणांत स्थापना केली.

---

## अध्याय ४९ वा.

---

### शूलभेदतीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय ह्मणतात; धर्मा! अंधकाचा पराजय करून; व इंद्रादिदेवांना दुःखमुक्त करून शंकर पार्वतीसह कैलासपर्वतावर प्राप्त झाले. नंतर इंद्रादिदेव शंकराजवळ कैलासपर्वतावर येऊन शंकराची प्रशंसा करिते झाले. शंकरानें इंद्रादिदेवांना यथायोग्य आसनादि सत्कारानें संतुष्ट करून ह्मटलें कीं, हे इंद्रादिदेवहो! मी अंधकाचा पराजय तुमच्या कल्याणार्थ केला, ही गोष्ट खरी आहे; परंतु माझ्या शूलाला अंधकाच्या रक्ताचें त्याच्या प्रहारानें स्नान झाल्यामुळें माझा शूल अपवित्र झाला आहे. आतां आपण ह्या अपवित्र शूलाचे शुद्धतेकरितां तीर्थयात्रा करून हा माझा शूल ज्यायोगें पवित्र होईल, असें करूं या. ह्याप्रमाणें सांगून शंकर सर्व देवांसह तो शूल हातीं घेऊन तीर्थयात्रा करण्याकरितां निघाले, ते प्रभासादि अनेक तीर्थें हिंडून; व त्या त्या तीर्थोदकांनीं शूलाला स्नान घालून शूलाच्या पवित्रतेची परीक्षा केली. अनेक तीर्थें हिंडूनहि तो शंकराचा शूल पवित्रतेला प्राप्त झाला नाहीं. शेवटीं नर्मदेच्या दक्षिण तीरावर असणाऱ्या भृगुपर्वतानजीक जाऊन शंकर देवांसह दमून खिन्नपणें बसते झाले. शंकराला क्रोध येऊन व हा शूल आतां निर्मळ होत नाहीं, अशा निराशेनें त्यानें आपल्या शूलाचा प्रहार भृगुपर्वतावर केला. पर्वतावर झालेल्या शूलप्रहारानें तो पर्वत तर फुटलाच; परंतु त्या योगें रसातलाचाहि भेद झाला; व तो शूल निर्मलत्वाला प्राप्त झाल्यामुळें शंकराला आपण कृतार्थ झालों, असें वाटून मोठा आनंद झाला. रसातलाचा भेद झाल्यामुळें तेथून जो एक जलप्रवाह निघाला, तो त्या भृगुपर्वतांतून बाहेर पडला; त्यासच आपण सरस्वती ह्मणतो. ज्याप्रमाणें कृष्णायमुनासंगम त्याच प्रमाणें सरस्वती; व नर्मदा ह्यांचा संगम झाला आहे. त्याठिकाणीं ब्रह्मदेवानें एक ब्रह्मेश नांवानें लिंग स्थापित केलें. ब्रह्मेशाच्या दक्षिणदिशेला स्वतः विष्णूनें आपली वसती केली. भृगुपर्वताचा शूलानें भेद केला, व त्यांतून तीर्थाची उत्पत्ति झाली; ह्मणून त्या तीर्थाला शूलभेद हें नांव प्राप्त झालें आहे. शूलभेदतीर्थाचें संनिध शंकरानें आपलें लिंग स्वतः स्थापित केलें. जे लोक अभागी

असतात, त्यांना ह्या तीर्थाचे ठिकाणीं स्नान करण्याची बुद्धि होणार नाहीं ह्या तीर्थामध्यें स्नान करून शिवलिंगाचें पूजन करणारा सर्व पापापासून मुक्त होऊन; व ह्या लोकीं सुख भोगून अंतीं शिवलोकाला प्राप्त होतो..

## अध्याय ५० वा.

### दाननियम.

मार्कण्डेय ह्मणतात; हे धर्मा ! पूर्वी देवपितृकर्मामध्यें दान कोणाला द्यावें; त्याप्रमाणें पूज्य ब्राह्मण कोणते; व अपूज्य कोणते; वगैरे उत्तानपादराजानें शंकराला प्रश्न केल्यावरून शंकर ह्मणतात; हे राजन् ! लाकडाचा हत्ती, कातड्याचा हरिण; व वेदशास्त्राध्ययन न केलला ब्राह्मण हे नामधारी समजावे. जसा स्त्रियांचे ठिकाणीं नपुंसक निरुपयोगी; गाईचे ठिकाणीं गाय निरुपयोगी जसें मूर्खाला दिलेलें दान तसाच अशिक्षित ब्राह्मण निष्फळ होय. ज्याप्रमाणें कातळावर पेरलेलें बीज निष्फळ तसेंच वेदाध्ययन न केलेल्या ब्राह्मणाला दान देणें निष्फळ आहे. जो ब्राह्मण मित्रांशीं वैर; दुष्ट; रसविक्रय करणारा; आई, बाप, व गुरु यांची निंदा करणारा; शूद्रान्न सेवन करणारा इत्यादि दोषांनीं युक्त असेल तर तो जरी ब्राह्मण असला तरी तो चांडाळ समजून त्याला स्पर्श सुद्धा करूं नये, केल्यास सचैल स्नान करावें. जे ब्राह्मण दान घेऊन त्या द्रव्यावर व्यापार करितात, त्यांस दान देऊं नये. वेदशास्त्राध्ययन करून सदाचारानें वागणारा जो ब्राह्मण, त्याला दान द्यावें. श्राद्धामध्यें आमंत्रित केलेल्या विद्वान् व अधिकारी ब्राह्मणास भोजनादि सत्कारपूर्वक देऊन त्याला सीमेपर्यंत पोंचवावें. शूलभेदादि पांच तीर्थांचे ठिकाणीं हव्यकव्यादि कर्मे सतरा वर्षेपर्यंत केल्यास त्याचें पितर तृप्त होऊन मुक्त होतात. जो ब्राह्मणांना दान करितो त्यास स्वर्गप्राप्ती होते. जो ब्राह्मणाला शय्यादान, अश्वदान; व छत्रदान देतो त्यास स्वर्गांतून विमान प्राप्त होतें. जो ब्राह्मणाला गृहदान देतो, तो शिवलोकामध्यें प्राप्त होऊन स्वर्णगृहामध्यें चिरकाल वास करितो. जो तिलधेनु दान करितो तो कल्पपर्यंत स्वर्गांत राहतो. जो तहानेनें व्याकुळ झालेल्या पुरुषाला पाणी देतो, त्याला सर्व दानाचें पुण्य प्राप्त होऊन तो स्वर्गाला जातो. जो कन्यादान करून एक बैल ब्राह्मणाला दान देतो, त्यास शिवलोक प्राप्त होतो. जो कन्याविक्रय करितो, तो कर्मचाण्डाल होय; अशा पुरुषाच्या घरीं भोजनहि करूं नये;

केल्यास चांद्रायणादि व्रतानें आपली शुद्धता करून घ्यावी. एखाद्या ब्राह्मणाचें घरीं जाऊन त्यास जें दान देणें तें उत्तम दान होय. अकस्मात् आलेल्या; व याचना करणाऱ्या अशा निरपेक्षित ब्राह्मणाला जें दान दिलें जातें, तें मध्यम दान होय एकाद्या ब्राह्मणाला आमंत्रण करून, व याचना करणाऱ्या ब्राह्मणाला जें दान द्यावयाचें तें कनिष्ठ दान होय; व हावऱ्याप्रमाणें मला द्या ! ! अशी याचना करून आपल्या घरीं चालून आलेल्या ब्राह्मणाला जें दान द्यावयाचें तें अधम दान होय. ज्याप्रमाणें दगड तरण्याकरितां त्या दगडाला दुसरा एक दगड बांधवा; व पाण्यांत टाकावा; ह्मणजे दोनहि दगड पाण्यांत बुडणारच, त्याप्रमाणें अनधिकारी ब्राह्मणाला स्वर्गप्राप्तीकरितां दान दिल्यास दान देणारा व दान घेणारा दोघेहि नरकालाच जाणार. ज्याप्रमाणें सुखलेल्या लाकडाची होडी पाण्यांत स्वतःला तारून दुसऱ्याला तारते त्याप्रमाणें अधिकारी पुरुषाला दान दिलें असतां ब्राह्मण स्वतःला तारून दान देणारालाही तारतो; ह्मणजे मुक्त करितो.

---

## अध्याय ५१ वा.

### दानमाहात्म्य.

मार्कण्डेय धर्माला ह्मणतात; हे धर्मा ! पूर्वीं उत्तानपादानें शंकराला 'दान केव्हां द्यावें; व श्राद्धादि कधी करावें' असा प्रश्न केला असतां शंकर उत्तानपादराजास ह्मणतात; हे राजा ! श्राद्धविधि हा अमुकच दिवशीं करावा, असा निर्बंध नाहीं; एकंदर चवदा मन्वन्तरें आहेत. त्या चवदा मन्वन्तराचे दिवशीं श्राद्धविधि करावे; व तसाच अयनकालीं श्राद्धविधी करावा. अयनें दोन आहेत; एक दाक्षिणायन व दुसरें उत्तरायण होय. चवदा मन्वन्तरें अनुक्रमेंकरून अश्वीन शुक्ल नवमी, कार्तिक शुक्ल द्वादशी; चैत्र शुक्ल तृतीया; भाद्रपदशुक्ल तृतीया; आषाढ शुक्ल दशमी; माघ शुक्ल सप्तमी; श्रावण कृष्ण अष्टमी; आषाढ कृष्ण पूर्णिमा; फाल्गुन कृष्ण अमावास्या; पौष शुक्ल एकादशी; कार्तिक शुक्ल पूर्णिमा; फाल्गुन शुक्ल पूर्णिमा; चैत्र शुक्ल पूर्णिमा; ज्येष्ठ शुक्ल पूर्णिमा; ह्या दिवशीं होतात. ह्या दिवशीं श्राद्धविधी करावा. जे कोणी चैत्रशुक्ल एकादशीचे दिवशीं उपोषण करून रात्रीं जागरण करितात; व विष्णूची धूपदीपादिकाच्या योगें पूजा करितात; आणि वेदाध्ययन करितात ते विष्णुलोकाला प्राप्त होतात. दुसरे दिवशीं श्राद्धविधि करून मार्कण्डेयेश्वराचें पूजन करावें. नंतर उत्तानपादानें मार्कण्डेयेशाच्या स्थापनेची कथा शंकरास विचारिली असतां शंकर राजास ह्मणतात; हे राजा ! पूर्वीं मार्कण्डेय नांवाच्या प्रसिद्ध अशा एका ऋषीनें गुहेमध्यें

राहून देवांची हजार वर्षें पुरीं होईपर्यंत मोठी तपश्चर्या केली. नंतर तपश्चर्येच्या सामर्थ्यानें स्वमनोरथ पूर्ण झाले असतां तेथेंच आपलें नांवानें एक लिंग स्थापित केलें; त्यासच मार्कण्डेयेश्वर ह्मणतात. त्या मार्कण्डेयेश्वराचें पूजन केलें असतां शिवलोकाची प्राप्ती होते. कोणालाहि दान द्यावयाचें असल्यास योग्यायोग्य विचार करून द्यावें. ब्राह्मणाला सुवर्ण, रौप्य, वस्त्र वगैरे दिलें असतां सर्व देव, व पितर तृप्त होतात. जे कोणी चंद्रग्रहण व सूर्यग्रहणसमयीं नर्मदातीर्थाचे ठिकाणीं स्नान करून ब्राह्मणांना घोडा, गाडी, हत्ती व तुलापुरुष ( आपण स्वतः तागडीच्या एका पारड्यांत बसून दुसऱ्या पारड्यांत आपल्या भारंभार सुवर्ण घालून ते दान करणें ह्यास तुलापुरुषदान ह्मणतात ) दान करितात त्यांना ह्या लोकीं ऐश्वर्य व सुख यांची प्राप्ती होऊन परलोकीं अखंड शिवलोक प्राप्त होतो. अनाधिकारी ब्राह्मणाला दान देऊं नये. जो कोणी प्रसूत होत असणाऱ्या गाईचें दान करितात, त्याला पृथ्वीदानाचें फल प्राप्त होतें. जे चंद्रसूर्यग्रहणामध्यें शास्त्रोक्तपद्धतीनें गाईचें दान करितात, त्यांना अनंत पुण्य प्राप्त होतें; व त्यांचा एकवीस कुलांचा उद्धार होतो. ग्रहणांत दान देणें अधिक श्रेयस्कर आहे. गाईचे ठिकाणीं सर्व तीर्थें राहत असल्यामुळें तिच्या दानानें सर्वप्रकारच्या तीर्थयात्रा केल्याचें पुण्य प्राप्त होतें. त्या पुण्यानें त्यास शिवलोक मिळून तो मोक्षाला जातो.

---

## अध्याय ५२ वा.

### महातपामुनीचें आख्यान.

मार्कण्डेय ह्मणतात; धर्मा ! नंतर शंकरानें उत्तानपादाला महातपामुनीचें आख्यान सांगण्याला प्रारंभ केला. तो असा. पूर्वीं काशी नगरीमध्यें चित्रसेन नांवाचा राजा राहत असे. तो प्रजेचें पालन पुत्राप्रमाणें करणारा असून मोठा धार्मिक होता. त्या काशी नगरीचे उत्तर दिशेला एक पवित्र असा आश्रम होता. हा आश्रम ज्या वनांत होता त्या वनाला मंदारवन हें नाव प्राप्त होतें; कारण त्या वनांत मंदार ह्मणजे पारिजातक याचीं झाडें फार होतीं. अशा त्या मंदारवनांतील आश्रमांत दीर्घतपा नांवाचा ऋषि तप करीत राहत होता. त्या ऋषीचीं बायकामुलेंहि त्या आश्रमांतच राहत असत. त्या ऋषीला पितृसेवापरायण असे पांच पुत्र होते. त्यांपैकीं सर्वांत लहान जो पुत्र त्याचें नांव ऋक्षशृंग असें होतें. तो नित्य पितृसेवा करून इतर मुलांचे बरोबर क्रीडा करीत असे.

# अध्याय ५३ वा.

## ऋक्षशृंगनिधन.

शंकर उत्तानपाद राजास ह्मणतात; हे राजा ! काशीपति जो चित्रसेन तो प्रधानाचे ताब्यांत राज्यकारभार समर्पित करून स्वतः मृगया करण्याकरितां अरण्यामध्यें गेला असतां रानामध्यें पुष्कळ हरिणांचे कळप त्याच्या दृष्टीस पडले. त्यानें त्यांचा पाठलाग केल्यामुळें ते कळप विस्कलित होऊन दशादिशेकडे फांकून गेले. पुढें तो राजा मृगांचा शोध करीत करीत जात असतां निबिड अरण्यांत शिरला. तो फारच थकून गेल्यामुळें एका झाडाखालीं विसावा घेण्याकरितां बसला असतां त्या राजाला तहान फार लागली होती; ह्मणून तो पाण्याचा शोध करीत हिंडूं लागला. त्या वेळीं एक सुंदर तलाव त्याच्या दृष्टीस पडला. नंतर राजा पाणी पिऊन बाहेर येतो तोंच पुष्कळ हरिणाचे कळप पुनः त्याच्या दृष्टीस पडले. त्या हरिणांच्या कळपामध्यें दीर्घतपामुनीचा मुलगा ऋक्षशृंग होता; हें राजाला माहीत नव्हतें. हरिणांची शिकार करावी ह्या उद्देशानें राजानें हरिणावर बाण सोडिले. हरिण पळून गेले; व चुकून बाण ऋक्षशृंगाला लागला; असतां तो कृष्ण असा उच्चार करून जमिनीवर धाडकन् पडला. हें वर्तमान राजाला समजतांच त्यानें ऋक्षशृंगाजवळ येऊन त्याची पुष्कळतऱ्हेनें प्रार्थना केली कीं, मी मुद्दाम होऊन तुह्माला बाण मारिला नसून मृगया करीत असतांना चुकून तुमचा माझ्या बाणानें घात केला; करितां मला क्षमा करा. मला सांप्रत ब्रह्महत्या लागली आहे, त्याचा दोष कशानें नष्ट होईल तें सांगा. अशातऱ्हेनें चित्रसेनाचें भाषण ऐकून ऋक्षशृंग ह्मणतो कीं, मी मृत झालों तर माझ्या मृत्यूमुळें शोकसंतप्त होऊन माझीं मातापितरेंहि मृत होतील; एवढेंच नव्हे तर माझे चार बंधूहि नष्ट होऊन त्यांच्या शोकानें त्यांच्या स्त्रियाहि नष्ट होतील; तात्पर्य तुला एकचशा काय पण पुष्कळ ब्रह्महत्या लागतील; कारण ह्या सर्वांचा नाश तूं केलेल्या ह्या माझ्या नाशामुळें होणार आहे. अतां तूं मला माझ्या आश्रमांत आईबापाकडे घेऊन जा; माझ्या बापाला घडलेलें सर्व वर्तमान कथन कर; ह्मणजे ते तुझ्यावर दया करितील; व ब्रह्महत्यानाशनाचा उपायहि सांगतील. नंतर ऋक्षशृंगाच्या सांगण्याप्रमाणें चित्रसेन राजा त्याला घेऊन दीर्घतपा मुनीच्या आश्रमाजवळ गेला, तोंच ऋक्षशृंगाचा प्राणांत झाला. त्या राजानें ऋक्षशृंगाचा अंत्यविधि उरकून; व स्नानादि करून तो ब्रह्महत्या घडल्याबद्दल शोक करूं लागला; व ब्रह्महत्येच्या पातकाच्या नाशाबद्दल विचार करूं लागला.

---

# अध्याय ५४ वा.

## दीर्घतपामुनीचें स्वर्गारोहण.

शंकर ह्मणतात; हे राजा ! नंतर चित्रसेनानें विचार केला कीं, त्या ब्रह्महत्येच्या दोषानें भ्रष्ट झालेला हा देह घेऊन काशीला जाण्यापेक्षां येथें अग्नीमध्यें दग्ध करावा, हें बरें; असा विचार करून आपला देह अग्नींत विसर्जन करणार, तोंच ऋक्षशृंगांनीं सांगितलेलें भाषण आठवून तो दीर्घतपामुनीकडे जाण्यास निघाला. तेथून आश्रम जवळ असल्यामुळें चित्रसेन लवकरच दीर्घतपामुनीच्या आश्रमांत येऊन पोंचला. राजा आलेला पाहून मुनीला मोठा आनंद झाला; व तो त्याचें आदरातिथ्य करण्याविषयीं उद्युक्त झाला असतां चित्रसेन दीर्घतपामुनीला ह्मणतो कीं, हे मुने ! मी मोठा पापी; व अपराधी असून तुझ्याकडून आदरातिथ्य स्वीकारण्यास अयोग्य आहें; कारण मृगांच्या कळपामध्यें असणाऱ्या तुझ्या मुलाला मी मृगया करीत असतां चुकून मारिलें, हा मी तुझा मोठा अपराध केला आहे, त्याची मला क्षमा करा. हें राजाचें भाषण ऐकून दीर्घतपामुनी परिवारासह अत्यंत शोक करीत राजाला ह्मणतो कीं, तूं मला आपलें मुखसुद्धां दाखवूं नको. पुत्रशोकानें आमचे सर्व कुटुंब नष्ट होऊन इतक्या सर्व ब्रह्महत्या तुझ्या देहावर लादल्या जातील, असें समजून पुढें चित्रसेनानें मुनीचे पाय धरून फारच विनवण्या केल्यावरून दीर्घतपा पुनः शांतपणें राजास ह्मणतो कीं, जर तुला दोषमुक्त व्हावयाचें असेल, तर आह्मां सर्वांच्या अस्थि गोळा करून शूलभेदतीर्थांत नेऊक टाक; ह्मणजे तूं दोषमुक्त होशील. नंतर ऋक्षशृंगाची माता पुत्रशोकानें मृत होती झाली, इतर बंधुहि मातृशोकानें नष्ट झाले; व ऋक्षशृंगाच्या भावाच्या बायकाही पतिशोकानें स्वर्गीं गेल्या. हा सर्व प्रकार पाहून दीर्घतपामुनीनें स्वतः देहत्याग केला. राजाला त्या गोष्टीनें फार दुःख झालें; व त्यानें विद्वान् ब्राह्मण बोलावून त्या सर्वांचे अंत्यविधि समाप्त केले. शेवटीं तो चित्रसेन राजा सर्वांच्या अस्थि गोळा करून शूलभेदतीर्थाचा मार्ग विचारीत विचारीत शूलभेदतीर्थाचे ठिकाणीं प्राप्त झाला. तो राजा त्या तीर्थांत स्नान करून तिलोदक विधीनें मुनि कुटुंबाच्या अस्थि तीर्थांत टाकता झाला. तत्काळ राजा वर तोंड करून पाहतो, तों विमानांत बसून दीर्घतपा पुत्रांसह व पत्नीसह दिव्यरूप धारण करून स्वर्गाला जात आहे, हें त्याच्या दृष्टीस पडलें. त्या वेळीं दीर्घतपा चित्रसेनाला ह्मणतो; राजा ! तुझें हें कृत्य पुत्रकृत्याहूनहि श्रेष्ठ आहे. तूं आमच्या अस्थि शूलभेदांत टाकिल्यामुळें आमचा उद्धार झाला आहे. नंतर चित्रसेनाला दोषमुक्त करून; व आशीर्वाद देऊन दीर्घतपा परिवारासह स्वर्गीं निघून गेला.

# अध्याय ५९ वा.

## चित्रसेनाला मोक्षप्राप्ती.

शंकर ह्मणतात; हे राजा ! परिवारांसह दीर्घतपा शूलभेद तीर्थाच्या प्रभावानें मुक्त झाला, हें पाहून चित्रसेनाला आश्चर्य वाटलें; व आपणहि ह्याच तीर्थाचे काठीं तप करून कृतार्थ व्हावें, असा विचार करून तो चित्रसेनराजा भृगुपर्वतावर चढून ईशान्यदिशेला असणाऱ्या कुंडाचे काठीं मोठी तपश्चर्या करिता झाला. त्या वेळीं मी स्वतः व तसेच ब्रह्मदेव; व विष्णुहि त्याजवळ जाऊन प्रसन्न होऊन त्यास वर देण्यास उद्युक्त झाले. नंतर मी राजास बोललों कीं, राजा ! उगीच तपानें कष्टी होऊन प्राणत्याग करूं नकोस. अजून तूं तरुण आहेस, तेव्हां ह्या वयांत तूं आपला देह टाकणें तुला युक्त नाहीं. आतां तूं आपल्या घरीं जाऊन राज्योपभोगाचा अनुभव घे. त्या वेळीं चित्रसेन ह्मणतो कीं, मला राज्य, पुत्र, बंधु किंवा सुख कशाचीहि गरज नाहीं. माझ्या कृत्यामध्यें उगीच आपण विघ्न उत्पन्न करूं नये. मी स्वर्गप्राप्तीच्या इच्छेनें हें कृत्य करीत आहें; तेव्हां त्याची प्राप्ती होईपर्यंत मी आपलें हें तपकृत्य अव्याहत चालविणार, ह्या प्रमाणें चित्रसेनाचें भाषण ऐकून मी त्यास बोललों कीं, ज्याच्यासमोर आज आह्मी तिघेजण उभे आहों, त्या तुला स्वर्ग घेऊनच काय करावयाचें आहे आह्मी तिघे प्रसन्न झालों आहों, इच्छित वर माग. नंतर चित्रसेन आह्माला ह्मणतो कीं, तुह्मी जर मजवर प्रसन्न झाला आहां, तर आपण तिघांनींहि ह्या ठिकाणींच कायमचें राहावें. ज्याप्रमाणें आपण गयातीर्थ अत्यंत पवित्रतेला आणिलें आहे, त्याप्रमाणें हे शूलभेदतीर्थहि गयातीर्थाप्रमाणें पवित्र व्हावें. ज्या ज्या ठिकाणीं आपण तिघे राहाल, त्या त्या ठिकाणीं माझा वास असावा. नंतर मी चित्रसेनास बोललों, हे राजा ! तुझ्या वचनाप्रमाणें आह्मी आजपासून ह्या शूलभेदतीर्थाचे ठिकाणीं राहत जाऊं; व आपण नंदि ह्या नांवानें शिवगणांत प्रविष्ट होऊन माझे जवळ राहावें. माझ्या पूर्वीं आपण लोकांकडून पूजिले जाल. आपली पूजा केल्याशिवाय केलेली माझी पूजा व्यर्थ होय; असें सांगून आह्मीं स्वस्थानीं गेलों; व अंशरूपानें आह्मी त्यातीर्थाचे ठिकाणीं राहते झालों. ज्याप्रमाणें दीर्घतपा स्वर्गीं निघून गेला, त्याप्रमाणें हा चित्रसेनहि आपल्या तपःप्रभावानें शुद्ध होता झाला. इतर सर्व तीर्थें गदातीर्थाचे ठिकाणीं राहत होतीं तीं त्या दिवसापासून शूलभेदतीर्थाचे ठिकाणीं राहूं लागली. ह्या तीर्थाचे ठिकाणीं पितृपितामहप्रपितामहरूपानें विष्णु, ब्रह्मा; व मी असें राहते झाला, जे कोणी शूलभेदाचे ठिकाणीं श्राद्ध करितात, त्यांच्या एकवीस कुळांचा तत्काळ उद्धार होतो. अज्ञानानें केलेलें

पाप ह्या तीर्थांत स्नान केलें असतां नष्ट होतें. जे कोणी हें आख्यान श्रवण करितील, व पठण करितील त्यांचीं सर्व पातकें नाहिशीं होऊन ते ह्या लोकीं सुख भोगून अंतीं शिवलोकीं जातील.

---

# अध्याय ५६ वा.

## देवशिलादितीर्थमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे राजा! आतां तुम्हाला गंगेची उत्पत्ति सांगतों, श्रवण कर. विंध्य नांवाचा एक पर्वत आहे. त्या पर्वताचे शिखरावर सर्व देव गेले, व त्यांनीं माझी पूजा करून व मला प्रसन्न करून घेऊन जटेमध्यें असणाऱ्या गंगेला भूतलावर सोडण्याविषयीं माझी प्रार्थना केली. त्यांच्या प्रार्थनेप्रमाणें मी आपल्या जटेंतील गंगा पृथ्वीवर सोडिली असतां ती नदी देवांच्या प्रार्थनेवरून उत्पन्न झाल्यामुळें तिला देवनदी म्हणतात. जे कोणी देवनदीचें काठीं स्नानादि करितात, ते मुक्त होतात. ती नदी शूलभेदाच्या दक्षिणेस अवतरली आहे. त्या तीर्थाला देवशिलातीर्थ म्हणतात. त्या देवशिलातीर्थाचे ठिकाणीं स्नान करून ब्राह्मणांना यथाशक्ति भोजन घातलें असतां ते जन्ममरणापासून मुक्त होतात. पूर्वी चेदिदेशांत वीरसेननांवाचा एक राजा धर्मानें वागणारा, व पुत्राप्रमाणें प्रजेचें पालन करणारा असा असता झाला. त्या राजाला एक मुलगी होती; व योग्यकाळीं तिचा विवाहहि झालेला होता. पुढें कांहीं दिवसांनीं त्या राजानें बारा वर्षांनीं पुऱ्या होणाऱ्या अशा एका यज्ञाला प्रारंभ केला. आरंभलेल्या यज्ञाची समाप्ती होण्यापूर्वीच त्या राजाच्या मुलीचा पति मृत झाला. राजाला फारच त्यामुळें दुःख झालें; व राजाची मुलगी विधवानियमाप्रमाणें आचार करिती झाली. ती राजाची मुलगी भानुमती कांहीं सेवक बरोबर घेऊन जन्माचें सार्थक करण्याच्या उद्देशानें नर्मदानदीचे काठीं जाऊन, व अमरकंटक पर्वतावर पांच वर्षें राहून तपश्चर्या करिती झाली. नंतर तीर्थें हिंडत हिंडत ती देवनदीचा व नर्मदेचा जेथें संगम झाला आहे तेथें जाऊन, व त्याठिकाणीं असणाऱ्या ऋषींना नमस्कार करून ती त्यांस प्रश्न करिती झाली कीं, ह्या तीर्थाचें माहात्म्य आपण मला सांगा. ह्याप्रमाणें राजकन्येचें भाषण ऐकून ऋषी तिला म्हणतात; हें चक्रतीर्थ आहे. पूर्वी शंकरानें विष्णूला ह्याचठिकाणीं चक्र दिलें. जे कोणी येथें स्नान करितील, त्यांचीं सर्व पातकें दग्ध होऊन ते जन्ममरणापासून मुक्त होतील. दुसरे दिवशीं शूलभेदतीर्थाचे ठिकाणीं स्नान करून तीर्थविधि केला असतां तीन जन्मांचीं पातकें नष्ट होतात. देवशिलातीर्थाचे ठिकाणीं स्नान करावें; व

श्राद्धादि करावीं; म्हणजे ब्रह्महत्यादि दोष दूर होऊन पितरांचा उद्धार होतो. एकादशीचे दिवशीं उपोषण करून; व रात्रीं जागरण करून पुराणकथा श्रवण कराव्या. नंतर प्राची सरस्वतीचे काठीं जाऊन स्नान; व श्राद्ध करावें; म्हणजे पितर मुक्त होतात. विधवा स्त्री जर ह्याठिकाणीं बारा वर्षे राहून नियमव्रतांचें पालन करील, तर ती पतीसह मुक्त होऊन अखंड शिवलोकीं वास करील. नंतर ती राजकन्या त्या देवशिलातीर्थाचे ठिकाणीं स्नानादि करून; व त्या तीर्थाच्या माहात्म्याचा प्रभाव जाणून ऋषींना म्हणाली कीं, आपण माझ्या आई-बापाकडे जाऊन ह्या तीर्थाचें माहात्म्य त्यांस सांगावें; व त्यांस इकडे घेऊन यावें. मला येथून दुसरीकडे जावेंसे वाटत नाहीं. ह्याप्रमाणें ऋषींना सांगून ती त्याचठिकाणीं व्रतनियमपरायण अशी असती झाली. ह्याप्रमाणें राजाच्या विधवा झालेल्या कन्येनें तेथें बारा वर्षे घालविलीं असतां त्या पुण्यप्रभवानें आपल्या एकवीस कुलांचा उद्धार करून ती पतीसह शिवलोकीं जातीझाली.

आतां आणखी ह्या देवशिलातीर्थाचें माहात्म्य सांगतों, ऐका. एक शबर नांवाचा व्याध अत्यंत दरिद्री असा, कांहीं खावयास मिळेल ह्या आशेनें पत्नीसह अरण्यांत गेला असतां कोणतेंहि श्वापद दृष्टीस पडलें नाहीं. नंतर तो खिन्न-मुद्रेनें पुढें जात असतां एक सर्वैश्वर्यसंपन्न असें सुंदर सरोवर त्याचें दृष्टीस पडलें. तें सरोवर पाहून; व त्या सरोवरांतील सुंदर कमळें घेऊन शबरस्त्री आपल्या पतीस म्हणते कीं, हीं सुंदर कमळें शूलभेदाच्या पूजेला योग्य आहेत, तीं ग्रहण करावीत. नंतर पत्नीच्या प्रार्थनेप्रमाणें शबरानें त्या सरोवरांतील कांहीं कमळें काढून घेतलीं; व थोडीं पिकलेलीं बेलफळें घेऊन तो शबर शूलभेदाचे ठिकाणीं प्राप्त झाला. त्या दिवशीं एकादशीं असल्यामुळें त्या तीर्थावर स्नानाक-रितां; व तेथील शिवलिंगाचें पूजन करण्याकरितां पुष्कळ लोक आपल्या मुलां-बाळांसह आलेले त्या शबराच्या दृष्टीस पडले, त्या दिवशीं सर्वांनीं उपवास केले होते. हा सर्व तेथील समारंभ पाहून शबरस्त्रीला आनंद झाला. शबर आपल्या स्त्रीस म्हणतो कीं, तूं देवळांत जाऊन हा समारंभ कोणत्या उद्देशानें चालला आहे, हें विचारून ये. नंतर ती तेथें जाऊन तेथील दुसऱ्या व्रतस्थ स्त्रियांना विचारिती झाली कीं, हें तुम्ही किंनिमित्त स्नानादि करीत आहां. नंतर त्या स्त्रिया शबरस्त्रीस म्हणतात; आज एकादशी आहे, करितां स्नान; व उपोषण एकादशीचे दिवशीं केलें असतां स्वर्गप्राप्ती होते; असा देवशिलातीर्थाचा महिमा आहे. हें त्या स्त्रियांचें भाषण ऐकून शबरस्त्रीनें आपल्या पतीला सर्व वर्तमान सांगितलें. शबरानें व शबरस्त्रीनें मोठ्या आनंदानें उपोषण करून तीं स्नान करण्याकरितां गेलीं. स्नान करून; व देवांना नमस्कार करून; तेथील देवावर तिनें कमळें वाहिलीं. त्याच देवशिलेचे ठिकाणीं पूर्वीच्या इतिहासांत वर्णिलेली राज-

कन्या विधवा भानुमतीहि तेथेंच होती. तिलाहि तिनें देवाला पाहण्याकरितां कळविलें. पुढें सर्वांनीं ते दिवशीं उपोषणें करून द्वादशीचे दिवशीं ती सर्व मंडळी म्हणजे शबरस्त्री, शबर व भानुमती हीं चक्रतीर्थाला गेलीं; व तेथें त्यांनीं श्राद्धविधीहि केला. त्याप्रमाणें तीं तिघेंही तेथें तीन दिवस राहून कृतार्थ झालीं.

---

## अध्याय ५७ वा.

—:O:—

## शबराला स्वर्गप्राप्ती.

शंकर म्हणतात,—हे राजा ! नंतर भानुमती राजकन्या त्या देवशिलातीर्थाचे ठिकाणीं ब्राह्मण-भोजन घालून, त्रयोदशीचे दिवशीं मार्कंडह्रदाचे ठिकाणीं स्नान केल्यानें व शूलपाणिदेवाचें पूजन केल्यानें निष्पाप झाली. नंतर तिनें रात्रीं जागरण; व पुराणकथा श्रवण केल्या, आणि नृत्यगीतादिहि करून ब्राह्मणांना भोजन घातलें. चतुर्दशीचे दिवशीं पूर्ववत् जागरणादि करून, ब्राह्मणांना अनेक दानें दिलीं. पुढें दुसरे दिवशीं पौर्णिमा तिथी असून रविवार होता, ते दिवशीं पञ्चकर्माचें पर्व होतें. त्या दिवशीं होमहवन, दान, जप इत्यादि कोणतेंहि कृत्य केल्यास तें अक्षय्य फल देणारें होतें; म्हणून भानुमती ब्राह्मणांसह पुनः शूलभेदतीर्थाचे ठिकाणीं गेली, तेथें शबराला पत्नीसह कड्यावरून कुंडांत उडी टाकित असतांना पाहून ती शबराला म्हणते कीं, उगीच आत्महत्या कां करितोस ? तें सांग. नंतर शबर भानुमतीला म्हणतो; आम्हाला आत्महत्या करण्यास दुसरें कोणतेंच कारण नाहीं. संसारभयाच्या भीतीनें मी आत्महत्या करीत आहे. जो मनुष्यजन्म प्राप्त झाला असतां धर्मादि शुभ कृत्य करीत नाहीं तो नरकाला जातो; म्हणून मी आपलें पाप नाहिंसें करण्याच्या उद्देशानें ह्या तीर्थांत उडी टाकून आत्महत्या करीत आहे. नंतर भानुमती पुनः शबराला म्हणाली; अजून तुझा धर्माचरणाचा काळ अवशिष्ट आहे. तुझ्या मनांत आल्यास शिवध्यानानें तुला मुक्ति होईल; व तूं निष्पाप होशील; उगीच आत्महत्या करून दोषास पात्र होऊं नको. तूं आतां कंद, मूळ, फळें वगैरे खाऊन तीर्थयात्रा कर; म्हणजे स्वर्गाला जाशील. नंतर शबर म्हणतो; मी आजपासून अन्न खाण्याचें टाकून दिलें आहे; व मी ह्याच तीर्थांत देहत्याग करण्याचा निश्चय केला आहे; असें म्हणून तो शबर पत्नीसह पर्वताच्या कड्यावरून तीर्थांत उडी टाकिता झाला. तत्काळ तीं दोघें देहमुक्त होऊन व विमानांत बसून स्वर्गी गेलीं.

---

## अध्याय ५८ वा.

### भानुमतीचें स्वर्गारोहण.

मार्कण्डेय म्हणतात; धर्मा ! नंतर भानुमतीनें काय केलें. असा उत्तानपाद राजानें शंकरास प्रश्न केल्यावरून शंकर म्हणतात; नंतर भानुमती हा शबरवृत्तांत पाहून दोन घटका त्याबद्दल आपल्या मनाशीं विचार करूं लागली; व त्या शूलभेद कुंडाजवळ ती येऊन; व त्या कुण्डाचें माहात्म्य अगाध आहे, असें पाहून भानुमतीला मोठा आनंद झाला. तिनें पुष्कळ ब्राह्मणांना बोलावून त्यांना अनेकप्रकारचीं दानें दिलीं; व देवाचें पूजन करून निश्चितान्तःकरणानें पंधरा दिवस त्याठिकाणीं राहिली. नंतर अमावास्येच्या दिवशीं ती गंधमादन पर्वताच्या कड्यावर चढून सर्व ब्राह्मणांच्या आज्ञेनें तेथून तीर्थांत उडी टाकिती झाली. तिला नेण्याकरितां शिवगणांनीं तेथें विमान आणिलें, व त्या विमानांत बसून ती स्वर्गाला गेली. मार्कण्डेय म्हणतात; पूर्वीं शंकरानें उत्तानपाद राजाला जसें शूलभेदाचें माहात्म्य सांगितलें; तसेंच मीहि तुला सांगितलें आहे. जे कोणी हें शूलभेदमाहात्म्य पठण किंवा श्रवण करितात त्यांचीं शंभर जन्माचीं भयंकर ब्रह्महत्यादि महापातकें सुद्धां नष्ट होतात. जे कोणी हें शूलभेदमाहात्म्य पितृश्राद्धाचे समयीं ब्राह्मण भोजनास बसले असतां त्यांस ऐकवितील, त्यांचे पितर आनंदित होऊन मुक्त होतील. हें माहात्म्य दुसरा पठण करीत असतां, स्वतः तेथें बसून जो श्रवण करील, तो सर्व पापापासून मुक्त होईल. हें व्याख्यान कीर्ति देणारें, आयुष्य वाढविणारें आहे. ह्या तीर्थमाहात्म्याच्या श्रवणानें पापें नष्ट होऊन शिवलोकाची प्राप्ती होते.

## अध्याय ५९ वा.

### आदित्यतीर्थमाहात्म्य.

मार्कंण्डेय म्हणतात;—हे धर्मा ! सर्व पातकांचें नाशन करणाऱ्या अशा पुष्करिणीतीर्थामध्यें प्रथम स्नान करावें. नर्मदा नदीच्या उत्तरेच्या तीरांवर एक तीर्थ आहे. त्या तीर्थामध्यें आदित्याचें ( सूर्याचें ) नित्य वास्तव्य असतें. कुरुक्षेत्राप्रमाणेंच हेंहि तीर्थ पुण्यप्राप्ति करून देणारें आहे. तसेंच कुरुक्षेत्रामध्यें दानें दिल्यानें जें पुण्य तेंच ह्या ठिकाणींहि प्राप्त होतें सूर्यग्रहणामध्यें जर ह्या तीर्थांत स्नान केलें; व हत्ति, घोडे वगैरे दानें दिलीं तर त्याचें शंभरपटीनें अधिक फल प्राप्त होतें. त्याच तीर्थामध्यें तिलोदकानें पितरांना तृप्त करावें; म्हणजे पित-

त्यांचा उद्धार होतो. ह्याच तीर्थामध्यें अक्षता, बोरें, बेलफळ, हिंगणबेट्याचें फळ व तिळ ह्या पदार्थांनीं श्राद्धविधि केल्यास त्यायोगें त्यांची अक्षय्य तृप्ति होते. त्या आदित्यतीर्थाचे ठिकाणीं स्नान करून जे आदित्यहृदय स्तोत्राचा जप करितात व आदित्याचें पूजन करितात, ते परम पदाला प्राप्त होतात. जे कोणी कोणत्याहि वेदांतील ऋचा (मंत्र) ह्या तीर्थासन्निध बसून पठण करितील त्यांना चारहि वेदांचें अध्ययन केल्याचें पुण्य प्राप्त होईल. जे कोणी आदित्य ह्या तीन अक्षरांच्या सूर्याच्या नाममंत्राचा जप करितील, ते सर्वपापापासून मुक्त होतील. जे कोणी ह्या तीर्थांत देहत्याग करितील, ते सूर्यलोकीं जातील.

---

## अध्याय ६० वा.

### आदित्येश्वरतीर्थमाहात्म्य.

मार्कंडेय म्हणतात, धर्मा! आतां आदित्येश्वर तीर्थाचें माहात्म्य सांगतों. हें तीर्थ सर्व दुःखें, व विघ्नें नाहींशीं करणारें असून, आयुष्य व ऐश्वर्य वाढविणारें आहे. ह्या तीर्थाची बरोबरी दुसरें कोणतेंहि तीर्थ करूं शकणार नाहीं. पूर्वी पार्वतीनें शंकराला आदित्येश्वरतीर्थाचें माहात्म्य विचारिलें होतें, व शंकर पार्वतीला तेंच माहात्म्य सांगत असतां आम्हीहि ऐकिलें आहे, व तेंच मी तुम्हाला सांगणार आहें. पूर्वी दुष्काळानें पीडित झालेले वसिष्ठादि ऋषी नर्मदा-नदीचे काठीं असलेलीं तीर्थें हिंडत हिंडत ते आदित्येश्वर तीर्थाला प्राप्त झाले. त्या तीर्थाजवळ लांबडीं वस्त्रें नेसलेल्या, हातांत पाश असलेल्या, मोठमोठे देह धारण केलेल्या, मोठमोठ्या जिव्हा व पिंगट नेत्र असलेल्या, मोठमोठ्या दाढा असलेल्या अशा कांहीं स्त्रिया बसलेल्या वसिष्ठादि ऋषींच्या दृष्टीस पडल्या. त्या स्त्रियांनीं वसिष्ठादि ऋषींना पाहिलें; व त्या त्याजवळ प्राप्त झाल्या. हे ऋषि मोठे तपस्वि आहेत, असें पाहून त्या स्त्रियांचीं मनें पवित्र होऊन त्या सत्कर्माचरण करून मुक्त झाल्या. नंतर वसिष्ठादि ऋषि नर्मदातीरीं येऊन नर्मदेची स्तुति करूं लागले. त्यांच्या स्तुतीनें नर्मदा प्रसन्न झाली असतां, वसिष्ठादि ऋषीनें त्या आदित्येश्वरतीर्थांत स्नान केलें. नर्मदेनें वसिष्ठादिऋषींना इच्छित वर दिले. वसिष्ठादिऋषि तेथून दुसरीकडे जात असतां, त्यांना एक आश्चर्य दृष्टीस पडलें; तें हें कीं, एकाएकीं आमच्यापुढें पाश हातांत घेतलेले पांच पुरुष येऊन उभे राहिले; व आम्हाला म्हणतात कीं, हे ऋषीहो! तुम्ही पुष्कळ तीर्थें हिंडलां, तथापि तुमचीं पूर्वपापें नष्ट झालीं नव्हतीं; परंतु ज्या वेळीं तुम्हीं आदित्येश्वरतीर्थामध्यें स्नान केलें त्या वेळीं तुम्ही सांप्रत निष्पाप झाला आहां. आदि-

त्येश्वरतीर्थामध्यें स्नान न करितां, दुसरीं कितीहि तीर्थें तुम्ही हिंडलां तरी तीं तुमचें पाप क्षालन करण्यास समर्थ नाहींत. ह्या आदित्येश्वराचा महिमा पूर्वी शंकरानें असा वर्णिलेला आहे कीं, जे कोणी सूर्यग्रहणकाळीं आदित्येश्वरतीर्थाचे ठिकाणीं स्नान करितील त्यांना अवर्णनीय फल प्राप्त होईल, असें सांगून ते पुरुष स्वस्थानीं निघून गेले. हें तीर्थमाहात्म्य पापी, कृतघ्न वगैरे दुष्ट लोकांना सांगूं नये.

---

## अध्याय ६१ वा.

### शक्रेश्वरतीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात,—हे धर्मा ! आदित्येश्वरतीर्थानंतर शक्रेश्वरतीर्थाला जावें. पूर्वी इंद्रानें ह्याच ठिकाणीं तप केलें होतें; त्या वेळीं शंकरानें दैत्यांचा वध होऊन, स्वर्गराज्य मिळण्याविषयीं इंद्राला वर दिला. त्या दिवसापासून त्या स्थानाला शक्रेश्वरतीर्थ हें नांव प्राप्त झालें. जे कोणी कार्तिक कृष्ण त्रयोदशीस ह्या तीर्थांत स्नान करून उपोषण करितात, त्यांचीं सर्व पातकें नष्ट होतात. जे शक्रतीर्थावर स्नान करून शक्रेश्वराचें पूजन करितात, त्यांचीं सात जन्मांचीं पातकें नष्ट होतात. अगम्य स्त्रीचे ठिकाणीं जर गमन केलें; व राजा आणि मित्र ह्यांचा जर विश्वासघात केला; तर जीं प्राप्त झालेलीं घोर पातकें त्यांपासून ह्या तीर्थांत स्नान केल्यानें; व शक्रेश्वराचें पूजन केल्यानें मुक्तता होते. ह्या तीर्थाचे ठिकाणीं दानधर्म केल्यास तो इहलोकीं सुख भोगून अंतकाळीं स्वर्गलोकाला जातो.

---

## अध्याय ६२ वा.

### करोडीश्वरतीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात,—धर्मा ! नंतर करोडीश्वरतीर्थाचे ठिकाणीं जावें. त्याच ठिकाणीं पूर्वी देवदैत्यांचें युद्ध चालू असतां, देवांनीं दैत्यांचा पराजय केला; त्या वेळीं देवांनीं त्या मेलेल्या दैत्यांचीं मस्तकें, मुक्ति मिळण्याच्या हेतूनें पूर्वीचा वैरभाव विसरून येथें टाकिलीं; व तेथें एक देवांनीं शिवलिंग स्थापित केलें; ह्या तीर्थाला करोडीतीर्थ हें नांव पडण्याचें कारण येथें कोट्यावधि दैत्य देवांनीं युद्धांत मारले होते. शुद्ध व कृष्णपक्षांतील अष्टमी व चतुर्दशी ह्या दोन दिवशीं भक्तिभावनेनें उपोषण करून रात्रीं जागरण करावें. चांगल्या चांगल्या कथा श्रवण कराव्या; वेदाध्ययन करावें; व सकाळीं करोडीश्वरतीर्थांत स्नान करून करोडीश्वराचें पूजन

करावें; श्राद्धादि तीर्थविधि करावे, अनेकप्रकारचीं ब्राह्मणांना दानें द्यावीत, म्हणजे अनंत पुण्याची प्राप्ति होऊन अक्षय्य शिवलोकप्राप्ति होते. ह्या तीर्थांत जो आपला देह विसर्जित करितो, त्याच्या जितक्या अस्थि ह्या तीर्थांत टाकल्या गेल्या असतील तितक्या कालपर्यंत तो शिवलोकीं राहतो. तेथून पुनः मनुष्य-जन्म घेऊन कोट्याधीश श्रीमान् होतो. असा पुण्य-पुरुष ह्या भूतलाचे ठिकाणीं सांवायुषी होऊन अनेक सुखें भोगणारा होतो; मग शेवटीं पुनः करोडीश्वरतीर्थांत स्नान करून, करोडीश्वराचें पूजनानें परमगतीला प्राप्त होतो. हें करोडीश्वर स्थान इंद्र, चंद्र, यमधर्म, अकरा रुद्र, बारा सूर्य, आठ वसु, विश्वेदेव इतक्या सर्व देवांनीं मिळून नर्मदेच्या काठीं स्थापित केलें आहे. जे कोणी नर्मदेच्या उत्तर तीरावर एखादी धर्मशाळा बांधतील त्यांना त्याच ठिकाणीं सद्गति प्राप्त होईल. जे कोणी हें माहात्म्य श्रवण करितील, त्यांचीं सर्व पापें दग्ध होतील.

---

## अध्याय ६३ वा.

### कुमारेश्वरतीर्थमाहात्म्य.

मार्कंडेय म्हणतात, नंतर कुमारेश्वर तीर्थाला जावें. हें तीर्थ प्रसिद्ध असून अगस्त्येश्वराजवळच आहे. पूर्वी कुमारानें म्हणजे कार्तिकस्वामीनें सर्व पातकें दग्ध करणाऱ्या अशा कुमारेश्वरतीर्थांत स्नान करून व कुमारेश्वराचें पूजन करून अनेकप्रकारच्या सिद्धि व देवांच्या सैन्याचें आधिपत्यहि मिळविलें; म्हणूनच ह्या तीर्थाला कुमारेश्वरतीर्थ हें नांव प्राप्त झालें. जे कोणी एकाग्र अन्तःकरणानें ह्या तीर्थांत स्नान करून; व कार्तिक महिन्यांतील अष्टमीला व चतुर्दशीला कुमारेश्वराचें दहि, दूध इत्यादिकांनीं पूजन करून गायन व श्राद्धविधि करितील, त्याचीं सर्व कर्मे अक्षय्य मुक्ति देणारीं अशीं होतील; असें श्रेयप्रद देणारें स्थान कार्तिकस्वामीनें निर्माण केलें. कुमारेश्वराच्या दर्शनानें सर्व पातकें नष्ट होऊन तो मुक्त होतो. जे कोणी हें आख्यान श्रवण किंवा पठण करितील ते ह्या लोकीं सुख भोगून अंतकालीं शिवलोकीं जातील.

---

## अध्याय ६४ वा.

### अगस्त्येश्वरतीर्थमाहात्म्य.

मार्कंडेय ह्मणतात,—नंतर आपलीं सर्व पातकें नष्ट व्हावीं, एवढ्याकरितां अगस्त्येश्वरतीर्थाचे ठिकाणीं जावें. तेथें स्नान करणारा मनुष्य ब्रह्महत्येपासून

मुक्त होतो. कार्तिक कृष्ण चतुर्दशीचे दिवशीं अगस्त्येश्वराला तुपानें स्नान घालावें. जे त्याप्रमाणें करीत नाहींत, त्यांचीं एकवीस कुळें स्वर्गांतून भ्रष्ट होऊन तीं नरकाला जातात; व जे सांगितल्याप्रमाणें पूजन करितात, ते ब्रह्महत्यादि दोषांपासून मुक्त होऊन शिवलोकीं जाऊन राहतात. त्याठिकाणीं ब्राह्मणांना द्रव्य, जोडा, छत्री, तूप घोंगडी व भोजन वगैरे जें जें आपण देऊं तें तें सर्व कोटीपटीनें अधिक पुण्य देणारें होऊन, अक्षय्य शिवलोकाची प्राप्ति करून देणारें होतें.

## अध्याय ६५ वा.

### आनंदेश्वरतीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात;—धर्मा! नंतर आनंदेश्वर तीर्थाचे ठिकाणीं स्नान करण्याकरितां जावें. ज्या ठिकाणीं प्रत्यक्ष शंकराला आनंद झाला होता. शंकराला आनंद कां झाला? असा प्रश्न धर्मानें केल्यामुळें मार्कण्डेय म्हणतात, ज्या वेळीं देवांनीं दैत्यांचा पराजय केला, त्या वेळीं त्यांनीं शंकराची पूजा केली, देवांनीं केलेल्या पूजेच्या योगें शंकर आनंदित होऊन नृत्य करूं लागले. त्या वेळीं सर्व शिवगणहि आनंदित होऊन आनंदेश्वरतीर्थाचे कांठीं नृत्य करूं लागले. त्याप्रमाणेंच देवांनीं आनंदित होऊन तेथें आनंदेश्वर नांवानें लिंगस्थापना केली. प्रत्येक अष्टमीला, चतुर्दशीला व पूर्णिमेला यथाविधि आनंदेश्वराचें पूजन करून ब्राह्मणपूजन करावें; व अनेकप्रकारचीं दानें द्यावीं. चैत्र शुद्ध त्रयोदशीला तेथें श्राद्धविधि करावा; त्यायोगें सर्व पितर आनंदित होऊन मुक्त होतात. आनंदेश्वराचें पूजन करणाराची सात जन्मपर्यंत वंशवृद्धि होते; व त्याचा जन्म आनंदांत जातो.

## अध्याय ६६ वा.

### मातृतीर्थमाहात्म्यवर्णन.

नंतर मातृतीर्थांत स्नान करावें. ज्याठिकाणीं नर्मदासंगम झाला आहे, तेथेंच ब्राह्म्यादि मातांची उत्पत्ति झाली; म्हणून ह्या स्थानास मातृतीर्थ हें नांव प्राप्त झालें आहे. त्या तीर्थामध्यें नवमीचे दिवशीं स्नान केलें असतां त्याच्यावर माता तृप्त होऊन त्यास इच्छित फल देतात. ज्या कोणी वंध्या असतील किंवा ज्यांचीं मुलें मरत असतील, अशांनीं ह्या तीर्थाचें अवश्य सेवन करावें; म्हणजे त्यांची वंशवृद्धि होऊन त्या शिवलोकीं जातील.

# अध्याय ६७ वा.



## लुंकेश्वरतीर्थमाहात्म्य.

मार्कंडेय म्हणतात, धर्मा ! नंतर लुंकेश्वरतीर्थांत स्नान करावें. हें तीर्थ अत्यंत पुण्यफल देणारें आहे. आतां याची उत्पत्ति व माहात्म्य सांगतों. पूर्वी कालपृष्ठ नांवाचा एक कश्यपाचा दितीचे ठिकाणीं झालेला दैत्य होता. त्यानें गंगेच्या कांठीं मोठी तपश्चर्या केली. त्याच्या घोर तपश्चर्येनें शंकर प्रसन्न होऊन पार्वतीसह तेथें आले. त्याची तपश्चर्या पाहून पार्वतीला त्या कालपृष्ठ दैत्याची दया आली; व तिनें त्या दैत्याला वर देण्याविषयीं शंकराची प्रार्थना करून आग्रह धरिला. नंतर शंकर म्हणतात, पार्वती ! प्रत्येकानें आपआपला नफा तोटा पाहिला पाहिजे. हा दैत्य दुष्ट असल्यामुळें त्याला वर देणें योग्य नाहीं. जे स्त्रीच्या आज्ञेनें वागतात, ते नाश पावतात. याप्रमाणें शंकराचें भाषण ऐकून पार्वती शंकराला म्हणते, जर तुम्ही त्याला वर देणार नाहीं, तर मी प्राणत्याग करीन. असा आग्रह धरून शंकराला पार्वतीनें त्या दैत्याजवळ आणून वर देण्याची आज्ञा केली. शंकर कालपृष्ठ दैत्याजवळ येऊन म्हणतात कीं, तूं धूम्रपानादि घोर साधनांचा आश्रय करून एवढी मोठी तपश्चर्या कां करीत आहेस ? तुझी काय इच्छा आहे ? तें सांग. नंतर दैत्य शंकराला म्हणतो, हे देवा ! माझी आपले ठिकाणीं निश्चल भक्ति असावी; व ज्याच्या मस्तकावर मी हात ठेवीन तो भस्म व्हावा, असा आपण मला वर द्यावा. असें दैत्याचें भाषण ऐकून बरें आहे, असें म्हणून शंकर पार्वतीसह स्वस्थानीं जाण्यास निघाले असतां कालपृष्ठदैत्य शंकरास म्हणतो कीं, तूं दिलेला वर खरा किंवा खोटा आहे, याची परीक्षा करण्याकरितां प्रथम तुमच्या मस्तकावर हात ठेऊन पाहतो, करितां आपण जरा थांबावें. असें दैत्याचें भाषण ऐकून शंकरानें दैत्याबरोबर युद्ध करण्याकरितां आपल्या नंदीला आज्ञा दिली. नंतर नंदीचें व कालपृष्ठ दैत्याचें मोठें युद्ध झालें, त्यांत नंदीनें आपल्या शिंगांनीं कालपृष्ठाला जोरानें ताडन करून मूर्छित केलें; व नंदी कैलासाला परत आला. कांहीं वेळानें सावध होऊन कालपृष्ठ दैत्य नंदीच्या मागोमाग पाठलाग करीत कैलासपर्वताला आला. कालपृष्ठ आपल्या पाठीस लागलेला पाहून नंदीवर बसून शंकर पार्वतीसह इंद्रलोकाला व विष्णुलोकाला गेले, तरीहि कालपृष्ठ त्यांस सोडीना. शेवटीं शंकर विष्णुला कालपृष्ठाला वर दिल्याबद्दल सांगून त्याचा नाश करण्याविषयीं सुचविते झाले. नंतर शंकराच्या सूचनेप्रमाणें कालपृष्ठाला फसविण्याकरितां विष्णु मोहिनीचें रूप घेऊन त्या दैत्याच्या मार्गांत आडवे आले. मोहि-

तीला पाहून कालपृष्ठ दैत्य मोहित झाला; व तिला वश होण्याविषयीं विनंति करूं लागला. नंतर मोहिनी म्हणते कीं, लग्नापूर्वी पतीसह कुलदेवतेसन्निध नृत्य करावें, असा आमचा नियम आहे. जर मी तसें केलें नाहीं, तर माझें दैवत सडतर आहे, तें केव्हांच नियमभंग केल्याबद्दल आपलें भस्म करील; करितां मी जसे हावभाव करीन तसेंच तुम्हाला करावे लागतील; व अशातऱ्हेनें त्या देवतेपुढें नृत्य केल्यानंतर मी तुझ्याशीं लग्न करीन. असें मोहिनीचें भाषण ऐकून कालपृष्ठ दैत्याला तें खरें वाटलें; व त्यानें तिच्या सांगण्याप्रमाणें वागण्याचा निश्चय केला. नंतर मोहिनी त्याला घेऊन कुलदेवतेजवळ गेली व हावभावासह नृत्य करूं लागली. नृत्य करतां करतां मोहिनीनें आपल्या मस्तकावर हात ठेविला; तें पाहून कालपृष्ठदैत्यानेंहि आपला हात आपल्या मस्तकावर ठेविला. मस्तकावर हात ठेवतांच कालपृष्ठाचें भस्म झालें. नंतर मोहिनीनें आपलें विष्णु-स्वरूप प्रगट करून शंकराला झालेलें वर्तमान सांगून दुःखमुक्त केलें. पार्वती-नेंहि मोठ्या आनंदानें शंकर; व विष्णु त्यांची पूजा केली; ज्या ठिकाणीं हा प्रकार घडला, तेथें शंकरानें आपलें लिंग लुंकेश्वरनांवानें स्थापित केलें. जे कोणी लुंकेश्वराची पूजा करून हें आख्यान श्रवण करितील ते सर्व पापापासून मुक्त होऊन शिवलोकाला प्राप्त होतील. लुंकेश्वराचे रक्षणार्थ साक्षात् पार्वती चतुर्भुज रूप धारण करून तेथें राहते.

---

## अध्याय ६८ वा.

### धनदतीर्थमाहात्म्य.

मार्कंण्डेय म्हणतात,—हे धर्मा! नंतर धनदतीर्थाला आऊन तेथें स्नान करावें. हे तीर्थ नर्मदेच्या दक्षिण तीरावर असून सर्व पापांचें नाशन करणारें आहे. ह्या तीर्थांत स्नान केल्यानें त्रैलोक्यांत असणाऱ्या सर्व तीर्थांत स्नान केल्याचें फल प्राप्त होतें. चैत्र शुक्ल त्रयोदशीला इंद्रियनिग्रह करून व उपोषण करून मोठ्या भक्तीनें धनदतीर्थांत यथाविधि स्नान करावें; व धनदेश्वराचें पंचामृतासह षोडशोपचारविधीनें पूजन करून व रात्रीं जागरण करून नृत्यगीतादि आच-रावीं. दुसरे दिवशीं सकाळीं विद्वान् ब्राह्मण बोलावून त्यांचें पूजन करावें; व त्यांचेकडून चांगले आशीर्वाद ग्रहण करावे, त्याचप्रमाणें ब्राह्मणांना गाई, सुवर्ण, वस्त्र, जोडा वगैरे अर्पण करावीत; तसेंच छत्री, शय्या वगैरेहि द्यावींत, म्हणजे सर्व पातकांचा क्षय होऊन ते निष्पाप होतात. जे लोक दुष्ट असतील, त्याची बुद्धि सुसंस्कृत होऊन त्यांस धनदेश्वराच्या प्रसादानें स्वर्गप्राप्ति होते. जे

मनुष्य असतील त्यांना वनेश्वराच्या कृपेनें मोक्ष मिळतो. दरिद्र्यांना अन्नप्राप्ति व कुलीन पुरुषांना पुत्रप्राप्ति ह्या तीर्थाच्या सेवनानें होते. जे कोणी विद्येची इच्छा करून ह्या तीर्थाचें सेवन करितील त्यास विद्याप्राप्ति व मोक्षप्राप्ती होते.

---

## अध्याय ६९ वा.

### मंगलेश्वरतीर्थमाहात्म्य.

मार्कंडेय म्हणतात,–हे धर्मा ! नंतर मंगलेश्वरतीर्थाचे ठिकाणी स्नान करावें हे तीर्थ भूमीचा पुत्र जो मंगळ त्यानें स्थापित केलें आहे. पूर्वी, मंगळ चतुर्थीचे दिवशी शंकराची तपश्चर्या करून त्यास प्रसन्न करून घेता झाला. शंकरानें वर माग, असें सांगितल्यावरून मंगळ शंकरास म्हणतो, हे शंकर ! आपण नवग्रह प्रसन्न होऊन माझी सूर्यादि ग्रहांमध्यें स्थापना करावी; व माझी सर्वांनी पूजा करावी, असा मला वर द्या; व ह्या स्थानाचे ठिकाणीं आपण माझें नावानें वास्तव्य करावें. नंतर शंकरानें बरें आहे, असें म्हणून स्वस्थानीं गमन केलें. मंगळानें त्याठिकाणीं मंगलेश्वर नावाचें शिवलिंगाची स्थापना करून तेथें एक तीर्थ निर्माण केलें. त्या ठिकाणीं स्नान करून शिवलिंगाचें पूजन करणाराचीं सर्व पातकें नष्ट होतात. जे कोणी अंगारकी चतुर्थीला मंगलेश्वरतीर्थांत स्नान करून त्याचें पूजन करतात त्यावर शंकर प्रसन्न होऊन त्यास आपल्या लोकाला घेऊन जातो. ह्या तीर्थाचे काठीं चतुर्थी, अष्टमी ह्या तिथींला श्राद्धविधि केल्यास पितर जरी वाईट योनींत जन्माला गेले असले तरी ते मुक्त होतात, ह्या मंगलेश्वराच्या प्रसादानें सर्वत्र आपल्या कुळामध्यें नित्य मंगळाचेंच वास्तव्य असतें. जे कोणी हें आख्यान श्रवण किंवा पठण करितील ते निष्पाप होऊन अंतीं शिवलोकाला जातील.

---

## अध्याय ७० व ७१ वा.

### रवितीर्थादितीर्थमाहात्म्य.

मार्कंडेय म्हणतात, हे धर्मा ! नर्मदेच्या उत्तरतीरावर सूर्यानें स्थापित केलेलें रवितीर्थ नांवाचें एक तीर्थ आहे. सूर्यनारायण स्वतः तेथें वास्तव्य करितात. त्या तीर्थांत स्नान केलें असतां सर्व रोगांचा परिहार होऊन स्वर्गलोकाची प्राप्ति

होते. जे कोणी प्रत्येक षष्ठीला, अष्टमीला किंवा चतुर्दशीला ह्या तीर्थांत स्नान करून पिंडदान करितात त्यांच्या पापाचा नाश होतो; व ते स्वर्गाला जातात. कदाचित् ते पुण्यक्षयामुळें जन्माला आल्यास सत्कुलांतच जन्म घेतात.

त्याचप्रमाणें कामेश्वर नांवाचेंहि एक दुसरें तीर्थ आहे; ज्या तीर्थांत स्नान केल्यामुळें गणपतीला सिद्धि मिळाली. ह्या तीर्थांत स्नान करून पंचामृतानें षोडशोपचार शिवलिंगाचें पूजन करणाऱ्याच्या सर्व इच्छा पूर्ण होऊन शंकराच्या प्रसादानें त्यांस शिवलोकाची प्राप्ति होते. मार्गशीर्ष महिन्यांतील अष्टमीला ह्या तीर्थांत स्नान करावें; म्हणजे सर्व पातकें नष्ट होऊन त्यांचे सर्व मनोरथ पूर्ण होतात. हें माहात्म्य श्रवण करणारांचींहि सर्व पातकें दग्ध होतात.

---

# अध्याय ७२ वा.

## मणिनागेश्वरतीर्थमाहात्म्य.

मार्कंडेय म्हणतात; हे धर्मा! हें तीर्थ; व शिवलिंग मणिनाग नांवाच्या सर्पानें स्थापिलेलें आहे. पूर्वी कश्यपाला दोन बायका होत्या. त्यांपैकीं विनतेला गरुड; व कद्रूला सर्प झाले. विनता व कद्रू मोठ्या प्रेमानें अनेक दिवस आनंदांत घालवून सुखोपभोग घेत होत्या. पुढें एकदां उच्चैःश्रवा नांवाच्या घोड्याला पाहून कद्रू विनतेला विचारिते कीं, ह्या घोड्याचा वर्ण कसा आहे? तो सांग पाहूं; मला वाटतें, ह्याचा वर्ण काळा आहे. नंतर कद्रूचें वचन ऐकून विनता कद्रूला म्हणत्ये कीं, तुला घोडा दिसतो, पण घोड्याचा वर्ण दिसत नाहीं, हें मोठें आश्चर्य आहे. मला वाटतें तुला काळा, पांढरा हे वर्णच ओळखतां येत नाहींत. जर तूं हें समजून उमजून मला फसविण्याकरितां खोटें भाषण केलें असशील, तर खरोखरच यमलोकाला जाशील; आणि मी आपल्याबद्दल पैज मारून सांगतें कीं, जर माझें भाषण खोटें असेल तर हजार वर्षें तुझी नोकरी मी स्वतः करीन. ह्याप्रमाणें कद्रूनें विनतेचें दास्यत्व खोटें भाषण ठरल्यास पत्करण्याचें कबूल केलें. ह्याप्रमाणें उभयतांनीं पैजा मारल्या व त्या स्वगृहीं निघून आल्या; परंतु रात्रीं त्यांस निद्रा लागली नाहीं. कद्रूनें दुसरे दिवशीं झालेलें सर्व वर्तमान आपले पुत्र जे सर्प त्यांस निवेदन केलें. तें ऐकून सर्पांना फार वाईट वाटलें; व उच्चैःश्रवा काळा दिसण्याकरितां काय उपाय योजावा? हा विचार सुरू झाला. मातृभक्तिपरायण असा मणिनाग नांवाचा एक कद्रूचा पुत्र होता. त्यानें मातृकार्यासाठीं नर्मदातीरीं जाऊन शंकराची आराधना केली. ती घोर तपश्चर्या पाहून शंकर प्रसन्न झाले; व मणिनागास वर मागण्या-

विषयीं सूचना करूं लागले. मणिनाग शंकराची स्तुति करून त्यास म्हणतो कीं, हे महादेवा! जर आपण मजला वर देण्यास तयार झाला असाल, तर मी मागतों तेवढें द्या. प्रथम माझ्या आईनें उच्चैःश्रवा, घोडा काळा असावा, असें म्हटलें आहे. त्याप्रमाणें तो व्हावा; व विनतेला हा काळाच आहे, असें वाटावें. नंतर आपण ह्या ठिकाणीं माझ्याच नांवानीं राहून हें स्थान पवित्र करावें; व माझी आपल्याठिकाणीं असणारी भक्ति कायम राहून अंतकाळीं मुक्तिहि मला मिळावी. नंतर शंकरानें मणिनागाच्या सर्व इच्छा पूर्ण करून त्यास आपल्या पार्षदांमध्यें गृहीत केलें. ह्या स्थानीं जें शिवलिंग स्थापिलें गेलें तेंच मणिनागेश्वर होय. जे कोणी ह्या मणिनागेश्वरतीर्थांत स्नान करून शिवलिंगाचें पूजन करितात ते सर्पभीतीपासून मुक्त होऊन; व सर्वव्याधींपासूनहि मुक्त होऊन शिवलोकाला प्राप्त होतात.

---

## अध्याय ७३ वा.

### गोपारेश्वरतीर्थमाहात्म्य.

मार्कंडेय म्हणतात;–धर्मा! हें तीर्थ गोपारेश्वर नांवानें प्रसिद्ध आहे; कारण ह्या तीर्थाचे काठीं गाईच्या देहापासून उत्पन्न झालेलें गोपारेश्वर नांवाचें शिवलिंग स्थापित केलें आहे. आतां तें शिवलिंग कसें उत्पन्न झालें तें सांगतों, ऐका. ह्या ठिकाणीं पूर्वीं कामधेनूनें मोठी तपश्चर्या करून शंकराची आराधना केली. तिच्या त्या घोर तपश्चर्येच्या सामर्थ्यानें शंकर प्रसन्न होऊन पुण्यस्वरूपी अशा त्या गाईच्या देहांतून प्रगट झाले; व कामधेनू गाईपुढे उभे राहिले; नंतर ते गाईला म्हणतात; हे कामधेनो! तुझ्या तपश्चर्येनें मी प्रसन्न झालों आहे. तुला तप करण्याचें कारण काय असेल तें सांग, मी तुझ्या सर्व इच्छा पूर्ण करीन. नंतर गाय शंकराला म्हणत्ये; देवा! ब्रह्मदेवानें लोकोपकारार्थ मला उत्पन्न केलें आहे. करितां आपणहि माझ्या सांगण्यावरून लोककल्याणार्थ येथेंच वास्तव्य करावें, एवढीच माझी इच्छा आहे. ह्या माझ्या तीर्थांत स्नान करून तुझें पूजन करणारे लोक सर्व पापापासून मुक्त व्हावे. तसेंच ह्या ठिकाणीं गोदान करणारे, पितरांना उद्देशून पिंडदान करणारे वगैरे सर्व पुण्य पुरुष पितरांसह निष्पाप होत्साते मुक्त होवोत, अशी माझी इच्छा आहे; व मीहि एवढ्याकरितांच तप करीत होत्यें. अशातऱ्हेनें गाईचें भाषण ऐकून शंकर त्याठिकाणीं लिंगस्वरूपानें गोपारेश्वर नांवानें राहते झाले; व मूर्तस्वरूपानें अंतर्धान पावले. ह्या गोपारेश्वरतीर्थाचे ठिकाणीं वृषोत्सर्गादि विधि केला असतां ब्रह्मदेव, शंकर व विष्णु हे तिघेहि प्रसन्न होऊन त्यास सर्व पापापासून निवृत्त करून मुक्त करतात.

---

## अध्याय ७४ वा.

### गौतमेश्वरतीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात; हे धर्मा! नर्मदा नदीच्या उत्तर तीरावर गौतमानें स्थापिलेलें गौतमेश्वर नांवाचें लिंग आहे. हें तीर्थ म्हणजे जणुं काय स्वर्गाला जाण्याकरितां शिडीच कीं काय? असा ह्या तीर्थाचा प्रभाव आहे, त्याठिकाणीं स्नान करून शिवलिंगाचें पूजन केलें असतां यात्रीनें स्वर्गप्राप्ती होते. हें तीर्थ सौभाग्य व विजय देणारें असून सर्व दुःखापासून मुक्त करणारें आहे. एकहि जरी पिंड ह्या तीर्थांत दिला, तरी सर्व कुलांचा उद्धार होतो. ह्या तीर्थामध्यें अल्पस्वल्प जरि दान दिलें तरी त्याचें फळ शतपटीनें अधिक मिळतें. हें तीर्थ सर्व तीर्थांहून श्रेष्ठ आहे, असें प्रत्यक्ष शंकराचें वचन आहे; करितां येथें स्नान केल्यास मुक्ति मिळते.

## अध्याय ७५ वा.

### शंखचूडतीर्थमाहात्म्य.

नर्मदानदीच्या दक्षिणतीरावर शंखचूड नांवानें एक तीर्थ प्रसिद्ध आहे. ह्या तीर्थाचे ठिकाणीं गरुडाच्या भीतीनें शंखचूड नांवाचा सर्प त्या ठिकाणीं अजून राहत आहे. जे कोणी ह्या तीर्थांत स्नान करून शुद्धान्तःकरणानें दूध, मध, व तूप ह्यांनीं शंखचूडाला स्नान घालितात, ते सर्व दुःखापासून मुक्त होऊन शिवलोकीं जातात. जे कोणी शंखचूडाला दहिभाताचा नैवेद्य दाखवून विद्वान् ब्राह्मणांना भोजन घालतात, ते शिवलोकीं पापमुक्त होऊन गमन करितात. जे कोणी ह्या ठिकाणीं गोप्रदान करितात; किंवा सांप चावलेल्या पुरुषास येथें आणून त्यास साहाय्य करितात, ते सर्व पापापासून मुक्त होऊन; व ह्या लोकीं सुख भोगून अंतकाळीं शिवलोकीं जातात.

## अध्याय ७६ वा.

### पारेश्वरतीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात,—हें तीर्थ पराशरानें स्थापित केलेलें आहे. ह्या ठिकाणीं पराशरानें पुत्रप्राप्तीकरितां पार्वतीची आराधना केली. पराशराच्या तपानें पार्वती

प्रसन्न होऊन पराशरास म्हणाल्ये कीं, हे मुने! तुमच्या तपश्चर्येनें मी प्रसन्न झाल्यें आहे; आपणाला कांहीं हवा असल्यास वर मागून घ्या. अशी पार्वतीची वाणी ऐकून पराशर पार्वतीला म्हणतात, हे देवी! जर तूं प्रसन्न होऊन मला वर देण्यास तयार असशील तर सुंदर व सर्वलक्षणसंपूर्ण असा मुलगा दे. तो मुलगा वेदाध्ययन करणारा, सर्व शास्त्रांत पारंगत असा असावा; व तूंहि ह्या ठिकाणीं शंकरासह माझ्या नांवानें वास्तव्य करावेस. त्याप्रमाणें पराशराच्या मागणीप्रमाणें पार्वतीनें त्याच्या सर्व इच्छा तृप्त केल्या; व ती गुप्त झाली. नंतर पार्वतीसह शंकराची पारेश्वर नांवानें तेथें पराशरानें स्थापना केली. त्याच तीर्थांत स्नान केल्यामुळें पराशर कृतार्थ होता झाला. त्या ह्या तीर्थाचे ठिकाणीं मग स्त्री असो किंवा पुरुष असो; जे कोणी माघ, चैत्र, वैशाख; व श्रावण आणि मार्गशीर्ष ह्या मासीं शुक्लपक्षामध्यें स्नान करून व उपोषण करून रात्रीं जागरण, दीपदान, गायननर्तनादि करतात ते सर्व पापापासून मुक्त होऊन शिवसायुज्य-मुक्तीला जातात. त्या पारेश्वरतीर्थाचे ठिकाणीं स्नानादि सर्व कर्में वेदोक्त-विधीनें करून ब्राह्मणांचें पूजन करावें; व पितरांच्या नांवानें श्राद्धादि विधि करावा; म्हणजे पितरांच्या कृपेनें वंशवृद्धि होऊन अंतकालीं पितरांसह स्वर्ग-लोकाची अक्षय्य प्राप्ति होते. जे कोणी हें पारेश्वरमाहात्म्य श्रवण किंवा पठण करितील, ते सर्व पापापासून मुक्त होऊन स्वर्गाला जातील.

---

## अध्याय ७७ वा.

### भीमेश्वरतीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात;—धर्मा! नंतर भीमेश्वरतीर्थांत स्नान करावें. त्या तीर्थाचे ठिकाणीं स्नान, उपवास वगैरे करून; व सूर्याकडे वरती हात करून एकाक्षरमंत्राचा जप करावा. असें केलें असतां ह्या एका जन्मांत केलेलें सर्व पातक नष्ट होतें. ह्या तीर्थाचे काठीं गायत्रीपुरश्चरण केल्यास सात जन्मांतील सर्व पातकें दूर होतात. ह्या तीर्थांत वैदिक मंत्राचा अथवा पुराणोक्त मंत्राचा जप केल्यास तत्काल तो निष्पाप होतो. ह्या तीर्थांत यथाशक्ति दानधर्म केल्यास त्याचें फल अक्षय्य प्राप्त होतें. हें माहात्म्य श्रवण करणारांचीं सर्व पातकें नष्ट होऊन ते दुर्लभ अशा शिवलोकाला प्राप्त होतात.

---

## अध्याय ७८ वा.

### नारदेश्वरतीर्थमाहात्म्य

नंतर नारदेश्वर तीर्थांत स्नान करावें. हें तीर्थ नारदानें निर्माण केलें आहे. पूर्वी एकदा ब्रह्मदेवाचा मानसपुत्र जो नारद त्यानें नर्मदेचे कांठीं मोठी तपश्चर्या केली. त्या तपश्चर्येनें शंकर प्रसन्न होऊन नारदाजवळ येऊन म्हणतात, हे मुने ! तुझ्या तपश्चर्येनें मी संतुष्ट झालों आहे, वर माग. नंतर नारद शंकराला म्हणतात, हे देवा ! माझी आपले ठिकाणीं कायमची भक्ति असावी, तसेंच स्वेच्छेनें मला हिंडतां यावें व मी त्रिकालज्ञ असावें. तसेंच तिन्ही लोकांत कोठेंहि युद्ध होत असल्यास तें मला निर्धास्तपणें पाहण्यास मिळावें; व हें तीर्थ माझे नांवानें प्रसिद्ध होऊन ह्याचें संनिद्ध आपल्या शिवलिंगाचीहि स्थापना करावी, एवढा मला वर द्या. नंतर शंकर नारदाला म्हणतात, तूं म्हणतोस त्याप्रमाणें सर्व सफल होईल, तूं त्रैलोक्यांत स्वच्छंदानें हिंडूं लागशील, व हें तीर्थहि तुझ्या नांवानें प्रसिद्ध होईल; एवढेंच नव्हे तर हें तीर्थ सर्व तीर्थांहून अधिक फल देणारें होईल. भाद्रपदकृष्णचतुर्दशीचे दिवशीं जे लोक ह्या तीर्थांत स्नान करून, व उपोषण करून जागरणादि करितात; त्याचप्रमाणें ह्या ठिकाणीं छत्री वगैरे ब्राह्मणांस दान करणें, श्राद्धविधि करणें, कपिला गाईचें दान करणें इत्यादि कर्मे करितात; ते निष्पाप होत्साते शिवलोकाला प्राप्त होतात, व त्यांचे पितरहि उद्धरून शिवलोकाला जातात. ह्या तीर्थाचे कांठीं विद्यादान केल्यास अक्षय्य गति प्राप्त होते. ह्या तीर्थाचे तीरावर बैल, घोडे इत्यादि ब्राह्मणास अर्पण करावें; तसेंच धान्यानें पूर्ण भरलेलीं अशीं शेतें ब्राह्मणास अर्पण करावीं; व त्याठिकाणीं अनेक वेदोक्तमंत्रांनीं सूर्याची स्तुति करावी. ह्याच तीर्थाचे कांठीं अग्निसेवा, होमहवन वगैरे कर्मे करून देवांना संतुष्ट ठेवावें. ह्या नारदेश्वर तीर्थाच्याच सेवनानें कुबेर, यम, व इंद्र त्याप्रमाणें दुसरे राजेलोक ह्या सर्वांना ऐश्वर्यप्राप्ति झाली. हें आख्यान श्रवण किंवा पठण करणाराचीं सर्व पातकें नष्ट होतात; व ते ह्या लोकीं सुख भोगून अंतकाळीं शिवलोकाला प्राप्त होतात.

---

## अध्याय ७९ वा.

### दधिस्कंद व मधुस्कंद यांचीं माहात्म्यें.

मार्कंडेय म्हणतात, धर्मा ! नंतर दधिस्कंद व मधुस्कंद ह्या दोन तीर्थांत स्नान करावें. दधिस्कंदामध्यें स्नान करून ब्राह्मणांना दहि अर्पण करावें; म्हणजे

सात जन्मांचीं पातकें नष्ट होतात; व त्यास व्याधि शोक वगैरे प्राप्त होत नाहीं. मधुस्कंदतीर्थांत स्नान करून मधयुक्त तिल पितरांच्या नांवानें ब्राह्मणांस अर्पण करावे; व पितरांना मधानें मिश्रित पिंड करून अर्पण करावे; म्हणजे सर्व पितर तृप्त होऊन आनंदानें शिवलोकाला प्राप्त होतात; व त्यांच्या कुलांत कोणालाहि दारिद्र्याची बाधा होत नाहीं. ह्या तीर्थांत स्नान करणारे शिवलोकाला प्राप्त होतात.

## अध्याय ८० वा.

### नंदिकेश्वरतीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय धर्माला म्हणतात; नंतर नंदिकेश्वरतीर्थांत स्नान करावें. ज्या ठिकाणीं नंदीला सिद्धि प्राप्त झाली. पूर्वी एकदा नर्मदानदीचे कांठीं नंदी तप करीत सर्व तीर्थांमध्यें हिंडूं लागला; शेवटीं दधिस्कंद व मधुस्कंद ह्याहि तीर्थांत स्नान करण्यास निघाला, त्या वेळीं शंकराला मोठा आनंद झाला; परंतु तेथेंहि नंदीला सिद्धि प्राप्त झाली नाहीं. नंतर तो नंदी ह्या नंदिकेश्वरतीर्थाचे ठिकाणीं येऊन तप करूं लागला असतां, तत्काळ शंकर प्रसन्न होऊन, नंदीला वर मागण्याविषयीं सांगूं लागले; त्या वेळीं नंदी शंकराला म्हणतो कीं, मला द्रव्य नको; संतति नको; तर फक्त मला तुझ्या पायाची सेवाच पाहिजे आहे. मला कोणत्याहि वाईट योनींत जन्म प्राप्त झाला तरी तुझ्या सेवेंत अंतर पडूं नये, अशी माझी इच्छा आहे. नंतर शंकर बरें आहे, असें म्हणून; व नंदीला आपल्याबरोबर घेऊन तो कैलासाला निघून गेला. ह्या तीर्थांत स्नान करून शिवाचें पूजन करणारे जे लोक त्यांना अग्निष्टोम यज्ञाचें फल प्राप्त होतें. जे कोणी ह्या तीर्थांत प्राणत्याग करतात; ते शिवगणांत राहून कैलासांत राहतात. हें आख्यान श्रवण करणारांचीं सर्व पातकें नष्ट होऊन ते शिवलोकीं जातात.

## अध्याय ८१ वा.

### वरुणेश्वरतीर्थमाहात्म्य.

नंतर वरुणेश्वरतीर्थांत स्नान करावें. हें तीर्थ वरुणानें स्थापित केलेलें आहे. ह्या वरुणानें कृच्छ्रचांद्रायणादि करून व शंकराचें पूजन करून सिद्धि मिळविली. ह्या तीर्थांत स्नान करून पितृश्राद्ध केलें असतां व शिवपूजन केलें असतां पितर शिवलोकाला प्राप्त होतात. बारा वर्षें सतत यज्ञ करून जें फल

मिळावयाचें तें ह्या तीर्थांत स्नान केल्यानें प्राप्त होतें. सर्व दानांमध्यें अन्न-दान श्रेष्ठ आहे. तें अन्नदान ह्या तीर्थाचे काठीं केल्यास शिव प्रसन्न होऊन त्यास सद्गति देतो. ह्या तीर्थांत मृत होणाऱ्यांना वरुणलोकाची प्राप्ती होते. अन्न दान देणारे पूर्णायुषी होऊन अंतकाळीं शिवलोकाला प्राप्त होतात.

## अध्याय ८२ वा.

### वह्नितीर्थादितीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात; धर्मा ! ज्याठिकाणीं अग्नीला सिद्धि प्राप्त झाली, अशा वह्नितीर्थाचे ठिकाणीं जाऊन स्नान करावें. पूर्वी कांहीं कारणामुळें दंडकारण्यांतील ऋषींनीं तूं सर्वभक्ष्य होशील, असा अग्नीला शाप दिला असतां तो अग्नि ह्या तीर्थांत स्नान केल्यामुळें शापमुक्त झाला. जे कोणी ह्या तीर्थाचे काठीं चिता पेटवून त्यांत प्रवेश करितात; ते अग्निस्वरूपाला जाऊन पोंचतात. जे कोणी येथें पितृश्राद्ध करितात त्यास अग्निष्टोम यज्ञाचें फळ मिळतें. त्यानंतर जवळच असणाऱ्या कौबेरतीर्थाचे ठिकाणीं जावें. ज्याठिकाणीं यक्षांचा राजा जो कुबेर त्यास सिद्धि प्राप्त झाली. येथें स्नान करून शिवपार्वतीचें पूजन केलें असतां व ब्राह्मणास सुवर्णादि दानें दिलीं असतां त्यांस अनंतपट फल प्राप्त होऊन मोक्षप्राप्तिहि होते. दधिस्कंदतीर्थ, मधुस्कंदतीर्थ, नंदीशतीर्थ, वरुणेश्वरतीर्थ व वह्नितीर्थ ह्या पांच तीर्थांत स्नान करून जें फल मिळत नाहीं तें फक्त एका कौबेरतीर्थाच्या स्नानानें मिळतें. ज्यांनीं मधुस्कंदादि पांच तीर्थांत स्नान करून नंतर कौबेरतीर्थांत स्नान केलें आहे, ते सूर्यलोकाला प्राप्त होतात, व ते धन्य होत. नंतर चवदा कल्पपर्यंत सूर्यलोकीं राहून पुनः ते राजकुळांत जन्माला येतात, व निरोगी स्थितींत राहून आणि सर्व वस्तूंचा उपभोग घेऊन शेवटीं मुक्त होतात. गंगा ही कनखल क्षेत्रांतच पुण्यकारक आहे. सरस्वती ही कुरुक्षेत्रामध्येंच पुण्य देणारी आहे, परंतु नर्मदा ही अत्यंत मोठें पुण्यफल देणारी आहे. प्रलयकाळीं गंगादि सर्व नद्या व समुद्र नष्ट होतात; परंतु नर्मदा ही कधींहि नष्ट होत नाहीं.

## अध्याय ८३ वा.

### हनुमंतेश्वरतीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात, आतां हनुमंतेश्वराचें माहात्म्य सांगतों, ऐका. पूर्वी रामचंद्रानें हनुमंताच्या साहाय्यानें रावणादि दुष्ट राक्षसांचा वध केल्यावर रामचंद्र

सर्व मंडळीसह सीतेला घेऊन अयोध्येंत परत आले. युद्धांत रावणाचा पुत्र जो अक्ष त्याला हनुमंतानें मारिलें असल्यामुळें त्यास ब्रह्महत्या प्राप्त झाली होती. एके दिवशीं हनुमंत कैलासपर्वतावर शंकराला भेटण्याकरीतां गेला असतां नंदी हनुमंताला म्हणतो कीं, तूं ब्रह्महत्या केली आहेस, करितां भैरवांच्या सभेंत जाण्यास अयोग्य आहेस; ह्या हेतूस्तव तूं नर्मदेंत स्नान कर; म्हणजे ब्रह्महत्येपासून मुक्त होशील; व त्यानंतर शंकरदर्शनार्थ येथें ये. असें नंदीचें भाषण ऐकून हनुमंत नर्मदेकाठीं जाऊन स्नान करून शिवाराधना करूं लागला. तात्काळ शंकर प्रसन्न होऊन त्याच्या सर्व इच्छा तृप्त करिता झाला. त्या दिवसापासून ह्या तीर्थाला हनुमंतेश्वर लिंग हें नांव प्राप्त झालें.

मार्कण्डेय म्हणतात, धर्मा ! आतां तुम्हाला ह्याबद्दल एक इतिहास सांगतों; ऐक. पूर्वी एक सुपर्वानांवाचा सदाचारी राजा होता. त्याला शतबाहु नांवाचा पुत्र होता, तो शतबाहु दुराचारी असून सर्वत्र भटकत फिरत असे. त्या शतबाहूनें फिरतां फिरतां एका अरण्यांत खांकेंत पोथ्यांचें जुडकें असलेला पिंगल नांवाचा ब्राह्मण पाहून त्यास विचारिलें कीं, तूं एकटा ह्या रानांत कोठून आलास; तें सांग. नंतर पिंगळ ब्राह्मण म्हणतो, मी कान्यकुब्ज देशाहून आलों आहे. मला राजकन्येनें हनूमंतेश्वर तीर्थांत अस्थि टाकण्याकरितां पाठविलें आहे. असें ऐकून शतबाहु ब्राह्मणास विचारितो कीं, हनूमंतेश्वरांत अस्थि कां टाकाव्या ? तें सांग. असा राजाचा प्रश्न ऐकून ब्राह्मण म्हणतो; कान्यकुब्ज देशांत शिखंडी नांवाचा राजा होता, त्याला पुत्र नसून एकच कन्या होती. तिनें विवाह करण्याचें नाकारल्यामुळें ती अजून पितृगृहींच आहे. तिचा बाप स्वर्गस्थ झाल्यामुळें तिच्या सांगण्यावरून ह्या आस्थि टाकण्यास मी हनूमंतेश्वर तीर्थाला जात आहे. नंतर पिंगल ब्राह्मण व वज्रबाहू दोघेहि हनुमंतेश्वराला प्राप्त झाले. तेथें जाऊन; ते स्नान करून तीर्थांत अस्थि टाकतात तोंच आकांशातून पुष्पवृष्टि झाली; व तत्काल तेथें विमान येऊन ज्या राजाच्या अस्थि तीर्थांत टाकिल्या होत्या त्या राजास विमानांत घालून शिवगण ह्यांच्या समक्ष त्यास स्वर्गांत घेऊन जाते झाले. हा तीर्थमहिमा प्रत्यक्ष पाहून शतबाहु राजानें पंधरा दिवसपर्यंत सतत उपोषण, स्नान वगैरे करून तो निष्पाप होत्साता विमानांत बसून शिवलोकाला गेला. नंतर कांहीं काळानें शतबाहूच्या आग्रहावरून पिंगल ब्राह्मणालाही शिवलोकाची प्राप्ति झाली. अशातऱ्हेनें हें तीर्थ सर्व पापांचें हरण करणारें आहे. हें माहात्म्य श्रवण व पठण करणारांचीं सर्व पातकें नष्ट होऊन त्यांस शिवलोकप्राप्ति होते.

# अध्याय ८४ वा.

## रामेश्वरादितीर्थमाहात्म्य.

मार्कंडेय म्हणतात, धर्मा! पूर्वी शंकरानें कार्तिकस्वामीला रामेश्वरादितीर्थांचें माहात्म्य सांगितलें होतें, तेंच मी तुह्मांस सांगतों. पूर्वी रामरावणयुद्धामध्यें रावणादि चवदा कोट राक्षस रामानें मारिले असतां सर्व त्रैलोक्याला आनंद झाला. नंतर सीतेसह राम अयोध्येंत येऊन राज्यारूढ झाल्यानंतर हनूमान् स्वतःला कृतार्थ झालों, असें समजून कैलासाला निघून गेला. शंकराच्या द्वारावर नंदि होता तो हनूमंताला आंत येऊं देईना, त्या वेळीं हनूमंत नंदीला म्हणतो की, मी असें कोणतें पातक केलें आहे कीं, ज्यायोगें तूं मला शंकराकडे आंत जाऊं देत नाहींस. इतक्यांत जो नंदीचें, व हनुमंताचें भाषण होत आहे, तोंच शंकर तेथें प्रगट होऊन हनुमंताला म्हणतात; कीं, तूं गंगा, गया, नर्मदा, यमुना, सरस्वती ह्या सर्व नद्या पापें दूर करणाऱ्या आहेत; करितां त्या त्या ठिकाणीं जाऊन स्नान कर; म्हणजे निष्पाप होशील. नंतर तूं नर्मदेच्या दक्षिणतीरावर सोमनाथानजीक स्नान कर; म्हणजे तुझीं मोठमोठीं सर्व पातकें लयाला जातील. नंतर हनूमंतानें गंगादितीर्थांत स्नान करून नंतर नर्मदेच्या दक्षिणतीरावर सोमनाथाचे शेजारीं जाऊन तप केलें. तत्काल शंकरानें त्यास आलिंगन देऊन कपितीर्थ या नांवानें तेथें एक तीर्थ निर्माण केलें. नंतर हनुमंत रामाजवळ येऊन त्यानें रामचंद्राला झालेला सर्व वृत्तान्त व नर्मदामाहात्म्य सांगितलें. तें ऐकून राम व लक्ष्मण उभयतां आपआपल्या रावणादिकांची हत्या केलेल्या दोषापासून स्वतःची मुक्तता करून घ्यावी; म्हणून कपितीर्थासन्निध्द येऊन घोर तपश्चर्या करिते झाले. नंतर चोवीस वर्षें तपश्चर्या झाल्यावर उभयतांनीं आपआपल्या नांवानें; म्हणजे रामेश्वर व लक्ष्मणेश्वर ह्या नांवानें शिवलिंग स्थापन केलें, त्यायोगें राम व लक्ष्मण हे निष्पाप झाले. शंकर आपल्या शिवगणांसह व ब्रह्मादिदेवांसह रामलक्ष्मण जेथें तप करीत होते त्याठिकाणीं प्राप्त होऊन त्यांनीं त्यांस वर दिला कीं, तुम्ही स्थापित केलेलीं हीं दोन स्थानें सर्वश्रेष्ठ होऊन ह्याठिकाणीं मी स्वतः वास करीन. नंतर सर्व ऋषींनीं अनेक तीर्थोदकानें युक्त असा कुंभ ( घट ) त्याठिकाणीं स्थापित करून एक शिवलिंगहि स्थापित केलें; व त्यास कुंभेश्वर असें नांव ठेविलें. ज्या वेळीं गुरूनें युक्त शनि कन्या राशीला येतो, त्या वेळीं सर्व तीर्थें ह्याठिकाणीं प्राप्त होतात; करितां अशा समयाला ह्या तीर्थांत स्नान करून शिवलिंगपूजन करणारांना तत्काल शिवलोक प्राप्त होतो. जे कुंभेश्वर तीर्थांत स्नान करून पितृश्राद्ध करतात त्यांचे पितर जितके अंगावर केस आहेत

तितकीं वर्षें आनंदानें शिवलोकामध्यें राहतात. सिंहराशीला गुरु गेला असतां गोदावरी स्नानाचें जें फळ मिळतें त्याचें बारापट अधिक फल कुंभेश्वरतीर्थीत स्नान केल्यानें प्राप्त होतें. ह्याप्रमाणें रामेश्वर, लक्ष्मणेश्वर, व कुंभेश्वर ह्या तीर्थांस वर देऊन शंकर परिवारांसह स्वस्थानीं निघून गेले. जोंपर्यंत रामेश्वर, लक्ष्मणेश्वर व कुंभेश्वर ह्या तीर्थांत स्नान केलें नाहीं, तोंपर्यंत [illegible] पाप राहतें, करितां प्रत्येकानें एकदां तरी ह्या तीर्थांत स्नान करावें.

---

## अध्याय ८५ वा.

### सोमनाथतीर्थमाहात्म्य.

मार्कंडेय म्हणतात, धर्मा ! आतां सोमनाथतीर्थाचें माहात्म्य सांगतों, ऐका. प्रथम ब्रह्मदेवापासून दहा मरीचिप्रमुख ऋषि उत्पन्न झाले. पैकीं ब्रह्मपुत्र जो दक्ष त्याला पन्नास मुली झाल्या. त्यांपैकीं दहा धर्माला, तेरा कश्यपाला, सत्तावीस चंद्राला दिल्या. त्या सत्तावीसांपैकीं चंद्राला रोहिणीच फार प्रिय झाली. दक्षाला हा चंद्रानें केलेला पक्षपात न आवडून त्यानें चंद्राला शाप दिला कीं, तूं क्षयरोगी होशील, त्या शापामुळें चंद्र निस्तेज होऊन क्षयी झाला. चंद्र ब्रह्मदेवाकडे जाऊन त्याला शरण गेला; व त्यास म्हणतो कीं, दक्षानें मला शाप देऊन माझी अशी स्थिति केली आहे, करितां आतां मी शापमुक्त कसा होईन ! तें सांगा. नंतर ब्रह्मदेव चंद्राला म्हणतात कीं, तूं जेथें नर्मदा समुद्राला मिळाली आहे, अशा ठिकाणीं जाऊन शिवाराधना कर, म्हणजे शापमुक्त होशील. नंतर चंद्र ब्रह्मदेवाच्या सांगण्याप्रमाणें तेथें जाऊन तपश्चर्येनें शंकराला प्रसन्न करून घेता झाला. तत्काळ शंकर तेथें प्रगट होताच चंद्रानें त्याची उत्कट स्तुति केली. स्तुतीनें प्रसन्न झालेल्या शंकरानें ' वर माग ' असें म्हणतांच 'दक्ष-शापापासून मुक्त करा ' असा वर मागितला; व शंकरानें त्यास शापमुक्त व रोगमुक्तहि करून टाकिलें. ह्या ठिकाणीं एक शिवलिंग स्थापित करून त्या लिंगाचें व त्या तीर्थाचें नांव सोमनाथ असें ठेविलें. सोमनाथ नांव ठेवण्याचें कारण ह्या ठिकाणीं सोम म्हणजे चंद्र त्याला सिद्धि प्राप्त झाली हेंच होय.

आतां तुम्हांला ह्याविषयीं एक इतिहास सांगतों. पूर्वी शंबर ह्या नांवाचा एक राजा होता; त्याला त्रिलोचन नांवाचा पुत्र होता; त्या त्रिलोचनाला कण्व नांवाचा एक पुत्र झाला. तो कण्व महापापी होता. कण्व मृगया करण्याकरितां गेला असतां एक ब्राह्मण त्याचेकडून मारला गेला; त्यामुळें कण्वाला ब्रह्महत्या

लागली. तो फिरत फिरत नर्मदेच्या तीरीं प्राप्त होऊन; व नर्मदातीर्थांत स्नान करून सोमनाथाचें पूजन करता झाला; नंतर मृगया करून थकलेला असा कण्व एका झाडाच्या सावलीखालीं स्वस्थ झोपीं गेला असतां एक ब्राह्मण त्याच सोमनाथतीर्थांत स्नान करण्याकरितां निघाला; व त्यास हातांत पाश घेतलेली अशी एक स्त्री हांक मारून ह्मणूं लागली कीं, तूं जर नर्मदा-संगमावर जात असलास तर माझ्या पतीला माझा निरोप सांग कीं, तुझी बायको एकटीच रानामध्यें फिरत आहे; तिची व्यवस्था कर. ह्याप्रमाणें त्या स्त्रीचें भाषण ऐकून तो ब्राह्मण कण्वाजवळ येऊन सर्व वर्तमान सांगूं लागला. नंतर कण्व ब्राह्मणाला म्हणतो कीं, तूं पुनः त्या स्त्रीजवळ जाऊन तूं कोण वगैरे चवकशी कर. कण्वाच्या सांगण्याप्रमाणें ब्राह्मण त्या स्त्रीजवळ येऊन सर्व हकीगत विचारिता झाला. ती स्त्री म्हणत्ये कीं, मी ब्रह्महत्या आहे. कण्वानें ब्राह्मणाला मारल्यामुळें त्याचा माझा कांहीं वेळ समागम होता; परंतु त्यानें सोम-नाथतीर्थांत स्नान केल्यामुळें त्याचा मला असह्य असा वियोग झाला आहे; करितां तूं त्याला माझेकडे पाठवून दे. मी तेथें त्या तीर्थाचे आसपास एक मैल-पर्यंतच्या प्रदेशांत येऊं शकणार नाहीं. असें त्या स्त्रीचें भाषण ऐकून ब्राह्मण कण्वाजवळ येऊन त्या स्त्रीचें सर्व भाषण त्यास सांगता झाला. तें ऐकून कण्वाला फारच वाईट वाटलें, व हा सोमनाथाचा प्रभाव आहे, असें जाणून; व ह्या तीर्थाचे काठीं देहत्याग करण्याचा विचार करून त्यानें चिता पेटविली; व स्नान करून आणि सोमनाथाचें पूजन करून चितेला तीन प्रदक्षिणा घातल्या; व भगवद्ध्यान करीत करीत चितेंत उडी टाकिली. हा प्रकार पाहून देवांनीं तत्काल त्याचेंवर पुष्पवृष्टि केली. नंतर कण्वराजा विमानांत बसून शिवलोकीं गेला.

मार्कंण्डेय म्हणतात; हे धर्मा ! शुक्लपक्षांतील अष्टमी किंवा चतुर्दशी रविवारीं असेल तर त्या दिवशीं उपोषण; व जागरण करून षोडशोपचारानें सोमनाथाचें पूजन करावें. सोमवारीं अष्टमी असतां सत्पात्र ब्राह्मण बोलावून त्यांचें पूजन करावें. सोमनाथाचे ठिकाणीं पितृश्राद्ध करणारे पितरांसह अखंड शिवलोकीं राहतात. ह्या तीर्थाचे काठीं यथाशास्त्र कपिलागाईचें दान केलें असतां तो सत्य-लोकाला प्राप्त होतो. पूर्णिमा, व्यतीपात, वैधृति, सूर्यसंक्रांत, क्षयतिथि, गजच्छायापर्व, सूर्यग्रहण वगैरे दिवशीं सोमनाथतीर्थांत स्नान करून सोम-नाथाचें पूजन करणारे सर्व पापापासून मुक्त होऊन दुर्लभ अशा मोक्षाला प्राप्त होतात. जो सोमनाथाला प्रदक्षिणा घालतो, त्याला पृथ्वीप्रदक्षिणेचें पुण्य लागतें. ह्याठिकाणीं स्नान करणारांचे ब्रह्महत्यादि दोष नाश पावतात. हें आख्यान श्रवण करणारांची वंशवृद्धि होऊन; त्यास अंतीं मोक्षहि मिळतो.

---

## अध्याय ८६ वा.



### पिंगलेश्वरतीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात; हें तीर्थ अग्नीनें स्थापिलेलें आहे. ज्या वेळीं शंकर पार्वतीसह क्रीडा करीत असतां देवांच्या आज्ञेनें अग्नि गुप्तरूपानें शंकराजवळ जाऊन वीर्यभिक्षा मागूं लागला त्या वेळीं शंकरानें आपलें वीर्य अग्नीच्या मुखांत ठेविलें. अग्नीच्या शरीराचा शिववीर्यानें दाह होत असतां त्या दाहाची शांति व्हावी म्हणून अग्नि तीर्थयात्रा करण्यास निघाला; तो नर्मदेकाठीं शिवाराधना करूं लागला. नंतर शंकर प्रसन्न होऊन अग्नीच्या दाहाची शांति करते झाले. अग्नीनें त्या ठिकाणीं पिंगलेश्वर नांवानें शिवलिंग स्थापन केलें. ह्या तीर्थाचे ठिकाणीं स्नान, उपोषण वगैरे करून पिंगलेश्वराचें पूजन करणाऱ्यांचीं सर्व दुःखें नाहिंशीं होतात; व ते शिवलोकाला प्राप्त होतात. हें आख्यान मुक्ति देणारें आहे.

---

## अध्याय ८७ वा.



### ऋणत्रयमोचनतीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात; धर्मा ! नंतर ऋणत्रयमोचनतीर्थांत स्नान करावें. हें तीर्थ ब्रह्मवर्गानीं स्थापित केलेलें आहे. हें तीर्थ नर्मदानदीचे काठीं असून ह्या तीर्थांत स्नान करणारे देवऋण, ब्रह्मऋण; व पितृऋण ह्या तीनहि ऋणापासून मुक्त होतात, म्हणून ह्या तीर्थास ऋणत्रयमोचनतीर्थ असें म्हणतात. त्या तीर्थांत स्नान करून दानधर्म करणारास शिवलोकाची प्राप्ति होते. हें आख्यान श्रवण व पठण करणारे ह्या लोकीं सुख भोगून अंतकालीं शिवलोकाला जातात.

---

## अध्याय ८८ वा.



### कपिलेश्वरमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात; धर्मा ! नंतर कपिलानें स्थापिलेल्या कपिलेश्वरतीर्थांत स्नान करावें. शुक्लपक्षांतील अष्टमीला व चतुर्दशीला कपिला गाईच्या दुधानें कपिलेश्वराला स्नान घालावें; व शिवलिंगाला सुगंधी चंदनाची उटी घालावी. नंतर

पुष्पादिकांनीं त्याची पूजा करावी; म्हणजे सर्व पापापासून मुक्त होऊन ते दुर्लभ अशा मोक्षाला प्राप्त होतात. ह्या तीर्थांत स्नान करून ब्राह्मणांच्या पूजाविधिपूर्वक त्यास गोप्रदानादि दानें द्यावींत व भोजन घालावें; म्हणजे ह्या लोकीं राज्यप्राप्ति व सर्व सुखें प्राप्त होऊन शिवलोकाचीहि अंतीं प्राप्ति होते.

## अध्याय ८९ वा.



### पूतिकेश्वरादितीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात; धर्मा ! नंतर पूतिकेश्वर तीर्थांत स्नान करावें. हें तीर्थ प्रसेजिनजित नामक राजानें स्थापित केलें आहे. पूर्वी प्रसेनजित नामक राजाच्या वक्षस्थलाचें ठिकाणीं देदिप्यमान असा एक स्यमंतक नांवाचा मणि होता. तो रानांत शिकार करण्यास गेला असतां त्या मण्याची चोहोंकडे फांकलेली कांति पाहून जांबुवान् नांवाचा एक अस्वल आपल्या गुहेंतून बाहेर पडला, व तो प्रसेनजिताच्या अंगावर धांवत जाऊन त्यांच्या गळ्यांतील तो स्यमंतक घेऊन आपल्या गुहेंत निघून गेला. जांबुवंताच्या तीक्ष्ण नखांच्या प्रहारानें प्रसेनजिताच्या वक्षस्थलाला क्षत पडून त्यांतून पूति म्हणजे घाण सुटून पू वगैरे वाहूं लागला असतां तो प्रसेनजित नर्मदा नदीचे कांठीं स्नान करून पुष्कळ काळपर्यंत घोर तपश्चर्या करून शंकराला प्रसन्न घेता झाला. नंतर शंकर प्रसन्न होऊन शंकरानें त्याचा व्रण नाहींसा करून त्या राजाचा देह कांतीनें युक्त केला; व शंकर गुप्त झाले. नंतर प्रसेनजितानें तेथें शिवलिंग स्थापित करून पूति म्हणजे दुर्गंधि नाश करणारे हें स्थान असल्यामुळें ह्यास पूतिकेश्वर हें नांव दिलें. ह्या तीर्थांत स्नान करून पूतिकेश्वराचें पूजन करणारे शिवलोकाला जातात.

## अध्याय ९० वा.

### जलशायितीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात;–धर्मा ! नर्मदेच्या उत्तर तीरावर वैष्णवांचें जलशायी नांवाचें एक तीर्थ आहे. विष्णूनें दैत्यांचा वध केल्यानंतर रक्तांनीं माखलेलें आपलें सुदर्शनचक्र ह्या तीर्थांत धुवून त्याठिकाणीं शेषावर शयन केलें. पूर्वी तालमेघ या नांवाचा एक दैत्य होता. त्यानें सर्व देव जिंकून यज्ञयागादि

पुण्यकर्मेंहि बंद केलीं होतीं. त्या वेळीं इंद्रादिदेव ब्रह्मदेवाला शरण जाऊन तालमेघानें दिलेल्या त्रासाबद्दल त्यांनीं सर्व वर्तमान निवेदन केलें. ब्रह्मदेव इंद्रादिकांना घेऊन विष्णूकडे गेला; व त्यानें विष्णूला सर्व हकीगत सांगितली. विष्णूनें देवांना आश्वासन देऊन त्यांस स्वस्थानीं जाण्यास सांगितलें. नंतर विष्णु गरुडावर बसून व हातांत चक्र घेऊन तालमेघाबरोबर युद्ध करण्यास निघाले. दोघांचें भयंकर युद्ध होऊन त्यांत विष्णूनें आपल्या सुदर्शनचक्रानें तालमेघाचा शिरश्छेद केला. विष्णूनें नर्मदेच्या काठीं येऊन त्या जलशायि-तीर्थासमीप आपलें रक्तमिश्रित चक्र तीर्थोदकांत धुवून साफ केलें; त्यायोगें त्या चक्राला शुद्धता प्राप्त झाली; म्हणून ह्या जलशायितीर्थाला कोणी चक्रतीर्थ म्हणतात, कोणी कालाघनाशक तीर्थ म्हणतात. सर्व महिन्यामध्यें मार्गशीर्ष महिना श्रेष्ठ आहे; करितां मार्गशीर्ष शुद्ध एकादशीच्या दिवशीं निष्कामबुद्धीनें जलशायितीर्थामध्यें स्नान करून विष्णूचें पूजन करणारे विष्णुलोकाला प्राप्त होतात. ह्या जलशायितीर्थांत स्नान करणारांना चांद्रायण, कृच्छ्र, पक्षोपवास, मासोपवास इत्यादि कर्मांचीं फळें मिळून अक्षय्यगति प्राप्त होते.

आतां तिलधेनूचें माहात्म्य सांगतों; ऐका. एक, घर, एक गाय, एक शय्या ही एकाच ब्राह्मणाला द्यावी, पुष्कळ ब्राह्मणांना देऊं नये. पांढरे व काळे तीळ एकत्र करून त्या तिळाची एक गाय व एक वासरूं करावें. कमी-तकमी सव्वाखंडी तीळाची गाय व पावणेतेरा शेराचें वासरूं तयार करावें. त्या गाईच्या कानांत रत्नें घालावीं. चंदनाची उटी गाईला लावावी. कांबळें, मध, तूप, गहूं, दुधाची खीर वगैरेसह सोन्याच्या शिंगाची व रुप्याच्या खुरांची गाय ब्राह्मणास अर्पण करावी. ह्या तिलधेनूच्या दानानें पंचमहापातकें व वार्तिकसारिक दुसरींहि सर्व पातकें नष्ट होतात. ही तिलधेनु कपटी, अंधळा, कुरूप, अविद्वान्, तेल तूप विकणारा ब्राह्मण, मित्राजवळ भांडणारा वगैरे ब्राह्मणास देऊं नये; तर सुरूप विद्वान् अशा ब्राह्मणास माघी किंवा कार्तिकी पौर्णिमेला किंवा वैशाख, मार्गशीर्ष आषाढ व चैत्र ह्यापैकीं एकाद्या महिन्यांत तिलधेनु दान द्यावी. जे जलशायितीर्थांत स्नान करून तिलधेनुदान करितात, त्यांस अक्षय्य विष्णुलोकाची प्राप्ति होते.

## अध्याय ९१ वा.

### चंडादित्यतीर्थमाहात्म्य.

मार्कंडेय ह्मणतात; पूर्वीं चंड व मुंड या नांवाचे दोन दैत्य होते. त्या दोघांनीं नर्मदानदीचे कांठीं मोठी तपश्चर्या केली. तपश्चर्येनें सूर्यनारायण

संतुष्ट होऊन त्यांस वर देण्यास तयार झाले, नंतर चंड-मुंड दैत्य सूर्याचें स्तुति करून त्यास ह्मणतात कीं, आह्मी देवांना अजिंक्य होऊन निरोगी व्हावें. एवढीच आमची इच्छा आहे; व ती आपण पूर्ण करावी; नंतर सूर्यनारायणानें चंड-मुंडास त्यांच्या इच्छेप्रमाणें वर दिले; व तो अंतर्धान पावला. सूर्यनारायण स्वस्थानीं गेल्यावर चंड व मुंड ह्या उभयतांनीं चंडादित्यतीर्थ या नांवानें एक तीर्थ स्थापित केलें. जे कोणी ह्या ठिकाणीं देव, मनुष्य व पितर ह्यांची तृप्ति करितात, ते सूर्यलोकांत कल्पपर्यंत राहून सुखी होतात. षष्ठी तिथीचे दिवशी तेथें दीप लावावा; ह्मणजे प्राणी सर्व पापापासून मुक्त होतो; व सूर्यलोकांत जातो. जे कोणी हें चंडादित्यतीर्थमाहात्म्य श्रवण करितील ते विजयी होतील.

---

## अध्याय ९२ वा.

### यमहास्यतीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय ह्मणतात; हे धर्मा ! नंतर यमहास्यतीर्थाला जाऊन स्नान करावें आतां हें तीर्थ कसें उत्पन्न झालें, तें तुह्माला सांगतो. पूर्वी तुझा पिता यम नर्मदा नदीवर स्नान करण्यास आला असतां, ज्याप्रमाणें धोब्यानें धुतलेलें वस्त्र निर्मल होतें, त्याप्रमाणें हा तेथें स्नान करून निर्मल झाला. हा प्रकार पाहून यमाला आश्चर्यानें हास्य आलें; व आपल्याशींच ह्मणतो कीं, असें हें पुण्यकारक स्थान असतां प्राणि माझ्या लोकाला कसे प्राप्त होतात, असें ह्मणून त्या पुण्य-स्थानाचे ठिकाणीं एक शिवलिंग स्थापित केलें; व तेथील तीर्थास यमहास्यतीर्थ हें नांव दिलें; व यम स्वस्थानीं निघून गेला. यमहास्यतीर्थांत आश्विन कृष्ण चतुर्दशीला स्नान करून व उपोषण करून यमहास्येश्वराचें पूजन व रात्रीं जागरण करावें. जे कोणी अमावास्येला सुवर्ण किंवा भूमि दान करतात तसेच ह्या ठिकाणीं तिलदान, कृष्णाजिनदान वगैरे दानें करतात ते निष्पाप होत्साते शिव-लोकाला प्राप्त होतात. यमाचें वाहन रेडा असल्यामुळें ह्या तीर्थांत रेडा ब्राह्म-णास दान द्यावा; ह्मणजे यम संतुष्ट होतो. त्याप्रमाणें दुसरींहि अनेक दानें ह्या तीर्थाचे कांठीं दिलीं असतां, त्यास असिपत्रवन, कुंभीपाक इत्यादि नरकांत जावें लागत नाहीं; व त्यास शिवलोक प्राप्त होतो. हें आख्यान श्रवण व पठण करणारे निष्पाप होऊन व इहलोकीं सुखी होऊन अंतीं मोक्षाला प्राप्त होतात.

## अध्याय ९३ वा.

### कल्होडीतीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात;–नंतर कल्होडीतीर्थाला जावें. जें तीर्थ सर्व पातकांचें क्षालन करणारें आहे. ह्या तीर्थांत साक्षात् गंगा पशूंचें रूप घेऊन स्नान करण्याकरितां आली होती; म्हणून ह्या तीर्थाला कल्होडीतीर्थ म्हणतात. पौर्णिमेचे दिवशीं ह्या तीर्थांत तीन दिवस स्नान करून व कामादि षड्रिपूंचा त्याग करून शिवलिंगपूजन करणारांना मोक्षप्राप्ति होते. ह्या तीर्थाचे ठिकाणीं स्थापिलेल्या शिवलिंगाला गाईच्या दुधानें "ॐ नमः शिवाय" ह्या षडक्षर मंत्राचा जप करून स्नान घालावें. शुभ्रवर्णाची गाय ब्राह्मणास दान द्यावी; म्हणजे शिवलोकाची अखंड प्राप्ति होऊन सौख्यादि प्राप्त होतात.

## अध्याय ९४ वा.

### नंदिकेश्वरतीर्थमाहात्म्य.

नंतर नंदिकेश्वर तीर्थाला जावें. हें तीर्थ सर्व पापांचें हरण करणारें असून नंदीनें स्थापिलेलें असें आहे. पापी लोकांचीं सर्व पातकें दूर करून मोक्षप्राप्ति करून देणारें असें हें एकच तीर्थ आहे. ह्या नंदितीर्थाचे ठिकाणीं स्नान करून नंदिकेश्वराचें षोडशोपचारविधीनें पूजा करावी; व ब्राह्मणांना अनेक दानें देऊन उपोषण जागरणादि कृत्यें करावीं; म्हणजे त्यायोगें आपणास सद्गति प्राप्त होते.

## अध्याय ९५ वा.

—:0:—

### नारायणतीर्थमाहात्म्य.

नंतर बदरिकाश्रमाला जावें. जेथें नरनारायणाचा वास प्रत्यक्ष स्वरूपानें आहे. ह्या तीर्थाचें महात्म्य साक्षात् शंकरानें स्वमुखानें गायिलें आहे. एकदां नरनारायणांनीं लोकोपकारार्थ नर्मदातीरीं शंकराची उपासना करून एक लिंग स्थापित केलें; तेंच हें नारायणतीर्थ होय; व बदरिकाश्रमहि ह्याच क्षेत्राला म्हणतात. चैत्रशुद्ध अष्टमी किंवा चतुर्दशीचे दिवशीं नारायणतीर्थांत स्नान

करून शिवलिंगपूजन करावें; म्हणजे त्यास शिवलोकाची प्राप्ति होईल. जो कोणी उपोषण करून नारायणतीर्थांत स्नान करितो तो कल्पकालपर्यंत शिवलोकांत जाऊन राहतो. हें आख्यान व माहात्म्य श्रवण; किंवा पठण करणारांचींहि सर्व पापें नष्ट होऊन तेहि सद्गतीला जातात.

## अध्याय ९६ वा.



### कोटीश्वरतीर्थमाहात्म्य.

नंतर कोटीश्वरतीर्थांत स्नान करावें. त्या ठिकाणीं एक कोट ऋषि येऊन त्यांनीं हें लिंग शंकराच्या आज्ञेनें स्थापित केलें आहे. म्हणून त्यास कोटितीर्थ म्हणतात. जे कोणी पूर्णिमेला पितरांस तृप्त करण्याच्या बुद्धीनें त्या तीर्थांत स्नान करून श्राद्धादि विधि करतात; व त्यांतून विशेषतः श्रावणी पौर्णिमेला जे त्या ठिकाणीं श्राद्ध करितात त्यांचे पितर अखंड तृप्त राहून वंशवृद्धि होण्याबद्दल श्राद्ध करणारांस आशीर्वाद देतात. हें तीर्थ प्रत्येक प्राणिमात्राचीं सर्व दुःखें नष्ट करून त्यास अखंड मोक्षप्राप्ति करून देणारें आहे.

## अध्याय ९७ वा.

### व्यासतीर्थमाहात्म्य.

नंतर व्यासतीर्थाला जावें. त्या ठिकाणी व्यासांचा वास असल्यामुळें कलिप्रवेश होण्याची मुळीच भीति नाहीं. आतां तुम्हाला व्यासतीर्थाची उत्पत्ति सांगतों. पूर्वीं पराशर नांवाचा एक ऋषि होता. त्यानें गंगेंत राहून बारा वर्षें घोर तपश्चर्या केली. नंतर गंगेतून बाहेर येऊन भिक्षा मागण्याकरितां फिरत असतां एक सुंदर स्त्री पराशराच्या दृष्टीस पडली. तिला पाहून पराशर कामपीडित झाले असतां ती स्त्री म्हणते कीं, मी धीवराची कन्या आहे; व आपण ब्राह्मण आहां, तेव्हां आपण मनांत आणलेला विचार निरर्थक आहे. असें तिचें भाषण ऐकून पराशर म्हणतात; हे स्त्रिये, तूं धीवराची म्हणजे कोळ्याची कन्या नसून राजकन्या आहेस. वसु नांवाचा एक जंबुद्वीपचा राजा आहे. त्याला सातशें बायका व दहा मुलगे आहेत. कांहीं म्लेच्छ लोक त्या राजाला पीडा देऊं लागले असतां तो त्या म्लेच्छांचा पाडाव करण्या-

करितां समुद्र उल्लंघून पलीकडे गेला व सर्व म्लेच्छ त्यानें पराजित केले. वसुराजा द्वीपांतराला समुद्रापलीकडे गेला असतां त्याची पत्नी म्हणजे तुझी माता ऋतुस्नात झाली. द्वीपान्तराला जाण्यास तेथील कोणीहि समर्थ नसल्यामुळें राजाला इकडील वर्तमान कळविण्याकरितां एक पत्र पोपटाचे चोचींत देऊन व द्वीपांतराला जाऊन ते राजाला देण्याकरितां पोपटास सांगून त्यास राजपत्नीनें द्वीपांतरांत पाठवून दिलें. पत्र राजानें वाचून व त्या पत्राचा तो अभिप्राय जाणून आपलें अमोघवीर्य पेटींत घालून तें राजपत्नीचे जवळ देण्याकरितां पोपटाजवळ दिलें. तो पोपट परत येण्यास निघाला असतां वाटेंत ससाण्यासी व त्याची गांठ पडली. ससाण्याचें व पोपटाचें द्वंद्वयुद्ध सुरू झाल्यामुळें पोपटाच्या चोंचीतील पेटी पाण्यांत पडली; ती एका माशानें गिळिली. त्या पेटींत राजाचें वीर्य आल्यामुळें; व तें बीज माशाचे पोटांत गेल्यामुळें मासा गरोदर राहिला. तो मासा एका कोळ्यानें आपल्या घरीं आणून चिरला असतां त्यांत तुझी मूर्ति त्याचें दृष्टीस पडली. तुला पाहून कोळ्याला अत्यानंद झाला. हें आपलें जन्माख्यान ऐकून तिला आनंद झाला. पुढें पराशराच्या इच्छेप्रमाणे त्याचा काम शांत केला; व पराशराच्या कृपेनें व अंगस्पर्शानें तिच्या अंगाला जो दुर्गंधी येत होती तीहि दूर होऊन तिचें अंग सुगंधित झालें. पराशराचें अमोघ वीर्य तिनें धारण केल्यामुळें ती गरोदर राहून तत्काल तिला आठ वर्षांचा ब्रह्मचारी असा पुत्र झाला. तेच व्यास होत. नंतर पराशर तिला म्हणतात कीं, जरी तुला पुत्र झाला आहे, तरी माझ्या तपःसामर्थ्यानें तुझी कुमारिकावस्था कायमच राहील; व तुला शंतनुराजा वरील; काळजी करण्याचें कारण नाहीं. आजपासून तुला योजनगंधा किंवा सत्यवती अशा नांवानें लोक हांक मारितील; तूं स्वस्थानीं जा, असें म्हणून पराशर निघून गेले. नंतर तो आठ वर्षांचा पुत्र म्हणजे व्यास आपल्या मातेला म्हणतो कीं, मला तप करावयाची आज्ञा दे. हें पुत्राचें भाषण ऐकून सत्यवती म्हणत्ये; तूं मला टाकून जाऊं नको; तुझ्या वियोगानें मी एक क्षणभर सुद्धा जिवंत राहूं शकणार नाहीं. त्याप्रमाणें मातेचें भाषण ऐकून व्यास म्हणतात; तूं दुःख करूं नकोस. मी तुझ्या जवळच आहे, असें समज. ज्या वेळीं तुझ्यावर संकट उपस्थित होईल त्या वेळीं तूं माझें स्मरण कर; म्हणजे मी तुझ्याजवळ येईन, असें म्हणून व्यास तेथून निघाले. ते एका अरण्यांत जाऊन बसले असतां सर्व देव; व नारदादि ऋषि त्याठिकाणीं येऊन; व व्यासाचे गर्भाधानादि सर्व संस्कार करून त्यास ज्ञानोपदेशहि करिते झाले. नंतर व्यास तीर्थयात्रा करण्याकरितां निघाले ते नर्मदानदीवर येऊन अनेकप्रकारानें घोर तपश्चर्या करिते झाले. शंकर प्रसन्न होऊन व्यासांना म्हणतात कीं, मी तुम्हाला वर देण्याकरितां आलों आहे, करितां

आपली कांहीं इच्छा असल्यास वर मागा. नंतर व्यास म्हणतात; आपली स्थापना ह्या ठिकाणीं करून हें स्थान माझें नांवानें प्रसिद्ध व्हावें, अशी माझी इच्छा आहे; व ही माझी इच्छा आपण पूर्ण करावी. असें व्यासभाषण ऐकतांच शंकर बरें आहे, असें म्हणून स्वस्थानीं निघून गेले. पुढें व्यासाला शुक्राचार्य नांवाचा पुत्र झाला. व्यासांनीं नर्मदेचे काठीं तप करून तेथें जें शिवलिंग स्थापून तीर्थ निर्माण केलें. त्यासच व्यासतीर्थ म्हणतात. ह्याच व्यासतीर्थाचे ठिकाणीं स्नान करून; व कार्तिक शुद्ध चतुर्दशीला उपोषण व जागरण करून भक्तीनें व्यासेश्वरलिंगाचें पूजन केल्यास ईश्वर संतुष्ट होऊन, त्यांस आपल्या लोकाला; म्हणजे शिवलोकाला घेऊन जातात. ह्या तीर्थाचे काठीं ब्राह्मणांना छत्री, जोडा, वस्त्र, शया वगैरे दान दिल्यास त्याला स्वर्गलोक प्राप्त होतो. ह्या तीर्थाचे ठिकाणीं ब्राह्मणाला तिलधेनु द्यावी; व कृष्णाजिनादि अनेक दानें द्यावीं; म्हणजे त्यास ब्रह्मलोकाची प्राप्ति होते. जो व्यासतीर्थांत स्नान करून व्यासेश्वराला प्रदक्षिणा करितो, त्यास संपूर्ण पृथ्वी दान दिल्याचें पुण्य लागतें. जे कोणी हें व्यासजन्माख्यान श्रवण; किंवा पठण करितात, ते निष्पाप होत्साते, अखंड शिवलोकाला जाऊन आनंदानें राहतात.

## अध्याय ९८ वा.

### प्रभासतीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय ह्मणतात; धर्मा ! नंतर प्रभासतीर्थाला जावें. हें तीर्थ त्रैलोक्यांत प्रसिद्ध आहे. पूर्वीं सूर्याची पत्नी प्रभा, हिनें शंकराची आराधना केली. शंकर प्रसन्न होऊन तिला इच्छित वर देता झाला. नंतर शंकराच्या आज्ञेवरून प्रभेनें प्रभासनांवानें एक तीर्थ व शिवलिंग नर्मदेचे काठीं स्थापित केलें. ह्या तीर्थांत स्नान केलें असतां सर्व तीर्थांत स्नान केल्याचें पुण्य प्राप्त होतें. ह्या तीर्थाचे काठीं गोप्रदानादि शुभ कर्मे करणारांस अक्षय्य शिवलोकाची प्राप्ति होते. हें आख्यान श्रवण व पठण करणारे निष्पाप होऊन ब्रह्मलोकाला प्राप्त होतात.

## अध्याय ९९ वा.

### नागेश्वरतीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय ह्मणतात; नंतर नर्मदेच्या दक्षिण तीरावर असणाऱ्या नागेश्वरतीर्थांत स्नान करावें. एके दिवशीं शंकर नृत्य करीत असतां श्रमानें शंकराच्या

शरीरांतून घामाचा प्रवाह सुरू झाला असतां तो घाम तेथें असणाऱ्या नागांनीं भक्षण केला. हा प्रकार पाहून गंगेला राग आला व तिनें नागांना शाप दिला कीं, तूं विंध्यपर्वतावर शंकराची आराधना कर; ह्मणजे शापमुक्त होशील; नंतर तो नाग विंध्यपर्वतावर नर्मदेचे काठीं तप करून व शंकराला संतुष्ट करून स्वतः शापमुक्त होता झाला. त्यानें त्याठिकाणीं नागेश्वर नांवानें एक तीर्थ निर्माण करून शिवलिंगाची स्थापनाहि केली. हें नागेश्वर लिंग सर्व पापाचें क्षालन करणारें आहे जे कोणी अपुत्र असतील, त्यांनीं जर ह्या तीर्थांत स्नान केलें तर त्यांस पुत्रप्राप्ति होईल. ह्या तीर्थाचे काठीं श्राद्ध केल्यास पितर तृप्त होतात; व त्यास सर्पभीति राहत नाहीं; व त्याची वंशवृद्धि होते.

## अध्याय १०० वा.

### मार्कण्डेयेश्वरतीर्थमाहात्म्य.

नंतर मार्कण्डेयेश्वरतीर्थाला जावें. ह्या तीर्थाचें माहात्म्य सर्व देवांनीं वर्णन केलें आहे. हें तीर्थ मी स्वतः स्थापित केलें आहे. हें तीर्थ जणूं काय स्वर्गाला जाण्याची शिडीच होय. ह्या तीर्थाचे ठिकाणीं स्नान करून जपजाप्यादि कर्मे केलीं असतां मनुष्य सर्व पापापासून मुक्त होतो. जे कोणी अंतकालीं ह्या लिंगाचें पूजन करितात, त्यांस शिवलोक प्राप्त होतो. अष्टमीचे दिवशीं ह्या लिंगापुढें तुपाचा दिवा लावावा; ह्मणजे स्वर्गलोकाची प्राप्ति होते. या ठिकाणीं श्राद्ध केल्यास पितर तृप्त होतात. हें माहात्म्य श्रवण करणारांसहि शिवलोकप्राप्ति होते.

## अध्याय १०१ वा.

### संकर्षणतीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात;—नंतर संकर्षणतीर्थांत स्नान करावें. पूर्वी ह्याठिकाणीं संकर्षणानें म्हणजे बलरामानें शंकराची आराधना केली होती. शंकरानें प्रसन्न होऊन आपलें लिंग बलरामाकडून तेथें स्थापित केलें; व त्याचें नांव संकर्षणेश्वर असें ठेविलें. जे ह्या तीर्थाचे ठिकाणीं स्नान करून भक्तीनें शिवलिंगाचें पूजन करितात, ते शिवलोकीं जाऊन कल्पपर्यंत वास करितात. जे कोणी एकादशीला मधाचे योगानें शंकराला स्नान घालतात; व पितृश्राद्धाचे योगें पितरांना तृप्त करितात ते निष्पाप होत्साते अंतकालीं शिवलोकाला जातात.

## अध्याय १०२ वा.

### मन्मथेश्वरतीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतातः—धर्मा ! नंतर मन्मथेश्वरतीर्थात स्नान करावें; ह्या तीर्थात स्नान करणारांना यमलोक प्राप्त होत नाहीं. ज्या स्त्रीला पुत्र होत नसेल, तिनें जर ह्या तीर्थात स्नान केलें तर तीस पुत्रप्राप्ति होईल. ह्या तीर्थात स्नान करणारांना हजार गाई दान दिल्याचें पुण्य लागतें. मन्मथेश्वराचें दर्शन घेणारास यमपीडा न होता सुखप्राप्ति होते. मन्मथेश्वराचें दर्शन म्हणजे जणुंकाय स्वर्गाला जाण्याची शिडीच होय. हें क्षेत्र काम, म्हणजे मदन ह्यानें स्थापित केलें असल्यामुळें याची सेवा करणाराचे सर्व काम म्हणजे इच्छा पूर्ण होतात. याठिकाणीं श्राद्धविधीनें अन्नदानादि करणारास या लोकीं सुख प्राप्त होऊन अंतकालीं शिवलोकांचीहि प्राप्ति होते.

## अध्याय १०३ वा.

### एरंडीसंगमतीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात;–नंतर एरंडीसंगमतीर्थाला जावें. या तीर्थाचें माहात्म्य पूर्वी पार्वतीनें शंकराला विचारिलें होतें; व शंकरानें पार्वतीला जें सांगितलें तेंच मी तुम्हाला सांगतों. श्रवण करा. पूर्वी अत्रि या नांवाचा एक ऋषि होता. तो नित्य अग्निहोत्र करून सातहि सोमसंस्थाचे विधि त्यानें पूर्ण केले होते. त्या ऋषीची अनसूया या नांवाची बायको होती. ती पतिव्रता होती; परंतु संततिहीन होती. एके दिवशीं अत्रि व अनसूया एकांतांत बसलीं असतां अत्रि आपल्या बायकोला म्हणतो. हे प्रिये ! तुझ्यासारखी स्त्री त्रैलोक्यांत मिळणें दुर्लभ आहे. तुझ्यासारख्या सुंदर स्त्रीच्या सहवासानें मी आज धन्य झालों आहे; परंतु आपणाला संतान नसल्यामुळें मला फारच दुःख होतें. पुत्रावांचून स्वर्गप्राप्ति नाहीं, असें शास्त्र आहे. आपणाला सद्गति देणारी अशी एक पुत्ररूपीच वस्तु होय. याप्रमाणें पतीचें भाषण ऐकून अनसूया म्हणते हे प्रिय ! आपण म्हणतां ही गोष्ट खरी आहे. मला वाटतें कीं, आपण जर मला आज्ञा कराल, तर मी तप करून प्रजापति जो ब्रह्मदेव त्याची आराधना करीन, त्यायोगें आपणाला संतति व सुख प्राप्त होईल. नंतर अनसूयेच्या सांगण्याप्रमाणें अत्रीनें स्वस्त्रीला तप करण्याची आज्ञा दिल्यावरून अनसूया

नर्मदानदीचे काठीं तप करण्याकरितां निघाली. त्याठिकाणीं नर्मदा व एरंडी नदी ह्यांचा संगम झाला आहे, त्याठिकाणीं ती पंचाग्निसाधन, धूम्रपान इत्यादि कष्टकारक विधीनें घोर तप करूं लागली. तिच्या तपानें संतुष्ट होऊन साक्षात् ब्रह्मदेव, विष्णु, व शंकर हे तीनहि देव त्याठिकाणीं प्राप्त झाले. त्यांना पाहून अनसूयेनें साष्टांग नमस्कार घातला. तिच्या तपानें संतुष्ट झालेले तीनहि देव अनसूयेला वर देण्यास उद्युक्त झाले असतां अनसूया देवांना म्हणते कीं, जर आपण मला वर देण्यास तयार आहां, तर माझेठिकाणीं आपण पुत्ररूपानें अवतीर्ण व्हावें; व ह्या स्थानाचे ठिकाणीं जे स्नानपूजनादि करितील त्यांस अ वर देऊन संतुष्ट करावें; एवढी माझी इच्छा पूर्ण होईल असें करा. नंतर शंकर म्हणतात; हे अनसूये! तुझी इच्छा पूर्ण होईल; व तुझें हें स्थान एरंडीतीर्थ यानांवानें प्रसिद्ध होईल. जे कोणी चैत्रमहिन्यांत ह्या तीर्थाचे ठिकाणीं येऊन उपोषण; व स्नान करून ह्याला प्रदक्षिणा करितील, त्यांस शिवलोकप्राप्ति; व इच्छित वस्तूची प्राप्ति होईल. जे कोणी याठिकाणीं श्राद्धादि विधि करून ब्राह्मणांना भोजन व द्रव्यदान देतात ते पितरांसह शिवलोकीं जाऊन राहतात. जे कोणी आपला देह ह्या तीर्थांत विसर्जन करितात ते हजार युगांपर्यंत शिवलोकीं राहतात. अशातऱ्हेनें ब्रह्मा, विष्णु; व शंकर यांनीं दिलेले वर ऐकून अनसूया आपल्या आश्रमाला येऊन आपल्या पतीला म्हणजे अत्रिऋषीला झालेलें सर्व वर्तमान सांगती झाली. अनसूयेचें भाषण ऐकून अत्रीला मोठा आनंद झाला. पुढें लवकरच अनसूयेला ब्रह्मदेवाच्या अंशापासून चंद्र, विष्णूच्या अंशापासून दत्त; व शिवाच्या अंशापासून दूर्वास असे तीन पुत्र झाले. साक्षात् ब्रह्मादि तीन देव पुत्ररूपानें अवतीर्ण होण्याचें कारण अनसूयेनें केलेली एरंडीतीर्थानजीकची तपश्चर्याच होय. तात्पर्य ज्याला संतति नसेल त्यानें एरंडीतीर्थांत स्नान करून शिवलिंग पूजन करावें; म्हणजे त्यास अनसूयेप्रमाणें दिव्य पुत्र होतील ह्यांत शंका नाहीं. आतां ह्या तीर्थांत स्नान केल्यामुळें एका ब्राम्हणाची भ्रूणहत्या नष्ट झाली; हा इतिहास तुम्हाला सांगतो ऐका. एक सुवर्णशिलक नांवाच्या गांवांत गौतम गोत्रांत जन्माला आलेला एक शेतीभाती करणारा ब्राह्मण होता. त्यानें लांकडांनें भरलेली गाडी घेऊन आपल्या घरीं आणिली असतां प्रेमानें बापाजवळ रांगत रांगत आलेल्या पुत्राकडे त्याचें लक्ष न लागून ती गाडी खालीं ओतिली. तत्काल त्या गाडींतील लांकडें त्या पुत्राच्या डोंक्यांवर पडून तो चेंगरून मृत झाला; परंतु त्या ब्राम्हणाला हा प्रकार माहितीहि नाहीं. तो दमल्यामुळें पाणी पिण्याकरितां घरांत शिरला; व पुत्राचा शोध करूं लागला तों आपल्या प्रमादानें पुत्राचा नाश झाला, असें त्यास आढळून आलें. नंतर सर्व मंडळी फारच शोक करूं लागली. त्या वेळीं

लोक पुष्कळप्रकारानें त्यांचें समाधान करूं लागले. नंतर त्या ब्राह्मणानें पुत्राचे सर्व संस्कार केल्यानंतर त्यानें आपल्याला लागलेली जी भ्रूणहत्या; ह्मणजे बालहत्या त्याच्या नाशार्थ पत्नीसह एरंडीसंगमतीर्थांत जाऊन स्नान केलें. तेथें स्नान करितांच त्याची बालहत्या नष्ट होऊन वंशवृद्धिहि झाली. हें आख्यान श्रवण व पठण करणारांस एरंडीसंगमतीर्थांत स्नान केल्याचें फल प्राप्त होतें. जे कोणी चैत्र शुद्ध सप्तमीला या तीर्थांत स्नान करून शिवपूजन करितात, त्यांच्या सर्व इच्छा पूर्ण होऊन त्यास सद्गतिहि प्राप्त होते. या तीर्थांत स्नान करणारे पशु, पक्षी, वृक्ष व इतर कीटकादि प्राणीहि मुक्त होतात.

---

## अध्याय १०४ वा.

### सुवर्णशीलातीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय ह्मणतात; धर्मा! एरंडीतीर्थांत स्नान केल्यानंतर सुवर्णशीलातीर्थांत स्नान करावें. हें तीर्थ सर्व पातकांचें क्षालन करणारें असून नर्मदेच्या उत्तरतीरावर आहे. हें तीर्थ औरस-चौरस शंभर पावलें लांब-रुंद आहे. या तीर्थांत स्नान करून शंकराचें पूजन करावें; नंतर सूर्याला नमस्कार करून होम-हवनादि कृत्यें करावींत. सर्व व्याधींच्या नाशार्थ बेलाचीं पानें व तूप यांचाहि होम करावा; नंतर ब्राह्मणाला दक्षणा द्यावी; त्यायोगें अश्वमेधादि मोठमोठे यज्ञ केल्याचें फल प्राप्त होतें. अनेकप्रकारच्या दानानें मनुष्य अंतकाळीं स्वर्गलोकाला प्राप्त होतो; व अशातऱ्हेनें स्वर्गाला गेल्यावर पुण्य संपतांच पुनः जरी त्यास मृत्युलोकांत जन्म घ्यावा लागला; तरी तो जन्म श्रीमंतांच्या व विद्वानांच्याच कुळांत प्राप्त होऊन व या लोकीं सुख भोगून अंतीं सायुज्यमुक्तीहि प्राप्त होईल. हें माहात्म्य श्रवण करणारांस तीर्थस्नानाचें फल मिळतें.

---

## अध्याय १०५ वा.

### करंजतीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय ह्मणतात; धर्मा! नंतर करंजतीर्थांत स्नान करावें. त्या वेळीं उपोषण करून इंद्रियनिग्रहहि करावा; ह्मणजे सर्व पातकें नष्ट होऊन सद्गति प्राप्त होते; नंतर शंकराची पूजा करावी. ब्राह्मणांना यथाशक्ति मणि, मोती,

पोंवळीं, रत्नें, रूपें, सुवर्ण, जोडे, खडावा, छत्री, शय्या, वस्त्र वगैरे अनेकप्रकारचीं दानें द्यावींत. आपण या तीर्थाचे काठीं ज्या वस्तूचें ज्या मानानें दान करूं त्या मानानें त्याच्या कोट्यावधिपटीनें अधिक फल दान देणारास प्राप्त होतें. हें करंजतीर्थमाहात्म्य श्रवण करणारास या लोकीं सर्वप्रकारचीं सुखें प्राप्त होऊन व तीर्थस्नानाचें फल मिळून मोक्षप्राप्तिहि होते.

## अध्याय १०६ वा.

—:O:—

### कामदतीर्थमाहात्म्य.

मार्कंण्डेय म्हणतात; नंतर कामदतीर्थाला जावें. हें तीर्थ सौभाग्याची वृद्धि करणारें आहे. भाद्रपद शुद्ध तृतीयेला उपवास करून शिवपार्वतीचें पूजन व कामदतीर्थांत स्नान करावें. विद्वान् ब्राह्मण बोलावून त्यास दूधभाताचें भोजन घालावें; व अनेकप्रकारची दक्षिणा, वस्त्र, सुवर्ण, गाई वगैरे दानें द्यावींत. नंतर देवाची प्रार्थना करून त्यास प्रदक्षिणा घालावी; म्हणजे अखंड सौभाग्य प्राप्त होतें. ज्येष्ठ शुद्ध तृतीयेला ह्या तीर्थाचे ठिकाणीं पंचाग्निसाधन करावें; म्हणजे सर्व पापापासून मुक्तता होते. जो आपला देह ह्या ठिकाणीं विसर्जन करतो, त्याला शिवलोक प्राप्त होतो. एका दांपत्याला बोलावून हींच शिवपार्वती ह्या कल्पनेनें त्यांचा भोजनादि योग्य सत्कार करून; व त्यास सौभाग्यदानें व अलंकारादि देऊन संतुष्ट करावें; म्हणजे अखंड सौभाग्य व गृहस्थाश्रमसुख प्राप्त होऊन शेवटीं सद्गतिहि प्राप्त होते. ह्या तीर्थाचें सेवन करणारांपैकीं जे दरिद्री असतील त्यांस द्रव्यप्राप्ति होईल; व जे निपुत्रिक असतील त्यास पुत्रप्राप्ति होईल. ह्या कामदतीर्थाचें माहात्म्य श्रवण करणारास सर्व इष्ट वस्तु सफल होतें.

## अध्याय १०७ वा.



### भंडारीतीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात; हे धर्मराजा ! नंतर भंडारीतीर्थाला जावें. ह्या तीर्थांत स्नान केलें असतां दारिद्र्यनाश होतो. पूर्वी कुबेरानें ह्या ठिकाणीं तप करून महादेवाला प्रसन्न करून घेतलें. त्या वेळीं थोड्याशा ह्या कर्मानें सर्व द्रव्याचें आधिपत्य ह्याचेकडे प्राप्त झालें; करितां जे कोणी ह्या तीर्थाचे काठीं जाऊन

स्नान करून शिवलिंगाचें पूजन; व थोडेंबहुत दानधर्मादि पुण्यकर्म करितात, त्यांस कुबेराप्रमाणें पुष्कळ द्रव्य मिळून सर्व दारिद्र्याचा एकदम नाश होतो. हें आख्यान श्रवण करणारालासुद्धां दारिद्र्याची बाधा होत नाहीं.

## अध्याय १०८ वा.

### रोहिणीतीर्थमाहात्म्य.

नंतर रोहिणीतीर्थांत स्नान करावें. हें तीर्थ त्रैलोक्यांत प्रसिद्ध आहे; व सर्व पापांचें क्षालन करणारें आहे. पूर्वी एके कालीं सर्व पृथ्वी जलमय झाली असतां समुद्रांत शयन करणाऱ्या विष्णूच्या नाभीपासून म्हणजें बेंबीपासून एक कमळ उत्पन्न झालें. त्या कमळाचे ठिकाणीं ब्रह्मदेवाची उत्पत्ति झाली. नंतर विष्णूच्या आज्ञेनें ब्रह्मदेवानें सृष्टि उत्पन्न करण्याचा क्रम चालविला. प्रथम ब्रह्मदेवानें पुलस्त्य, पुलह, क्रतु, दक्ष, वशिष्ठ, भृगु, नारद हे सप्तर्षि निर्माण केले. दक्षाला पन्नास मुली झाल्या. पैकीं दहा यमधर्माला, तेरा कश्यपाला व सत्तावीस चंद्राला विवाहविधीनें अर्पण केल्या. त्या चंद्राच्या सत्तावीस बायकांपैकीं रोहिणी नांवाची जी बायको होती. तिनें पतीची आपल्या एकटीवरच प्रीति राहावी, एवढ्याकरितां नर्मदानदीचे काठीं जाऊन पार्वतीची आराधना केली. नंतर पार्वती प्रसन्न होऊन रोहिणीला वर देण्यास उद्युक्त झाली. रोहिणीनें इच्छित वर मागितल्यामुळें ती इतराहून चंद्रास अतिशय प्रिय झाली. त्या दिवसापासून त्या प्रदेशाला रोहिणीतीर्थ म्हणतात. ज्या स्त्रिया रोहिणीतीर्थांत स्नान करतील त्या पतीला फारच प्रिय होऊन आनंदांत गृहसौख्याचा उपभोग घेतील. त्या तीर्थांत देहत्याग करणारांना पतिपत्निवियोग होत नाहीं.

## अध्याय १०९ वा.

### चक्रतीर्थमहात्म्य.

त्यानंतर सेनापुरनांवानें प्रसिद्ध असलेलेल्या चक्रतीर्थाला जावें. तेंहीं तीर्थ सर्व पापांचें नाशन करणारें आहे. ह्या ठिकाणीं पूर्वी कार्तिकस्वामीला तारकासुराचा नाश करण्याकरितां देवांचें सेनाधिपत्य दिलें होतें. त्या वेळीं कार्तिकस्वामीला विजय प्राप्त व्हावा; म्हणून देवांनीं ब्राह्मणांना अनेक दानें देऊन

संतुष्ट केलें, ज्या वेळीं कार्तिकस्वामीला सेनाधिपत्य देण्यानिमित्त अभिषेकविधि सुरू झाला. त्या वेळीं ह्या कर्मांत विघ्न उत्पन्न करण्याकरितां रुरु नांवाचा एक राक्षस प्राप्त झाला. त्या वेळीं त्या राक्षसाचें व देवांचें युद्ध चालू असतां विष्णूनें आपल्या सुदर्शनचक्रानें सर्व दैत्यांचा नाश केला. त्यानंतर तें चक्र नर्मदा-जलांत स्वतःची हत्यारूपी दोषापासून शुद्धि करून घेण्याकरितां पडलें असतां त्या तीर्थाला चक्रतीर्थ असें नांव प्राप्त झालें. हें तीर्थ सर्व पातकांचें क्षालन व्हावें; म्हणून विष्णूनें निर्माण केलें. जे कोणी ह्या चक्रतीर्थांत स्नान करतात, त्यांस पुंडरीकयज्ञाचें फळ मिळतें. ह्या तीर्थांत देहत्याग करणारास विष्णुलोक प्राप्त होतो. हें आख्यान श्रवण करणारांचीं सर्व पापें दग्ध होऊन ते शिवलोकीं जातात.

## अध्याय ११० वा.

### धौतपापतीर्थमाहात्म्य.

नंतर चक्रतीर्थाजवळ असणाऱ्या धौतपापतीर्थाला जावें. हें तीर्थ विष्णूनें निर्माण केलें आहे. विष्णूनें लोककल्याणार्थ दैत्यांचा नाश केला असतां, त्या पातकांच्या क्षालनार्थ तेथें पुष्कळ कालपर्यंत तप केलें; नंतर ब्राह्मणांना अनेक प्रकारचीं दानें दिलीं असतां भगवान् विष्णु दैत्यनाशामुळें उत्पन्न झालेल्या पापरूपी दोषापासून मुक्त होऊन वैकुंठाला प्राप्त झाले. जे कोणी या ठिकाणीं स्नान करितील ते कितीं पापी असले तरी धौतपाप होतील.

## अध्याय १११ वा.

### स्कंदतीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय ह्मणतात; नंतर स्कंदतीर्थांत स्नान करावें. हें स्कंदतीर्थ कार्तिकस्वामी यानें निर्माण केलें आहे. याच ठिकाणीं प्रत्यक्ष शंकरानें तप करून त्या तपाच्या प्रभावानें पार्वतीची प्राप्ति करून घेतली. ज्या वेळीं तारकासुराबरोबर लढणारा योग्य सेनापति देवांना मिळेना, त्या वेळीं देवांनींहि याच ठिकाणीं तप केलें होतें. त्या तपाच्या प्रभावानें शंकर प्रसन्न झाले व त्यांच्याच कल्याणाकरितां पार्वतीशीं संयोग करून कार्तिकस्वामीला उत्पन्न केलें. नंतर कार्तिकस्वामीनें या ठिकाणीं तपश्चर्या केली. एक हजार वर्षें तप करितांच

शंकर प्रसन्न झाले; व त्यांनीं कार्तिकस्वामीला सेनापतित्व दिलें; नंतर कार्तिकस्वामीनें त्या ठिकाणीं एक शिवलिंग स्थापित केलें; व त्याचें नांव स्कंदेश्वर ठेऊन त्या तीर्थाचें नांव स्कंदतीर्थ असें ठेविलें. जे कोणी या ठिकाणीं पितरांचें श्राद्ध करितील त्यांचे पितर बारा वर्षेपर्यंत तृप्त राहून अखंड सुखाचा अनुभव घेतील. या ठिकाणीं प्राण-त्याग करणारे शिवलोकाला प्राप्त होतील. हें आख्यान श्रवण करणाराला आयुष्य, कीर्ति, द्रव्य, सुख व मोक्ष मिळेल.

## अध्याय ११२ वा.

### आंगिरसतीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात; धर्मा ! नंतर नर्मदेच्या उत्तरतीरावर असणाऱ्या व सर्व पातकांचें क्षालन करणाऱ्या आंगिरस तीर्थाला जाऊन स्नान करावें. पूर्वी कृतयुगामध्यें पुत्रप्राप्तीकरितां अंगिरानावाच्या एका ऋषीनें ह्या ठिकाणीं घोर तपश्चर्या केली होती. तो तीर्थांत तीन वेळां नित्य स्नान करून शिवपूजा करीत असे. तो नित्य कृच्छ्रचांद्रायणादि व्रतेंही करीत असल्यामुळें बारा वर्षे निघून गेल्यावर शंकर प्रसन्न होऊन त्यास इच्छित वर देते झाले. त्याच वराच्या प्रभावानें अंगिराऋषीला बृहस्पति नांवाचा पुत्र झाला. हाच देवांचा गुरु होय. पुत्रप्राप्ति होतांच अंगिरा त्या तीर्थाला येऊन व तेथें एक शिवलिंग स्थापून त्याचें नांव आंगिरसेश्वर असें ठेविलें. त्यामुळें ह्या तीर्थाला आंगिरस तीर्थ असें नांव प्राप्त झालें. जे कोणी ह्या तीर्थांत स्नान करितात ते निष्पाप होऊन शिवलोकाला जातात. ह्या तीर्थांत स्नान केल्यानें ज्याला पुत्र नसेल त्यास पुत्र होईल; ज्याला द्रव्य नसेल त्याला द्रव्यप्राप्ति होईल; अर्थात् सर्वांच्या सर्व इच्छा पूर्ण होऊन त्यांस शेवटीं सद्गति मिळेल.

## अध्याय ११३ वा.

### कोटितीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात; नंतर मोठें पुण्य देणारें; व सर्व पापांचें नाशन करणारें जें कोटितीर्थ त्या तीर्थाला जावें. ह्या ठिकाणीं कोट्यवधि ऋषींना तपः सामर्थ्यानें सिद्धि प्राप्त झाली. ह्या ठिकाणीं स्नान करून एका ब्राह्मणाला भोजन घातल्यास

कोटि ब्राह्मणांना भोजन घातल्याचें श्रेय प्राप्त होतें. ह्या ठिकाणीं पितरांच्या नांवानें श्राद्ध केल्यास तत्काळ पितरांचा उद्धार होऊन श्राद्ध करणारास ऐहिक सर्व सुखें प्राप्त होऊन अंतीं शिवलोकप्राप्ति होते.

---

## अध्याय ११४ वा

### अयोनिसंभवतीर्थमाहात्म्य.

नंतर अयोनिजतीर्थांत स्नान करावें. हें तीर्थ सर्व पातकांचें क्षालन करणारें आहे. ह्या अयोनिजतीर्थांत स्नान करून शंकराची आराधना, व देवांची पूजा केली असतां सर्व पातकें दग्ध होतात. जे कोणी ह्या तीर्थांत देहत्याग करितात त्यांना पुनः जन्ममरणचक्रांत फिरत राहण्याचा प्रसंग प्राप्त होत नाहीं. हें तीर्थ चौऱ्यांशीं लक्ष योनीपासून सोडविणारें असल्यामुळें ह्यास अयोनिजतीर्थ हें नांव प्राप्त झालें. हें माहात्म्य श्रवण करणारा शिवलोकीं जातो.

---

## अध्याय ११५ वा.

### आंगारकतीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय ह्मणतात: नंतर आंगारकतीर्थाला जावें. हें तीर्थ नर्मदाकाठीं असून प्रसिद्ध आहे. पूर्वी अंगारक ह्मणजे मंगळ, त्यानें या ठिकाणीं पुष्कळ वर्षे तप केलें. शेवटीं शंकरानें प्रसन्न होऊन व त्याला दर्शन देऊन वर माग, असें ह्मटलें असतां अंगारक ह्मणतो; देवा! जोंपर्यंत सर्व लोकांमध्यें मेरुपर्वत श्रेष्ठ आहे, जोंपर्यंत चंद्र—सूर्य आपआपल्या स्थानीं भ्रमण करीत आहेत, जोंपर्यंत नद्या, नद व समुद्र आस्तित्वांत आहेत, तोंपर्यंत माझी नवग्रहांमध्यें स्थापना करावी. असा वर मागतांच शंकर बरें आहे, असें ह्मणून स्वस्थानीं निघून गेले; नंतर अंगारकानें तेथें एक शिवलिंग स्थापित केलें व त्याचें नांव आंगारकेश्वर असें ठेवून तेथील तीर्थाचें नांवहि पण आंगारकतीर्थ असेंच ठेविलें. जे कोणी आंगारकतीर्थांत स्नान करून, होम—हवनादि करून आंगारकेश्वराचें पूजन करितात., त्यांना अश्वमेधाचें फल मिळतें. जे कोणी अंगारकी चतुर्थीला ह्या ठिकाणीं स्नान करितात, त्यांना अत्यंत रूप प्राप्त होऊन त्यांच्या सर्व इच्छा पूर्ण होतात. ह्या ठिकाणीं देहत्याग करणारांना शिवलोकप्राप्ति होते.

---

## अध्याय ११६ वा.

### पांडुतीर्थमाहात्म्य.

नंतर पांडुतीर्थाला जावें. हें तीर्थ सर्व पापांचा नाश करणारें आहे. त्या ठिकाणीं जे स्नान करितात ते सर्व पातकापासून मुक्त होतात. जे त्याठिकाणीं सुवर्णादि अनेक दानें योग्य ब्राह्मणाला दान देतात, त्यांच्या भ्रूणहत्यादि सर्व हत्या व इतर सर्व दोष नष्ट होतात. जे कोणी त्या ठिकाणीं पितरांना उद्देशून पिंडदानादि श्राद्धविधि करितात, त्यांना वाजपेययज्ञाचें फळ मिळतें; व पितर मोठ्या आनंदानें तृप्त होऊन मुक्त होतात; व शिवलोकीं जातात.

## अध्याय ११७ वा.

### त्रिलोचनतीर्थमाहात्म्य.

त्यानंतर त्रिलोचनतीर्थांत जावें. हें तीर्थ पुण्यकारक आहे. सर्व लोकांनीं ज्याला वंदन केलें आहे, असा शंकर त्याठिकाणीं स्वतः येऊन राहिला आहे. त्या तीर्थांत स्नान करून शंकराचें पूजन करणारे अंतकाळीं दिव्यविमानांत बसून शिवलोकीं जातात. त्यानंतर दुसऱ्या कल्पामध्यें हेच पुण्य पुरुष स्वेच्छेनें क्रीडा करण्याकरितां पुनः जन्म घेऊन, सुखैश्वर्यानें युक्त होत्साते पूर्ण शतायु होतात.

## अध्याय ११८ वा.

### इंद्रतीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात;—धर्मा ! नंतर इंद्रतीर्थाला जाऊन स्नान करावें. हें तीर्थ नर्मदेच्या काठीं आहे. पूर्वी इंद्रानें वृत्राला मारिलें असतां त्यास ब्रह्महत्या लागली. इंद्र त्रैलोक्यांत हिंडूं लागला, तरीसुद्धां ब्रह्महत्या पाठीशी उभी आहेच. हें पाहून इंद्राला फार वाईट वाटलें. मद्यपान, परस्त्रीगमन इत्यादि पातकांचें नाशन करणारे अनेक उपाय आहेत; परंतु ब्रह्महत्या नष्ट करणारा एकहि उपाय नाहीं; असें पाहून आतां आपली ब्रह्महत्या नष्ट कशी होणार ? हा विचार करीत करीत इंद्र सर्वसंगपरित्याग करून नर्मदानदीचे काठीं असणाऱ्या

स्कंदतीर्थाजवळ प्राप्त झाला. त्याठिकाणीं स्नान करून; व कृच्छ्रचांद्रायणादि व्रतानें आपला देह क्षीण करून अनेकप्रकारानें इंद्रानें घोर तपश्चर्या केली. एक हजार वर्षे पूर्ण होतांच त्याठिकाणीं साक्षात् परमेश्वर प्रसन्न झाले; व तप करण्याचें कारण विचारूं लागले. नंतर इंद्र शंकराला म्हणतो कीं, मी लोककल्याणार्थ वृत्रासुराचा वध केला खरा; पण त्यायोगें मला ब्रह्महत्या प्राप्त झाली. त्या ब्रह्महत्येच्या नाशानार्थ मी पुष्कळ तीर्थें हिंडलों; परंतु व्यर्थ. शेवटीं निराश होऊन मी येथें तपश्चर्या करूं लागलों असतां आपलें दर्शन घडलें. आतां माझी इच्छा एवढीच आहे कीं, आपल्या दर्शनानें ब्रह्महत्या दूर व्हावी. असें इंद्राचें भाषण ऐकून परमेश्वरानें इंद्राजवळ असणाऱ्या ब्रह्महत्येचे चार भाग केले. त्यांपैकीं एक भाग पाण्यांत टाकिला. नदींतून वाहात पाणी भरून घेत असतां जर तें पाणी डवळल्याशिवाय घेतलें. तर तें ब्रह्महत्यायुक्त होतें. तसेंच स्त्रियांच्या रजाच्या ठिकाणीं ब्रह्महत्येचा दुसरा भाग ठेवला. त्यामुळें स्त्रीला रजोदर्शन झालें असतां प्रथम चारदिवसपर्यंत ती कोणताहि संबंध ठेवण्यास अयोग्य होय. जर एखाद्यानें आपल्या अज्ञानपणानें तिच्याशीं संबंध ठेवला तर तो ब्रह्महत्यादोषानें युक्त होतो. नंतर ब्रह्महत्येचा तिसरा भाग पृथ्वीवर टाकिला; त्यामुळें मृत्तिका ही भक्षणास अयोग्य ठरली; मृत्तिका भक्षण करणारा ब्रह्महत्यादोषानें युक्त होतो; व चवथा भाग शेती करणाऱ्या व शूद्राची सेवा करणाऱ्या ब्राह्मणाचे ठिकाणीं ठेविला. जो कोणी ब्राह्मण शूद्रसेवा, शेती, व्यापार वगैरे करील तो ब्रह्महत्यादोषास पात्र होईल. अशातऱ्हेनें शंकरानें ब्रह्महत्येचे चार भाग करून; व ते चारठिकाणीं वाटून देऊन इंद्राला दोषमुक्त केलें. नंतर शंकरानें वर माग म्हणताच इंद्रानें मागितलें कीं, तूं ह्याठिकाणीं नित्य वास करावास, असें म्हणून; व तेथें इंद्रेश्वर नांवानें शिवलिंग स्थापून तें तीर्थहि इंद्रतीर्थ या नावानें प्रसिद्ध केलें. या तीर्थांत स्नान करणारे मुक्त होतात.

---

## अध्याय ११९ वा.

### कल्होडीतीर्थमाहात्म्य.

मार्कंडेय म्हणतात; धर्मा ! नंतर कल्होडीतीर्थांत स्नान करावें. हें तीर्थ नर्मदानदीच्या उत्तर तीरावर आहे. पूर्वी अनेक ऋषींनीं लोककल्याणार्थ ह्याठिकाणीं मोठी तपश्चर्या करून शंकराच्या प्रसादानें ह्याची स्थापना केली आहे. ह्या तीर्थांत कपिला गाईचें सशास्त्र वत्सासह दान करणाराची पापनिवृत्ति होऊन त्यास मोक्षप्राप्ति होते. सर्व दानांमध्यें कपिलादान श्रेष्ठ आहे. दान करणारानें उपो-

क्षण करावें, पद्रिपूंचा जय करावा; व अशा रीतीनें शुचिर्भूत होऊन नुकतीच व्यायलेली कपिलागाय आणून ती विद्वान् ब्राह्मणास यथाविधीनें द्यावी; ह्मणजे त्यास पृथ्वीदानाचें पुण्य लागतें. कपिलागाईच्या दानानें देहकृत, वाणीकृत व मनःकृत हीं सर्व पातकें नष्ट होतात. ह्या तीर्थांत स्नान करून कपिलागाय दान देणारास जितके केश त्या गाईच्या अंगावर असतील तितकीं हजार वर्षें विष्णुलोकाची प्राप्ति होते. अशा पुरुषास पुनः जन्म प्राप्त झाल्यास सत्कुलांत व श्रीमंताचें घरींच जन्म येतो; व त्यास दीर्घायुष्य प्राप्त होऊन तो शेवटीं शिवलोकाला प्राप्त होतो. हें आख्यान श्रवण करणारांचीं सर्व पातकें नष्ट होतात.

## अध्याय १२० वा.

### कम्बुकेश्वरमाहात्म्य.

आतां कंबुकेश्वराचें महात्म्य सांगतों. पूर्वी हिरण्यकशिपु नांवाचा दैत्य त्रैलोक्यामध्यें आपलें स्वामित्व गाजवूं लागला असतां, त्याचा पुत्र जो प्रल्हाद त्यानें भक्तीच्या जोरावर दुष्टबुद्धीच्या हिरण्यकशिपूंचा नाश विष्णूकडून करवून स्वतः राज्यारूढ झाला. त्या प्रल्हादाचा मुलगा विरोचन व त्याचा पुत्र बलि होय. बलीला बाण नांवाचा मुलगा झाला. बाणाचा पुत्र शंबर व शंबराचा कंबु नांवाचा पुत्र होता. त्या कंबु दैत्यानें देवांना जिंकण्याच्या इच्छेनें नर्मदेच्या काठीं उग्र तपश्चर्या केली. शंकर प्रसन्न होऊन त्यास इच्छित वर देते झाले. त्या वेळीं त्या कंबु दैत्यानें तेथें एक शिवलिंग स्थापून त्याचें नांव कंबुकेश्वर असें ठेविलें; नंतर अंतकालीं तो कंबु शिवरूप होऊन कैलासाला जाता झाला. त्या दिवसापासून हें तीर्थ कंबुतीर्थ या नांवानें प्रसिद्ध आहे. जे कोणी ह्या कंबुतीर्थांत स्नान करून यथाविधि सूर्याची उपासना व कंबुकेश्वराचें पूजन करतात ते सर्वपापापासून मुक्त होऊन शिवलोकाला जातात. जे कोणी ह्या ठिकाणीं गायत्रीमंत्राचा जप करितील, त्यांस चारहि वेदाचें अध्ययन करण्याचें फल प्राप्त होऊन शेवटीं ते पापमुक्त होऊन शिवलोकीं जातील.

## अध्याय १२१ वा.

### चंद्रहासतीर्थमाहात्म्य.

मार्कंण्डेय म्हणतात;—धर्मा! नंतर चंद्रहासतीर्थाला जावें. या तीर्थांत स्नान केल्यामुळें चंद्राला सिद्धि प्राप्त झाली. पूर्वी एकदां दक्षानें चंद्राला क्षयरोगी

होशील, असा शाप दिल्यामुळें चंद्रानें ह्या तीर्थांत स्नान केलें; व शापमुक्त झाला. चंद्राला शाप देण्याचें कारण तो आपल्या अश्विन्यादि सर्वांस बायकांचा त्याग करून फक्त रोहिणीशींच संरक्त होत असे. हें वर्तमान दक्षाला आवडलें नाहीं. स्त्रीला रजोदर्शन झाल्यापासून सोळादिवसपर्यंतचा जो काळ त्याला ऋतुकाल म्हणतात. या ऋतुकालांतील आरंभाचे चार दिवस सोडून उत्तर राहिल्या बारादिवसांपैकीं समदिवशीं स्त्रीगमन केल्यास पुत्रप्राप्ति; व विषम दिवशीं गमन केल्यास कन्याप्राप्ति होते. पुत्रप्राप्तीच्यायोगें मोक्षप्राप्ति होते. ऋतुकालीं स्त्रीगमन न केल्यास ब्रह्महत्या; व भ्रूणहत्या हे दोष प्राप्त होऊन नरकप्राप्तिहि होते; तेव्हां ह्या दोषामुळें चंद्र क्षयी झाला होता. तो ज्या तीर्थांत स्नान करून शापमुक्त झाला, तेथें चंद्रेश्वर नांवानें शिवलिंग स्थापून त्या तीर्थाचें नांवहि चंद्रहासतीर्थ असें ठेविलें. ग्रहणकालीं ह्या तीर्थांत स्नान करणारा प्राणी पापमुक्त होतो. व याठिकाणीं केलेलीं शुभ कृत्यें अक्षय्य फल देणारीं होतात. या तीर्थांत स्नान केल्यानें वाचिक, देहकृत व मनःकृत सर्व पातकें नष्ट होतात. जे कोणी या तीर्थांत स्नान करितील, ते दोषमुक्त होऊन, व संसारचक्रांत न सांपडून सोमलोकाला जातील.

---

## अध्याय १२३ वा.

### कोहनस्वेश्वरतीर्थमाहात्म्य.

चातुर्वर्ण्याचीं कर्मं व पुरुषार्थांचे विधि धर्मानें मार्कंण्डेयास विचारल्यावरून मार्कण्डेय म्हणतात; धर्मा! सर्व जग उत्पन्न करण्याला कारणीभूत ब्रह्मदेव आहे. ब्राह्मणांची उत्पत्ति ब्रह्मदेवाच्या मुखापासून आहे; क्षत्रियांची दंडापासून; वैश्यांची मांड्यापासून; व शूद्रांची पायापासून उत्पत्ति आहे. इतर या चातुर्वर्ण्याहून जे भिन्न वर्ण आहेत हे संकरजन्य वर्ण होत. आतां ब्राह्मणादि वर्णांचे धर्म सांगतो. ब्राह्मणाला साहा कर्मांचा अधिकार आहे. तीं साहा कर्मं येणेंप्रमाणें:—स्वतः वेदाध्ययन करणें, दुसऱ्याला वेद शिकविणें, स्वतः दुसऱ्याला दान देणें, दुसऱ्यानीं दिलेलें दान स्वतः घेणें, स्वतः यज्ञ करणें, किंवा दुसऱ्याकडून करविणें. हीं साहा कर्मं करून त्याशिवाय ब्राह्मणांनीं सर्वलक्षणसंपन्न पत्नीशीं विवाह लावून स्मार्ताग्नि व श्रौताग्नि ह्यांचें सेवन करावें. तसेंच पंचमहायज्ञादि करून वंशवृद्धि झाल्यानंतर वानप्रस्थाश्रम स्वीकारावा, ह्यायोगें मोक्षप्राप्ति होते. क्षत्रियानें दान, अध्ययन व यज्ञ हीं तीन कर्मं करून उत्तमतऱ्हेनें प्रजापालन करावें, म्हणजे तो मोक्षाला जातो. वैश्यानें पूर्वोक्त तीन कर्मं करून शिवाय

शेतीभाती व गोरक्षण करावें. सत्यभाषण, शुद्धता इत्यादि सद्गुण संपादून धर्ममार्गानें वागून वैश्यानें आपणाला मोक्षप्राप्ति करून घ्यावी. शूद्राला सेवेवाचून दुसरा धर्मच नाहीं; व त्या सेवाधर्मानेंच शूद्राला सद्गति प्राप्त व्हावयाची असते. याप्रमाणें सृष्टीच्या उत्पत्तीच्या आरंभीं ब्रह्मदेवानें हे चातुर्वर्ण्याला धर्ममार्ग घालून दिले आहेत. वरील धर्मांचें उल्लंघन करणारा प्राणी तिर्यग्योनींत जन्म घेऊन अधोगतीला जातो. असो. तेव्हां वर सांगितलेल्या ब्राह्मणवर्णानें पाळण्यास योग्य अशा धर्ममार्गांचें सेवन करीत आनंदांत ह्या तीर्थाचे कांठीं कुटुंबासह राहणारा असा एक ब्राह्मण स्नानसंध्यादि स्वकर्म करीत असतां " हनस्व हनस्व " मारा मारा असा एकाएकी उत्पन्न झालेला ध्वनि त्यानें श्रवण केला; व तो सभोंवार पाहूं लागला. वर पाहतो, तों हातांत पाश धारण केलेले जे यमदूत त्यांनीं वेष्टित असा रेड्यावर बसलेला यमधर्म आपल्याकडे येत आहे, असें त्यानें पाहिलें. नंतर रुद्रमंत्राचा जप करीत बसलेल्या ब्राह्मणाला पाहून यम म्हणतो कीं, मी यमधर्म तुला नेण्याकरितां आलों आहे; जप करण्याचें कृत्य पुरें कर. असें यमाचें भाषण ऐकून ब्राह्मण घाबरून गेला; व तेथून उठून दुसरीकडे पळूं लागला. नंतर यमदूतहि त्याचा पाठलाग करूं लागले. तो ब्राह्मण शेवटीं थकून एक नर्मदेच्या कांठीं लिंग होतें तेथें येऊन त्या लिंगावर आडवा पडला; व मुखानें शंकरा, माझें रक्षण कर, असें म्हणूं लागला. त्या वेळीं एकदम त्या लिंगांतून कोण तुला मारीत आहे, भिऊं नको असा ध्वनि निघाला. तो ध्वनि व हुंकार ऐकून यम दूतांसह तेथून पळून गेला. ज्या लिंगांतून " को हनस्व " कोण तुला मारीत आहे, अशी भाषा व हुंकार उत्पन्न झाला त्याच लिंगाला कोहनस्वेश्वर हें नांव प्राप्त झालें; व त्या तीर्थाचें नांवहि कोहनस्वतीर्थ असें पडलें. ह्या तीर्थाचे ठिकाणीं स्नान करणाराला व कोहनस्वेश्वराचें पूजन करणाराला अग्निष्टोम यज्ञाचें फळ मिळतें. जे या तीर्थामध्यें प्राणत्याग करितील ते शिवलोकाला प्राप्त होतात. जो या तीर्थाचे कांठीं अग्निप्रवेश करील तो तीनशें कल्पपर्यंत अग्निलोकांत वास करील. नंतर वरुणलोकांत राहून शेवटीं लोकालोकपर्वतावरून शिवलोकाला प्राप्त होईल. हें माहात्म्य श्रवण करणारालाहि तीर्थस्नानाचें फल मिळून मोक्ष मिळतो.

---

## अध्याय १२३ वा.

### कर्मदेश्वरतीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात;—धर्मा ! नंतर कर्मदेश्वरतीर्थाला जाऊन स्नान करावें. ज्या ठिकाणीं महाबलवान् गणपति वास करीत असतो. ह्या तीर्थांत चतुर्थीचे

दिवशीं उपोषण करून याचें पूजन करणाराला कोणत्याहि प्रकारचें विघ्न प्राप्त होत नाहीं. ह्या तीर्थाचे ठिकाणीं केलेलीं दानादि कर्में अक्षय्य फळ देणारीं होतात. जे कोणी येथें स्नान करून कर्मदेश्वराचें पूजन करतात; ते सर्व पापापासून मुक्त होऊन व या लोकीं सुख भोगून अंतकालीं शिवलोकाला प्राप्त होतात. हें आख्यान पठन करणाराहि शिवलोकाला जातो.

---

## अध्याय १२४ वा.

### नर्मदेश्वरतीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात; हे धर्मराजा ! नंतर सर्व जगांतील तीर्थांत अत्युत्कृष्टत्वेनें फलरूपानें वर्णिलेलें असें हें नर्मदेश्वर नावाचें तीर्थ आहे. त्या तीर्थामध्यें स्नान केलें असतां प्राणि सर्व महापातकापासून मुक्त होतो. जे कोणी ह्या तीर्थाचे तीरीं अग्निप्रवेश करितात, तसेंच नर्मदातीर्थांत प्रवेश करून जे प्राणत्याग करितात; किंवा ह्याच तीर्थामध्यें स्नान करून उपोषणादिकानें आपला देह कृश करून घेतात त्या पुरुषास श्रेष्ठ अशा शिवलोकाची प्राप्ति होऊन त्यांचीं संसारबंधनें तुटून जातात; व ते सर्व पातकापासून मुक्त होऊन शिवलोकाला प्राप्त होतात; असें प्रत्यक्ष शंकराचें सांगणें आहे.

---

## अध्याय १२५ वा.

### रवितीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात; धर्मा ! नंतर रवितीर्थाला जावें. ज्या ठिकाणीं साक्षात् सूर्यानें घोर तप करून स्वर्गाला गमन केलें, असें हें तीर्थ फारच महत्त्वाचें आहे. नंतर सूर्यानें तप कां केलें ? असा धर्मानें प्रश्न केल्यावरून मार्कण्डेय त्यास म्हणतात; हे धर्मराजा ! सृष्टीच्या उत्पत्तीच्या पूर्वीं हें जग अव्यक्त स्थितींत होतें. नंतर एकाएकीं एक तेज उत्पन्न होऊन त्या तेजापासून शंकराची उत्पत्ति झाली. ब्रह्मदेव, अग्नि वगैरे देव उत्पन्न झाले असतां अग्नि हाच सूर्य नांवानें प्रसिद्ध झाला. तो सूर्य आपल्या मण्डळामध्यें राहून सर्व देवांनीं स्तविलेला असा त्रैलोक्याला प्रकाश देऊं लागला सूर्याच्या उदयास्तावरून दिवसरात्र हे भेद पडले आहेत. असे अहोरात्र तीस दिवस म्हणजे एक महिना; व साहामहिने

म्हणजे एक अयन होय. अशी अयनें दोन आहेत. एक दक्षिणायन व दुसरें उत्तरायण होय. सूर्य हाच सर्व जगाची उत्पत्ति, स्थिति व लय करण्यास कारणीभूत आहे. सूर्य हाच जगाचें मूळ बीज होय. त्यानें परोपकारार्थ नर्मदातीरावर स्नान करून व शंकराला प्रसन्न करून घेऊन एकतीर्थ व शिवलिंग स्थापित केलें, त्यासच रवितीर्थ म्हणतात. ह्या तीर्थाचे ठिकाणीं स्नान करणारास व प्रदक्षिणा करणारास; आणि तीन वेळां मंत्रजप करणारास सूर्यलोकाची प्राप्ति होते. जे कोणी रवितीर्थाचें पूजन; व प्रदक्षिणा करितात त्याना पृथ्विप्रदक्षिणेचें पुण्य प्राप्त होतें. प्रत्येक कर्माला मंत्रविधीची आवश्यकता असल्यामुळें हा स्नानविधी; व पूजनविधी समंत्रकच केला पाहिजे; तरच वर सांगितल्याप्रमाणें उत्कृष्ट फल प्राप्त होईल. जसा लाकडाचा हत्ति किंवा चामड्याचा हरिण कोणतेंहि कार्य करूं शकत नाहीं, तसेंच अमंत्रक केलेला विधी निष्फळ होय. ज्याप्रमाणें राखेंत हवन केलेल्या यज्ञाचें फळ मिळत नाहीं, तसेंच उदकावाचून दिलेलें दान निष्फळ होय. लाकडाची, दगडाची किंवा मातीची तयार केलेली जी ईश्वरमूर्ति तिचें पूजन किंवा आराधन करावयाचें असल्यास मंत्रपूर्वकच केलें पाहिजे. मंत्ररहित नुसत्या भक्तीनेंच देवाला बारा वर्षे नमस्कार करून जें फल मिळावयाचें तें फळ मंत्रपूर्वक एका नमस्कारानें तत्काळ मिळतें. नर्मदानदीमध्यें स्नान करून मंत्रादिकांनीं रवीचें पूजन करणारा सर्व पापापासून मुक्त होऊन शिवलोकाला प्राप्त होतो; व ह्या लोकीं पुत्रपौत्रादि अनेक सुखांचाहि उपभोग घेतो. हें रवितीर्थमाहात्म्य श्रवण करणारालाहि तीर्थस्नानाची सर्व फळें प्राप्त होतात.

---

## अध्याय १२६ वा.

### अयोनिजतीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात; धर्मा ! नंतर अयोनिजतीर्थाला जाऊन स्नान करावें. त्याठिकाणीं स्नान करणाराला जन्ममरणरूप संसाराची प्राप्ति होत नाहीं. त्या तीर्थांत स्नान करून अयोनिजेश्वराचें पूजन करावें; व त्याची प्रार्थनाहि करावी. ह्या शिवलिंगाचें पूजन करणारे कोट्यावधि कालपर्यंत शिवलोकीं राहतात. जे कोणी मध व दूध ह्यानें शिवलिंगाला अभिषेक घालतात, त्यांना पुष्कळ संपत्ति प्राप्त होते. शुक्लपक्षांतील अष्टमी तिथि व कृष्णपक्षांतील चतुर्दशी ह्या दोन दिवशीं शंकराची पूजा करून गीत–वाद्यांदिकांनीं जागरण वगैरे करणारांना कल्पपर्यंत शिवलोकीं राहावयास मिळतें. जे ह्या लिंगाचें पूजन करून " ॐ नमः शिवाय "

ह्या मंत्राचा जप करितात, त्यांना वेदशास्त्राध्ययनाचें पुण्य प्राप्त होतें. या तीर्थाचे काठीं ब्राह्मणाला दानादि दिलीं असतां किंवा उदक व भिक्षा ब्राह्मणाला दिली असतां मेरुपर्वत दानाचें व समुद्रोदकदानाचें पुण्य मिळतें. हें माहात्म्य श्रवण करणाराला शिवलोक प्राप्त होतो.

## अध्याय १२७ वा.

### अग्नितीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात, धर्मा! नंतर अग्नितीर्थाचे ठिकाणीं जाऊन स्नान करावें. प्रत्येक प्रतिपदेला या तीर्थांत स्नान करून पापमुक्त व्हावें. जे कोणी या तीर्थाचे काठीं येऊन योग्य अशा वराला आपली मुलगी कन्यादान-विधीनें देतात, त्याला अग्निष्टोम, अतिरात्र अशासारख्या हजारों पुण्यकृत्यांच्या फलाचें श्रेय मिळतें, तेंच कन्यादान जर सालंकृत असें केलें, तर त्याहूनहि अधिक फल मिळतें. अशातऱ्हेनें कन्यादान करणाऱ्या पुरुषाला त्या कन्येला होणाऱ्या पुत्र-पौत्रादि संततीच्या शरीरावर जितके केश असतील, तितकीं वर्षें शिवलोक-प्राप्ति होते. हें आख्यान श्रवण व पठण करणारे निष्पाप होऊन मुक्त होतात.

## अध्याय १२८ वा.

### भृकुटेश्वरतीर्थमाहात्म्य.

नंतर भृकुटेश्वरतीर्थी जाऊन स्नान करावें. त्या ह्या तीर्थाचे ठिकाणीं कोपिष्ठ अशा भृगूला सिद्धि प्राप्त झाली. त्या भृगूनें शंभर वर्षें घोर तपश्चर्या करून शंकर प्रसन्न झाल्यावर पुत्रप्राप्तीचा वर मागितला. शंकरानें भृगूला इच्छित वर दिल्यावर शंकराच्याच आज्ञेनें .भृगूनें आपल्या नांवानें तेथें एक शिवलिंगाला स्थापित करून एक तीर्थहि निर्माण केलें. तेंच हें भृकुटेश्वरतीर्थ होय. ह्या तीर्थाचे ठिकाणीं स्नान करून शिवपूजन करणारास अग्निष्टोम यज्ञाचें फल मिळतें. पुत्रप्राप्तीच्या इच्छेनें जे कोणी ह्या तीर्थांत स्नान करितात, त्यांस पुत्रप्राप्ति होते. ह्या तीर्थामध्यें स्नान करून सुवर्ण, गाई व पृथ्वी ह्यांचीं दानें दिलीं असतां संपूर्ण पृथ्वी दान दिल्याचें पुण्य मिळतें. त्या ह्या तीर्थाचे ठिकाणीं स्नानादि करणारांना पुनः स्वर्गलोकाची प्राप्तिहि होऊन व तेथें ते देवादिकांनीं पूज्यत्वाला प्राप्त होऊन शेवटीं मोठ्या आनंदानें शिवलोकाला जातात.

## अध्याय १२९ वा.

### ब्रह्मतीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतातः—धर्मा ! नंतर ब्रह्मतीर्थाला जावें. हें तीर्थ अन्य तीर्थांहून श्रेष्ठ असें आहे. या नर्मदानदीचे काठीं राहाणारा ब्रह्मदेव उपासना करणाऱ्या चारहि वर्णांच्या लोकांच्या कायिक, वाचिक व मानसिक अशा पापांचा नाश करितो. जे कोणी या तीर्थाचे काठीं वेदशास्त्रोक्त प्रायश्चित्तें आचरितात, ते स्वर्गलोकाला प्राप्त होतात. जे कोणी या तीर्थाला येऊन वेदशास्त्राच्या विरुद्ध कृत्यें करितात, ते नरकाला जातात. प्रथम या तीर्थांत स्नान करून, व ब्रह्मदेवाला नमस्कार करून आपण आजपर्यंत केलेल्या पातकांचा उच्चार करावा; म्हणजे त्यायोगें जसा सूर्योदय होताच अंधकाराचा नाश होतो त्याप्रमाणें सर्व पापांचा नाश होतो. प्रत्यक्ष शंकरानें असें सांगितलें आहे कीं, जे कोणी या तीर्थावर दानधर्म करितील त्याचें तें सर्व अक्षय्य फल देणारें होईल. जो कोणी येथें गायत्रीजप करील त्यास चारहि वेदाच्या अध्ययनाचें फळ मिळेल. जे कोणी ह्या ठिकाणीं देहत्याग करितील त्यांना ब्रह्मलोकाची प्राप्ति होईल, व पुनः जन्ममरणाची भानगड शिल्लक राहणार नाहीं. अशा-तऱ्हेनें जे लोक ह्या पुण्यतीर्थावर जातात, ते ऐहिक सुखांचा उपभोग घेतात

## अध्याय १३० वा.

### देवतीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात, हे धर्मराजा ! नर्मदेच्या दक्षिणतीरावर देवतीर्थ नांवाचें एक तीर्थ आहे. ह्या तीर्थाची स्थापना देवांनीं शंकराला संतुष्ट करून केली आहे. ह्या तीर्थाचे ठिकाणीं कामक्रोधादि षड्रिपूंचा त्याग करून, जे देवेश्वराचें पुजन करितात; ते सर्व पापापासून मुक्त होऊन, त्यांस हजार गाई दान दिल्याचें पूण्य लागतें. हें माहात्म्य श्रवण करणारांचीं सर्व पातकें नष्ट होऊन; व ते इहलोकीं सुख भोगून अंतकालीं शिवलोकाला जातात.

# अध्याय १३१ वा.

## नागतीर्थमाहात्म्य.

नर्मदेच्या दक्षिणतीरावर नागतीर्थ आहे. ज्याठिकाणीं नागांनीं तप करून, तेंहि सिद्धविलें आहे. पूर्वी कश्यपप्रजापतीच्या दोन भार्या होत्या त्या कद्रू व विनता ह्या होत. त्यांच्यांत घोड्याच्या रंगाच्या परीक्षणाबद्दल वाद उपस्थित होऊन, पैज लागली कीं, ज्याचा पराजय होईल त्यानें दुसऱ्याचें दास्यत्व करावें. ह्याप्रमाणें उभयतांच्या प्रतिज्ञा झाल्यावर कद्रू आपले पुत्र जे नाग त्यांना सर्व हकीगत सांगून म्हणाली कीं, मला विनतेचें दास्यत्व करावें लागणार नाहीं, व माझी प्रतिज्ञा खरी होईल, असा एखादा उपाय करावा. असें आज्ञापिल्यानंतर नागांनीं मातृकार्याकरितां, नर्मदातीरीं तपश्चर्या केली. नंतर शंकरानें प्रसन्न होऊन, नागांचे सर्व मनोरथ सफल केले. नंतर नागांनीं त्या ठिकाणीं शिवलिंग स्थापित केलें; तेंच हें नागतीर्थ होय. ह्या तीर्थांत स्नान करणाराला नागादिकांचें भय अवशिष्ट राहत नाहीं. जे कोणी येथें पंचमीला शिवपूजन करितात, ते सर्व पातकांपासून मुक्त होऊन शिवलोकाला जातात.

---

# अध्याय १३२ वा.

## आदिवाराहतीर्थमाहात्म्य.

मार्कंडेय म्हणतात; धर्मा! नर्मदेच्या उत्तरतीरावर आदिवाराहतीर्थ आहे. तेथें स्नान केलें असतां ते सर्वपापांपासून मुक्त होतात. ह्या ठिकाणीं श्रीमहाविष्णूनें लोककल्याणार्थ आदिवराहावतार धारण केला. त्या तीर्थांत स्नान करून आदिवराहाचें पूजन करणारे लोक सर्वपापांपासून मुक्त होतात. पापी लोकांच्या सहवासानें स्वतः प्राप्त होणाऱ्या पापानें युक्त असणारे जे लोक त्यांचीं सर्व पापें आदिवराहतीर्थाच्या दर्शनानें व स्नानानें नष्ट होतात. ज्याप्रमाणें गरुडाला पाहून सर्प भयभीत होऊन नाश पावतात, त्याचप्रमाणें आदिवराहाच्या दर्शनानें सर्वपापें नष्ट होतात. ज्याप्रमाणें सूर्योदय होतांच संपूर्ण अंधकाराचा नाश होतो, त्याप्रमाणें आदिवराहाच्या पूजनानें सर्वपापें दग्ध होतात. ज्यांची भक्ति ईश्वराचे ठिकाणीं अनन्यभावानें संलग्न झालेली आहे, अशा भक्तांनीं "ॐ नमो नारायणाय" ह्या अष्टाक्षरी मंत्राचा जप केला असतां त्यांस इतर मंत्रांची मुळींच आवश्यकता नाहीं; फक्त ह्याच मंत्रजपानें सर्व कार्यें सिद्धीला जातील. श्रीविष्णूला एकच

नमस्कार केला असतां त्यास दहा अश्वमेध यज्ञ केल्याचें पुण्य मिळतें. दहा अश्वमेध यज्ञ करणारा पुनः पुण्य सरतांच जन्माला येतो; परंतु विष्णूला नमस्कार करणारा पुनः कधींहि जन्माला येत नाहीं; हाच त्या उभयतांमध्यें विशेष फरक आहे. जे कोणी ह्या आदिवराहतीर्थांमध्यें देहत्याग करितील ते देवांना दुर्लभ अशा वैकुंठाला प्राप्त होतील.

---

## अध्याय १३३ वा.



### कुबेरादितीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात; धर्मा! नंतर कुबेरतीर्थ, वरुणतीर्थ, यमतीर्थ व वायुतीर्थ ह्या चार तीर्थांमध्यें जाऊन स्नान करावें. पूर्वीं ध्रुवस्थानाची इच्छा धरून लोकपाल नर्मदातीरीं येऊन व वायुभक्षण करून तप करिते झाले; त्यांच्या त्या घोर तपश्चर्येनें संतुष्ट झालेले शंकर कुबेरादिकांजवळ येऊन त्यांस इच्छित वर देते झाले. नंतर शंकर स्वस्थानीं निघून गेल्यावर कुबेरादिकांनीं आपआपल्या नांवांनीं नर्मदातीरीं एकेक लिंग स्थापित केलें. तीं कुबेरेश्वर, वरुणेश्वर, यमेश्वर व वातेश्वर ह्या नांवांनीं अद्याप प्रसिद्ध आहेत. अशातऱ्हेनें लिंगस्थापना केल्यावर त्यांनीं त्यांची पूजा केली. जे कोणी ह्या चार लिंगांचें पूजन करितात त्यांच्या सर्व इच्छा पूर्ण होऊन ते शिवलोकाला प्राप्त होतात.

---

## अध्याय १३४ वा.



### रामेश्वरतीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात; धर्मा! नर्मदेच्या दक्षिणतीरावर असणारें जें रामेश्वरतीर्थ आहे, तें प्रत्यक्ष रामचंद्रानें निर्माण केलें असल्यामुळें त्याचें माहात्म्य इतर सर्व तीर्थांहून श्रेष्ठ आहे. ह्या तीर्थमाहात्म्यश्रवणानेंहि मोक्ष प्राप्त होतो.

---

## अध्याय १३९ ते १४० वा.

### वाराहतीर्थादितीर्थमाहात्म्य.

नंतर वाराहतीर्थांत स्नान करावें. जें वाराहतीर्थ विष्णूनें जगाच्या उद्धारार्थ वराह अवतार घेऊन नर्मदेच्या कांठीं निर्माण केलें आहे. त्या तीर्थांत स्नान केल्यावर वराहाचें पूजन, व रात्रीं जागरण करावें; म्हणजे सर्व संकटांचें निरसन होऊन स्वर्गलोकाची प्राप्ति होते. नंतर तेथून सिद्धेश्वरतीर्थांत स्नान करावें. व सिद्धेश्वराचें पूजन करावें; म्हणजे वाजपेयादि यज्ञांचें फल प्राप्त होतें. तसेंच पूर्वी जेथें रामचंद्रानें अहिल्येचा उद्धार केला तेथें असणाऱ्या अहिल्येश्वराचें पूजन करावें; म्हणजे सर्व पातकें नष्ट होतात; व त्यास स्वर्गप्राप्ति होते. अहिल्येश्वरतीर्थांत स्नान केल्यानंतर कर्कटेश्वरतीर्थांत स्नान करावें. त्या कर्कटेश्वराचें पूजन करणाराला पुनः जन्ममरणादि दुःखें प्राप्त होत नाहींत. ह्या कर्कटेश्वरासन्निध तपश्चर्या करून वालखिल्यप्रमुख ऋषि, व मरीचिप्रमुख ऋषि सद्गतीला प्राप्त झाले. कर्कटेश्वरानंतर शक्रतीर्थाला जावें. तेथें स्नान करून शक्रेश्वराचें पूजन करणारास परस्त्रीगमनाचा दोष लागत नाहीं. पूर्वी शक्र म्हणजे इंद्र अहिल्येजवळ केलेल्या व्यभिचारामुळें प्राप्त झालेल्या दोषाचें ह्या तीर्थांत स्नान करून नाशन करिता झाला; करितां ह्या तीर्थांत स्नान करणारे दोषमुक्त होऊन शिवलोकीं जातात. नंतर सोमतीर्थांत स्नान करून नंदाह्रदामध्यें स्नान करावें. पूर्वी नंदादेवीनें महिषासुराचा वध केल्यानंतर हा ह्रद निर्माण केला आहे. ह्याच्या स्मरणानेंहि मुक्ति मिळेल.

---

## अध्याय १४१ ते १५० वा.

### तापेश्वरादितीर्थमाहात्म्य.

मार्कंडेय म्हणतात, धर्मा! पूर्वी एकदां हरिणी व्याधाच्या भीतीनें उदकांत देह विसर्जन करिती झाली; हा हरिणीचा प्रकार पाहून; व देह नश्वर आहे, असें निश्चित ठरवून त्या व्याधानें हातांतील धनुष्यबाण फेंकून दिले, व त्या ठिकाणीं मोठी तपश्चर्या केली. त्याच्या तपानें शंकर प्रसन्न होऊन व्याधास वर देते झाले. व्याधानें जेथें तप केलें त्या तीर्थाला तापेश्वरतीर्थ म्हणतात. जे कोणी तापेश्वरतीर्थांत स्नान करून तापेश्वराचें पूजन करितात ते

दुःखमुक्त होत्साते शिवलोकीं जातात. त्यानंतर रुक्मिणीतीर्थांत स्नान करावें. पूर्वी कुण्डिननामक नगरांत भीष्मक नांवाचा एक राजा होता. त्याला रुक्मीनांवाचा एक पुत्र; व रुक्मिणीनांवाची एक कन्या असती झाली. रुक्मिणीच्या जन्मकाळीं आकाशवाणी झाली कीं, हे राजा! तुझी ही मुलगी कृष्णाला अर्पण कर. पुढें हा प्रकार रुक्मीनामक भीष्मकपुत्राला न आवडून त्यानें रुक्मिणी शिशुपाळाला द्यावयाची असें ठरवून सर्वत्र लग्नचिठ्या पाठविल्या. रुक्मिणीच्या मनांतून कृष्णाशींच लग्न लावावयाचें असल्यामुळें तिनें गुप्तरीतीनें सुदेवनामक ब्राह्मणाला कृष्णाकडे पाठवून आपला अभिप्राय त्यास कळविला. तत्काळ कृष्ण बळरामासह कुण्डिन नगराला प्राप्त होऊन; व संधी साधून रुक्मिणीचें हरण करता झाला. नंतर कृष्णबळरामाबरोबर रुक्मीचें युद्ध होऊन त्यांत रुक्मी, शिशुपाळ वगैरे वीरांचा पराभव झाला. कृष्णानें मरीच्यादिऋषींच्या समक्ष रुक्मिणीशीं विवाह लाविला. नंतर रुक्मिणीनें नर्मदातीरीं एक तीर्थ निर्माण केलें, तेंच हें रुक्मिणीतीर्थ होय. ह्या तीर्थांत स्नानदानादि पुण्य कृत्यें करणारास विष्णुलोकाची प्राप्ति होते. रुक्मिणीतीर्थांत स्नान केल्यावर योजनेश्वरतीर्थांत स्नान करावें; त्यायोगें मनुष्य निष्पाप होत्साता शिवलोकीं प्राप्त होतो. नंतर द्वादशीतीर्थ; व शिवतीर्थ ह्या दोन तीर्थांत स्नान करून शिवलिंगाचें पूजन करावें. ह्या तीर्थांचे काठीं श्राद्धादि केल्यास सर्व पितरांचा उद्धार होऊन त्यांसह शिवलोकाची प्राप्ति होते. त्या नंतर अस्माहकनांवाच्या पितृतीर्थांत स्नान करून श्राद्धविधीहि करावेत; म्हणजे गयाप्रमुख तीर्थांत श्राद्धें केल्याचें पुण्य लागून सर्व पितरांचा उद्धार होतो. नंतर सिद्धेश्वर; व अंगारकेश्वर ह्या तीर्थांत स्नान केलें असतां सर्व सिद्धि प्राप्त होऊन शिवसायुज्यमुक्तिहि प्राप्त होते. अंगारकी चतुर्थीला अंगारकेश्वराचें दर्शन घेणाराचीं सर्व शुभकृत्यें निर्विघ्नपणें पार पडून त्यास अश्वमेधादि यज्ञांचें पुण्य प्राप्त होतें. नंतर लिंगवाराहतीर्थांत स्नान करून कुसुमेश्वर तीर्थांत स्नान करावें. हें तीर्थ मदनानें स्थापित केलें आहे. जे कोणी चैत्र महिन्यांत ह्या तीर्थांत स्नान करून पितरांचे नांवानें श्राद्धविधि करितात, ते पितरांसह शिवलोकाला प्राप्त होतात.

---

## अध्याय १५१ ते १६० वा.



### जयवाराहादितीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात,— धर्मा! नर्मदेच्या कांठीं एक जयवाराह नांवाचें तीर्थ आहे. जे कोणी ह्या तीर्थांत स्नान करून, विष्णूच्या मत्स्यादि दहा अव-

तारांचें कीर्तन करितात, ते सर्व पापापासून मुक्त होतात. नंतर मत्स्यादि अव-तार विष्णूनें कां घेतले? असा धर्माचा प्रश्न ऐकून मार्कंडेय म्हणतात कीं, ज्या वेळीं दैत्यांनीं वेद चोरून समुद्रांत बुडविले त्या वेळीं विष्णूनें मत्स्यावतार घेऊन वेदोद्धार केला; व ते वेद देवांना आणून दिले. ज्या वेळीं समुद्र-मंथन सुरू झालें, त्या वेळीं रवीप्रमाणें उपयोगांत आणिलेला जो मंदरपर्वत तो समुद्रांत तळाला जाऊं लागला असतां, त्याला वरती उचलण्याकरितां विष्णूनें कूर्मावतार घेतला. समुद्रांत बुडालेल्या पृथ्वीला वर काढण्याकरितां विष्णूनें वराहावतार घेऊन, हिरण्याक्षाचा वध केला. हिरण्यकशिपूला मारून, प्रल्हादाचें रक्षण करण्याकरितां, विष्णूनें नरसिंहाचा अवतार घेतला. बळीला पाताळांत घालून इंद्राला इंद्रपद देण्याकरितां विष्णूनें वामनावतार घेतला. सहस्रार्जुनाला मारून एकवीस वेळा निःक्षत्रिय पृथ्वी करण्याकरितां भगवंतानें परशुरामाचा अवतार घेतला. रावणाचा वध करून देवांना सौख्य देण्याकरितां, विष्णूला रामावतार घ्यावा लागला. कंसादि दुष्ट दैत्यांचा नाश करून पृथ्वीचा भार दूर करण्या-करितां, विष्णूनें श्रीकृष्ण नांवानें अवतार घेतला. नंतर कलियुगांत जगाला मोहित करण्याकरितां, व पाखंडमतांचा उच्छेद करून, लोकांना भक्तिमार्ग दाख-विण्याकरितां विष्णूनें बुद्धावतार धारण केला; व दाहावा कल्कि-अवतार घेऊन विष्णु मुसलमानांचा आणि दुष्ट प्राण्यांचा वध करणार असून, सर्व जगात् सन्मार्गाला लावून त्याचा उद्धार करणार आहे. असे हे भगवंताचे दशावतार जे श्रवण करितील ते निष्पाप होत्साते वैकुंठलोकाला प्राप्त होतील. जयवाराह-तीर्थांत स्नान केल्यानंतर भार्गवेश्वराचें पूजन, व तीर्थ-स्नान करावें; म्हणजे अश्वमेधयज्ञाचें फळ प्राप्त होतें. नंतर रवितीर्थ, कल्कलेश्वरतीर्थ, शुक्लतीर्थ, वासुदेवतीर्थ, हंकारस्वामीतीर्थ; व संगमेश्वरतीर्थ ह्या तीर्थांत स्नान करावें. हीं सर्व तीर्थें अनेकप्रकारचीं शुभ फलें देणारीं आहेत. ह्या साहा तीर्थांचे काठीं श्राद्धादि शुभ कृत्यें केल्यास पितरांचा उद्धार होऊन, ज्योतिष्टोमादि व अश्व-मेधादि यज्ञ केल्याचें त्यांस फल प्राप्त होतें. नंतर अनरकेश्वरतीर्थांत स्नान करावें. त्या तीर्थांत स्नान करणारा प्राणी कितीहि पातकी असला, तरी तो सर्व पापापासून मुक्त होऊन स्वर्गाला जातो. नरकाला जाण्याची त्यास भीति रहात नाहीं. अश्विन कृष्ण चतुर्दशीचे दिवशीं ह्या अनरकेश्वरतीर्थांत स्नान करून, श्राद्ध करणाराचे पितर निष्पाप होत्साते शिवसायुज्याला प्राप्त होतात; व त्यांना अठ्ठावीस कोटी नरकांत जावें लागत नाहीं. अनरकेश्वरतीर्थांत स्नान केल्यानंतर मोक्षतीर्थांत स्नान करावें. ह्या मोक्षतीर्थांत स्नान करून पुलस्त्य, पुलह, क्रतु, वशिष्ठ, दक्ष, नारद वगैरे सात हजार ऋषि सिद्धीप्रत प्राप्त होते झाले. ह्या तीर्थमाहात्म्याच्या श्रवणानेंहि मोक्ष मिळतो.

# अध्याय १६१ ते १६८ वा.

## सर्पतीर्थादितीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय ह्मणतात; धर्मा ! मोक्षतीर्थांत स्नान केल्यानंतर सर्पतीर्थाचे काठीं जाऊन स्नानादि कृत्यें करावींत. ह्या सर्पतीर्थाचे काठीं वासुकी, तक्षक, ऐरावत, कालिय, कर्कोटक, धनंजय, शंखचूड, धृतराष्ट्र, वृकोदर, कुलिक, वामन वगैरे सर्प तप करून व्रतसिद्धि मिळविते झाले; करितां ह्या सर्पतीर्थांत स्नान करून तीर्थविधि करणारांस वाजपेयादि यज्ञ केल्याचें फल मिळून सर्व सिद्धिहि प्राप्त होतात. त्यानंतर गोपेश्वरतीर्थांत स्नान करावें. ह्मणजे कितीहि पापी मनुष्य असला तरी तो शिवलोकाला जातो. गोपेश्वरानंतर नागतीर्थांत स्नान करावें. आश्विन शुद्ध पंचमीला जितेन्द्रियपणानें व शुद्धान्तःकरणानें नागतीर्थांत स्नान करून व नागेश्वराचें षोडशोपचारविधीनें पूजन करून रात्रीं जागरणादि करणारांस व त्या तीर्थाचे काठीं श्राद्धादि करणारांस पितरांसह निर्दोषपणानें शिवलोकाची प्राप्ति होते; नंतर सांवौरतीर्थांत स्नान करावें. ज्या सांवौरतीर्थाचे संनिध देवदैत्यांनीं पूजिलेला सूर्य प्रत्यक्ष राहिलेला आहे. जे कोणी पांगळे, व्यंग, कुष्ठादि रोगानें पीडित, अनाथ व निर्बल असतील त्यांनीं जर सांवौरतीर्थांत स्नान केलें व सांवौरेश्वराचें पूजन केलें तर ते ह्या वरील सर्व दोषापासून मुक्त होऊन सुख, संपत्ति इत्यादिकानें युक्त होत्साते शिवलोकाला प्राप्त होतील. सांवौरतीर्थांत स्नान केल्यानंतर सिद्धेश्वरतीर्थांत स्नान करावें. हें तीर्थ सर्व तीर्थांमध्यें श्रेष्ठ आहे. हें तीर्थ नर्मदानदीच्या दक्षिणतीरावर असून ह्या ठिकाणीं श्राद्धादि करणारांस मोक्षप्राप्ति होते. ह्या सिद्धेश्वरतीर्थाचे काठीं कापिलादि मुनि तप करून सिद्धि मिळविते झाले, असा ह्या तीर्थाचा महिमा विशेषतः अवर्णनीय आहे. त्यानंतर ज्या तीर्थाचे काठीं सिद्धेश्वरी देवी अनेकप्रकारच्या सुखांना मिळविती झाली, असें हें सिद्धेश्वरीतीर्थ स्नान करणारांच्या सर्व पातकांचें निरसन करणारें आहे; करितां या तीर्थांत स्नान केलें असतां प्राणी दुःखमुक्त होऊन व या लोकीं सुख भोगून अंतीं मोक्षाला प्राप्त होतो. अष्टमी किंवा चतुर्दशी या दिवशीं या तीर्थांत स्नान करून सिद्धेश्वरीदेवीचें पूजन करणारांवर देवी प्रसन्न होऊन त्यास पुत्र, धन वगैरे देऊन स्वलोकाला घेऊन जाते; नंतर मी स्वतः स्थापित केलेल्या मार्कण्डेयेश्वरतीर्थांत स्नान करून मार्कण्डेयेश्वराचें पूजन करणारांवर शंकर स्वतः प्रसन्न होऊन त्यास स्वस्थानीं घेऊन जातात. त्यानंतर अंकूरेश्वरतीर्थांत स्नान करावें. हें तीर्थ रावणाचा भाऊ जो कुंभकर्ण

त्याच्या अंकूर नांवाच्या नातवानें तप करून तें स्थापिलें आहे. या तीर्थांत स्नान करून अंकूरेश्वराचें पूजन केलें असतां सर्व सिद्धि प्राप्त होऊन मोक्षहि प्राप्त होतो. अंकूरेश्वरतीर्थांत मृत झालेल्या लोकांना शिवलोकप्राप्ति होते.

---

## अध्याय १६९ ते १७२ वा.

### मांडव्यनारायणतीर्थमाहात्म्य.

मार्कंडेय म्हणतात,—धर्मा! पूर्वी देवपन्न नांवाचा एक राजा होता. त्याची कल्याणिनी नांवाची एक प्रिय पत्नी होती. त्यानें पुत्रप्राप्तीकरितां देवीची आराधना केली. त्याच्या आराधनेनें देवी प्रसन्न होऊन राजास म्हणाली कीं, तुझ्या दैवांत पुत्रप्राप्तीचा योग नाहीं; परंतु जर तूं यज्ञादि कृत्य केलेंस तर त्यायोगें तुला एखादी कन्या होईल. असें सांगून देवी गुप्त झाली. नंतर देवपन्न राजानें यज्ञादि कर्म केलें असतां त्याला कामप्रमोदिनी नांवाची सुंदर मुलगी झाली. ती मुलगी सखीसह बागेंत खेळत असतां तिला शंबर राक्षसानें श्येनपक्ष्याच्या रूपानें येऊन पळवून नेलें. त्या मुलीच्या अंगावर जे दागिने होते, ते त्या शंबरानें वाटेनें जातां जातां जेथें मांडव्यऋषि तप करीत बसला होता, तेथें टाकिले; व तो शंबर आपल्या राजधानींत निघून गेला. इकडे मुलीला पळवून नेल्याचें वर्तमान देवपन्न राजाला समजतांच त्यानें आपले दूत मुलीचा शोध करण्याकरितां जिकडे तिकडे पाठविले. दूतांनीं मुलीच्या अंगावरचे दागिने मांडव्य ऋषीच्या आश्रमाजवळ आहेत, असें ओळखून राजाला वर्दी दिली. राजानें मनांत विचार केला कीं, ज्यापेक्षां माझ्या मुलीचे दागिने मांडव्य ऋषीच्या आश्रमाजवळ पडले आहेत, त्यापेक्षां माझी मुलगी ह्या ऋषीनेंच पळवून नेली असावी. अशा समजुतीनें राजानें मांडव्य ऋषीला सुळावर चढविण्याचें ठरविलें. व त्याप्रमाणें मांडव्याला सुळावर चढविलें. हा प्रकार जाणून मांडव्याचा ज्येष्ठ बंधु जो नारायणऋषि त्याला राग आला; व आतां राजाला शाप देणार, इतक्यांत त्याला मांडव्यानें त्या कृत्यापासून परावृत्त केलें. नंतर सर्व देव; व दुसरे ऋषि हे प्रकार जाणून मांडव्याला भेटण्याकरितां आले; व त्यांनीं त्याचें पुष्कळ प्रकारें समाधान केलें. दुसरे दिवशीं शांडिली नामक एक पतिव्रता स्त्री आपल्या पतीला खांद्यावर उचलून घेऊन काळोख्या रात्रीं त्याच रस्त्यावरून राजद्वाराकडे जात होती. जातां जातां जेथें मांडव्य ऋषीला शूळावर चढविलें होतें, तेथें येतांच तिचा त्या ऋषीला धक्का लागला. त्यायोगें मांडव्याला अधीक राग येऊन तो म्हणतो कीं, तूं कोण आहेस! व येथें या अपरात्रीं मला त्रास देण्याकरितां

कां आलीस ! त्या वेळीं शांडिली म्हणते कीं, मी पतिव्रता स्त्री आहे; व पतीला घेऊन जात असतां चुकून आपल्याला माझा धक्का लागला, याची मला क्षमा करा. नंतर मांडव्यानें तिच्या प्रार्थनेला न जुमानून तिला शाप दिला कीं, तुझा पति सूर्योदय होतांच नष्ट होईल. हा शाप ऐकतांच शांडिलीला वाईट वाटलें; व ती ऋषीला म्हणाली कीं, तुम्ही हा दिलेला शाप परत घ्या, मी पतिव्रता आहे; व तुमचा शाप खोटा करीन; व त्यांत तुमचा मान राहणार नाहीं. असें पतिव्रतेनें सांगितलें, तरी सुद्धां मांडव्यानें आपला शाप परत घेतला नाहीं. नंतर ती शांडिली पतीला घेऊन आपल्या आश्रमाला येऊन स्वस्थ बसली; व सूर्याला उद्देशून म्हणाली कीं, माझ्या आज्ञेवांचून जर उगवलास तर तुला माझ्या पातिव्रत्यधर्मप्रभावानें जाळून भस्म करीन. हें तिचें भाषण ऐकतांच सूर्याला काळजी उत्पन्न झाली; व तिच्या भीतीनें तो नित्याप्रमाणें उगवला नाहीं. सूर्योदय न झाल्यामुळें लोकांचीं नित्यनैमित्तिक कर्में बंद पडून देवतांना हविर्भागहि मिळेनासे झाले. त्या वेळीं सर्व देव मांडव्य ऋषीकडे येऊन त्याच्या-सह शांडिलीच्या आश्रमाला प्राप्त झाले. शांडिलीला सूर्योदय करण्याबद्दल देवांनीं विनंती केली असतां ती देवांना म्हणते कीं, तुम्ही आपलें कार्य साधण्याक-रितां माझजवळ आलां; परंतु सूर्योदय होतांच माझ्या पतीचा अंत होईल याची वाट काय ! तेव्हां देवांनीं तिच्या पतीला जिवंत करण्याचें तिला वचन देऊन सूर्योदय करण्यास सांगितलें. सूर्योदय होतांच देवांनीं तिच्या पतीला जिवंत करून लोकांचीं कर्में अबाधित चालू केलीं. तितक्यांत शंबरराक्षस कामप्रमोदिनी नामक हरण केलेल्या राजकन्येला देवपन्न राजाजवळ आणून देऊन केलेल्या अपराधाची क्षमा मागून स्वस्थानीं निघून गेला. नंतर राजानें आपल्या मुलीचा मांडव्याबरोबर विवाह लाविला. ज्या ठिकाणीं शांडिलीचा पति देवांनीं जिवंत केला, तेथें मांडव्यानें, व त्याचा बंधु जो नारायण त्यानें एक तीर्थ निर्माण करून त्यास मांडव्यनारायणतीर्थ हें नांव ठेविलें. ह्या मांडव्यनारायणतीर्थांत स्नान करून मांडव्येश्वराचें पूजन करणाराच्या सर्व व्याधि नष्ट होऊन ते निरोगी; व दीर्घायु होत्साते पुष्कळ काळपर्यंत शिवलोकीं राहतील.

---

## अध्याय १७३ ते १८० वा.

### शुद्धेश्वरादितीर्थमाहात्म्य.

स्नान केल्यानंतर शुद्धेश्वर
हे तीर्थ मोठमोठीं पातकें

नष्ट करणारें आहे. पूर्वीं शंकरानें ब्रह्मदेवाचें मस्तक तोडल्यामुळें त्याला लागलेला जो ब्रह्महत्येचा दोष तो ह्या तीर्थात स्नान केल्यामुळें नष्ट होऊन शंकराला निर्दोषत्व प्राप्त झाल्यामुळें तो शुद्ध झाला. त्याला कोणी शुद्धरुद्रतीर्थ असेंहि म्हणतात. ह्या तीर्थासन्निध पितरांना उद्देशून श्राद्ध केलें असतां बारा वर्षेपर्यंत पितर तृप्त होऊन मुक्त होतात. ह्या तीर्थात केवळ स्नान केलें तरी सुद्धां शिवलोकाची प्राप्ती होते. त्यानंतर गोपेश्वरतीर्थांत स्नान करावें. जे कोणी ह्या तीर्थात प्राणत्याग करितात, ते मोठ्या आनंदानें शिवलोकाला प्राप्त होतात. कार्तिक शुद्ध नवमीला ह्या गोपेश्वर तीर्थात स्नान करून देवापुढें पुष्कळ दिवे लाविल्यानें पुष्कळ कल्पपर्यंत शिवलोकीं राहावयास मिळतें. गोपेश्वरानंतर कपिलेश्वरतीर्थाला जाऊन स्नान करावें. भगवंतांनीं कपिल नावानें अवतार घेऊन ह्या तीर्थाची स्थापना केली असल्यामुळें हें तीर्थ मुक्ति देणारें आहे. ह्या तीर्थांत स्नान करणारांना हजार गाई दान दिल्याचें पुण्य लागतें. ज्येष्ठ शुद्ध चतुर्दशीला ह्या तीर्थात स्नान करून थोडेबहुत यथाशक्ति सत्पात्रीं दान दिल्यास तें दान अक्षय्य फल देणारें होतें. ह्या तीर्थाचे काठीं प्रत्येक पौर्णिमेला, व अमावास्येला पितृश्राद्ध करणाराचे पितर बारा वर्षेपर्यंत तृप्त होऊन मुक्त होतात. त्यानंतर पिंगलावर्ततीर्थात स्नान केलें असतां प्राणी कायिक, वाचिक, व मानसिक पापापासून मुक्त होतो. हें तीर्थ पिंगलाक्ष नांवाच्या अग्नीनें शिवाराधना करून निर्माण केलें आहे. पिंगलावर्ततीर्थात स्नान करून पिंगलेश्वराचें पूजन करणारे प्राणी निरोगी होत्साते रुद्रलोकांत राहून मुक्त होतात. प्रत्येक रविवारीं ह्याप्रमाणें पिंगलेश्वराचें पूजन करणारे, व त्याठिकाणीं योग्य ब्राह्मणाला तिलपात्र दान करणारे कुष्ठरोगापासून मुक्त होऊन शिवसायुज्यमुक्तीप्रत प्राप्त होतात. पिंगलावर्ततीर्थात स्नान केल्यावर भूतीश्वरतीर्थात स्नान करावें. ह्या तीर्थाचे काठीं शंकरानें आपल्या अंगाला भस्म लाविलें होतें; म्हणून ह्या स्थानाला भूतीश्वर हें नांव प्राप्त झालें आहे. ह्या भूतीश्वर तीर्थात स्नान करणाराची कोट्यावधि कुळें उद्धरून जातात. भूतीश्वराच्या अंगाला लाविलेल्या भस्मांपैकीं जितके भस्मकण आपल्या अंगाला लागले असतील तितकीं हजार वर्षें आपणास शिवलोकीं राहावयास मिळेल, भस्मस्नानाहून दुसरें श्रेष्ठ स्नान नाहीं. ह्या भूतीश्वर तीर्थात स्नान करून भूतीश्वराचें पूजन करणाराला अश्वमेधयज्ञाचें फळ मिळून मोक्षहि मिळतो. भूतीश्वरानंतर गंगावाहकतीर्थात स्नान करावें. ह्या गंगावाहकतीर्थाचे काठीं साक्षात् गंगेनें शंभर वर्षें तप केलें होतें. त्या तपानें विष्णु प्रसन्न होऊन, व गंगेला इच्छित वर देऊन त्यानें गंगेकडून तीर्थ निर्माण करविलें, व त्याठिकाणीं ते स्वतः राहते झाले. ह्या तीर्थाचे काठीं असणाऱ्या विष्णूचें

पूजन करून रात्रीं जागरण करणारे विष्णुलोकाला प्राप्त होतात. त्या ह्या तीर्थांत स्नान करून पितृश्राद्ध करणारांना पुनः जन्ममरणादि प्राप्त होत नाहींत. गंगावाहकतीर्थांत स्नान केल्यानंतर गौतमेश्वरतीर्थांत स्नान करावें. हें गौतमेश्वरतीर्थ सर्वप्रसिद्ध असून सर्व पातकें नाश करण्यास समर्थ आहे. ह्या तीर्थाचे कांठीं गौतमानें पूर्वी तप करून आपल्या नांवानें हें तीर्थ निर्माण केलें आहे जो कोणी ब्रह्मचारी ह्या गौतमेश्वरतीर्थांत स्नान करून शिवपूजन करितो, त्यास अश्वमेधाचें फल प्राप्त होतें; व तो निष्पाप होऊन शिवलोकाला जातो. जे कोणी ह्या ठिकाणीं दानधर्मादि सत्कर्मे करितील त्यांना त्या कर्मांचीं अक्षय्य फळें मिळून ते मुक्त होतील. त्याचे मागून दशाश्वमेधतीर्थांत स्नान करावें. ज्या ठिकाणीं स्नानादि कर्मे केलीं असतां दहा अश्वमेध यज्ञ केल्याचें फळ प्राप्त होतें. आश्विन महिन्यांत ह्या तीर्थांत स्नान केलें असतां त्याचें फळ विशेष आहे. दशाश्वमेधतीर्थाचे कांठीं स्थापिलेल्या सरस्वतीदेवीचें पूजन करणारेहि मोक्षाला प्राप्त होतात. येथें संन्यास घेतला असतां मुक्ति मिळते.

---

## अध्याय १८१ ते १८५ वा.

---

### भृगुकच्छादितीर्थमाहात्म्य.

मार्कंडेय ह्मणतात, धर्मा ! आतां तुह्माला भृगुकच्छतीर्थाचें माहात्म्य सांगतों, ऐका. ह्या माहात्म्याच्या श्रवणानें ब्रह्महत्या, गोहत्या वगैरे पातकें नाश पावतात. ह्या तीर्थासन्निध धूतपाप नांवाचें एक स्थान आहे. हें भृगुकच्छतीर्थ भृगुऋषीनें घोर तप करून शिवरूपानें निर्माण केलें आहे. भृगुमुनि हा ब्रह्मदेवाचा पुत्र होय. त्यानें प्रत्येक महिन्याला एक पाण्याचा थेंब पिऊन देवांचीं एक हजार वर्षे पुरीं होईपर्यंत शिवाची आराधना केली. त्या वेळीं पार्वती शंकराला ह्मणते कीं, भृगुमुनी इतकी घोर तपश्चर्या करीत असतां तुह्मी त्याजवर प्रसाद करीत नाहीं, हें ठीक नाहीं. ह्याप्रमाणें पार्वतीचें भाषण ऐकून शंकर ह्मणतात कीं, जोंपर्यंत मनुष्याचे जवळ क्रोध आहे, तोंपर्यंत केलेली तपश्चर्या निष्फळ आहे. भृगुमुनीजवळ अजून क्रोध असल्यामुळें त्याच्या तपाचें फळ त्याला मिळत नाहीं; असें ह्मणून आपल्याजवळ उभा असलेल्या नंदीला (वृषाला) शंकरानें भृगुला क्रोध उत्पन्न करण्याकरितां त्याजकडे पाठविलें. नंतर शंकराच्या आज्ञेप्रमाणें नंदीनें भृगुला आपल्या शिंगानें उचलून नर्मदेंत टाकिलें. त्यायोगें भृगुला राग येऊन तो नंदीला काठीनें ताडण करिता झाला.

तेथें पुढें धांवत आहे; व भृगु त्याचे पाठीस लागला आहे. असें धांवतां धांवतां तेथें इंद्रचंद्रादि लोक फिरून शेवटीं अत्यंत थकल्यामुळें शंकराजवळ प्राप्त झाला. नंतर पार्वती ह्मणते, शंकरा! हा भृगु जोंपर्यंत येथें येऊन आपल्यावर रागावला नाहीं, तोंपर्यंत त्याच्यावर प्रसन्न होऊन त्याच्या इच्छा पूर्ण कराव्या. असें पार्वतीचें भाषण ऐकून शंकर भृगुजवळ स्वस्वरूपानें प्रगट झाले. शंकराला पाहून भृगुला आनंद झाला व तो शंकराची स्तुति करूं लागला. त्याच्या स्तुतीनें शंकर प्रसन्न होऊन भृगूच्या इच्छेप्रमाणें भृगु जेथें तप करीत होता, तेथें भृगुकच्छतीर्थ निर्माण केलें व नंदीनें भृगुला पाण्यांत टाकिलें होतें. तेथें वृषखाततीर्थ निर्माण केलें. ह्या तीर्थांत स्नान करून हें माहात्म्य श्रवण करणारांचीं सर्व पातकें नष्ट होतात. भृगुकच्छतीर्थांत स्नान केल्यानंतर केदारेश्वरतीर्थांत स्नान करावें. ह्या तीर्थांत माघमहिन्यांत स्नान केलें असतां सर्व पापें नष्ट होऊन शिवसान्निध्य प्राप्त होतें. त्यानंतर धौतपापेश्वरतीर्थाचे काठीं जाऊन स्नान करणारा निष्पाप होऊन शिवलोकाला प्राप्त होतो. शंकराला ब्रह्मदेवाचें पांचवें मस्तक तोडल्यामुळें लागलेली जी ब्रह्महत्या ती ह्या धौतपापेश्वरतीर्थांत स्नान केल्यामुळें नष्ट झाली. ह्या तीर्थांत स्नान केल्यानें मोठमोठीं पातकें धुवून जात असल्यामुळें ह्यास धौतपापेश्वर ह्मणतात; नंतर एरंडीतीर्थांत स्नान करावें. हें तीर्थसुद्धां ब्रह्महत्यादि पातकें नष्ट करणारें आहे. कार्तिक शुक्लचतुर्दशीला ह्या तीर्थांत स्नान केलें असतां शिवलोकाची प्राप्ति होते.

---

## अध्याय १८६ ते १९१ वा.

### कनखलेश्वरादितीर्थमाहात्म्य.

मार्कंडेय म्हणतात; धर्मा! आतां तुम्हाला कनखलेश्वरतीर्थाचें माहात्म्य सांगतों. जें तीर्थ गरुडानें तपःसामर्थ्यानें स्थापित केलें आहे. ह्याच तीर्थाच्या प्रभावानें गरुडाला विष्णूचें वाहकत्व, व पक्ष्यांमध्यें श्रेष्ठत्व प्राप्त झालें आहे. ह्याच तीर्थाचे ठिकाणीं गरुडानें पार्वतीची आराधना करून तिची कनकेश्वरी नांवानें तेथें स्थापना केली. जे कोणी कनखलेश्वरतीर्थांत स्नान करून कनखलेश्वराचें; व कनकेश्वरीचें पूजन करतात ते पापरहित होऊन शिवलोकीं जातात. नंतर कालाग्निरुद्रतीर्थांत स्नान करून जालेश्वरलिंगाचें पूजन करावें. हें तीर्थ सर्व पापांची निष्कृति करणारें आहे. पूर्वी दैत्यांनीं देवांचा पराभव केला असतां त्या दैत्यांच्या नाशार्थ देवांच्या प्रार्थनेवरून कालाग्निरुद्रतीर्थांतून धूम निघून पातालांतून एक लिंग उत्पन्न झालें; व त्या लिंगापासून निघालेल्या

अग्निज्वाळांनीं दैत्यांचा नाश झाला; म्हणून ह्या लिंगाला ज्वालेश्वर म्हणतात. ह्या ज्वालेश्वराच्या पूजनानें शत्रुनाश; व ऐश्वर्यप्राप्ति होऊन मोक्षहि मिळतो. कालाग्नितीर्थांत स्नान करून ज्वालेश्वराचें पूजन केल्यावर शालिग्रामतीर्थाला जावें. ज्याठिकाणीं वामनावतारी भगवान् विष्णु स्वतः स्वस्वरूपानें राहिले आहेत. ह्या ठिकाणीं नारदऋषीनें तप करून शिवप्रसादानें ब्राह्मणांना वेदाध्ययनाकरितां शाळा निर्माण करून एक तीर्थहि निर्माण केलें; म्हणून ह्या तीर्थाला शालिग्रामतीर्थ म्हणतात. मार्गशीर्ष शुक्ल एकादशीला ह्या शालिग्रामाचें पूजन करून शालिग्रामतीर्थांत स्नान करणारे विद्वान् निष्पाप होऊन वैकुंठाला प्राप्त होतात. ह्या तीर्थाचे काठीं संन्यास घेणारे दुःखमुक्त होत्साते विष्णुस्वरूपांत लीन होतात. ह्यानंतर उदीर्णवराहतीर्थांत स्नान करावें. ह्या ठिकाणीं वराहावतार घेऊन भगवंतानें पृथ्वीचा उद्धार केला होता. ज्येष्ठ शुक्ल एकादशीच्या दिवशीं नर्मदा नदींत स्नान करून व नर्मदेच्या काठीं असणाऱ्या आदिवाराह, जयवाराह, श्वेतवाराह, आदित्यवाराह व उदीर्णवाराह ह्या पांच वाराहतीर्थांत स्नान करून ब्राह्मणांना सुवर्ण, तिळ, घोडे, भूमि, अलंकार वगैरे दान देणारे पंचमहापातकापासून मुक्त होऊन शिवलोकीं जातात. वाराहतीर्थानंतर सोमतीर्थांत स्नान करावें व चंद्रहासाचें पूजन करावें; म्हणजे सर्व सिद्धि प्राप्त होतात. पूर्वी सोमाला एकट्या रोहिणीवरच प्रेम केल्यामुळें तूं क्षयी हो, असा दक्षानें शाप दिला असतां सोमानें तद्दोषपरिहारार्थ शिवाराधना करून सोमतीर्थ निर्माण केलें; व चंद्रहासेश्वर नांवानें तेथें शिवलिंग स्थापिलें. ह्या लिंगाच्या पूजनानें सर्व रोगांचा नाश होऊन मोक्ष प्राप्त होतो. त्यानंतर सिद्धेश्वरतीर्थांत स्नान करावें. ह्या ठिकाणीं सूर्यानें शिवाराधना करून सिद्धि मिळविली. ह्या तीर्थांत स्नान करून सिद्धेश्वराचें पूजन केलें असतां पुत्रप्राप्ति होऊन सिद्धिहि मिळते.

---

## अध्याय १९२ ते १९५ वा.

### श्रीपतिमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात; धर्मा! पूर्वी एकदां ब्रह्मदेवापासून दक्ष व धर्म ह्यांची उत्पत्ति झाली. मरुत्वती, वसु, ज्ञाना, लंबा, भानुमती, संकल्पा, मुहूर्ता, साध्या, विश्वावती; व ककुप् ह्या दाहा धर्माच्या बायका होत. त्या दाहांपैकीं साध्येचे ठिकाणीं धर्मापासून नर, नारायण, हरि; व कृष्ण असे चार मुलगे झाले. त्या चारांपैकीं नर; व नारायण हे दोन गंधमादनपर्वतावर जाऊन तप करिते झाले. त्यांच्या घोर तपानें इंद्राला काळजी वाटून त्यानें तपांत विघ्न उत्पन्न करण्या-

करितां रम्भा, तिलोत्तमा, कुब्जा, घृताची, ललिता, प्रम्लोचा, सुम्लोचा; सौरभेयी व अलंबुषा वगैरे अप्सरा नरनारायणाकडे गंधमादनपर्वतावर पाठविल्या. नंतर त्या सर्व अप्सरांनीं अनेकप्रकारांनीं त्यांना मोहित करण्यास आरंभ केला. त्या अप्सरांच्या दुष्कृत्यांनीं नरनारायणांच्या मनाला तिळमात्रहि विकार झाला नाहीं; मात्र अप्सरांना भुलविण्याकरितां नारायणानें आपल्या मांडीपासून उर्वशी नांवाची एक अति सुंदर अप्सरा निर्माण करून रंभाप्रमुख अप्सरांकडे पाठविली. तिला पाहून त्या अप्सरा लज्जित होऊन नरनारायणांची स्तुति करूं लागल्या. त्यांच्या स्तुतीनें प्रसन्न झालेले नारायण अप्सरांना म्हणतात कीं, मी एक उर्वशीच निर्माण केली आहे, असें समजूं नका. तर माझ्या मनांत आपल्यास मी एका क्षणांत इंद्रचंद्रादि नवीन सृष्टि निर्माण करून दाखवीन, असें माझें सामर्थ्य आहे. नंतर अप्सरांच्या सांगण्यावरून नारायणानें मोठ्यांदा हास्य केलें; व तत्काळ त्यानें इंद्रचंद्रादि नवीन सृष्टि निर्माण केली. हा अद्भुत चमत्कार पाहून; व हे साक्षात् ईश्वर आहेत, असें ओळखून त्यांनीं नारायणाला नमस्कार केला; व त्यांनीं नारायणस्तोत्राचें पठण केलें. नंतर नारायणाच्या सांगण्यावरून अप्सरांनीं उर्वशीला इंद्राकडे नेऊन झालेला सर्व वृत्तान्त इंद्राला कळविला. हा नारायणाचा पराक्रम श्रवण करून भृगुक्षानतीर्थांत उत्पन्न झालेल्या लक्ष्मीनें नारायणाच्या प्राप्तीकरितां पार्वतीच्या सांगण्यावरून नर्मदातीरीं तप केलें. नारायण पति व्हावा, म्हणण्याकरितां लक्ष्मी तप करीत आहे, हें वर्तमान इंद्रादिदेवांस समजताच ते हुबेहुब नारायणासारखें रूप घेऊन लक्ष्मीपुढें उभे राहिले; व म्हणाले कीं, तुझ्या तपानें तुष्ट होऊन आम्ही तुझ्याशीं लग्न लावण्याकरितां आलों आहों. असें त्यांचें वाक्य ऐकतांच लक्ष्मी म्हणते कीं, जर तुम्ही नारायण आहां, तर अप्सरांना दाखविलेलें विश्वरूप मला दाखवा; म्हणजे मी तुमच्याशीं लग्न लाविते, असें लक्ष्मीचें भाषण ऐकतांच देवांना विश्वरूप दाखविणें अशक्य झाल्यामुळें ते नारायणाकडे गेले; व त्यांनीं लक्ष्मीच्या तपश्चर्येबद्दल त्यास निवेदन केलें. नारायण तत्काळ लक्ष्मीजवळ जाऊन; व तिला विश्वरूप दाखवून तिच्याशीं विवाह लाविते झाले. ज्या पर्वतावर लक्ष्मीचा व नारायणाचा विवाह झाला, त्या पर्वताला नारायणगिरि म्हणतात; व त्या स्थानाला श्रीपतिक्षेत्र म्हणतात. ज्याठिकाणीं लक्ष्मी तप करीत होती त्याठिकाणीं इंद्रादि देवांनीं स्नान करून स्वदोषांचें निरसन केल्यामुळें त्यातीर्थाला देवतीर्थ म्हणतात. नंतर लक्ष्मी; व नारायण उभयतां श्रीपतीनांवानें अंशस्वरूपानें त्या क्षेत्रांत वास्तव्य करिते झाले. ह्या देवतीर्थांत स्नान करून श्रीपतीचें पूजन करणारे सर्व दुःखापासून मुक्त होतात.

# अध्याय १९६ ते २०० वा.

—:O:—

## हंसादितीर्थमाहात्म्य.

मार्कंण्डेय म्हणतात, धर्मा ! नंतर हंसतीर्थांत स्नान करून ब्राह्मणाला सुवर्णदान देणारा सर्व पापापासून मुक्त होऊन ब्रह्मलोकाला प्राप्त होतो. नंतर ब्रह्मलोकांत अनेक कल्पपर्यंत राहून शेवटीं मोक्षाला जातो. त्यानंतर सूर्यतीर्थाला जावें. हें तीर्थ ब्रह्मदेवानें निर्माण केलें आहे. पूर्वी एकदां शंकराच्या सांगण्यावरून पार्वतीनें ह्याठिकाणीं सूर्याची स्थापना केली होती. त्या स्थानाला मूलस्थानभास्कर म्हणतात. रविवारीं सप्तमी असतां त्या दिवशीं नर्मदानदींमध्यें स्नान करून मूलस्थानभास्कराचें पूजन करणारे सूर्यलोकाला प्राप्त होतात. त्यानंतर शूलतीर्थांत स्नान करून भद्रकालीचें पूजन करावें; म्हणजे त्यायोगें सद्गति प्राप्त होते. पूर्वी मांडव्यऋषीवर एका राजानें चोरीचा आरोप केल्यामुळें त्यास शूळावर चढविलें होतें; परंतु इतर मुनींच्या प्रार्थनेवरून हा ऋषी असून चोर नव्हे, असें जाणून राजानें मांडव्याला शूळापासून मोकळें केलें. तत्काळ मांडव्यानें शिवध्यान केल्यामुळें शंकर प्रसन्न होऊन त्या शूळासंनिध शूलेश्वर नांवानें राहते झाले. ह्या शूलेश्वरपूजनानें सर्व दोष नष्ट होऊन शिवलोकाची प्राप्ती होते. त्यानंतर काशींत असणाऱ्या विशालाक्षीचें पूजन सर्व फल देणारें आहे. तशीच नैमिषक्षेत्रांत लिंगधारिणी देवी, प्रयागक्षेत्रांत ललितादेवी, गन्धमादनपर्वतावर कामुकादेवी मानससरोवरानजीक असणारी कुमुदादेवी. गोमंतक्षेत्रांत गोमतीदेवी अशातऱ्हेनें ह्या सर्व देवता इच्छित फल देणाऱ्या आहेत. त्यानंतर आश्विनतीर्थांत स्नान करावें. ह्याठिकाणीं आश्विनी देवांनीं तप करून सौंदर्य, व वैद्यकशास्त्रांत नैपुण्य मिळविलें. ह्या आश्विनतीर्थांत स्नान करणारे पितरांना तृप्त करून रूपवान् होत्साते श्रेष्ठ लोकाला प्राप्त होतात. त्यानंतर सावित्रीतीर्थांत स्नान करावें. स्नान करते वेळीं “ आपोहिष्ठा ” ह्या मंत्रांनीं मार्जन करून “ ऋतं च सत्यं ” ह्या मंत्रांनीं अघमर्षण करावें. नंतर “ तदुत्यं जातवेदसं ” ह्या मंत्रानें सावित्रीची प्रार्थना करून “ तत्सवितुर्वरेण्यं ” ह्या गायत्रीमंत्रानें जप केल्यास स्वर्गलोकाची प्राप्ति होते.

# अध्याय २०१ ते २०८ वा.

## देवतीर्थादितीर्थमाहात्म्य.

मार्कंडेय म्हणतात; धर्मा! नंतर देवतीर्थांत स्नान करावें. ज्या ठिकाणीं इंद्रप्रमुख देवांना सिद्धि प्राप्त झाल्या. त्या तीर्थाचे काठीं स्नान, दान, जप, होम, स्वाध्याय, देवपूजन वगैरे कोणतेंहि कृत्य केलें तरी त्याचें त्याला अनंतपटीनें अधिक फळ मिळतें. विशेषेंकरून भाद्रपद कृष्ण त्रयोदशीला त्या तीर्थांत स्नान करून पितृश्राद्ध करावें; म्हणजे पितरांसह मोक्षप्राप्ति होते. त्या नंतर शिखितीर्थांत स्नान करावें. हें तीर्थ सर्व तीर्थांमध्यें श्रेष्ठ आहे. त्या तीर्थाचे काठीं अग्नीनें शिखा म्हणजे ज्वाळा प्राप्त होण्याकरितां शंकराची आराधना केली होती. जे कोणी या तीर्थांत स्नान करून तिलोदकानें देव, ऋषि, पितर, व अन्य देवतांना संतुष्ट करितात, व अग्नीची षोडशोपचारें पूजा करितात, ते विमानांत बसून रुद्रलोकाला प्राप्त होतात. शिखितीर्थांत स्नान केल्यानंतर कोटितीर्थांत स्नान करावें. त्या ठिकाणीं वसिष्ठप्रमुख कोट्यवधि महर्षी तपश्चर्या करून अणिमादि सिद्धींना मिळविते झाले. भाद्रपद कृष्ण चतुर्दशीला त्या कोटितीर्थांत स्नान करून शिवलिंगाचें पूजन केलें असतां नरकांत पडण्याची भीति उरत नाहीं. त्या नंतर पैतामहतीर्थांत जाऊन स्नान करावें. पूर्वी ब्रह्मदेवानें त्या तीर्थाचे काठीं तीनशें वर्षें घोर तप आचरिलें होतें. ब्रह्मदेवानें आपली मुलगी जी सरस्वती तिच्याशीं संभोगाची इच्छा केल्यामुळें शंकरानें ब्रह्मदेवाला शाप दिला; व त्या शापाच्या निरासार्थ ब्रह्मदेवानें शिवाराधना केली. व हें तीर्थ स्थापित केलें. त्या तीर्थाच्या स्नानानें शिवलोक प्राप्त होतो. नंतर कर्कुरीतीर्थांत स्नान करावें. त्या तीर्थांत स्नान केल्यानें पुत्रादिकांची, व धनधान्याची प्राप्ति होते; व शेवटीं मोक्ष प्राप्त होतो. त्या नंतर ओणिनाथतीर्थांत स्नान करावें. त्यालाच दशकन्यातीर्थ म्हणतात. त्या तीर्थाचे काठीं ब्रह्मदेवाच्या दाहा कन्याशीं शंकरानें विवाह लाविला; म्हणून त्याला दशकन्यातीर्थ हें नांव प्राप्त झालें. त्या तीर्थांत स्नानदानादि करणारे ब्रह्मलोकाला प्राप्त होतात. त्या नंतर स्वर्णबिंदुतीर्थांत स्नान करावें. स्वर्णबिंदुतीर्थांत स्नान केल्यानंतर ऋणमोचनतीर्थांत जाऊन स्नान करून श्राद्धादि विधि आचरावे; म्हणजे मनुष्य ब्रह्मऋण, पितृऋण, व देवऋण ह्या तीनहि ऋणापासून मुक्त होऊन निष्पाप होत्साता शिवलोकाला प्राप्त होतो.

---

# अध्याय २०९ वा.

## भारभूतितीर्थमाहात्म्य.

मार्कंडेय म्हणतात, धर्मा ! आतां तुम्हाला भारभूतितीर्थाचें माहात्म्य सांगतों, ऐका. पूर्वी एक विष्णुशर्मा नांवाचा ब्राह्मण होता. तो नर्मदेच्या काठीं राहत असे व भिक्षा मागून उदरनिर्वाह करी. त्या सच्छील ब्राह्मणाला पाहून त्याजकडे प्रत्यक्ष शंकर बटुरूप घेऊन प्राप्त झाले, व ब्राह्मणास ह्मणाले कीं, जर तूं मला विद्या शिकविणार असतील तर माझी इच्छा आपले घरीं राहण्याची आहे. असें बटूचें भाषण ऐकून तो ब्राह्मण बटूला ह्मणतो कीं, जर तुझी विद्याध्ययन करण्याची इच्छा असेल तर मी तुला विद्या शिकवितों, असें ह्मणून त्यानें त्या बटूला विद्या शिकविण्यास प्रारंभ केला. त्या ब्राह्मणाकडे विद्याध्ययन करणारे दुसरेहि पुष्कळ बटु होते; व ते पाळीपाळीनें गुरूच्या घरीं कामें करीत असत. कांहीं दिवसांनीं इतर बटूंनीं बटुवेषधारी ईश्वराला सांगितलें कीं, आजची स्वयंपाक करण्याची तुझी पाळी आहे, आज तुला स्वयंपाक केला पाहिजे; असें त्यांचें भाषण ऐकून बटुवेषधारी शंकरानें सर्व वनस्पतींना गुरुगृहीं अन्न शिजविण्यास सांगून तो इतर बटूंबरोबर फिरावयास निघाला. तेव्हां इतर बटु त्यास म्हणतात कीं, जर तूं आज अन्न शिजविलें नाहींस, तर आम्ही सर्वजण तुला बांधून नर्मदेंत फेंकून देऊं. त्या वेळीं बटुवेषधारी शंकर म्हणतात कीं, तुमचें म्हणणें मला कबूल आहे; परंतु मी बाहेर असूनहि जर गुरुगृहीं अन्न तयार झालें असलें तर मी तुम्हां सर्वांना नर्मदेंत फेंकून देईन; अशा उभयतांच्या प्रतिज्ञा झाल्यावर रोजच्याप्रमाणें ते बटु गुरुगृहीं येऊन पाहतात तों रोजच्यापेक्षांहि उत्तम असा षड्रसपूर्ण स्वयंपाक तयार झाला आहे. हें पाहून इतर बटूंना आश्चर्य वाटून त्यांना बटुवेषधारी शंकराचें कौतुक वाटलें. नंतर त्याचेवर गुरु प्रसन्न होऊन त्यास सर्व विद्या सफल होतील, असा वर देते झाले. त्या बटुरूपी शंकरानें प्रतिज्ञेप्रमाणें इतर बटूंच्या मोळ्या बांधून नर्मदेंत टाकिल्या. ज्या ठिकाणीं हा प्रकार घडला त्याच स्थानाला भारभूतितीर्थ हें नांव प्राप्त झालें. त्या ह्या भारभूतितीर्थांत स्नान करून विष्णुशर्मा ब्राह्मण, व दुसरे बटुहि शिवस्वरूपाला प्राप्त झाले. ह्या तीर्थांत स्नान करून सहदेव नांवाचा वैश्य विश्वासघाताच्या दोषापासून मुक्त होऊन शिवलोकीं जाता झाला.

# अध्याय २१० ते २१५ वा.

## पुंखिलतीर्थादितीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात; धर्मा ! त्यानंतर पुंखिलतीर्थांत स्नान करावें. त्या तीर्थाचे काठीं पुंख नांवाचा एक ऋषि तप करून सिद्धीप्रत निळविता झाला. परशुरामहि ह्याच तीर्थाच्या स्नानानें मातृदोषापासून मुक्त होऊन सद्गतीला प्राप्त झाले. जे कोणी ह्या पुंखिलतीर्थांत स्नान करून देव व पितर ह्यांना तृप्त करितात ते ऋणमुक्त होऊन रुद्रलोकीं प्राप्त होतात. त्यानंतर मुंडितीर्थाला जावें. एकदां शंकर कुष्ठरोगी होऊन ब्राह्मणाकडे भिक्षा मागण्याकरितां गेले असतां, ब्राह्मणांनीं त्यास झिडकारून हाकलून लाविलें; नंतर शंकर गुप्त झाले. त्यायोगें ब्राह्मण भोजनास बसले असतां त्यांच्या पानांत किडे उत्पन्न झाले. हा प्रकार अतिथीच्या निर्भर्त्सनेमुळें झाला, असें समजून सर्व ब्राह्मण अतिथीला शोधण्याकरितां सर्वत्र निघून गेले; नंतर त्या अतिथीची व ब्राह्मणांची नर्मदातीरीं गाठ पडली व तेथें शंकरानें आपलें रूप प्रगट करून मुंडितीर्थ ह्या नांवानें एक तीर्थ निर्माण केलें. त्याच्या स्नानानें मोक्ष प्राप्त होतो; नंतर एकशालडिंडिमेश्वरतीर्थांत स्नान करावें. त्याच्या दर्शनानें सद्गति प्राप्त होते. एकशालडिंडिमेश्वरतीर्थात स्नान केल्यानंतर श्रीकपालतीर्थांत स्नान करावें; तसेंच आनलेश्वरतीर्थांत जाऊन स्नान केलें असतां दीर्घायुष्य प्राप्त होऊन अनंतकालपर्यंत शिवलोकांत राहावयास मिळतें. त्यानंतर मोक्षदतीर्थांत स्नान करावें. हें तीर्थ मृत झालेल्या प्राण्यांना मोक्ष देणारें आहे. त्या ठिकाणीं पितरांना उद्देशून पिंडदान देणारा पितरांसह मुक्त होऊन शिवस्वरूप होत्साता शिवलोकीं जाऊन राहतो. ह्या तीर्थांत स्नान करणारा देवऋण, पितृऋण व ब्रह्मऋण ह्या तीन ऋणापासून मुक्त होतो. ह्या तीर्थस्नानाच्या पुण्यप्रभावानें प्रथम गणेशलोक प्राप्त होऊन, नंतर क्रमाक्रमानें इतर लोक प्राप्त होतात. हें आख्यान श्रवण किंवा पठण करणारे प्राणी सर्व दुःखापासून मुक्त होऊन अंतीं शिवलोकाला जातात.

# अध्याय २१६ ते २२० वा.

## आषाढीतीर्थादितीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात; धर्मा! नंतर आषाढीतीर्थांत जाऊन स्नान करावें. या ठिकाणीं शंकर स्वतः कामिकरूप घेऊन राहिले आहेत. यालाच चातुर्युगतीर्थ म्हणतात. हें तीर्थ कल्पकाळींसुद्धां राहणारें आहे. या तीर्थांत स्नान करणारा रुद्राचा सेवक होतो; म्हणजे शिवगण होतो. या तीर्थांत प्राणत्याग करणारा शिवलोकीं जाऊन शिवस्वरूप होतो. त्यानंतर एरंडीनदीचा व नर्मदेचा जेथें संगम झाला आहे, त्या तीर्थांत स्नान करावें, त्याला एरंडीतीर्थ म्हणतात. त्या तीर्थांत स्नान करून उपोषण करणारा ब्रह्महत्यादि महापातकांपासून मुक्त होतो. या एरंडीतीर्थांत देह विसर्जन करणारा शिवलोकीं जाऊन जन्ममरणादि दुःखापासून मुक्त होतो. एरंडीतीर्थांत स्नान केल्यावर जामदग्न्यतीर्थाला जावें. हें तीर्थ परशुरामानें सहस्रार्जुनाला मारून एकवीस वेळां निःक्षत्रिय पृथ्वी केल्यावर पितरांच्या तृप्त्यर्थ तप करून निर्माण केलें आहे. हें जामदग्न्यतीर्थ जेथें नर्मदेचा व समुद्राचा संगम झाला आहे, त्या ठिकाणीं आहे. ह्या तीर्थांत स्नान करून नर्मदा व समुद्र ह्यांची प्रार्थना करून जामदग्न्येश्वराचें पूजन करणारा विजयी होऊन पितरांसह मोक्षाला प्राप्त होतो. त्या नंतर कोटीश्वरतीर्थांत स्नान करावें. ज्या ठिकाणीं स्नानदानादि कर्में कोटिपट फल देण्यास समर्थ होतात. कोटीश्वरलिंगाच्या पूजनानेंहि शिवलोकाची प्राप्ती होते. नंतर लोटणेश्वरतीर्थांत स्नान करावें. ह्या तीर्थांत स्नान केलें असतां कायिक, वाचिक व मानसिक सर्व पापें दग्ध होतात. ज्यानें लोटणेश्वराचें पूजन करून जागरण केलें, तो पुरुष धन्य होय. "ॐ नमो विष्णुरूपाय" ह्या मंत्रानें स्नान करून "अग्निश्च तेजो मृडया" ह्या मंत्रानें लोटणेश्वराला अर्घ्यदान करून यथाविधि स्नान करावें; म्हणजे स्वर्गलोकाची प्राप्ति होते.

# अध्याय २२१ ते २२५ वा.

## हंसेश्वरादितीर्थमाहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात; धर्मा ! मातृतीर्थापासून दोन कोश अंतरावर हंसेश्वर तीर्थ आहे. एकदां ब्रह्मदेवानें आपलें वाहन जो हंस त्याला बोलाविलें असतां तो कांहिं कारणामुळें न आल्यामुळें ब्रह्मदेवाला राग आला; व त्यानें हंसाला शाप दिला. त्या शापानें दुःखी झालेला हंस नर्मदातीरीं येऊन तपश्चर्या करिता झाला. त्यायोगें शंकर प्रसन्न होऊन; व हंसाला शापमुक्त करून त्याठिकाणीं हंसेश्वर नांवाचें तीर्थ निर्माण करिते झाले. ह्या तीर्थांत स्नान करून नवीन प्रसूत झालेल्या गाईचें दान ब्राह्मणास देणारे साठ हजार वर्षे शिवलोकीं जाऊन राह- तात. हंसेश्वरानंतर तेथून एक कोशावर असणाऱ्या तिलादेश्वर तीर्थांत जाऊन स्नान करावें. ह्या तीर्थाचे काठीं जाबाली ऋषी तिल भक्षण करून तप करिते झाले; म्हणून ह्या तीर्थाला तिलादेश्वर हें नांव प्राप्त झालें. ह्या तीर्थांत स्नान करून ब्राह्मणांना तिलदान केलें असतां पितर अक्षय्य तृप्त होऊन त्यांसह अखंड स्वर्गलोकाची प्राप्ति होते. त्यानंतर वासवेश्वर तीर्थाला जावें. हें तीर्थ धर, ध्रुव, सोम, आप, अनिल, अनल, प्रत्यूष व प्रभास ह्या आठ वसूंनीं नर्मदातीरीं तप करून शिवप्रसादानें निर्माण केलें आहे. त्या तीर्थांत स्नान करून शिवलिंगाचें पूजन करणारे आठ हजार वर्षे शिवलोकाला प्राप्त होतात. त्यानंतर तेथून एक कोशावर असणाऱ्या कोटीश्वरतीर्थांत स्नान करावें. ह्या तीर्थांत देव, गंधर्व, ऋषि, सिद्ध वगैरे लोक येऊन शिवस्थापना करिते झाले. ह्या तीर्थाचे संनिध केलेलीं कर्में कोटिपट फल देणारीं होतात. चतुर्दशी, अष्टमी वगैरे दिवशीं ह्या तीर्थांत शिवपूजन व स्नान करणारे व ब्राह्मणांस भोजन देणारे शिवस्वरूप होतात. ह्या तीर्थानंतर अलिकातीर्थाला जाऊन तेथें स्नान करावें. ह्या तीर्थाची स्थापना अलिका नांवाच्या चित्रसेन गंधर्वाच्या मुलीनें विद्यानंद नामक पतीचा अंत झाल्यावर विधवाधर्माचा स्वीकार करून व नर्मदाकाठीं शिवाराधना करून आपल्या नांवानें तें तीर्थ निर्माण केलें व ती शिवलोकीं गेली.

# अध्याय २२६ ते २३० वा.

## नर्मदातीर्थावलि.

मार्कण्डेय म्हणतात, धर्मा! नंतर विमलेश्वरतीर्थांत स्नान करावें. या तीर्थांत स्नान केल्यानें मनुष्य निर्मल म्हणजे निष्पाप होतो. या तीर्थांत स्नान करून सूर्य, ऋष्यशृंग, शंकर, ब्रह्मदेव; व दुसरेहि पुष्कळ लोक स्वदोषापासून मुक्त झाले; म्हणून याला विमलेश्वर म्हणतात. या नर्मदानदीचें महात्म्य वर्णन करणें हजार मुखाच्या शेषालासुद्धां अशक्य आहे. नर्मदेच्या तीरीं असणाऱ्या तीर्थांत * स्नान करून शिवपूजन करणारांना सर्व अष्टांगयोगादि कर्मैं केल्याचें फळ मिळून विद्या, कीर्ति वगैरेहि मिळतें. नर्मदातीर्थें चोवीस योजनाच्या प्रदेशांत आहेत. तितका प्रदेश हिंडून यात्रा करणारा शिवरूप होतो. आतां योजन म्हणजे काय? तर त्याचें कोष्टक सांगतों. आडवे एकापुढें एक आठ तांदूळ मांडले म्हणजे त्यास ऊर्ध्वा म्हणतात. त्या तीन ऊर्ध्वा म्हणजे एक अंगुल म्हणजे बोट होय. बारा-बोटें म्हणजे वीत. दोन वीती म्हणजे एक हात. चार हात म्हणजे एक धनुष्य. दोन हजार धनुष्यें म्हणजे एक कोश; व चार कोश म्हणजे एक योजन. हें योजनप्रमाण होय. ही चोवीस योजनाची नर्मदायात्रा करणारा निष्पाप होऊन मुक्त होतो. श्रेष्ठ जातीच्या मनुष्यानें कनिष्ठ जातीच्या लोकांकरितां द्रव्य घेऊन यात्रा करणारा दोषी होतो. सजातीयाकरितां तीर्थयात्रा केल्यास यात्रा करणाराला सोळाव्या हिश्शानें फळ मिळतें. आई, बाप, चुलता, आचार्य, गुरु, आजा, पणजा, मामा, भाऊ, सासरा, पुत्र, बहीण, मावशी इतक्यांच्या कल्याणार्थ जर आपण यात्रा केली, तर आपणाला अष्टमांश फळ मिळतें. एकंदर नर्मदातीरीं साठकोटी साठ हजार तीर्थें आहेत. या तीर्थांचें माहात्म्य श्रवण केलें असतां सर्व दोष नष्ट होऊन शिवसायुज्य प्राप्त होतें. हें माहात्म्य स्वतः लिहून जो ब्राह्मणाला दान करितो, त्याला नर्मदायात्रेचें फळ मिळतें. आतां तुम्हांला नर्मदाकाठीं असणाऱ्या मुख्य तीर्थांचीं नांवें; व तीर्थयात्राक्रम सांगतों; ऐका. प्रथम ॐकारेश्वर तीर्थांत स्नान करून नंतर अमरकंटकतीर्थाला जावें. नंतर

क्रमाक्रमानें दारुवन, चरुकासंगमावर असणारें व्यतीपातेश्वरतीर्थ वगैरे तीर्थाला जावें. नंतर पातालेश्वर, कोटियज्ञतीर्थ, वरुणेश्वरतीर्थ, सिद्धेश्वर, यमेश्वर, महेश्वर, सारस्वत, अष्टरुद्र, सावित्र, सोमेश्वर, शिवखात, रुद्रावर्त, ब्रह्मावर्त, सूर्यावर्त, पिप्पलावर्त, करमर्देश्वर, चक्रतीर्थ, अप्सरेश्वर, ज्वालेश्वर, शक्रतीर्थ, कुशावर्त, हंसतीर्थ, अंबरीषतीर्थ, महाकालेश्वर, मातृकेश्वर, भृगुतुंग, भैरव, चपलेश्वर, चण्डपाणी, कुबेरेश्वर, चण्डवेगतीर्थ, एरण्डेश्वर, काकहृद, जम्बुकेश्वर, कपिलेश्वर, दैत्यसूदनतीर्थ, वामनतीर्थ, अशोकवनिकातीर्थ, अंगारेश्वर, मेघवन, कुब्जातीर्थ, बिल्वाम्रक, द्वीपेश्वर, यज्ञेश्वर, मांडव्याश्रमतीर्थ, वागीश्वर, सहस्रावर्तक, ईशानतीर्थ, देवतात्रयतीर्थ, शूलखात, ब्रह्मोद, शांकर, सौम्य, सारस्वत, सहस्रयज्ञ, कपालमोचन, आग्नेय, दितिस्वर, देवपथ, यज्ञसहस्रक, शुक्लतीर्थ, दीप्तिकेश्वर, विष्णुतीर्थ, नर्मदेश्वर, मारुत, योगेश्वर, रोहिणीतीर्थ, पत्रेश्वर, मेघनाद, देवतीर्थ, करंजेश्वर, कुंडलेश्वर, विमलेश्वर, शूलभेद, मोक्षतीर्थ, आदित्येश्वर, संगमेश्वर, भीमेश्वर, मार्कंडेयेश्वर, करोटीश्वर, इंद्रेश्वर, अगस्त्येश्वर, कुमारेश्वर, व्यासेश्वर, वैद्यनाथ, केदारतीर्थ, आनंदेश्वर, मातृतीर्थ, मुंडेश्वर, धर्मेश्वर, लुंकेश्वर, धनदतीर्थ, जटेश्वर, मंगलेश्वर, गोपारेश्वर, मणिनागेश्वर, तिलकेस्वर; गौतमेश्वर, शंखचूड; पाराशर, बल्हीश्वर, नारदेश्वर, कुंभेश्वर, रामेश्वर, लक्ष्मणेश्वर, मेघेश्वर, मत्स्येश्वर, दधिस्कंद, मधुस्कंद, नंदिकेश्वर, वरुणेश्वर, कुसुमेश्वर, कुंडलेश्वर, कलकलेश्वर, हंसेश्वर, तिलाद, वासवेश्वर, कटीश्वर, अलिकातीर्थ, व विमलेश्वर हीं सर्व तीर्थें आणि दुसरींहि ह्या नर्मदातीरीं असणारीं इतर तीर्थें स्वमाहात्म्य श्रवण करून स्नान व लिंगपूजन करणारांस पापरहित करून; सुखसंपत्ति देऊन शिवलोकाला नेतात.

---

## अध्याय २३१ वा.

### नर्मदातीर्थपरिगणन.

सूत ह्मणतात; शौनकादिक ऋषिहो ! ह्याप्रमाणें मार्कण्डेयानें धर्मराजाला जें नर्मदातीर्थमाहात्म्य सांगितलें तेंच मी तुह्माला सांगितलें आहे. आतां नर्मदातीरीं

एकंदर तीर्थें किती आहेत, तें सांगतों; ऐका. ॐकारतीर्थापासून नर्मदेचा पश्चिमसमुद्राशीं संगम होईपर्यंत मध्यंतरीं इतर नद्यांचे एकंदर पस्तीस संगम झाले आहेत; म्हणजे पस्तीस नद्या ह्या नर्मदेला मिळाल्या आहेत; पैकीं नर्मदेच्या उत्तरतीरावर अकरा नद्यांचे संगम आहेत, दक्षिणतीरावर तेवीस नद्यांचे संगम आहेत; व पस्तीसावा एक संगम नर्मदा व पश्चिम समुद्र ह्यांचा होय. ह्या नर्मदातीरीं मुख्यतीर्थें चारशें आहेत; पैकीं तीनशें तेहतीस शिवतीर्थें आहेत. त्या तीनशें तेहतीस तीर्थांपैकीं दाहा मार्कंडेयस्थापित मार्कंडेयेश्वर तीर्थें आहेत. दाहा सूर्यतीर्थें, नऊ कपिलातीर्थें, आठ सोमतीर्थें आठ कोटितीर्थें, सात सिद्धेश्वरतीर्थें, सात नागेश्वरतीर्थें, सात अग्नितीर्थें, सात आवर्ततीर्थें, पांच केदारतीर्थें, पांच इंद्रतीर्थें, पांच वरुणेश्वरतीर्थें, पांच कुबेरेश्वरतीर्थें, पांच देवतीर्थें, चार यमेश्वरतीर्थें, चार वैद्यनाथतीर्थें, चार वानरेश्वरतीर्थें, चार अंगारेश्वरतीर्थें, चार सारस्वततीर्थें, चार दारुकेश्वरतीर्थें, तीन गौतमेश्वरतीर्थें, तीन रामेश्वरतीर्थें, तीन कपालेश्वरतीर्थें, तीन हंसेश्वरतीर्थें, तीन मोक्षतीर्थें, तीन विमलेश्वरतीर्थें, तीन सहस्रयज्ञतीर्थें, तीन भीमेश्वरतीर्थें, तीन स्वर्णतीर्थें, दोन धौतपापेश्वरतीर्थें, दोन करंजेश्वरतीर्थें, दोन ऋणमोचनतीर्थें, दोन स्कंदेश्वरतीर्थें, दोन दशाश्वमेधतीर्थें दोन नंदीतीर्थें, दोन मन्मथेश्वरतीर्थें, दोन भृगुतीर्थें, दोन पराशरेश्वरतीर्थें, दोन अयोनीसंभवतीर्थें, दोन व्यासेश्वरतीर्थें, दोन पितृतीर्थें, दोन नंदिकेश्वरतीर्थें, दोन गोपेश्वरतीर्थें, तशींच मारुतेश्वर, ज्वालेश्वर, शुक्लतीर्थ, अप्सरेश्वर, पिप्पलेश्वर, मांडव्येश्वर, द्वीपेश्वर, उत्तरेश्वर, अशोकेश्वर, योधनपुरतीर्थ, रोहिणीतीर्थ लुकेश्वर, हीं सर्व तीर्थें प्रत्येकीं दोन–दोन आहेत. ह्याशिवाय एक–एकच तीर्थ अशीं एकशें एकोणतीस तीर्थें आहेत. आतां बाकीचीं जीं वैष्णवतीर्थें ब्राह्मतीर्थें वगैरे नर्मदातीरीं आहेत, त्यांचेंहि परिगणन करितों; ऐका. वैष्णवतीर्थें अठ्ठावीस आहेत. त्यांपैकीं साहा वाराहतीर्थें, चार चक्रतीर्थें व बाकीचीं राहिलेलीं अठरा तीर्थें विष्णूनें स्थापिलेलीं आहेत. ब्राह्मतीर्थें सात आहेत. आतां सामान्य तीर्थांची संख्या सांगतों; ऐका. अमरकंटकपर्वताच्या सभोंवतीं ॐकारेश्वरतीर्थाजवळ लहान–मोठीं साडेतीन कोटी तीर्थें आहेत. अशोकवनिकेंत अशोकवनिकातीर्थाजवळ एक लक्ष तीर्थें आहेत. अंगारगर्तेच्या व नर्मदेच्या संगमाचे आसपास शंभर तीर्थें आहेत. कुब्जा नदीच्या संगमावर दहा लक्ष

तीर्थें आहेत. हिरण्यगर्भा नदीच्या संगमावर शंभर तीर्थें आहेत. विशोकासंगमावर अडसष्ट तीर्थें आहेत. वागुनदीच्या संगमावर हजार तीर्थें आहेत. सरस्वतीसंगमावर शंभर तीर्थें आहेत. शुक्रतीर्थासमीप दोनशें तीर्थें आहेत. विभूतीर्थाजवळ एक हजार तीर्थें आहेत. तशीच माहिष्मतीसंगमावर दाहा लक्ष तीर्थें, शूलभेदानजीक एक लक्ष तीर्थें, देवतीर्थाजवळ एकशें आट तीर्थें, लुंकेश्वरासमीर सातशें तीर्थें, मणिनदीसंगमावर एकशें आठ तीर्थें व वैद्यनाथतीर्थाचे आजुबाजूला एकशें आठ अशीं तीर्थें आहेत. तशाच तऱ्हेनें दुसऱ्याहि अनेक तीर्थांजवळ अनेक लहानमोठीं तीर्थें आहेत, त्या सर्वांचें माहात्म्य वर्णन करणें अशक्य असल्यामुळें संक्षेपेंकरून थोडक्यांत यथाशक्ति तीर्थमाहात्म्य वर्णित केलें आहे. हें कथानक सर्व दुःखें घालविणारें असें आहे.

---

## अध्याय २३२ वा.

### रेवाखंडमाहात्म्यफलश्रुति.

सूत म्हणतात; शौनकादि ऋषि हो! ह्याप्रमाणें धर्ममार्कण्डेयसंवादरूप असें नर्मदामाहात्म्य तुम्हाला सांगितलें आहे. ह्या भूतलावर नद्याहि पुष्कळ आहेत. तीर्थेंहि पुष्कळ आहेत; परंतु नर्मदेची बरोबरी करणारी एकहि नदी त्रैलोक्यांत मिळणार नाहीं, व नर्मदातीरीं असणाऱ्या तीर्थांचीहि बरोबरी करणारें तीर्थेंहि कोठें मिळावयाचें नाहीं. खरोखरच ज्याला आपला जन्म सफल करून घ्यावा असें वाटत असेल, त्यानें एकदां तरी नर्मदास्नान करावें. ज्या देशांतून नर्मदा वाहत गेली आहे, तो देश खरोखर धन्य होय, व त्या देशांत राहणारे प्राणी खरोखरच पुण्यवान् होत. जे कोणी हें नर्मदामाहात्म्य श्रवण करितील; किंवा पठण करितील त्यांना चौदा विद्या,व चौसष्ट कला यांचें अध्ययन केल्याचें, सर्वप्रकारचे यज्ञ केल्याचें व नर्मदायात्रा केल्याचें फळ मिळून त्यांच्या सर्व इच्छा पूर्ण होतील; व ते ह्या लोकीं पुष्कळप्रकारचीं सुखें भोगून

अंतीं शिवविमानांत बसून; व शिवगणांसह शिवलोकीं जाऊन अनंतकल्प-पर्यंत राहतील. ज्याच्या घरामध्यें नर्मदामाहात्म्याचा ग्रंथ लिहिलेला आहे तो शिवरूप, ब्रह्मरूप व विष्णुरूप होय. हें माहात्म्य सर्व शास्त्रांचें व श्रुतिस्मृतींचें सारभूत होय. ह्याच्या श्रवणानें ब्राह्मण वेदवेत्ता होतो, क्षत्रिय विजयी होतो, वैश्य श्रीमान् होतो; व शूद्र धर्मनिष्ठ होतो. जी स्त्री हें नर्मदामाहात्म्य पठण करील तिला सौभाग्य, संतति वगैरे प्राप्त होईल. जे कोणी हा ग्रंथ लिहून ब्राह्मणांना दान देतात त्यांना नर्मदास्नानाचें फळ मिळतें. हें माहात्म्य प्रथमतः शंकरानें स्वमुखानें वर्णिलें असल्यामुळें ह्याच्या श्रवणानें अनंत फळ प्राप्त होतें. हें माहात्म्य श्रवण करणारास स्वर्ग, पुत्र, धन, धान्य, कीर्ति, आयुष्य, सुख वगैरे प्राप्त होतात; व त्यास अंतीं शिवसायुज्य प्राप्त होतें.

रेवाखण्ड समाप्त ॥ ३ ॥
अवन्तिखण्ड समाप्त ॥५॥

# स्कंदपुराण.

## नागरखंड ६.



### अध्याय १ ला.

#### लिंगोत्पत्ति.

स धूर्जटिजटाजूटो जायतां विजयाय वः ।
यत्रैकपलितभ्रांतिं करोत्यद्यापि जाह्नवी ॥ १ ॥

ज्याच्या जटेंत शुभ्र वर्णाचा गंगाप्रवाह सतत वाहत असल्यामुळें ज्याच्या जटा अजूनहि पिकल्याप्रमाणें दिसत आहेत, असा शंकराचा जटासमूह तुम्हां सर्वांना विजय देवो.

एकदां ऋषींनीं सूतांस विचारिलें:—कीं, शंकराचीं सर्व अंगें सोडून लोक त्याच्या लिंगाचीच पूजा कां करितात ? हें आम्हांला सांगा. असा ऋषींचा प्रश्न ऐकून सूत म्हणाले:—ऋषिहो ! आवर्तदेशांत मुनिजनांस आश्रयभूत असें एक मोठें वन आहे. त्या वनांत एक रम्य आश्रम असून तेथें हजारों ऋषि यज्ञयागादि अनेक पुण्यकर्मे करीत असतात. एकदां शंकर सतीच्या वियोगामुळें संतप्त होऊन फिरत फिरत त्या वनांत आले. तेथें तें आश्रमाचें स्थान दृष्टि पडतांच ते हातांत भिक्षापात्र घेऊन नग्न स्थितींतच 'भिक्षां देहि' म्हणत रस्त्यांतून फिरूं लागले. त्यांचें तें लिंग पाहतांच आश्रमांतील सर्व स्त्रिया मोहित झाल्या व टक लावून तिकडे पाहूं लागल्या. तो प्रकार पाहून क्रुद्ध झालेले ऋषि शंकराला म्हणाले:—दुष्टा ! तूं ज्यापेक्षां येथें नग्न होऊन भिक्षा मागून आमच्या आश्रमाची विडंबना केलीस त्यापेक्षां हें तुझें लिंग पृथ्वीवर गळून पडो, असा शाप होतांच शंकराचें लिंग पृथ्वीवर गळून पडलें, व तें धरणी भेदून पातालांत गेलें. त्यामुळें शंकर लज्जित होऊन गर्भरूपानें मोठ्या गुहेंत जाऊन बसले. लिंगाच्या पतनामुळें त्रैलोक्यांत प्रलयकालाप्रमाणें महाभयंकर उत्पात होऊं लागले. तेव्हां ब्रह्मदेव, विष्णु वगैरे सर्व देवांनीं ज्या गुहेंत शंकर निजले होते, तेथें येऊन शंकराची स्तुति केली, व पुनः लिंगधारण करण्या-

विषयीं प्रार्थना केली. तेव्हां शंकर म्हणालेः—देवहो! मीच सतीच्या वियोगामुळें वैतागून शापाच्या मिषानें लिंगाचा त्याग केला आहे. आतां मला भार्या नाहीं, तरी लिंग धारण करून काय करावयाचें आहे? तें ऐकून देव म्हणालेः—प्रभो! ती सती मेनकेच्या गर्भामध्यें गौरी या नांवानें उत्पन्न झाली आहे. ती पुनः आपली भार्या होईल. तरी आपण आमचें कल्याण करण्यासाठीं लिंग धारण करावें. तें ऐकून शंभूनें 'आजपासून देव, ब्राह्मण वगैरे जर माझ्या लिंगाचें पूजन करितील, तर मी लिंग धारण करीन' असें सांगितलें. तेव्हां प्रथम ब्रह्मदेवानें व विष्णूनें पातालांत जाऊन लिंगाचें पूजन केलें. नंतर इंद्रादिकांनींहि त्या लिंगाची पूजा केली. त्यांनंतर शंभूनें लिंग धारण केलें. ब्रह्मदेवानें त्या जागेवर त्या लिंगाच्या आकाराचें दुसरें सोन्याचें लिंग बसविलें. त्यानें त्या लिंगाचें नांव 'हाटकेश्वर' असें ठेविलें, व जे मनुष्य या लिंगाची किंवा यासारखें दुसरें लिंग स्थापन करून त्याची त्रिकाळ पूजा करितील, ते परमपदाला पोंहोचतील असें सांगितलें. आणि तेव्हांपासूनच ब्रह्मदेव व विष्णु सतत तेथें जाऊन त्या लिंगाचें पूजन करितात. ह्या कारणामुळें शंकराचीं सर्व उत्तम अंगें सोडून संपूर्ण लोक लिंगाचें पूजन करितात, व त्याचेंच दर्शन घेतात.

---

## अध्याय २ ते ७ वा.

### त्रिशंकूचें आख्यान.

सूत म्हणालेः—ऋषिहो! शंभूनें पातालांतून लिंग उचलतांच पृथ्वींतून त्या मार्गानें गंगेचा प्रवाह सुरु झाला. पूर्वी चंडालयोनींत गेलेल्या त्रिशंकुराजाला तेथें स्नान केल्यामुळें पुनः त्यास योग्य असें शरीर प्राप्त झालें. तें ऐकून ऋषींनीं त्रिशंकुराजाची संपूर्ण कथा ऐकण्याची इच्छा दर्शविल्यावरून सूत म्हणालेः—पूर्वी सूर्यवंशांत त्रिशंकु नांवानें प्रसिद्ध असा एक राजा होऊन गेला. तो वसिष्ठमुनींचा शिष्य होता. त्यानें अग्निष्टोमादिक यज्ञ, व्रतें, तीर्थें, दानें वगैरे अनंत पुण्य कर्में केलीं. एकदां त्यानें वसिष्ठमुनींना असें सांगितलें कीं, गुरुमहाराज! आतां मला असा यज्ञ करण्याची इच्छा आहे कीं, ज्यामुळें या शरीरानें मला स्वर्गाला जातां येईल, तरी अशा यज्ञाची तयारी करावी. तें ऐकून वसिष्ठमुनींनीं 'या शरीरानें स्वर्गाला जातां येईल, असा यज्ञच नाहीं' असें सांगितल्यावर राजानें वसिष्ठाच्या तपोबलाचा जरा तिरस्कार केला; व म्हटलें कीं, आपण जर माझ्याकडून असा यज्ञ करविण्यास असमर्थ असाल त

म्हणूनच माझ्या प्रार्थनेचा तिरस्कार करीत असाल, तर मीं या कार्यासाठीं दुसऱ्या गुरूचे पाय धरूं काय ? वसिष्ठ म्हणालेः—राजा ! तसें होत असेल, तर तूं खुशाल दुसरा गुरु कर. नंतर राजा वसिष्ठमुनींना साष्टांग नमस्कार करून त्यांच्या पुत्राजवळ आला, व त्यांना झालेली सर्व हकीकत सांगून म्हणालाः—म्हणून तुम्हीं जर माझ्याकडून 'सशरीर स्वर्गाला जातां येईल' असा यज्ञ करवीत असाल तर ठीक; नाहीं तर मीं तुमचा त्याग करून, दुसरा गुरु करणार. तें ऐकतांच क्रोधाविष्ट झालेल्या गुरुपुत्रांनीं 'तूं हितचिंतक गुरूचा त्याग केल्यामुळें चांडाल हो' असा त्याला शाप दिला. तेव्हां तत्काल त्याचें शरीर चांडाला-प्रमाणें काळे ठिक्कर पडून दुर्गंधयुक्त झालें. तें पालिच्छ शरीर पाहून राजाला फार खेद झाला. आपल्या दुराग्रहाचें असें फल मिळालेलें पाहून त्याला पुढे काय करावें, हें सुचेना. अशारीतीनें दुःखित झालेल्या राजानें रात्रीं नगरांत जाऊन राजवाड्याच्या द्वारांतच उभें राहून, प्रधान–मंडळासह पुत्राला बोलावून आणिलें, व त्यांना शापाचा वृत्तांत निवेदन केला. तो ऐकून त्यांनाहि फार दुःख झालें. नंतर राजा प्रधानमंडळाला म्हणाला कीं, तुम्हीं माझ्या हरिश्चंद्र नामक पुत्राला राज्यावर बसवून राज्य–व्यवस्था नीट ठेवा. मीहि आतां शक्य तो उपाय योजून मृत्यूचा किंवा स्वर्गाचा स्वीकार करीन; असें सांगून राजानें अरण्याचा मार्ग धरिला. प्रधान–मंडळानें राजाच्या आज्ञेप्रमाणें सर्व व्यवस्था केली. त्रिशंकुराजाहि 'मला या संकटांतून मुक्त करण्यास त्रिभुवनांत विश्वामित्रावांचून कोणीहि समर्थ नाहीं, असा विचार करून त्याचा शोध काढीत काढीत तो नदीतीरीं विश्वामित्राच्या आश्रमामध्यें आला. तेथें शिष्यवृंदामध्यें बसून अध्यापन करणाऱ्या विश्वामित्राला, त्यानें आपलें नांव उच्चारून साष्टांग–नमस्कार केला. त्याला पाहतांच शिष्यवृंदानें 'अरे ! हा चांडाल येथें कसा आला ?' अशारीतीनें त्याची निर्भर्त्सना करून, 'तूं लवकर ह्या आश्रमांतून निघून जा, नाहीं तर एखादा तपस्वी शाप देऊन तुझें भस्म करील,' असें त्याला सांगितलें. तेव्हां राजा म्हणाला,—मीं सूर्यवंशांतील शांत कुळांत उत्पन्न झालेला त्रिशंकु नांवाचा राजा असून, मला वशिष्ठ–पुत्रांच्या शापामुळें चांडालत्व प्राप्त झालें आहे; व म्हणूनच मीं शापमुक्तीसाठीं ह्या जगन्मित्र विश्वामित्राला शरण आलों आहे. तें ऐकतांच विश्वामित्रानें पुनः त्याच्याकडून शापाचें कारण वगैरे सर्व वृत्तांत ऐकून घेतला, व वसिष्ठाशीं स्पर्धेनें ऋषिवर्गासमक्ष अशी प्रतिज्ञा केली कीं, राजा ! मी तुझ्याकडून सशरीर स्वर्गाला जातां येईल, असा यज्ञ करवितों; व प्रथम यज्ञ करण्याची योग्यता येण्यासाठीं तुझें चांडालत्व दूर करितों; असें म्हणून विश्वामित्रऋषि त्याला बरोबर घेऊन त्याच्या शुद्धीसाठीं तीर्थयात्रा करीत चालले. ते पुष्कळ तीर्थें हिंडले; पण राजाचें चांडालत्व दूर होईना. एकदां अर्बुदाचलावर

त्यांना मार्कंडेयऋषि भेटले; आणि त्यांना राजाचा वृत्तांत व आपली प्रतिज्ञा निवेदन करून विश्वामित्रानें चांडालत्व दूर होण्याचा उपाय विचारिला. तेव्हां मार्कंडेयांनीं हाटकेश्वरक्षेत्रांत जाऊन पातालगंगेंत स्नान व हाटकेश्वराचें दर्शन घेण्यास सांगितलें. त्याप्रमाणें विश्वामित्रानें हाटकेश्वरक्षेत्रांत जाऊन, राजाकडून पातालगंगेंत स्नान व हाटकेश्वराचें दर्शन करविलें. तेव्हां तत्काळ त्याचें चांडालत्व दूर होऊन, त्यास तेजस्विता प्राप्त झाली. नंतर विश्वामित्र, राजाला तेथेंच यज्ञसामग्री जमविण्यास सांगून व स्वतः सत्यलोकीं जाऊन ब्रह्मदेवाला म्हणाले;—भगवन् ! मीं त्रिशंकुराजाला मनुष्यशरीरानें तुझें पद प्राप्त करून देण्यासाठीं त्याच्याकडून यज्ञ करवीत आहे; तरी आपण सर्व देवांसह तेथें येऊन आपल्या हातानें यज्ञभाग स्वीकारावा. तें ऐकून ब्रह्मदेवानें 'देहांतरावांचून स्वर्गप्राप्ति होत नाहीं, तरी वेदोक्तविधीनें अग्नींत हवन करून, राजा अन्यशरीरानें स्वर्गाला येऊं द्या' असें सांगितलें. तें ऐकतांच क्रोधाविष्ट झालेले विश्वामित्र—'ठीक आहे, माझ्या तपश्चर्येचें बळ तर पहा; मीं त्रिशंकुराजाकडून यज्ञ करवून, तुझ्या देखत त्याला येथें घेऊन येतों.' असें ऋषींसमक्ष म्हणून विश्वामित्र पृथ्वीवर आले. नंतर त्यांनीं राजाला यज्ञदीक्षा दिली. त्यांत स्वतः विश्वामित्रानें अध्वर्यूचें काम स्वीकारून शांडिल्यप्रमुख ऋषींना होतृत्व वगैरे कामें दिलीं. नंतर मुनिवेष धारण करणाऱ्या यज्ञदीक्षित राजाच्या प्रेरणेवरून ऋषींनीं यज्ञाला प्रारंभ केला. तो यज्ञ पाहण्यासाठीं पुष्कळ लोक तेथें जमले होते. तेथें दान व भोजन किती झालें ? त्याची गणती होणार नाहीं. एकसारखा तोच धुमाकूळ चालला होता. तेथें दानासाठीं सोनें, चांदी, रत्नें, धान्यें, वगैरेचे पर्वतप्राय ढीग पडले होते. अशारीतीनें बारा वर्षें यज्ञसमारंभ झाला, पण इच्छित फल प्राप्त झालें नाहीं. तो यज्ञ संपतांच अवभृत स्नान करून यथायोग्य दक्षिणा वगैरे दिल्यावर ब्राह्मणांचें विसर्जन करून त्रिशंकुराजा विश्वामित्राला विनयानें ह्मणालाः—मुने ! आपल्या प्रसादानें मला दुर्लभ अशीं हीं फळें प्राप्त झालीं, चांडालत्वहि दूर झालें, तथापि हृदयांत शल्याप्रमाणें टोंचणारें एक दुःख मात्र दूर झालें नाहीं. मी अशा स्थितींत नगरांत गेलों, तर वसिष्ठपुत्र वगैरे माझा उपहास करितील; तरी मी येथेंच राहून आतां तपश्चर्या करितों, तें ऐकतांच लज्जित झालेल्या विश्वामित्रानें 'राजा ! ' जरा थांब. तुला या शरीरानें स्वर्गाला नेण्यासाठीं पाहिजे तें कर्म करीन, पण तुला स्वर्गाला नेईन. फार काय ? पण मी क्षत्रिय असतांहि तपोबलानें जसें ब्राह्मणत्व संपादन केलें; तशीच माझी स्वतंत्र सृष्टि निर्माण करीन.' अशा रीतीनें राजाचें आश्वासन करून जवळच असलेल्या शंकराची स्तुति करण्यास सुरुवात केली. तेव्हां प्रसन्न झालेल्या शंकरानें वर मागण्यास सांगतांच त्यानें 'मला सृष्टि करण्याचें सामर्थ्य दे.' असा वर मागितला, तेव्हां

शंकर 'तथास्तु' म्हणून अंतर्धान पावले. नंतर विश्वामित्रानें ध्यान करून चतुर्विध सृष्टि उत्पन्न केली. त्यांत देव, मनुष्य, वैमानिक, सप्तर्षि, ध्रुव, ग्रह, नक्षत्रें वगैरे ब्रह्मदेवाच्या सृष्टींतील सर्व वस्तु उत्पन्न करून त्यांना ऋषीनें आपल्या कामास लाविलें. तेव्हां आकाशामध्यें सूर्य, चंद्र, ध्रुव, सप्तर्षि वगैरे तारे दोन दोन दिसूं लागले. तें पाहून देवांसह इंद्रानें सत्यलोकीं जाऊन ब्रह्मदेवाची प्रार्थना केली; व 'या नवीन सृष्टीनें चराचर विश्व व्याप्त झालें नाहीं, तोंपर्यंतच विश्वामित्राला सृष्टीपासून निवृत्त करण्यास सांगितलें. तेव्हां ब्रह्मदेव विश्वामित्राजवळ जाऊन म्हणालेः—ऋषे ! इंद्रादि देव जोंपर्यंत नाश पावले नाहींत, तोंपर्यंतच आपण ही सृष्टि बंद कराल, तर मोठी मेहेरबानी होईल. त्यावर विश्वामित्रानें 'त्रिशंकुराजा या शरीरानें स्वर्गाला जात असेल, तर ही सृष्टि बंद करीन. असें सांगितल्यावर ब्रह्मदेव त्याच्या अपूर्व सामर्थ्याची प्रशंसा करून म्हणालेः—'ठीक आहे, ह्याला मी आपल्याबरोबर स्वर्गाला घेऊन जातों.' तें ऐकून विश्वामित्रानें आपल्या अनन्वित सृष्टिकृत्याबद्दल क्षमा मागून, आपण केलेली सृष्टि अक्षय होण्याविषयीं प्रार्थना केली. नंतर ब्रह्मदेव 'तुझी सृष्टि अक्षय होईल, पण यज्ञार्ह होणार नाहीं; असें सांगून ब्रह्मदेव त्रिशंकुराजासह सत्यलोकीं गेले.

---

## अध्याय ८ वा.

### वृत्रासुरवध.

सूत म्हणालेः—ऋषिहो ! अशारीतीनें विश्वामित्राच्या प्रयत्नानें त्रिशंकुराजा स्वर्गाला गेल्यावर तें पातालगंगातीर्थ त्रिभुवनांत प्रसिद्ध झालें. तेथें स्नान करणारे ब्रह्महत्येसारख्या महापातकांतूनहि मुक्त होऊन स्वर्गाला जाऊं लागले. तें तीर्थमाहात्म्य पाहून विश्वामित्रानें आपला आश्रम तेथेंच बांधिला. इतरहि पुष्कळ ऋषि तेथें येऊन राहिले. होतां होतां सर्वच मनुष्य तेथें येऊन स्नान करून स्वर्गाला जाऊं लागले. त्यामुळें अग्निहोमादिक यज्ञ, इतर व्रतें, दानें वगैरे सर्वच विधि बंद पडले. तेव्हां देवांना यज्ञभाग कोठेंही मिळेना. स्वर्गादि लोकहि वर येणाऱ्या मनुष्यांनीं भरून गेले. तेव्हां व्याकुळ झालेल्या इंद्रानें देवांच्या संमतीनें त्या तीर्थाचा उच्छेद करण्यासाठीं प्रलयकाळच्या वाऱ्याला आज्ञा केली. तेव्हां वायूनें तेथें धूळ भरून तें क्षेत्र बुजवून टाकिलें. तेव्हां पुनः पूर्ववत् सर्व कर्में सुरू झालीं. कांहीं दिवसांनीं तेथें वारुळें उत्पन्न झालीं, तीं

थेट पातालापर्यंत पोंचल्यावर त्या रस्त्यानें नागांचें पृथ्वीवर येणेंजाणें सुरु झालें. तेव्हांपासून त्या रस्त्याला 'नागबिल' ह्मणूं लागले. एकदां ब्रह्महत्येनें व्याकूळ झालेला इंद्र ब्रह्मदेवाच्या सांगण्यावरून त्या रस्त्यानें पातालांत गेला व हाटकेश्वराचें दर्शनानें शुद्ध होऊन स्वर्गांत आला; नंतर त्यानें 'मी हा रस्ता खुला ठेविला असतां त्रिशंकूसारखा एकादा राजा ह्याच्या पूजनानें तेजस्वी होऊन मला स्वर्गांतून खेंचून काढील' असें समजून रक्तशृंगपर्वताच्या योगानें तो रस्ता बुजवून टाकिला; नंतर ऋषींनीं इंद्राला ब्रह्महत्या कशी लागली, वगैरे सविस्तर वृत्तांत विचारिला, तेव्हां सूत ह्मणालेः—पूर्वी विश्वकर्म्याच्या रमानामक भार्येनें तपाच्या योगानें शंकराला तोषवून त्याच्याजवळ मला शस्त्रास्त्रांनीं अवध्य, वेदाध्ययनशील, ब्राह्मण व दैत्य यांचें रूप धारण करणारा तेजस्वी पुत्र दे, असा वर मागितला. तेव्हां शंकरानें 'तथास्तु' ह्मटलें. नंतर योग्य काळीं एक पुत्र झाला. विश्वकर्म्यानें त्याचें नांव "वृत्र" असें ठेविलें. नंतर योग्यकाळीं त्याचा व्रतबंध झाला. त्यानें ब्रह्मचर्यव्रत धारण करून षडंगवेद अध्ययन केलें. नंतर त्यानें इंद्राला जिंकण्याचा प्रयत्न सुरू केला. इंद्रानें त्याच्याशीं अठरा वेळ युद्ध केलें; पण त्याला एकांसुद्धां युद्धांत जय मिळाला नाहीं, तेव्हां शेवटीं तो कंटाळून उरलेल्या सैनिकांसह ब्रह्मलोकांत पळून गेला. तेव्हां वृत्रासुर इंद्रपदावर अधिरूढ झाला; व यज्ञभाग दैत्यांना देऊं लागला. अशारीतीनें त्रैलोक्याचें राज्य प्राप्त झालें, तरी वृत्राला संतोष झाला नाहीं; कारण इंद्र जेथें पळून गेला, तो ब्रह्मलोकहि आपल्या ताब्यांत घ्यावा, अशी त्याला महत्त्वाकांक्षा झाली. त्यानें शुक्राचार्यांच्या सांगण्यावरून नैमिषारण्यांत जाऊन ब्रह्मलोकीं जाण्यास साधनभूत असलेल्या तपश्चर्येला सुरुवात केली. तेव्हां देवांना भयभीत झालेले पाहून विष्णु इंद्राला ह्मणालेः—कीं, वृत्राला शिवकृपेनें अवध्यत्व प्राप्त झालें आहे. वृत्रनाशार्थ एकच उपाय आहे व तो हाच कीं, जर तुम्ही दधीचिऋषीच्या अस्थि आणून त्याचें जर एक वज्र तयार करून वृत्रासुरावर सोडिलें तरच तो मरेल; नाहींपेक्षां त्याचा नाश होणें अशक्य आहे. असें विष्णुवचन ऐकतांच इंद्र देवांसह दधीचीकडे जाऊन अस्थि मागूं लागला. त्या वेळीं दधीचीनें आपला देह ज्ञानयोगानें विसर्जित करून इंद्रादि देवांना अस्थि दिल्या. इंद्रानें त्या अस्थींचें वज्र तयार करून वृत्राचा वध केला. वृत्राला मारल्यामुळें इंद्राला ब्रह्महत्त्येचें पातक लागलें; व तो ब्रह्मदेवाच्या आज्ञेनें ब्रह्महत्यादि पातकांच्या क्षालनार्थ तीर्थयात्रा करीत करीत पाताळांत असणाऱ्या हाटकेश्वरक्षेत्रांत प्राप्त झाला. इंद्र तेथें जाऊन हाटकेश्वराचें पूजन करितांच तो ब्रह्महत्त्येच्या दोषापासून मुक्त झाला. हें आख्यान मोक्ष देणारें आहे.

---

## अध्याय ९ वा.

### नागबिलपूरण.

हाटकेश्वराच्या पूजनानें इंद्राची ब्रह्महत्या नष्ट झाल्यानंतर इंद्र प्रलयकाळच्या वायूला बोलावून म्हणतो कीं. हे वायो ! वाळू वगैरे वस्तूंनीं तूं हाटकेश्वरासंन्निध असणाऱ्या नागबिलाचें पूरण कर; म्हणजे मृत्युलोकांतील प्राणी ह्या बिलद्वारांनीं पाताळांत हाटकेश्वराजवळ येऊन आम्हांला त्रास देणार नाहींत. असें इंद्राचें भाषण ऐकून वायु म्हणतो; इंद्रा ! हें काम माझ्या हातून व्हावयाचें नाहीं; तर भूलोकामध्यें एक हिमालय नांवाचा पर्वत आहे; व त्या पर्वताला मैनाक, नंदिवर्धन, व रक्तशृंग असे तीन मुलगे आहेत. पैकीं मैनाकपर्वत तुझ्या भयानें समुद्रांत लपून बसला आहे. नंदिवर्धन हा वसिष्ठाश्रमासंनिध असणाऱ्या बिळाचें पूरण करून राहिला आहे; व तिसरा रक्तशृंगपर्वत आहे, तेव्हां आपण त्याला येथें आणून नागबिलाचे ठिकाणीं स्थापावें; म्हणजे ह्या बिलाचें पूरण होऊन आपली कार्यसिद्धि होईल. असें वायूचें भाषण ऐकून इंद्र हिमालयपर्वताजवळ प्राप्त झाला; व त्यानें रक्तशृंगाची मागणी केली. हिमालयाची परवानगी मिळतांच इंद्र त्या रक्तशृंगाला घेऊन नागबिलाचे ठिकाणीं स्थापिता झाला. त्या वेळीं रक्तशृंग इंद्राला म्हणतो कीं, माझ्या पर्वतावर एक नगर तयार व्हावें; व माझ्यावर उत्पन्न होणारी प्रत्येक वस्तु ब्राह्मणांनीं सेवन करावी, असा मला वर द्या. नंतर इंद्र म्हणतो; बा पर्वता ! एक चमत्कार नांवाचा राजा तुझ्यावर एक शहर निर्माण करून त्यांत ब्राह्मणांचीच स्थापना करील; व ते सच्छील ब्राह्मण तुझ्यावर उत्पन्न होणाऱ्या वस्तूंचा उपभोग घेतील; व तुझी इच्छा पूर्ण करतील, असें सांगून इंद्र तेथून स्वर्गाला जाता झाला.

## अध्याय १० वा.



### चमत्कारनृपचरित्र.

त्यानंतर पुष्कळ काळ निघून गेल्यावर चमत्कार नांवाचा आनर्त देशाचा राजा मृगया करितां करितां रक्तशृंगपर्वतावर प्राप्त झाला. त्या राजानें दुरूनच एका झाडाखालीं बसून आपल्या बालकाला दूध पाजीत असलेली मृगी पाहिली; व तिला एक बाण मारिला. त्यायोगें ती मृगी व्याकुळ होऊन राजाला म्हणते;

राजा ! तूं जें केलेंस हें फार वाईट केलेंस; कारण माझें बालक दुग्ध पीत असतां माझा प्राण घेण्याकरितां तूं बाण मारिलास; अर्थात् तूं निर्दय आहेस. मी स्वतःकरितां शोक करीत नाहीं, तर माझ्या पश्चात् माझ्या बालकाची काय स्थिति होईल, ह्याबद्दल मी विचार करीत आहे. ह्या तुझ्या दुष्कृत्यामुळें मी तुला शाप देत्यें कीं, तूं कुष्ठादिरोगांनीं पीडित होऊन दुःखी होशील. असें मृगीचें भाषण ऐकून राजा मृगीला म्हणतो कीं, मी राजा असल्यामुळें मृगया करणें हा माझा धर्मच आहे; तेव्हां त्यांत मी वाईट असें कांहींच केलें नाहीं. नंतर मृगी राजाला म्हणते कीं, ब्रह्मदेवानें मृग हे राजांना मृगया करण्याकरितां निर्माण केले आहेत, असें जरी असलें तरी त्याबद्दल स्वतंत्र नियम आहेत. ते असे कीं, निद्रित झालेला, मैथुनकर्मांत आसक्त झालेला, बालकाला स्तनपान करविणारा, पाणी पीत असणारा मृग जर राजानें मारला तर तो दोषास पात्र होतो; ह्या करितां मी जो शाप दिला तो योग्य आहे, असें सांगून मृगीनें स्वदेहाचें विसर्जन केलें. मृगीच्या शापाप्रमाणें राजाला कुष्ठरोगाची व्यथा होऊन तो त्या व्यथेच्या निरासार्थ शिवाराधना करण्याकरितां हाटकेश्वरासान्निध प्राप्त झाला. तेथें स्नानादि करितांच त्या राजाचा कुष्ठरोग नष्ट होऊन तो सर्व दोषापासून मुक्त होत्साता स्वनगराला परत गेला.

---

## अध्याय ११ वा.

### नगरसमर्पण.

चमत्कार राजानें तपश्चर्या कशी केली ? वगैरे शौनकादि ऋषींनीं प्रश्न केला असतां सूत म्हणतात; मुने ! तो चमत्कार राजा शापानें व्याकुळ होऊन कुष्ठनाशार्थ पुष्करादि व प्रभासादि अनेक तीर्थें हिंडत हिंडत ब्राह्मणांच्या सांगण्यावरून शेवटीं हाटकेश्वरासान्निध असणाऱ्या शंखतीर्थाजवळ प्राप्त झाला. हें तीर्थ शाण्डिल्यऋषीचा पुत्र जो शंख त्यानें स्थापिलें आहे. एकदां शंख आपला बंधु जो लिखित त्याच्या आश्रमांत जाऊन त्याच्या बागेंतील गोड गोड फळें आपलींच समजून चुकीनें काढिता झाला. इतक्यांत लिखितहि शिष्यवर्गासह त्याच बागेंत प्राप्त झाला लिखिताला पाहून शंख म्हणतो कीं, मी चुकीनें तुमच्या बागेंतील फळें चोरून खाल्लीं आहेत, करितां मला योग्य शिक्षा करा कीं, ज्यायोगें मला दुर्गति प्राप्त होणार नाहीं. असें शंखवाक्य ऐकतांच लिखितानें शंखाचा एक हात तीक्ष्ण शस्त्रानें तोडून टाकिला. नंतर शंकराच्या आराधनेनें शंखाला हात फुटले; व तेथें शंखनांवाचें एक तीर्थ निर्माण झालें.

अशा त्या शंखतीर्थांत स्नान करतांच राजा कुष्ठमुक्त झाला. नंतर चमत्कार राजा ब्राह्मणांना म्हणतो कीं, आपल्या कृपेनें मी आज दोषमुक्त झालों आहे. आतां मला राज्योपभोग भोगण्याची मुळींच इच्छा नाहीं, करितां माझें नगर व हस्त्यश्वादि राज्यैश्वर्य मी तुम्हांला कृपेनें अर्पण करीत आहे; असें म्हणून चमत्कार राजानें सर्व नगराचें दान देण्याच्या बुद्धीनें ब्राह्मणांच्या हातांवर उदक सोडिलें; व सांगितलें कीं, तुह्मांला जर कोणी पीडा दिली तर मला सांगा; म्हणजे मी त्या पीडेपासून तुम्हा सर्वांचें रक्षण करीन; असें राजवाक्य ऐकून ब्राह्मणांना मोठा आनंद झाला; व त्यांनी राजाला पुष्कळ आशीर्वाद दिले.

---

## अध्याय १२ वा.

### पुत्रोपदेश.

चमत्कार राजाला ब्राह्मणांना सर्वालंकारयुक्त अशी नगरी दान दिल्याबद्दल मोठा आनंद होऊन धन्यताहि वाटली. नंतर तो राजा शंखतीर्थाचे काठीं आपल्या पुत्रांना बोलावून म्हणतो कीं, पुत्रहो! आजरोजीं हें नगर मी ब्राह्मणांना दान दिलें आहे. आजपासून ह्या नगरावर ब्राह्मणांचा ताबा आहे. मात्र तुम्हीं एवढेंच करा कीं, जर कोणी ह्या नगराला त्रास देईल, किंवा आंत राहणाऱ्या ब्राह्मणांना जर कोणी पीडा देईल, तर तुम्ही त्यापासून ब्राह्मणांचें व नगराचें रक्षण करावें. ज्याच्या योगानें ह्या नगरांत राहणाऱ्या ब्राह्मणांना सुख होईल असें करा. जे कोणी ह्या ब्राह्मणांना पीडा देतील ते नरकाला जातील; व त्यांस अनेक दुःखें प्राप्त होऊन वारंवार त्यांचा पराजय होईल. तसेंच त्यांच्या आप्तेष्टांचे त्यांस वियोग होऊन ते व्याधिपीडित होतील; करितां तुह्मी सर्वांनीं एकमतानें ब्राह्मणांचें रक्षण करावें; म्हणजे तुमचें सतत कल्याण होऊन तुह्मांला सुखादिकांची प्राप्तिहि होईल.

---

## अध्याय १३ वा.

### अचलेश्वरमाहात्म्य.

चमत्कार राजानें वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें पुत्राला उपदेश केल्यावर शंखतीर्थाचे काठीं बसून तप केलें. त्यानं प्रथम तेथें एक आश्रम बांधून शंभर वर्षें-

पर्यंत केवळ फलभक्षणानेंच तपाचरण केलें, नंतर त्यानें आणखीही शंभर वर्षें झाडाचीं पानें खाऊन तसेंच वायुभक्षण करूनहि कित्येक वर्षें तप केलें, त्या वेळीं शंकर प्रसन्न होऊन राजास म्हणतात; राजा ! तुझी तपश्चर्या पाहून मी प्रसन्न झालों आहे, वर माग. नंतर राजा शंकरास म्हणतो; देवा ! जर आपण मला वर देण्यास सिद्ध झाला असाल तर जी नगरी मी ब्राह्मणांना दिली आहे, त्या नगरींत आपण स्वतः येऊन वास्तव्य करावें. अशा तऱ्हेनें राजाची प्रार्थना श्रवण करून शंकर म्हणतात, राजा ! मी तुझ्या प्रार्थनेवरून ह्या तुझ्या नगरामध्यें अचलरूपानें वास्तव्य करणार असल्यामुळें मला अचलेश्वर हें नांव प्राप्त होईल. जे कोणी माघ शुक्ल चतुर्दशीला अचलेश्वरानें पूजन करितील; व ब्राह्मणांना तूप व कांबळें दान देतील, त्यांचीं सर्व पातकें नाश पावतील. नंतर राजानें तेथें एक शिवलिंग स्थापिलें; त्या वेळीं आकाशवाणी झाली कीं, राजा ! मी ह्या लिंगामध्यें छायारूपानें प्रवेश करितो. ही माझी छाया लिंगासंनिध प्रत्यक्ष दृग्गोचर होईल. ज्याला ही ह्या लिंगासंनिध असणारी छाया दिसणार नाहीं; तो साहा महिन्याचे आंत मृत्यु पावेल, ही आकाशवाणी ऐकून राजाला आनंद झाला. ज्याची जी जी इच्छा असेल ती ती अचलेश्वराच्या पूजनानें व शिवप्रसादानें पूर्ण होईल. हें अचलेश्वराचें माहात्म्य सर्व पातकांचें क्षालन करणारें आहे.

---

## अध्याय १४ वा.

### प्रदक्षिणामाहात्म्य.

चमत्कार राजानें स्थापिलेल्या नगरामध्यें एक दरिद्री व मुका असा ब्राह्मण होता. तो गोरक्षण करून निर्वाह करीत असे. तो एकदा नित्याप्रमाणें गाईंना रानांत घेऊन गेला असतां त्यांच्या त्या कळपांतून एक गाय पळून रानांत निसटून गेली. हें वर्तमान गाईच्या मालकाला समजतांच त्यानें त्या दरिद्री व मुक्या ब्राह्मणाला दोष देऊन ह्मटलें कीं, तूं माझी रानांत हरवलेली गाय आतां आणून दे, नाहीं तर तुला शिक्षा करीन. असें धन्याचें भाषण ऐकतांच तो गरीब ब्राह्मण हातांत काठी घेऊन रानांत गेला व विचार करीत बसला. पुढें रानांत हिंडत असतां हरवलेल्या गाईचीं पावलें त्याच्या दृष्टीस पडलीं. त्या पावलांच्या मागोमाग जात असतां त्याला नगरप्रदक्षिणा घडल्यामुळें त्याला दुसरा जन्म राजकुलांत प्राप्त झाला; व हरवलेली गाय त्या राजाच्या प्रधानाच्या कुळांत जन्माला आली. एके दिवशीं दशार्ण देशाच्या राजकुलांत जन्माला

आलेला तो राजा प्रधानासह माघ शुक्ल चतुर्दशीला त्याच चमत्कारनगरांत येऊन प्रदक्षिणा घालीत असतां तेथें याज्ञवल्क्यप्रमुख ऋषींची गांठ पडली; नंतर याज्ञवल्क्यादि मुनि राजास म्हणतात; तूं दूर वर्षी ह्या नगराला प्रदक्षिणा घाल; म्हणजे कृतार्थ होशील. ह्या नगराचे आसपास अनंत तीर्थ आहेत. अशातऱ्हेनें मुनीचें भाषण ऐकून राजाला आनंद झाला; व त्याला नगरप्रदक्षिणेनें सिद्धिहि प्राप्त झाल्या; व अंतीं तो शिवविमानीं बसून शिवलोकीं गेला.

---

## अध्याय १५ वा.

### रक्तशृंगप्रभाव.

सूत म्हणतात:—शौनकादि ऋषिहो! आतां तुम्हाला रक्तशृंगनामक पर्वताचा प्रभाव सांगतों; ऐका. हा पर्वत इंद्रानें नागबिलाच्या पूरणाकरितां स्थापिला आहे, हें पूर्वी आपणास सांगितलें आहेच. त्याच पर्वताच्या शिखरावर चमत्कारराजानें एक नगर स्थापून ब्राह्मणांना दान दिलें आहे. ह्या पर्वतावर अनेक नद्या, व तीर्थे आहेत. हा पर्वत समुद्राचें संनिध आहे. ह्यास इंद्रानें स्थापन केल्यापासून ह्या पर्वतावर नित्य देव येऊन सुखानें क्रीडा करीत असतात. जितकीं पृथ्वीवर तीर्थें आहेत, तितकीं सर्व ह्या रक्तशृंग पर्वताच्या शिखरावर वास्तव्य करीत आहेत. जो कोणी ह्याठिकाणीं गोप्रदान करील, त्यास पृथ्वीदानाचें पुण्य प्राप्त होईल. ह्या पर्वताला प्रदक्षिणा घालणारा पुरुष साक्षात् शिवस्वरूप होऊन सुखादिकांचा उपभोग घेतो. चैत्र कृष्ण चतुर्दशीला ह्या रक्तशृंगाला प्रदक्षिणा घालणारा; व उपवासादिक करणारा सर्व पापापासून मुक्त होतो. अश्रद्धेनें प्रदक्षिणा घालणाऱ्या दरिद्री ब्राह्मणाला जर सिद्धि प्राप्त झाली, तर श्रद्धेनें तें करणारास सिद्धि प्राप्त होईलच होईल.

---

## अध्याय १६ वा.

### रक्तशृंगसमागमफल.

सूत म्हणतात कीं, रक्तशृंगपर्वत सर्वप्रकारचीं फलें देण्यास समर्थ असल्यामुळें त्याचें अवश्य सेवन करावें. ह्या पर्वताचा समागम केला असतां सर्व

तीर्थांत स्नान केल्याचें पुण्य लागतें; करितां त्याचा समागम करणें आवश्यक आहे. ह्या रक्तशृंगक्षेत्राचें सेवन केलें असतां जें फळ मिळतें, तें कोणत्याहि दानांनीं, कोणत्याहि कर्मांनीं. कोणत्याहि व्रतांनीं; किंवा कोणत्याहि यज्ञाच्या फलांनीं प्राप्त होत नाहीं, असा रक्तशृंगसमागमाचा महिमा आहे. अग्निष्टोमादि यज्ञ, चान्द्रायणादि प्रायश्चित्तें, प्रयागादि तीर्थें, पृथ्वीदानादि शुभ कर्में, व सर्व प्रकारचे वर्णाश्रम धर्म जें देऊं शकत नाहींत, तें ह्या रक्तशृंगाच्या सेवनानें प्राप्त होतें. रक्तशृंग पर्वतावर नष्ट झालेले पशु, पक्षि, सर्प, सिंह, वाघ, वृक वगैरे पातकी प्राणीहि पापमुक्त होऊन शिवसान्निध्याला जातात. जो ब्राह्मण पुण्यव्रतांचें आचरण न करतां केवळ शेतीभाती करणारा आहे; व तो जरी ह्या रक्तशृंगपर्वतावर येऊन राहील; मग तो कितीहि पापी असो, तरी तो पापरहित होऊन स्वर्गलोकाला प्राप्त होऊन तेथून शिवरूप असा शिवलोकीं जाईल. रक्तशृंगपर्वताचें, व हाटकेश्वरक्षेत्राचें नुसतें स्मरणहि केलें तरी त्यास मोक्षप्राप्ति होते; मग तर प्रत्यक्ष दर्शनानें मुक्ति मिळेल, हें सांगावयास नकोच.

---

## अध्याय १७ वा.

### विदूरथाख्यान.

शौनकादि ऋषींनीं चमत्कार राजानें रक्तशृंगावर स्थापिलेल्या नगरीची लांबी रुंदी विचारल्यावरून सूत म्हणतात: ऋषीहो! ही नगरी पांच कोस लांबरुंद आहे. त्याच्या पूर्वेस गयातीर्थ, पश्चिमेस विष्णुपद, उत्तरेस व दक्षिणेस गोकर्णेश्वर अशीं स्थानें आहेत, व हें स्थान त्यांच्या मध्यवर्ती आहे. नगरीला पूर्वी हाटकेश्वर हें नांव होतें; परंतु ही सांप्रत चमत्कार राजानें ब्राह्मणांना दान दिल्यामुळें त्यास चमत्कार असें म्हणतात. पूर्वी विदुरथनांवाचा एक राजा होता. तो कर्णाप्रमाणें दाता असून पराक्रमी होता. तो एकदां मृगया करण्याकरितां अरण्यांत गेला असतां त्यानें अनेक मृग, महिष, डुकर, तरस, सिंह, वाघ, हत्ति, वगैरे श्वापदें मारिलीं. शेवटीं एका मृगाला त्या विदूरथ राजानें एक तीक्ष्ण बाण मारिला असतांहि तो त्या बाणाला न जुमानून तसाच पुढें पळत सुटला. राजाहि सैन्यासह त्या पळणाऱ्या मृगाच्या पाठोपाठ धांवत चालला. धांवतां धावतां सर्व सैन्य थकून गेलें; व एकटाच राजा धावूं लागला. सरतेशेवटीं, मृग तर सांपडला नाहींच; परंतु तो घोडा अत्यंत श्रमित झाल्यामुळें थकून पृथ्वीवर धाडदिशी पडला. घोडा पडल्यामुळें राजानेंहि पृथ्वीवर अंग टाकिलें.

# अध्याय १८ वा.



## गयाशिरमाहात्म्य.

सूत ह्मणतात; शौनकादि ऋषि हो! तो विदूरथ राजा तृषेनें व क्षुधेनें व्याकूळ होऊन जमिनीवर भ्रमित असा निश्चेष्ट पडला असतां, कांहीं वेळानें सावध झाल्यावर त्या विदूरथानें आकाशांतून खालीं उतरणारीं तीन पिशाचें अवलोकन केलीं; व त्यांना पाहून राजाला भीति उत्पन्न झाली; व तो त्या पिशाचांस ह्मणतो कीं, आपण भीतिदायक स्वरूपें घेतलेले कोण आहां? तें सांगा. मी विदूरथ राजा मृगया करीत करीत येथें आलों आहे; व क्षुधेनें आणि तृषेनें माझी अशी स्थिति झाली आहे. अशा रीतीनें विदूरथाचें भाषण ऐकून त्या तीन पिशाच्चांपैकीं मुख्य असा मांसाद नांवाचा पिशाच राजाला ह्मणतो; राजा! आम्ही तिघे ह्या अरण्यांत राहणारे पिशाच आहोंत. माझें नांव मांसाद असून दुसऱ्या ह्या पिशाचाचें नांव विदैवत असें आहे; व तिसरा कृतघ्न नांवाचा पिशाच आहे. आमचीं सर्वांचीं नांवें अन्वर्थ असून आह्मी पूर्वीं केलेल्या पातकांचीं फळें सध्या भोगीत आहों. आतां आह्मांला सद्गति प्राप्त करून देणें आपल्यावर अवलंबून आहे. आतां आपण माझ्याकरितां गयाशिराचे ठिकाणीं जाऊन आमच्या तिघांच्या नांवांनीं श्राद्धविधि करा; ह्मणजे आह्मी पिशाचयोनीपासून मुक्त होऊं. दुसऱ्या कोणत्याहि उपायानें आह्मांला मुक्ति मिळावयाची नाहीं. असें पिशाचवचन ऐकतांच राजा पिशाचांस म्हणतो कीं, मी सांप्रत क्षुधेनें व तृषेनें व्याकुळ होऊन मरणोन्मुख झालों आहे, जर मजला पाणी प्यावयास मिळेल; व जर मी चांगल्या स्थितीमध्यें परत स्वनगराला जाईन, तर तुमच्या सांगण्याप्रमाणें गयाशिराला जाऊन तुमच्या नांवानें श्राद्धविधि करून तुमचा उद्धार करीन; परंतु मला सांप्रत पाणी कोठें मिळेल तें सांगा. असें राजवाक्य ऐकून मांसाद राजास म्हणतो कीं, येथून जवळच एक सरोवर आहे; व तेथें ऋषींचे आश्रमहि आहेत, करितां तुह्मी तेथें जाऊन आपली तहान भागवा; व नंतर आमची कामगिरी करण्याचे उद्योगास लागा, असें सांगून मांसादानें राजाला सरोवराकडे जाण्याचा रस्ताहि दाखविला. राजा हळूहळू सरोवरावर येऊन व तेथील आश्रम पाहून ऋषींना आपलें सर्व वर्तमान निवेदन करिता झाला. ऋषींच्या आज्ञेनें सरोवरांतील पाणी प्राशन केल्यावर राजा ऋषींना म्हणतो कीं, माझी माहिष्मती नगरी येथून किती लांब आहे; व तिकडे जाण्याचा मार्ग कोणता? वगैरे सांगा. नंतर ऋषी राजाला म्हणतात; राजा! आम्ही रानांत राहणारे ऋषि आहों, आम्हांला

तुह्मी माहिष्मती नगरी मुळींच माहिती नाहीं. आतां तुह्मी आमच्यासह येथें रात्र घालवून सकाळीं आपल्या नगराला जा; कारण आतां सूर्यास्ताचा समय झालेला असून सायंसंध्यादि नित्यकर्में करण्याचा काल प्राप्त झाला आहे. असें ऋषिभाषण ऐकतांच राजा ती रात्र स्वकर्मांत व ऋषींसह पुराणकथेच्या श्रवणांत घालवून मोठ्या आनंदानें तेथें राहता झाला.

---

## अध्याय १९ वा.

### पितृकूपिकामाहात्म्य.

नंतर त्याठिकाणीं राजसेवक राजाचा शोध करीत प्राप्त झाले असतां ऋषींच्या आश्रमांत असणाऱ्या राजाला पाहून त्यांना मोठा आनंद झाला. दुसरे दिवशीं सकाळीं सर्वांचीं नित्य कर्में आटोपल्यावर राजा सेवकांसह ऋषींची आज्ञा घेऊन माहिष्मती नगरीला प्राप्त झाला. कांहिं दिवस विश्रांति घेतल्यानंतर राजाला पिशाचांचें भाषण स्मरून त्यानें सेवकांसह गयाशिराला जाण्याचा विचार केला. प्रथम राजानें तेथें असणाऱ्या एका तीर्थांत स्नान करून मांसादाच्या नांवानें श्राद्धविधी केला. त्याच दिवशीं रात्रीं मांसाद राजाच्या स्वप्नांत येऊन ह्मणतो कीं, तुझ्या या श्राद्धकर्मानें मी मुक्त झालों आहे. तुझें कल्याण होवो, तुझ्या कृपेनें मी आतां विमानांत बसून वैकुंठाला जात आहे. दुसरे दिवशीं विदूरथ राजाला रात्रीचें आश्चर्यकारक स्वप्न पाहून अत्यानंद झाला; नंतर त्यानें विदैवताच्या नांवानें त्याच तीर्थांत स्नान करून श्राद्ध केलें. त्या रात्रीं तोहि राजाच्या स्वप्नांत येऊन मांसादाप्रमाणें सर्व हकीगत सांगून मुक्त झाला. तिसरे दिवशीं कृतघ्नपिशाचाचे नांवानें तेथें श्राद्ध केलें असतां तो राजाला ह्मणतो कीं, ह्या तीर्थांत श्राद्ध केल्यानें मांसादाप्रमाणें मला मुक्ति मिळावयाची नाहीं; कारण माझें पाप त्यांच्यापेक्षांहि भयंकर आहे, करितां आपण हाटकेश्वरासंन्निध वाळूनें भरून गेलेलें एक गयाशिरतीर्थ आहे, त्याठिकाणीं आपण जर माझें नांवानें श्राद्ध कराल तरच माझी मुक्ति होईल. असें कृतघ्नाचें भाषण ऐकून विदूरथराजानें हाटकेश्वरक्षेत्रांत प्रयाण करून पिंपळाच्या झाडाखालीं वाळूनीं आच्छादिलेलें गयाशिरतीर्थ उकरण्यास सुरवात केली. त्या वेळीं तेथें एक कूप तयार झाला. त्या कूपाचे कांठीं कृतघ्नाचे नांवानें श्राद्ध करतांच तो सर्व पापापासून मुक्त होऊन वैकुंठाला जाता झाला. त्या दिवसापासून त्या कूपाला पितृकूपिकातीर्थ असें नांव प्राप्त झालें. जे कोणी

दशांदि पितृतिर्थीना ह्या पितृकूपिकातीर्थांत स्नान करितात, ते पितरांसह कृतघ्न-नामक पिशाचाप्रमाणें कितीहि पापी असले तरी मुक्त होतात. ह्या पितृकूपिकातीर्थाचे सन्निध अग्निष्वात्तादि पितृगण, बर्हिषदादि व सोमप असे पितर राहत असल्यामुळें ह्या कूपाचा महिमा अगाध आहे; करितां प्रत्येकानें एकदां तरी पितरांना उद्देशून ह्या पितृकूपिकातीर्थाचे काठीं श्राद्ध-विधि करून त्यांच्या ऋणापासून मुक्त व्हावें; व पुत्रकार्याच्या अनुष्ठानानें कृतार्थ व्हावें.

---

## अध्याय ९० वा.

---

### बालमंडनतीर्थमाहात्म्य.

एकदा रामचंद्र, सीता व लक्ष्मण ह्यांसह अरण्यांत भ्रमण करीत असतां पितृकूपिकातीर्थासन्निध प्राप्त झाले. ते तिघे तृषित झाल्यामुळें जलप्राशन करून विश्रांति घेत बसले आहेत; इतक्यांत सूर्यास्त झाल्यामुळें त्यांनीं तेथेंच वस्ती केली; नंतर रामचंद्रानें सायंसंध्यादि नित्यविधि केल्यावर रात्रीं शयन केलें असतां स्वप्नांत रामचंद्राला दशरथाचें दर्शन घडलें. दुसरे दिवशीं रामचंद्र जागृत झाल्यावर विद्वान् ब्राह्मणांना रात्रीं पडलेलें स्वप्न सांगून त्याचें फळ विचारिता झाला. त्या वेळीं ब्राह्मण रामचंद्रास म्हणतात कीं, ह्या ठिकाणीं पितृकूपिकातीर्थांत साक्षात् गया राहत असल्यामुळें दशरथानें तुम्हांला दर्शन देऊन येथें श्राद्ध करण्याबद्दल सूचित केलें आहे, असें समजा. पितर श्राद्धप्रिय असल्यामुळें व अनायासें आपण ह्या पुण्यस्थानीं आल्यामुळें त्यांनीं तुम्हांला दर्शन दिलें आहे. असें ब्राह्मणांचें भाषण ऐकतांच रामचंद्रानें त्या कूपाचे काठीं यथाविधि श्राद्धानुष्ठान केलें. श्राद्धामध्यें आमंत्रित केलेल्या ब्राह्मणांच्या शरीरांत प्रत्यक्ष दशरथादि पितर सीतेला दिसूं लागल्यामुळें ती त्या वेळीं तेथून एका झाडाचे आड उभी राहिली होती. श्राद्धविधि उरकून ब्राह्मण स्वस्थानीं गेल्यावर सीता रामापुढें येऊन उभी राहिली असतां राम सीतेला रागावून म्हणतात कीं, तूं आतांपर्यंत कोठें होतीस ? तेव्हां सीता रामाला म्हणते, मला ब्राह्मणांच्या शरीरांत माझे श्वशूर दिसत होते; व त्यांना मी रानांतील कडू, आंबट वगैरे फळें वाढिल्यास कदाचित् ते रागावून मला शाप देतील, ह्या भीतीनें मी त्या झाडाचे आड उभी होतें. असें सीतेचें भाषण ऐकून रामाला आनंद झाला; नंतर सायंकाळ झाली असतां रामानें लक्ष्मणाला शय्या तयार करण्यास सांगितलें; त्या वेळीं लक्ष्मण रामाला रागावून म्हणतो

कीं, आजपासून मी तुझें कोणतेंहि काम करणार नाहीं; तुह्मी प्रत्येक काम मलाच कां सांगतां ! सीतेला कां सांगत नाहीं. असें लक्ष्मणाचें भाषण ऐकतांच राम जरा हांसून व स्वतः उठून शय्या तयार करिते झाले; नंतर राम व सीता उभयतांनीं शयन केलें असतां लक्ष्मणाच्या मनांत पापबुद्धि उत्पन्न झाली कीं, राम निजले आहेत, करितां त्याला ठार मारून सीतेला पळवून घेऊन जावें; परंतु तसें करण्यास लक्ष्मणाला धीर होईना. दुसरे दिवशीं सकाळीं राम व सीता तेथून दुसरीकडे जाण्यास निघाली असतां लक्ष्मणहि त्यांचे मागोमाग चालला. अशातऱ्हेनें कांहीं काळ निघून गेल्यावर रामचंद्राला ठार मारण्याबद्दल उत्पन्न झालेली जी पापबुद्धि त्याबद्दल पश्चात्ताप होऊन लक्ष्मण रामचंद्राला स्वामिद्रोह केल्याबद्दलच्या दोषाच्या नाशार्थ उपाय विचारूं लागला. तितक्यांत मार्कण्डेयमुनि रामाजवळ येऊन लक्ष्मणाला म्हणतात कीं, माझ्या आश्रमाजवळ बालमंडन नांवाचें एक तीर्थ आहे, तेथें स्नानादि केल्यास तुझा सर्व दोष नष्ट होईल. पूर्वीं ह्या तीर्थांत स्नान करून इंद्र दितीचा गर्भ नष्ट केल्याच्या दोषापासून मुक्त झाला. जे कोणी चमत्कारपुरामध्यें राहून बालमंडनतीर्थांत स्नान करतात, ते स्वामिद्रोहजन्य दोषापासून मुक्त होतात. नंतर मार्कण्डेयाच्या सांगण्याप्रमाणें लक्ष्मण बालमंडनतीर्थांत स्नान करून स्वामिद्रोहकृत दोषापासून मुक्त झाला. नंतर राम लक्ष्मणासह रावणादिकांचा नाश करून भूभाराचें हरण करिता झाला.

---

## अध्याय २१ वा.

—:0:—

### बालसख्यतीर्थमाहात्म्य.

सूत म्हणतात; ऋषिहो ! एक मृकंड नांवाचा महान् तपस्वी मुनि होता. त्याला वृद्धावस्थेंत असतां शिवप्रसादानें मार्कंडेय नांवाचा एक मुलगा झाला. त्याच्या घरीं कांहीं काळानंतर एक ज्योतिषी येऊन व मार्कंण्डेयाकडे पाहून आश्चर्यचकित झाला. हा प्रकार पाहून मृकंडमुनीनें ज्योतिष्याला आश्चर्यचकित होण्याचें कारण विचारिलें. त्या वेळीं ज्योतिषी मृकंडास म्हणतो कीं, तुझ्या मुलाचे गुण पाहून व त्याचे अल्पायुष जाणून मी आश्चर्यचकित झालों. हा तुझा मुलगा मार्कण्डेय आजपासून साहा महिन्यांनीं मृत्यु पावेल. असें ऐकतांच मृकंडाला फारच वाईट वाटलें. तो ज्योतिषी निघून गेल्यावर मृकंडानें आपल्या मुलाला जवळ बोलावून सांगितलें कीं, कोणीहि ब्राह्मण तुला भेटो, त्याला तूं नमस्कार करीत जा. असें मृकंडाचें भाषण ऐकून मार्कण्डेय बापाच्या सांगण्याप्रमाणें कोणीहि ब्राह्मण भेटो, त्याला तो नमस्कार करीत असे. अशात-

व्हेनें साहा दिवस कमी साहा महिनें निघून गेल्यावर एके दिवशीं मार्कण्डेयाला सप्तर्षींची गांठ पडली त्यानें सप्तर्षींना नमस्कार करितांच त्यांनीं मार्कण्डेयाला ' दीर्घायुषी हो ' असा आशीर्वाद दिला. तितक्यांत वशिष्ठाला ज्ञानदृष्टीनें हा अल्पायुषी आहे; असें जाणून म्हटलें कीं, ह्याला ' दीर्घायुषी हो ' असा आशीर्वाद जो आपण दिला तो खरा करण्याकरितां आपण ह्याला घेऊन ब्रह्मदेवाकडे जाऊं, असें म्हणून सप्तर्षि मार्कण्डेयाला घेऊन ब्रह्मदेवाकडे गेले. मार्कण्डेयानें ब्रह्मदेवाला नमस्कार करितांच ब्रह्मदेवानेंहि ' दीर्घायुषी हो ' असा आशीर्वाद दिला. नंतर वशिष्ठादि ऋषींनीं ब्रह्मदेवाला हा मार्कण्डेय अल्पायुषी असल्याबद्दल सांगितलें. त्या वेळीं ब्रह्मदेव म्हणतात: ऋषिहो ! ज्यापेक्षां मी ह्याला आशीर्वाद दिला आहे, त्यापेक्षां हा दीर्घायुषी होईल, आतां तुह्मी स्वस्थानीं निघून जावें. नंतर सर्व सप्तर्षि मार्कण्डेयाला त्याचे घरीं पोंचवून स्नानाला निघून गेले. मार्कण्डेयानें सर्व हकीगत मृकंडाला सांगतांच त्याला व मार्कण्डेयाचे आईला मोठा आनंद झाला. नंतर सप्तर्षींनीं मृकंडाला सांगितल्याप्रमाणें हाटकेश्वरासंनिध ब्रह्मदेवाची स्थापना करून मृकंडानें व मार्कण्डेयानें त्याचें पूजन केलें. त्यायोगें मार्कण्डेय दीर्घायु झाला. ह्या ब्रह्मदेवाचें बाल जो मार्कण्डेय त्यानें पूजन केल्यामुळें व त्या पूजनानें मृकंडाचें बालाशीं कायमचें सख्य म्हणजे मित्रत्व झाल्यामुळें त्या ब्रह्मदेवाला, व तेथील तीर्थाला बालसख्यतीर्थ म्हणतात. जे कोणी ह्या बालसख्यतीर्थांत स्नान करून ब्रह्मदेवाचें पूजन करितात ते सर्व दोषापासून मुक्त व दीर्घायु होऊन सत्यलोकीं राहतात; व त्यांस कोणापासूनहि पीडा उत्पन्न होत नाहीं.

---

## अध्याय २२ वा.

### इंद्राच्या ब्रह्महत्त्येचें नाशन.

एकदां ब्रह्मदेवाच्या डाव्या अंगठ्यापासून; दक्षप्रजापति उत्पन्न झाला. त्या दक्षाला पन्नास मुली होत्या. त्यांपैकीं त्यानें आपल्या दहा मुली धर्माला, तेरा कश्यपाला, सत्तावीस चंद्राला दिल्या. कश्यपाच्या दहा भार्यांपैकीं दिति; व अदिति ह्या दोन मुख्य भार्या होत. कश्यपाला अदितीपासून इंद्रादि देव उत्पन्न झाले व दितीपासून दैत्य उत्पन्न झाले. देवांचें व दैत्यांचें नित्य भयंकर युद्ध होत असतें. एकदां देवांनीं दैत्यांचा पराभव केला असतां, त्याचा सूड घेण्याच्या इराद्यानें दितीनें शंकराची उपासना केली; व देवांचा पराभव करणारा पुत्र मागितला. कांहीं दिवसांनीं शंकराच्या प्रसादानें दिति गरोदर राहिली असतां,

इंद्राला फारच धास्ति उत्पन्न झाली; व त्यानें दितीचा गर्भ नष्ट करण्याचा विचार केला. दिति दाहा महिन्यांची गरोदर असतां ती निजली आहे, असें पाहून इंद्रानें तिच्या पोटांत गुप्तरूपानें शिरून गर्भाचे एकोणपन्नास तुकडे केले. दितीच्या तपःसामर्थ्यानें ते गर्भाचे तुकडे नष्ट न होतां तितक्या प्रकारानें ते जिवंत राहिले, हें पाहून इंद्र दितीच्या पोटांतून घाबऱ्या घाबऱ्या बाहेर आला. दुसरे दिवशीं दितीला एकोणपन्नास पुत्र झाले. इंद्राला त्याच्या दुष्कृत्यानें दुर्गंधत्व, निस्तेजस्त्व व निर्वीर्यत्व प्राप्त झाल्यामुळें पश्चात्ताप होऊन, त्यानें दितीकडे येऊन तिला झालेली सर्व हकीगत सांगितली; आणि तिची प्रार्थना करून क्षमा मागितली. त्या वेळीं दिति इंद्राला म्हणते कीं, तूं ज्यापेक्षां माझ्याजवळ येऊन खरें बोललास त्यापेक्षां मी तुला तुझ्या अपराधाची क्षमा केली आहे; व तूं एकादा वर मागून घे. नंतर इंद्र म्हणतो;–माते! ह्या तुझ्या एकोणपन्नास मुलांचें नांव मरुत् असें ठेविलें आहे; हे मला फार प्रिय होवोत. हें स्थान बालकांनीं मंडित म्हणजे शोभित झाल्यामुळें ह्या स्थानाला; व येथील तीर्थाला बालमंडनतीर्थ, असें नांव प्राप्त होवो; व ह्या बालमंडनतीर्थाचें उदक ज्या गरोदर स्त्रिया प्राशन करितील त्याची प्रसूति सुखानें होईल; असा ह्या तीर्थाला वर द्यावा. असें इंद्रवाक्य ऐकतांच दितीनें त्या स्थानाला तसा वर देऊन व इंद्राच्या सर्व इच्छा पूर्ण करून इंद्राला ह्या तीर्थांत दोषनाशार्थ तप करण्यास सांगितलें. नंतर इंद्रानें बालमंडनतीर्थांत स्नान करतांच त्याची ब्रह्महत्त्या नष्ट झाली; व तो दोषमुक्त होत्साता स्वर्गाला निघून गेला. जे कोणी आश्विन शुक्ल दशमीला ह्या बालमंडनतीर्थांत स्नान करून, श्राद्धविधि करतात ते पितरांसह मुक्त होतात. बालमंडनतीर्थांत स्नान करून, शक्रेश्वराचें पूजन करणारे ब्रह्महत्त्यादि दोषांपासून मुक्त होतात.

---

## अध्याय २३ वा.

### मृगतीर्थमाहात्म्य.

बालमंडनतीर्थाच्या पश्चिमेस मृगतीर्थ आहे. हें तीर्थ लोकविख्यात असून पुण्यप्राप्ति करून देणारें आहे. चैत्र शुक्ल चतुर्दशीला ह्या मृगतीर्थांत स्नान करून शिवपूजन करणारे दुर्योनींत जन्माला न येतां शिवस्वरूपाला प्राप्त होतात. ह्या तीर्थाला मृगतीर्थ म्हणण्याचें कारण हें कीं, ह्या अरण्यांत पूर्वी पुष्कळ मृग भ्रमण करीत असतां तेथें हातांत धनुष्यबाण घेऊन कांहीं भिल्ल प्राप्त झाले. त्या भिल्लांना पाहून मृग भीतीनें जिकडेतिकडे धावूं लागले; व धावतां धावतां सर्व

मृग एका तलावांत शिरून मृत झाले. तात्काळ त्या तलावाच्या प्रभावानें व मृगांच्या पुण्यानें त्यांना मनुष्यत्व प्राप्त झालें. हा सर्व प्रकार पाहून भिल्लांना आश्चर्य वाटलें; व त्यांनीं हातांतील धनुष्यबाण जमिनीवर टाकून त्या सरोवरांत स्नान केलें. तत्काळ त्या भिल्लांचा देह, नृपत्वाला प्राप्त झाला. ह्या तीर्थांत प्रथम मृगांनीं स्नान केलें; म्हणून ह्याला मृगतीर्थ म्हणतात. ह्या मृगतीर्थालाच लिंगभेदोद्भवतीर्थ हें नांव प्राप्त झालें होतें; परंतु इंद्राच्या आज्ञेनें वायूनें हें तीर्थ वाळूनें बुजवून टाकिलें होतें. पुढें कित्येक काळ मध्यंतरीं गेल्यावर; त्या ठिकाणीं एक छिद्र निर्माण झालें; तेंच पुढें मोठें होतां होतां सरोवरत्वाला प्राप्त होऊन, व त्यांत मृगांनीं स्नान केल्यामुळें; आज त्या सरोवराला मृगतीर्थ म्हणतात. ह्या मृगतीर्थामध्यें त्रिशंकूनें स्नान करून, स्वर्गप्राप्ति करून घेतली. करितां ह्या मृगतीर्थांत स्नान करणारे दुर्लभ अशा मोक्षाप्रत प्राप्त होतात.

## अध्याय २४ वा.

### विष्णुपदीतीर्थोत्पत्ति.

मृगतीर्थानजीक एक विष्णुपदी नांवाचें तीर्थ आहे. हें तीर्थ सर्व पातकांचें क्षालन करणारें आहे. दक्षिणायनामध्यें जे कोणी एकाग्र अंतःकरणानें व श्रद्धेनें विष्णुपदीतीर्थांत स्नान करून विष्णूचें पूजन करतात, ते जरी दक्षिणायनांत मृत झाले तरी वैकुंठाला प्राप्त होतात. ज्या वेळीं बलिराजानें इंद्राला जिंकून त्रैलोक्य आपल्या ताब्यांत घेतलें, त्या वेळीं विष्णूनें वामनावतार घेऊन, बलीजवळ तीन पावलें भूमि मागण्याच्या हेतूनें त्याला जिंकिलें; पैकीं वामनानें पहिला पाय हाटकेश्वरक्षेत्रांत ठेविला व भूलोक व्यापून टाकिला. दुसरा पाय मर्त्यलोकांत ठेवून स्वर्गलोक व्यापून टाकिला; व तिसरा पाय ठेवण्याकरितां वामन स्थान शोधूं लागले असतां ब्रह्मांडाचीं शकलें होऊन; व समुद्र क्षुब्ध होऊन प्रलय होतो कीं काय! असें सर्वांस वाटूं लागलें; त्या वेळीं सर्व लोकांना ताप होऊन त्यांच्या शमनार्थ विष्णूनें आपल्या पायापासून एक नदी उत्पन्न केली. तिलाच विष्णुपदी म्हणजे गंगा म्हणतात. प्रथम विष्णुपदीची उत्पत्ति मृगतीर्थाजवळ झाली असल्यामुळें त्या ठिकाणीं विष्णुपदी नांवाचें एक तीर्थ निर्माण झालें. जे कोणी ह्या विष्णुपदीतीर्थांत स्नान करून श्राद्धविधी करितात, ते पितरांसह निष्पाप होऊन विष्णुलोकाला प्राप्त होतात. जे कोणी माघ महिन्यांत विष्णुपदीतीर्थांत स्नान करितात, त्यांना प्रयागतीर्थांत स्नान केल्याचें फळ प्राप्त होतें; करितां कल्याणेच्छु पुरुषानें अवश्य ह्या तीर्थांत स्नान करावें.

## अध्याय २५ वा.

### विष्णुपदीतीर्थमाहात्म्य.

सूत म्हणतात;-शौनकादि ऋषिहो! आतां तुम्हाला विष्णुपदीतीर्थाचें माहात्म्य सांगतों; ऐका. पूर्वी एक चंडशर्मा नांवाचा विप्र होता. तो तारुण्याच्या भरांत असतां एका वेश्येशीं आसक्त असता झाला. तो विप्र वैदिक कर्मांत पारंगत होता. तो रात्रीं वेश्येचें घरीं निजला असतां मध्यरात्रीचे सुमारास तृषेनें व्याकुळ होऊन वेश्येजवळ पाणी मागूं लागला. तिनें चुकीनें त्या विप्राला पाण्याच्या बदलीं मद्यानें भरलेला एक घट दिला. त्यानें तें मद्य पाणी समजून पितांच त्याला मद्याची घाण आली, व तो विप्र तिला पुष्कळ दोष देऊं लागला. त्या विप्राला मद्यप्राशनानें पश्चात्ताप होऊन तो एका निर्जन अरण्यांत जाऊन विचार करीत बसला. पुढें तो एका ब्राह्मणसभेंत जाऊन तेथील ब्राह्मणांस मद्यप्राशन केल्याच्या दोषाचें नाशार्थ प्रायश्चित्त विचारता झाला. ब्राह्मणांनीं सांगितलें कीं, जितकें मद्य प्राशन केलें असेल तितकें तूप अग्नीप्रमाणें तापवून प्राशन करावें; म्हणजे मद्यप्राशनाचा सर्व दोष नष्ट होईल. नंतर विप्र त्याप्रमाणें तूप तापवून पिणार इतक्यांत त्याचीं मातापितरें स्वर्गांतून खालीं उतरून ब्राह्मणास म्हणतात कीं, कीं, तुम्ही ह्याला हें घोर प्रायश्चित्त न सांगतां त्याच्या दोषाची अल्प प्रायश्चित्तानें निष्कृति होईल, असा एकादा उपाय सांगा. नंतर ब्राह्मण म्हणतात; हे विप्रा! तूं तीर्थयात्रा कर, म्हणजे दोषमुक्त होशील. असें सांगताच चंडशर्मा ब्राह्मणाच्या मातापितरांना आनंद झाला; व ते स्वस्थानीं निघून गेले. नंतर चंडशर्मा विप्र तीर्थयात्रा करीत विष्णुपदीतीर्थाला येऊन स्नानादि विधि करिता झाला. त्या विष्णुपदी तीर्थांत स्नान करितांच आकाशवाणी झाली कीं, हे विप्रा! तुझा मद्यप्राशनाचा दोष आतां नष्ट झाला आहे. तूं खुशाल स्वगृहीं जाऊन गृहस्थाश्रमधर्माचा स्वीकार कर. अशी आकाशवाणी ऐकतांच शंडचर्माला आनंद झाला; व तो निष्पाप होत्साता स्वगृहाला प्राप्त झाला. हें विष्णुपदीचें आख्यान जे श्रवण करितील ते विष्णुलोकीं जातील.

## अध्याय २६ वा.

### गोकर्णतीर्थमाहात्म्य.

सूत म्हणतात;-ऋषिहो! ह्या पृथ्वीतलावर मथुरानांवाची एक नगरी आहे. ती नगरी यमुनानदीचे काठीं असून अनेकप्रकारच्या वृक्षादि वनशोभेनें युक्त

आहे. त्या नगरींत गोकर्ण नांवाचा एक ब्राह्मण राहत असे. त्याच नगरींत दुसरा एक गोकर्णनांवाचा एक वृद्ध पापी मनुष्य राहत होता. तो वृद्ध गोकर्ण वयातीत व मरणोन्मुख झाल्यामुळें यमानें त्या वृद्ध गोकर्णास यमलोकीं आणण्याकरितां आपल्या दूतांना मथुरानगरींत पाठविलें. यमदूत यमाच्या आज्ञेप्रमाणें मथुरानगरींत येऊन वृद्ध गोकर्णाला यमलोकीं आणावयाचें असतां चुकीनें त्यांनीं तरुण व चिरायु अशा गोकर्णाला यमलोकीं आणिलें. यमानें गोकर्णाकडे पाहून आपल्या दूतांचा धिक्कार करून म्हटलें कीं, तुम्ही ह्या चिरायु गोकर्णाला येथें कशाला आणिलें? हें तुम्हीं फारच वाईट केलें. आतां तुम्हीं निमुटपणें त्यास त्यांच्या घरीं लवकर जाऊन पोंचवा; कारण ह्याचे आप्तस्वबंधु शोकाकुल होतील. त्या वेळीं ब्राह्मण यमास म्हणतो कीं, माझ्या दैवानें मी तुमचे जवळ प्राप्त झालों आहे, तो आतां मी परत भूलोकीं जाणार नाहीं. शेवटीं यमानें भूलोकीं जाण्याबद्दल गोकर्णब्राह्मणाची विनवणी केल्यावरून गोकर्ण यमाला म्हणतो कीं, जर तुमचा आग्रहच असेल तर मी भूलोकीं जातो; परंतु आपण मला येथील नरकांची माहिती देऊन त्याचीं शुभाशुभ फळेंहि सांगा. असें गोकर्णाचें वाक्य ऐकताच यमानें गोकर्णाला एकवीस अशा मुख्य नरकांची माहिती सांगितली. तें नरकवर्णन ऐकून गोकर्ण यमाला नरकप्राप्ती न होण्याचे उपाय विचारूं लागला असतां यम म्हणतो; गोकर्णा! जो कोणी तीर्थयात्रा करितो त्याला नरकप्राप्ति होत नाहीं. परोपकार करणारा, जपादि अनुष्ठान करणारा, दानधर्म करणारा, वर्णाश्रमविधींचें पालन करणारा, व्रतोपवासादि करणारा, कोणाची कधींहि हिंसा न करणारा, वेदशास्त्राध्ययन करणारा, व सद्वर्तन करणारा पुरुष नरकाल जात नाहीं. आतां तूं पृथ्वीवर जाऊन हाटकेश्वर क्षेत्रासन्निध एक शिवलिंग स्थापून त्याची आराधना कर; म्हणजे कृतार्थ होशील. असें यमवाक्य ऐकून गोकर्ण पृथ्वीवर मथुरानगरींत प्राप्त होता झाला. नंतर यमदूतांनीं मथुरेंत येऊन वद्ध अशा दुसऱ्या गोकर्णाला यमलोकीं नेलें असतां यम दूतांस म्हणतो कीं, ह्याचा प्राणोत्क्रमणाचा काळ तुमच्या मूर्खपणानें टळून गेल्यामुळें सांप्रत हा येथें येण्यास लायक नाहीं; करितां ह्याला पूर्वीच्या तरुण गोकर्णाप्रममाणें त्याच्या नगरींत घेऊन जा; असें यमाचें भाषण ऐकतांच, ते दूत गोकर्णाला परत मथुरेंत आणून पोंचविते झाले. नंतर त्या दोघां गोकर्णांनीं हाटकेश्वरक्षेत्रांत जाऊन; व शिवलिंग स्थापून शिवाराधना करण्यास प्रारंभ केला. त्यायोगें शंकर प्रसन्न होऊन त्या दोघां गोकर्णांस शिवलोकीं घेऊन गेले. गोकर्णांनीं स्थापिलेलें जें लिंग त्यासच गोकर्णेश्वर म्हणतात; व तेथील तीर्थास गोकर्णतीर्थ म्हणतात. ह्या तीर्थांत स्नानादि केलीं असतां मोक्षप्राप्ति होते.

---

## अध्याय २७ वा.

### चतुर्युगस्वरूप.

शौनकादिऋषींनी सूताला कृतयुगादि चार युगांचें स्वरूप; व माहात्म्य विचारल्यावरून सूत म्हणतात कीं, हें चतुर्युगमाहात्म्य पूर्वी इंद्रानें बृहस्पतीला विचारिलें होतें; व बृहस्पतीनें इंद्राला जें सांगितलें तेंच मी तुम्हाला सांगतों. एकदा इंद्र आपल्या सभेंत देवांसह बसला असतां; व अप्सरादि देवस्त्रिया गायनादि करीत असतां, व अनेकप्रकारच्या शास्त्रार्थांचा ऊहापोह चालू असतां सहज इंद्रानें बृहस्पतीला प्रश्न केला कीं, हे गुरो! आपण मला युगप्रमाण; आणि युगमाहात्म्य सांगा! त्या वेळीं बृहस्पती इंद्राला हें युगमान सांगण्यास आरंभ करितात. बृहस्पति म्हणतात; हे इंद्रा! एकंदर युगें चार होत. त्यांचीं नांवें अनुक्रमें कृतयुग, त्रेतायुग, द्वापरयुग, व कलियुग अशीं होत. त्यांपैकीं कृतयुगाची कालप्रमाणसंख्या सतरा लक्ष अठ्ठावीस हजार आहे. त्या युगांत धर्मस्वरूप पूर्णावस्थेंत असतें; व पुढें प्रत्येक युगांत चतुर्थांशानें तें कमी कमी होत जातें. त्या कृतयुगांत सर्व लोक स्वधर्माचें आचरण करून दीर्घायु होतात; त्या युगांत पांच ताडांच्या झाडाइतके उंच लोक असतात, सोळा हजार वर्षांपर्यंत बाल्यावस्था. बत्तीस हजार वर्षांपर्यंत तारुण्यावस्था; व नंतर वृद्धावस्था अशा त्या काळांत मनुष्यांची आयुःस्थिति राहते. त्रेतायुगाची कालप्रमाणसंख्या बारा लक्ष शहाण्णव हजार आहे. त्या युगांत धर्मस्वरूप पूर्णावस्थेंत नसून चतुर्थांशानें न्यून म्हणजे पाऊणपट आहे. सर्व लोक त्या कालांत फलाची इच्छा धरून व्रतोपवासादि धर्माचरण करितील; व कामादि षड्रिपूंच्या ताब्यांत राहून पापकर्माचेंहि आचरण करितील. त्रेतादियुगांत जे पाप करितील, त्यांच्याकरितां यमानें एकवीस नरक निर्माण केले आहेत. त्या युगांत लोकांची प्रवृत्ति यज्ञादि कर्में करण्याकडे राहील. हजार वर्षांनंतर मनुष्याला तारुण्य प्राप्त होईल; व पांच हजार वर्षांनंतर वृद्धावस्था प्राप्त होईल. त्या युगांत परीट, चांभार, नाटकी, बुरुड, कोळी, भिल्ल, चांडाळ हे सर्व शूद्रलोक उत्पन्न होतील. ब्राह्मण–स्त्रीचेठिकाणीं क्षत्रियापासून झालेला जो पुत्र त्याला सूत म्हणतात. सूतापासून ब्राह्मण–स्त्रीचे ठिकाणीं झालेला पुत्र परीट होय. परटाकडून ब्राह्मण–स्त्रीचे ठिकाणीं झालेल्याला चांभार म्हणतात. चांभाराकडून ब्राह्मणीचे ठिकाणीं झालेला नाटकी होय. वैश्याकडून ब्राह्मण–स्त्रीचे उदरीं जन्म घेणारा मागध होय. मागधापासून ब्राह्मणीचे ठिकाणीं होणारा बुरुड होय. बुरुडापासून कोळी उत्पन्न होतात; तसेंच शूद्रापासून ब्राह्मणस्त्रीचे ठिकाणीं उत्पन्न झालेले भिल्लादि उत्पन्न होतात. ही

सर्व अंत्यज ( शूद्र ) सृष्टि प्रतिलोम म्हणजे उच्च वर्णाच्या स्त्रीचे ठिकाणीं नीच वर्णाच्या पुरुषापासून झालेली आहे. अशाप्रमाणें त्रेतायुगांत अधर्मानें शूद्र-सृष्टि निर्माण होऊन पापप्रवृत्ति झाली. आतां द्वापारयुगाचें कालप्रमाण आठ लक्ष चौसष्ट हजार आहे. ह्या युगांत निम्मे प्रमाणांत धर्माचें स्वरूप राहील. ह्या काळांत शंभर वर्षांनें तारुण्य प्राप्त होईल; व पांचशे वर्षांनीं वृद्धावस्था प्राप्त होईल; ह्या कालांत पुष्कळसे लोक खोटें बोलतील; ह्या कालांत भक्तीचें प्राधान्य राहील. आतां भयंकर अशा कलियुगाचें स्वरूप सांगतों. हें युग चार लक्ष बत्तीस हजार वर्षें इतकें कालपर्यंत राहणारे आहे. ह्या युगांत धर्मस्वरूप चतुर्थांशानें अवशिष्ट राहिलें असून धर्माचे तीन अंश म्हणजे भाग नष्ट झाले आहेत. ह्या काळांत पुण्यापेक्षां पाप तिप्पटीनें अधिक असल्यामुळें पापी लोकांची वृद्धि फार होते. ह्या काळांत पूर्णायु म्हटलें असतां शंभरच वर्षें होय. शूद्र लोक ब्राह्मणाचारानें वर्तन करितील. मनुष्यांचा देह ह्या काळांत साडेतीन हात उंचीचा असेल. कोणतेंहि कर्म मनुष्याकडून अशास्त्रपद्धतीनें होत जाईल; व त्यामुळें त्यांना कर्मफळ मिळणार नाहीं. नियमादि योग, व मंत्रशास्त्रें मुसलमानांनीं दूषित होतील, व त्या कारणास्तव त्याचा उपयोग निष्फळ होईल. मनुष्य आपल्या मुली द्रव्याच्या लोभानें कुलीन पुरुषाला न देतां कुत्सित व अयोग्य पुरुषाला देतील. बायका नवऱ्याला फसवून व्यभिचारासक्त होतील. राजेलोक प्रजांना छळतील; व त्यांच्याकडून गैरवाजवी द्रव्य हरण करितील. त्याप्रमाणें पुण्यपुरुष अशा लोकांना राजाकडून फार त्रास होईल. एकादा वध करण्यास योग्य पुरुष असतांहि त्यानें जर पुष्कळसें द्रव्य राजाला दिलें तर ते त्या पुरुषाला सोडून देतील. राजे लोक क्षत्रियधर्माचा त्याग करून अधर्मानें युद्ध करितील. अशातऱ्हेनें कलियुगाचें क्रूर स्वरूप तुम्हांला निवेदन केलें आहे. हें चारहि युगांचें स्वरूप; व माहात्म्य जे कोणी श्रवण किंवा पठण करितील तें सर्व पापापासून मुक्त होऊन अंतीं मोक्षाला जातील.

---

## अध्याय २८ वा.

### तीर्थसंख्यानिर्देश.

बृहस्पतीनें सांगितलेलें कलियुगाचें स्वरूप श्रवण करून इंद्राच्या सभेंत एकत्र जमलेल्या प्रभासादि तीर्थांना भीति उत्पन्न झाली व तीं बृहस्पतीला म्हणतात कीं, जर भूतलावर कलियुगाचा समय प्राप्त झाला; व त्या काळांत लोक जर

अधर्माचारी झाले तर आम्ही त्या भयप्रद काळांत राहावें कसें; व आम्हाला त्यापासून कसें सुख प्राप्त होईल. ह्या घोर अशा कलियुगांत आम्ही नष्टप्राय होऊन जाऊं, करितां आमची व्यवस्था लावा. नंतर बृहस्पति प्रभासादितीर्थांना म्हणतो कीं, तुम्हाला जर कलीपासून पीडा होऊं लागली, तर तुम्ही निर्भय व कलिपीडारहित अशा हाटकेश्वरक्षेत्रांत जाऊन राहा. ज्या ठिकाणीं पूर्वी त्रिशंकुराजाकरितां विश्वामित्रानें तपश्चर्या केली होती. ज्या ठिकाणीं इंद्राच्या आज्ञेवरून प्रलयकाळच्या वायूनें वाळूनीं तें तीर्थ बुजवून टाकिलें होतें. ज्या ठिकाणीं साक्षात् शंकर हाटकेश्वरस्वरूपानें तेथें प्रगट झाले आहेत. हाटकेश्वरक्षेत्रांत कली कधींहि येऊं शकत नाहीं; करितां तेथें तुम्ही गेला असतां निर्भयपणानें राहाल; असें बृहस्पतीचें वाक्य ऐकून प्रभासादि तीर्थें हाटकेश्वरक्षेत्रांत जाऊन राहतीं झालीं. प्रभासादि तीर्थांचा हाटकेश्वरक्षेत्रांत वास असल्यामुळें ह्या क्षेत्राला सर्व क्षेत्राहून श्रेष्ठत्व प्राप्त झालें आहे. ह्या क्षेत्रांत साडेतीन कोटी तीर्थें राहतात. त्या तीर्थांचें वर्णन करणें अशक्य आहे; तथापि तुम्हांला ह्या तीर्थांचें माहात्म्य यथाशक्ति सांगतों.

---

## अध्याय २९ वा.

### सिद्धेश्वरमाहात्म्य.

हाटकेश्वर क्षेत्रांत असणाऱ्या सिद्धेश्वराचें माहात्म्य वर्णन करण्याच्या इच्छेनें सूत म्हणतात कीं, एकदां वत्स नांवाच्या ऋषि माझेजवळ येऊन म्हणाला; हे सूता ! जर तूं मला आपल्या घरीं चार महिने राहण्यास जागा देशील तर माझी अनुष्ठान करण्याची इच्छा आहे. असें वत्साचें भाषण ऐकून मी त्याला बोललों कीं, तुम्हांला अनुष्ठान करण्याकरितां मी जागा देतों; आपण खुशाल अनुष्ठानाला आरंभ करावा; व मी नित्य आपली सेवा करीत जाईन, असें माझें भाषण ऐकतांच वत्समुनि अनुष्ठान करण्याकरितां माझे घरीं राहिला; व त्याची मी नित्य सेवा करूं लागलों. तो रात्रीं मला चांगल्या चांगल्या व चमत्कारिक गोष्टी सांगत असे. मी त्याला एकदां सहज प्रश्न विचारिला कीं, तुमचें वय लहान असतां तुम्ही सर्व त्रैलोक्य हिंडून आलेल्या सर्वज्ञ मनुष्याप्रमाणें गोष्टी सांगतां, हें कसें. आपण सर्व जगाचें अवलोकन अल्प काळांत कसें केलें. नंतर वत्समुनि मला म्हणाला कीं, मी नित्य षडक्षरी शिवमंत्राचा जप करीत असतों. मी वयानें जरी तुला लहान दिसलों तरी माझें वय हजारों वर्षांचें आहे; परंतु मंत्रप्रभावानें मला वृद्धावस्था प्राप्त झाली नाहीं; व मी अजून

बाळवयाचाच लोकांना दिसतो. आतां तुला ह्याबद्दल एक कथा सांगतों. एकदां मेनका कान्यकुब्जवनांत गेली असतां तिला पाहून देवरातनामक ब्राह्मणाचें रेत स्खलित झालें, व तें उदकांत पडलें. तें ब्रह्मरेत एका मृगीनें प्राशन केल्यामुळें तिला मृगावती नांवाची एक कन्या झाली. ती मृगावती एकदां फिरत फिरत मी जेथें बसलों होतों तेथें आली असतां मी कामबाणानें पीडित होऊन तिच्या प्राप्त्यर्थ देवरात मुनीजवळ याचना केली; व तिच्याशीं विवाह लाविला. ती मृगावती एके दिवशीं रानांत फुलें आणण्याकरीतां गेली असतां तिला साप चावला, व ती मृत झाली. नंतर तिच्या सखीकडून मला सर्व वर्तमान समजलें असतां मी तिच्याबद्दल फारच शोक केला, व तिची उत्तरक्रियादि केली. सर्पानें माझ्या प्रियपत्नीचा नाश केला म्हणून मी पृथ्वीवर होणाऱ्या सर्पाला कधींहि जिवंत ठेवणार नाहीं; व जर ठेविलें तर जगांतील सर्व पातकें मला प्राप्त होतील, अशी मी प्रतिज्ञा केली. मी प्रतिज्ञेप्रमाणें सर्पनाश करीत असतां एका सर्पाच्या शरीरापासून बाल सूर्याप्रमाणें तेजस्वी एक पुरुष उत्पन्न झाला; व तो मला बोलला कीं, मी पूर्वजन्मीं चमत्कार नगरांत सिद्धेश्वरानजीक राहत होतों. एकदां त्या ठिकाणीं पुष्कळ यात्रेकरू आले असतां त्याचे अंगावर एक सर्प सोडिला, त्या सर्पानें एका तपस्व्याला वेढिलें. त्या तपस्व्याचा श्रीवर्धन नांवाचा एक शिष्य होता, त्यानें आपल्या गुरूला सर्पानें वेष्टिलें आहे, असें पाहून क्रोधानें शाप दिला कीं, ज्यानें माझ्या गुरूचें अंगावर साप टाकिला, तो सापाच्या जन्माला प्राप्त होवो. असा शाप ऐकून मला फार वाईट वाटलें; व मी ऋषी जवळ उच्छाप मागितला. ऋषीनें उच्छाप देतांच मी तत्काळ सर्परूप होऊन सर्वत्र फिरूं लागलों. आज आपल्या हस्तस्पर्शानें मी मुक्त झालों आहें. असें त्याचें भाषण ऐकून मी त्याला षडक्षर मंत्राचा उपदेश केला, व षडक्षर मंत्राचा सिद्धेश्वरासंनिध जप केल्यामुळें तो सर्व पापापासून मुक्त झाला. मलाहि षडक्षरमंत्राचा सिद्धेश्वरासन्निध जप केल्यामुळें सतत तारुण्य व दीर्घायुष्य प्राप्त झालें आहे; हा सर्व सिद्धेश्वराचा महिमा आहे. जे कोणी हें सिद्धेश्वर-माहात्म्य श्रवण किंवा पठण करितील, ते सर्व पापापासून मुक्त होतील.

---

## अध्याय ३० वा.

### सिद्धेश्वरोत्पत्ति.

सिद्धेश्वराची स्थापना कोणीं केली, असा शौनकादिकांचा प्रश्न ऐकून सूत म्हणतात,—ऋषिहो! पूर्वी एक सिद्धाधिप नांवाचा हंस होता. त्याला संतति

नसल्यामुळें त्यानें बृहस्पतीला पुत्रप्राप्तीचा उपाय विचारिला. नंतर बृहस्पति हंसाला म्हणतो कीं, तूं चमत्कारराजानें स्थापिलेल्या नगराला जाऊन तेथें एक शिवलिंग स्थापित कर; व त्या लिंगाचें पूजन करून तपादिकांचें अनुष्ठान कर; म्हणजे तुला संतति होईल. नंतर हंसानें त्या चमत्कारनगरीला जाऊन व शिवलिंग स्थापून तपानुष्ठान केलें; व त्यायोगें शंकर प्रसन्न होऊन सिद्धाधिप नांवाचें हंसाला पुत्र देते झाले. शंकर म्हणतात, हंसा! तूं जें हें लिंग स्थापिलें आहेस त्या लिंगाला सिद्धेश्वरलिंग असें म्हणतील; व जे कोणी ह्या सिद्धेश्वराचें पूजन करितील, त्यांना संतति व संपत्ति प्राप्त होऊन, अखंड सुखाचा; आणि मोक्षाचा लाभ होईल. तुझ्याहि सर्व इच्छा ह्या लिंगाच्या पूजनानें सफल होतील. जे कोणी ह्या लिंगाजवळ बसून, व दक्षिणाभिमुख होऊन षडक्षरमंत्राचा जप करितील ते दीर्घायु होतील. हें आख्यान श्रवण करणारेहि शिवलोकीं राहतील.

---

## अध्याय ३१ वा.

### नागह्रदमाहात्म्य.

सूत म्हणतात; ह्या सिद्धेश्वरासन्निध एक नागह्रदतीर्थ आहे. ह्या तीर्थांत स्नान करणारांना सर्पांचें भय उरत नाहीं ह्या ठिकाणीं सर्पांना कद्रूनें शाप दिल्यामुळें त्यांनीं तप करून ह्या तीर्थाची स्थापना केली. आतां ह्याविषयीं एक कथानक सांगतों. पूर्वी इंद्रसेन नांवाचा एक राजा होता. त्या राजानें हजार अश्वमेध यज्ञ केले होते. तो एकदां रात्रीं आपल्या मंदिरांत निजला असतां त्याला सर्पदंश होऊन तो मृत झाला. नंतर त्या राजाच्या मुलानें त्याचें अंत्यकर्म करून त्याच्या अस्थिहि गंगेत टाकिल्या. तो इंद्रसेन राजा एकदां आपल्या पुत्राचे स्वप्नांत येऊन म्हणतो कीं, मी सर्पदंशानें मृत झाल्यामुळें मला पिशाचजन्म प्राप्त झाला आहे; व त्यामुळें तूं मला उद्देशून केलेलीं श्राद्धादि कर्में माझ्या उपयोगी पडत नाहींत. आतां तूं जर चमत्कार नगराला जाऊन नागह्रदतीर्थाचे काठीं सर्पांना उद्देशून माझ्या नांवानें श्राद्ध करशील, तरच मी पिशाचयोनीपासून मुक्त होईन. नंतर तो चमत्कार क्षेत्रांत येऊन नागह्रदतीर्थावर श्राद्ध करण्याकरितां ब्राह्मणांना आमंत्रण देण्याच्या उद्देशानें प्रत्येक ब्राह्मणाला विचारिता झाला. त्या वेळीं कोणीहि श्राद्धाला येण्यास कबूल होईना. शेवटीं देवशर्मा ब्राह्मणाची त्या राजपुत्रानें गुप्तरूपानें सेवा केली, व त्यास प्रसन्न करून घेतल्यावर त्याची योजना श्राद्धामध्यें करून नागह्रदाचे काठीं पितृश्राद्धविधि केला. श्राद्ध करतांच इंद्रसेन पिशाचयोनीपासून मुक्त

होऊन स्वर्गाला गेला. नंतर राजपुत्र परत स्वनगराला येऊन राज्य करूं लागला. श्राद्धाला बसल्यामुळें इतर ब्राह्मणांनीं देवशर्म्याला जातींतून काढून टाकिल्यामुळें देवशर्मा नागह्रदाचे काठीं आश्रम बांधून राहूं लागला; व पुढें तोहि ह्या नागह्रदतीर्थांत स्नान करून मुक्त झाला. हें आख्यान जे कोणी श्राद्धकालीं श्रवण करितील, ते पितरांसह स्वर्गलोकीं राहतील.

---

## अध्याय ३३ वा.

### सप्तर्षि—आश्रममाहात्म्य.

सूत म्हणतात,—ह्या ठिकाणीं अत्रि, वसिष्ठ, कश्यप, भारद्वाज, गौतम, विश्वामित्र, जमदग्नि ह्या सात ऋषींचे आश्रम आहेत. जे कोणी ह्या ठिकाणीं स्नान करून कंदमूळफळांनीं पितृश्राद्ध करितात; व त्यांची पूजा करितात, ते राजसूययज्ञाच्या फळाला मिळवून शिवलोकाला प्राप्त होतात. पूर्वीं एकदां पर्जन्याच्या अभावामुळें मोठा दुष्काळ पडला असतां सप्तर्षींना अत्यंत क्षुधा लागली; व ते अन्न अन्न करीत जिकडेतिकडे हिंडूं लागले. वाटेंत त्यांना एक मृत असा बालक दिसला; व त्यांनीं त्याला खाण्याचा विचार केला. ते सप्तर्षि त्या मृत बालकाला खाणार, इतक्यांत तेथें वृषादर्भि नांवाचा एक राजा आला; व त्यानें सांगितलें कीं, नरमांस खाणें हें अत्यंत निंद्य आहे, करितां तुम्हीं मजबरोबर माझ्या घरीं चला, मी तुम्हाला पुष्कळ द्रव्य देतों; म्हणजे तुम्हाला अन्नाकरितां हिंडावें लागणार नाहीं. असें राजाचें भाषण ऐकतांच सप्तर्षि राजास म्हणतात कीं, आपत्कालीं नरमांस भक्षण केलें असतां प्रायश्चित्तानें शुद्धि होते; परंतु राजद्रव्याचें प्रतिग्रहरूपानें हरण केल्यास प्रायश्चित्तावांचून अगर दुसऱ्या कोणत्याहि विधीनें शुद्धि होत नाहीं. राजापासून प्रतिग्रह घेण्यापेक्षां नरमांस भक्षण करणें चांगलें; असें ऋषिवाक्य ऐकून राजा निघून गेला; व त्यानें ऋषींची परीक्षा पाहण्याकरितां सुवर्णाचीं उंबराचीं फळें तयार करून ऋषींच्या वाटेंत गुप्तरीतीनें टाकून दिलीं; व राजा बाजूला आड उभा राहिला. ऋषींनीं रस्त्यांत पडलेलीं उंबरें पाहून व तीं फोडून हीं सुवर्णाचीं आहेत, असें ओळखिलें. हीं कोणी तरी दुष्टानें आपणाला फसविण्याकरितां टाकिलीं असावीं, असा तर्क करून त्यांनीं तीं तेथेंच टाकिलीं; व ते सप्तर्षि पुढें चालूं लागले. कांहीं वेळानें इंद्रानें शुनोमुख नामक ब्राह्मणाचा वेष घेतला; व सप्तर्षींस सांगितलें कीं, येथून जवळच एक सरोवर आहे; व त्यांत कमळें आहेत, करितां आपण तेथें जाऊन स्नान करूं; व कमळांतील केंसरांचें भक्षणहि करूं; म्हणजे ५

निवारण होऊन स्वकार्याची सिद्धिहि होईल. असें शुनोमुखाचें भाषण ऐकतांच सप्तर्षि त्याचे मागोमाग सरोवरांजवळ आले; व त्यांनीं कमळांतील पुष्कळशीं केंसरें काढून सरोवरांचे काठीं ठेविलीं; व ते स्नान करण्याकरितां सरोवरांत शिरले तितक्यांत इंद्रानें तीं केंसरें लपवून ठेविलीं. सप्तर्षी स्नान करून सरोवरांचे काठीं येतात तों केंसरें कोठें दिसत नाहींत. शेवटीं शुनोमुखानें त्यांची ही अवस्था पाहून सांगितलें कीं, मीं इंद्र तुमची परीक्षा पाहण्याकरितां ह्या वेषानें येऊन तुमचीं कमळकेंसरें हरण केलीं. मीं प्रसन्न आहे; वर मागा. आतां आपण मजबरोबर स्वर्गाला चलावें. ह्या ठिकाणीं तुमचें आश्रम स्थापित होऊन त्या आश्रमांत श्राद्धादि कर्में करणारे मुक्त होतील, असा ह्या आश्रमांस मी वर देतों, असें म्हणून इंद्र स्वस्थानीं निघून गेला. त्या ऋषींनींहि तेथें घोर तप करून; व आपआपल्या नांवानें एक एक शिवलिंग स्थापून त्या लिंगाच्या प्रभावानें स्वर्गलोकाचा मार्ग स्वीकारिला; हें आख्यान आयुष्य, सुख देणारें असून मोक्ष देणारें आहे.

---

## अध्याय ३३ वा.

### अगस्त्याश्रममाहात्म्य.

पूर्वोक्त सात ऋषींच्या आश्रमाजवळच एक अगस्त्याचा आश्रम आहे. ह्या ठिकाणीं चैत्र शुक्ल चतुर्दशीला प्रत्यक्ष सूर्य येऊन शिवपूजनानें इष्ट सिद्धि मिळविता झाला, करितां जे कोणी अगस्त्याश्रमीं येऊन शिवलिंगाचें पूजन करितील, ते वैकुंठलोकाला प्राप्त होतील. ह्या आश्रमासन्निध पितृश्राद्ध केलें असतां पितरांना मोक्षप्राप्ति होते. अगस्त्याश्रमाला सूर्य कशाकरितां आला? असा शौनकादि ऋषींनीं प्रश्न केल्यावरून सूत म्हणतात, ऋषी हो! एकदां विंध्यपर्वत सूर्याला म्हणतो कीं, तूं मेरुपर्वताच्या सभोंवार फिरतोस, माझ्या सभोंवार कां फिरत नाहींस? असें विन्ध्याचें भाषण ऐकून सूर्य म्हणतो कीं, मेरु हा अत्यंत उंच असल्यामुळें मी त्याला प्रदक्षिणा घालीत आहे, असें सूर्यभाषण ऐकतांच विंध्य मेरुपर्वतापेक्षां उंच होऊन सूर्याच्या मार्गांत अडथळा करूं लागला. तें पाहून सूर्य अगस्त्याकडे येऊन त्यास विंध्यपर्वताची सर्व हकीकत सांगतां झाला. अगस्त्यानें विंध्याला शापाची भीति घालून व मी दक्षिणदिशेकडे जात आहे. तेथून परत येईपर्यंत तूं लहान होऊन राहा, असें सांगून सूर्याचा मार्ग मोकळा केला. नंतर सूर्याला अगस्त्य म्हणतो कीं, तुझ्याकरितां मला माझा आश्रम सोडून येथें राहावें लागलें आहे, करितां तूहि येथें राहून मी स्थापिलेल्या

शिवलिंगाचें पूजन कर; म्हणजे तुला तुझ्या कोणत्याही कर्मात विघ्न येणार नाहीं. असें अगस्त्यवाक्य ऐकून सूर्यानें तेथें शिवलिंगाचें पूजन केलें; व अगस्त्यास म्हटलें की, जे कोणी चैत्र शुक्ल चतुर्दशीला ह्या लिंगाचें पूजन करितील ते माझ्या लोकाला प्राप्त होतील, असें सांगून सूर्य स्वस्थानीं निघून गेला.

---

## अध्याय ३४ वा.

### देवदैत्ययुद्ध.

अगस्त्यानें समुद्रप्राशन कां केलें ? असा ऋषींचा प्रश्न ऐकून सूत म्हणतात: पूर्वी एकदां कालिकेयप्रमुख दैत्यांबरोबर देवाचें युद्ध सुरू झालें. कालिकेय दैत्य इंद्राला म्हणतो कीं, तुझें सामर्थ्य किती आहे, हें मला पाहावयाचें आहे. तुझ्या हातांतील वज्र मजवर फेंक पाहूं ! असें दैत्याचें भाषण ऐकतांच इंद्रानें कालिकेयावर हातांतील वज्र जोरानें फेकिलें; परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं, कालिकेयानें इंद्रावर गदाप्रहार केला असतां त्या योगें इंद्र मूर्च्छित पडला. इंद्र निश्चेष्ट पडला असतां देवांना भीति उत्पन्न झाली; व ते जिकडेतिकडे पळूं लागले. हा प्रकार पाहून विष्णु गरुडावर बसून दैत्यांबरोबर युद्ध करूं लागला. प्रथम विष्णूनें दैत्यांना पळवून लाविलें. असतां कालखंज दैत्य विष्णूबरोबर युद्ध करूं लागला. विष्णूनें कालखंजावर सुदर्शनचक्र सोडिलें असतां तें त्यानें गिळून टाकिलें; व विष्णूला आपल्या पराक्रमानें मूर्च्छित पाडिलें. नंतर शंकर युद्धभूमीवर येऊन दैत्यांना पळवून लावून कालखंजादि मुख्य दैत्यांचा नाश करिते झाले. कांहीं वेळानें इंद्र व विष्णु सावध होऊन व त्यांनीं दैत्यांचा पराजय शंकरानें केला, असें पाहून शंकराची पुष्कळ प्रकारें स्तुति केली. ते सर्व दैत्य पाताळांत जाऊन गुप्तरीतीनें राहते झाले.

---

## अध्याय ३५ वा.

### समुद्रप्राशन.

देवांनीं आपला परायजय केला, असें जाणून दैत्यांना फारच दुःख झालें; व त्यांनीं देवांचा पराभव कसा होईल ? असा विचार चालविला असतां प्रथम त्यांचा विचार ब्राह्मणांना पीडा देऊन यज्ञादि कर्में बंद करण्याचा ठरला.

त्या दिवसापासून ते दैत्य रोज रात्रीं समुद्रांतून बाहेर पडून ब्राह्मणांना पीडा देऊं लागले. कांहीं दिवसांनीं हा दैत्यांचा प्रकार जाणून देवांना मोठी काळजी उत्पन्न झाली; व समुद्रांत राहणाऱ्या दैत्यांचा पराभव कसा करावा ? हा विचार चालू झाला. शेवटीं अगस्त्याकडून समुद्राचें प्राशन करवून दैत्यवध करावा असा विचार ठरला; व सर्व देव, आणि ब्राह्मण चमत्कारक्षेत्रांत राहणाऱ्या अगस्त्यऋषीजवळ येऊन त्यांस दैत्यांच्या नाशार्थ समुद्रप्राशन करण्यास सांगितलें. नंतर अगस्त्यानें एकवर्षपर्यंत योगिनींचें अनुष्ठान करून; व विशोधिनी दैवतांची मुखामध्यें स्थापना करून समुद्राचें प्राशन केलें. त्यायोगें देवांचें व दैत्यांचें पुनः युद्ध होऊन दैत्यांचा पराभव झाला. नंतर देवांनीं समुद्राची पूर्ववत् स्थापना करण्याबद्दल अगस्त्यास सांगितलें असतां अगस्त्य म्हणतो कीं, सगर नांवाच्या राजाचे साठहजार मुलगे ही भूमि खणून टाकितील; व त्यांच्याच वंशांत उत्पन्न झालेला भगीरथ राजा ब्रह्माण्डांतून भागिरथी येथें आणील; व त्या गंगेच्या प्रवाहानें हा समुद्र पूर्ववत् भरलेला राहील. या चमत्कारक्षेत्रांत योगिनींची स्थापना होईल; व या योगीनींचें जे पूजन करितील त्यांचीं सर्व अरिष्टें नाश पावून ते सुखानें राहतील. याला चित्रेश्वरी हें नांव प्राप्त होईल.

---

## अध्याय २६ वा.

### चित्रेश्वरीमाहात्म्य.

सूत म्हणतात, ऋषिहो ! आतां तुम्हाला चित्रेश्वरीचें माहात्म्य सांगतों. ह्या चित्रेश्वरी पीठाच्या उपासनेनें आजपर्यंत हजारो योग्यांना सिद्धि प्राप्त झाली. ज्याला पुत्रप्राप्तीची इच्छा असेल त्यानें या चित्रेश्वरी संनिध गर्भोपनिषदाचें पठण करावें. जे कोणी ह्या ठिकाणीं शतरुद्रीय सूक्ताचा जप करितील, त्यांना शत्रुपीडा होणार नाहीं. जे कोणी ह्या पीठाचे ठिकाणीं वामदेव्यसूक्ताचा जप करितात त्यांच्या भूतप्रेतादिकांपासून होणाऱ्या पीडा नाश पावतात. ज्याला सुंदर पत्नी मिळावी, अशी इच्छा असेल त्यानें ह्या पुण्यस्थळीं "क इदं कस्मा अदात्" ह्या मंत्राचा जप करावा. जो ह्या ठिकाणीं श्रीसूक्ताचा जप करील, त्याला धनधान्यादि प्राप्त होईल. ह्या स्थळीं रथंतरसूक्ताचा जप करणारा अनेक प्रकारच्या वाहनांना मिळवितो. ह्या स्थानाचें महात्म्य असें आहे कीं, जी जी इच्छा आपलें मनांत धरून ज्या ज्या मंत्राचें किंवा सूक्ताचें जो कोणी पठण करील, त्याला त्याप्रमाणें सर्व इच्छित फळें प्राप्त होऊन सर्व सिद्धिही मिळतील. आमचे पिता जे लोमहर्षण त्यांनाहि येथील अनुष्ठानानें सिद्धि प्राप्त झाली होती.

---

## अध्याय ३७ वा.

### दुःशीलप्रासादोत्पत्ति.

सूत म्हणतात; ऋषिहो! एकदां चमत्कारनगरामध्यें पुष्कळ विद्वान् ब्राह्मण शास्त्रीय विषयाची चर्चा करीत बसले असतां तितक्यांत दुर्वास ऋषी त्यांचेजवळ येऊन म्हणतो कीं, मला एक शिवालय बांधावयाचें आहे; करितां मला योग्य-स्थान दाखवून शक्य तितकी मदत करा. दुर्वासानें पुष्कळप्रकारें ब्राह्मणांस सांगितलें तरी त्यांच्याकडून प्रश्नाचें कांहींच उत्तर मिळालें नाहीं. हा त्या ब्राह्मणांचा उर्मटपणा पाहून दुर्वासाला राग आला; व त्यांस शाप दिला कीं, तुमच्या कुळांतील सर्व पुरुष मानी व दुःखी होतील. असा शाप ऐकतांच त्या ब्राह्मणांपैकींच एक सुशील नांवाचा ब्राह्मण होता. त्यानें दुर्वासाला हाक मारून सांगितलें कीं, मी तुम्हाला शिवालय बांधण्यास स्थान देतों; व तुम्हाला माझेक-डून जी मदत पाहिजे असेल तीहि देतो. सुशीलाचें भाषण ऐकून दुर्वासानें त्या स्थानाचे ठिकाणीं एक प्रासाद् म्हणजे शिवालय तयार केलें. इतर ब्राह्म-णांनीं सुशीलाला दोष दिला कीं, ज्यांनीं आपणाला शाप दिला, त्याला तूं देवालय बांधण्यास भूमि द्यावी, हें ठीक नव्हे; व ज्याकरितां तूं असें केलेंस त्या-पक्षां तुला आम्ही आपल्या जातींतून काढून टाकिलें आहे, म्हणजे अपांक्त केलें आहे. आजपासून तुला दुःशील हें नांव प्राप्त होईल; व तुझ्या भूमीवर बांधलेलें जें देवालय (प्रासाद्) त्यास दुःशीलप्रासाद् असें नांव प्राप्त होईल. असें म्हणून त्या ब्राह्मणांनीं दूर्वासालाहि शाप दिला. तें ऐकून दूर्वासानें ब्राह्मणांच्या नगराचें मंत्रसामर्थ्यानें भस्म करण्याचें मनांत आणिलें; परंतु सुशील ब्राह्म-णाच्या प्रार्थनेनें दूर्वासानें तसें केलें नाहीं; व तो तेथें तपानुष्ठान करून सिद्धि मिळविता झाला. जे कोणी दुःशीलप्रासादांत स्थापिलेल्या लिंगाचें अष्टमीला पूजन करितात ते निष्पाप होऊन शिवलोकीं जातात.

## अध्याय ३८ वा.

### धुन्धुमारेश्वरमाहात्म्य.

त्या दुःशीलप्रासादाच्या जवळ धुन्धुमार राजानें स्थापिलेलें धुन्धुमारेश्वर नांवाचें एक लिंग आहे. त्याठिकाणीं धुन्धुमारानें एक आश्रम स्थापून भयंकर तपश्चर्या केली. त्या धुन्धुमारेश्वरलिंगानजीक एक विहीर आहे. त्याला धुन्धुमारतीर्थ

म्हणतात. ह्या तीर्थांत स्नान करून धुन्धुमारेश्वराचें पूजन करणारे नरकादि दुर्गतीला न जातां पुण्यलोकाला गमन करितात. हा धुन्धुमारराजा सूर्यवंशांत उत्पन्न झालेल्या बृहदश्वराजाचा मुलगा होय. ह्या राजाचें पूर्वीचें नांव कुवलयाश्व असें होतें; व ह्यानें धुन्धु नांवाच्या एका दैत्याला मारिलें; म्हणून ह्याला धुन्धुमार हें दुसरें नांव प्राप्त झालें. ज्या वेळीं ह्या धुन्धुमाराच्या तपानें शंकर प्रसन्न झाले, त्यावेळीं त्यांनीं राजाला सांगितलें कीं, तूं स्थापिलेल्या ह्या लिंगासंनिध मी विशेषतः चैत्र शुद्ध चतुर्दशीला राहीन, करितां ह्या दिवशीं धुन्धुमारेश्वराचें पूजन केलें असतां, व धुन्धुमारतीर्थांत स्नान केलें असतां ह्यांस माझ्या लोकाची म्हणजे शिवलोकाची प्राप्ती होईल.

---

## अध्याय ३९ वा.

### ययातीश्वरमाहात्म्य.

सूत म्हणतात; धुंधुमारेश्वराच्या उत्तरेस ययातिराजानें स्थापिलेलें एक शिवलिंग आहे. ह्या लिंगाचें पूजन ययातीची पत्नी जी देवयानी व शर्मिष्ठा ह्या दोघींनीं केलें आहे; व ह्या पूजनानें त्यांना अनेक सुखें मिळून मुक्तिहि मिळाली आहे. ययातीनें वृद्धावस्थेंत पुत्राला राज्यावर बसविल्यानंतर चमत्कारनगरांत मार्कण्डेयमुनीच्या आज्ञेनें तप करून व ह्या ययातीश्वरलिंगाचें पूजन करून मोक्ष मिळविला. हे माहात्म्य श्रवण करणारेहि मुक्त होतात.

---

## अध्याय ४० वा.

### चित्रशिलामाहात्म्य.

शौनकादि ऋषींनीं ब्राह्मीशिलेचें माहात्म्य विचारिल्यावरून सूत म्हणतात; ऋषे! एकदा ब्रह्मदेव तीर्थयात्रेबद्दल आपल्याशींच विचार करीत बसले असतां त्यांच्या मनांत आलें कीं, भूतलांवर सर्व देव, ऋषि, यक्ष इत्यादिकांच्या नांवाचीं अनेक तीर्थें आहेत; परंतु माझ्या नांवाचें एकहि तीर्थ नाहीं, तेव्हां आपण आपल्या नांवानें एकतरी तीर्थ निर्माण करावें, असा विचार करून ब्रह्मदेवानें एक शिळा घेऊन पृथ्वीवर टाकिली; व संकल्प केला कीं, जेथें ही शिळा पडेल त्या ठिकाणीं आपण एक तीर्थ निर्माण करूं. नंतर ती शिळा चमत्कारनगरांत पडली. तत्काल

ब्रह्मदेव चमत्कारनगरांत येऊन दाखल झाले. नंतर त्या ठिकाणीं पाताळांतून सरस्वतीला आणून तेथें तीर्थरूपानें स्थापिलें; व त्या तीर्थाला ब्राह्मी–शिलातीर्थ असें नांव प्राप्त झालें. त्या ब्राह्मीशिलेलाच चित्रशिला हें नांव प्राप्त झालें आहे. याच चित्रशिलातीर्थावर एकदा मंकणकऋषि दर्भ काढीत असतां, त्याचें एक बोट दर्भाच्या काडीनें कापिलें गेलें; व त्या बोटांतून शाकरस म्हणजे भाजांचा रस उत्पन्न झाला. त्या वेळीं मंकणकाला मी सिद्ध झालों; असें वाटून अत्यंत हर्ष झाला; व तो हर्षाच्या भरांत नृत्य करूं लागला. त्या मंकणकाच्या नृत्यानें सर्व जगत् नृत्य करूं लागलें. त्या वेळीं चमत्कारक्षेत्रांतील मंदिरें भग्न होऊन, सर्वत्र हाहाःकार उडाला. हाहाःकार देवांकडून शंकराला समजतांच, शंकर ब्राह्मणाचें रूप घेऊन मंकणकाजवळ प्राप्त झाले; व त्यास त्यानें नृत्य करण्याचें कारण विचारिलें. त्या वेळीं मंकणक म्हणाला,—हे ब्राह्मणा ! हा माझ्या हातांतून निघणारा शाकरस तुला दिसत नाहीं काय ! हा रस माझ्या सिद्धीमुळें प्राप्त झाला आहे; व त्या कारणास्तव मला सिद्धि मिळाली, असें समजून मी नृत्य करीत आहे; असें मंकणकाचें भाषण ऐकून, ब्राह्मणवेषधारी शंकरानें आपला अंगठा जमिनीवर आद-ळून त्यांतून भस्म निर्माण केलें; व तें मंकणकास दिलें; व सांगितलें कीं, जसा तुझ्या हातांतून शाकरस निघाला, तसेंच माझ्या अंगठ्यांतून भस्म निघालें आहे, तरीहि मी तुझ्याप्रमाणें नृत्य न करितां स्वस्थ बसलों आहे. आतां तुला नृत्य करण्याचें कारण काय आहे? तूं नृत्य करण्याचें सोडून दे; कारण नृत्य, गायन इत्यादिकांच्या योगें तपःसामर्थ्य नष्ट होतें. ह्या स्थानाला आजपासून आनंद-स्थान म्हणतील. ह्या ठिकाणीं आनंदेश्वर नांवानें माझी स्थापना कर; असें सांगून; व शंकर स्वस्वरूपाचें दर्शन मंकणकाला देऊन स्वस्थानीं निघून गेले. नंतर मंकणकानें त्या स्थळीं शिवाज्ञेप्रमाणें आनंदेश्वर नांवानें लिंग स्थापून तपाला आरंभ केला. त्या वेळीं सर्प मंकणकाजवळ येऊन म्हणतात कीं, तुम्ही मला निर्विष केलें आहे; त्यामुळें आम्हाला लोकांपासून त्रास होतो; करितां आम्ही पुनः सविष कशानें होऊं तें सांगा. नंतर मंकणकानें सर्पास सांगितलें कीं, तुम्ही सर्व जलसर्प व्हाल; व त्यामुळें तुम्ही निर्विष असतांहि पीडारहित व्हाल; असा त्यांस आशीर्वाद दिला. नंतर ते सर्प जलसर्प होऊन राहते झाले. त्याठिकाणीं तेथील तीर्थांत स्नान करून चित्रशिलेला वंदन करणारे मुक्त होतात. हा प्रकार पाहून व सर्व लोक मुक्त होऊं लागले; व यमपुरी ओस पडलेली पाहून यमानें ब्रह्मदेवाला सांगून तें सरोवर व ती चित्रशिळा वाळूनीं भरून नाहिशी करून टाकिली. आनंदेश्वरलिंग मात्र त्याठिकाणीं कायमचें राहिलें आहे.

## अध्याय ४१ वा.

### जलशायी—उत्पत्ति.

सूत म्हणतात;—ऋषिहो ! एक बाष्कलि नांवाचा दैत्य होता. तो त्रैलोक्याला अजिंक्य असल्यामुळें देवादिकांना पादाक्रांत करून स्वर्गाचें राज्य मिळविता झाला. इंद्रादि देव पराजित झाल्यामुळें विष्णूला शरण जाऊन बाष्कलीच्या नाशाविषयीं उपाय विचारूं लागले. त्या वेळीं विष्णु म्हणतात कीं, योग्य वेळीं मी त्या दैत्यांचा नाश करीन; व तोंपर्यंत तुम्ही तप करीत राहा. नंतर विष्णु व इंद्र हे उभयतां चमत्कारक्षेत्रात जाऊन, इंद्रास तप करण्यास सांगून विष्णु स्वतः तेथें शयन करिता झाला. विष्णूच्या कृपेनें क्षीरसमुद्राची सर्व शोभा तेथील समुद्राला प्राप्त झाली. आषाढ कृष्ण द्वितीयेच्या दिवशीं बृहस्पती इंद्राजवळ येऊन म्हणतो कीं, आज अशून्यशयनीनामक द्वितीया आहे; करितां आजपासून चार महिनें तूं अशून्यशयनव्रत कर, म्हणजे कृतार्थ होशील. ह्याप्रमाणें इंद्रानें चार महिनें व्रताचरण केल्यावर त्याला तेजःप्राप्ति झाली; व तो विष्णूसह बाष्कलीबरोबर युद्ध करण्याकरितां गेला; आणि त्यानें दैत्यांचा पराभव केला. नंतर इंद्रानें विष्णूची स्तुति केल्यावर विष्णु म्हणतात, इंद्रा ! आजपासून मी जलशायी नांवानें चमत्कारक्षेत्रांत वास्तव्य करीन; तूं आतां स्वनगराला जाऊन राज्य कर. जर तुला पुनः एकादें संकट प्राप्त झालें, तर तूं चमत्कारक्षेत्रांत येऊन जलशायीचें पूजन कर; म्हणजे संकटापासून मुक्त होशील; असें सांगून विष्णु अंतर्धान पावले. ह्या आख्यानाच्या श्रवणानें मुक्ति मिळते.

## अध्याय ४२ वा.

### मेनकासमागम.

सूत म्हणतात;—मुनिहो ! ज्या ठिकाणीं विश्वामित्रानें कुंड स्थापिलें त्या ठिकाणीं स्वतः गंगा वाहत असून ती सर्वांना पवित्र करीत आहे. त्या कुंडांत स्नान करून श्राद्धादि करणारे पितरांसह मुक्त होतात. एकदां एक हरिणी व्याध पाठीस लागल्यामुळें ह्या कुण्डांत प्राणत्याग करिती झाली; व त्यामुळें तिला मेनका नांवानें अप्सरांच्या कुळांत जन्म प्राप्त झाला. पुढें कांहीं काळानें विश्वामित्राची व मेनकेची ह्याच कुंडासन्निध गांठ पडली असतां मेनकेला विश्वामित्रदर्शनानें मोह उत्पन्न झाला; व ती कामपीडित होऊन विश्वामित्रापुढें धावत

गेली. विश्वामित्रहि त्या अदृष्टपूर्व अप्सराकुळांत जन्मलेल्या मेनकेला पाहून विचारता झाला कीं, तूं कोण आहेस ? तू नित्य ईश्वराची भक्ति करितेस किंवा नाहीं, वगैरे सामान्य कुशल प्रश्न विचारून तिला स्त्रीधर्म सांगण्यास प्रारंभ केला. विश्वामित्र म्हणतात; स्त्रिये ! नित्य सकाळीं उठून गृहसंमार्जनादि कृत्य करावें. पतिसेवा करावी, इष्टमित्रांना दिल्याशिवाय स्वतः अन्न ग्रहण करूं नये. गाई, पुराणीक ह्यांची पूजा करावी, विद्वान् ब्राह्मणांना दक्षिणा देऊन संतुष्ट ठेवावें, उगीच गांवोगाव हिंडूं नये, परगृहीं वास करूं नये, पतिभोजन झाल्या-शिवाय भोजन करूं नये, पतीची आज्ञा मोडूं नये, पति रागावला असतां आपण त्याच्यावर रागावूं नये, वेश्यांची संगती धरूं नये, अशा तऱ्हेनें वागणाऱ्या स्त्रिया पतीसह शिवलोकीं जाऊन राहतात.

## अध्याय ४३ वा.

### मेनकासंवाद.

सूत म्हणतात; अशा तऱ्हेचें विश्वामित्राचें भाषण ऐकून मेनका विश्वामित्रास म्हणाली कीं, तूं मला जे स्त्रीधर्म सांगितलेस, त्यांचें आचरण करणाऱ्या स्त्रिया मनुष्य आहेत, मी नव्हे. हे धर्म माझ्याकरितां निर्माण झालेले नाहींत. मी देवांगना असून माझें नांव मेनका आहे. आतां आपण कोठून आलां आहां, तें सांगा. आपलें मदनाप्रमाणें सुंदर स्वरूप पाहून मी वेडी झालें आहें. आतां आपण माझ्याशीं समागम करून माझी कामेच्छा तृप्त करावी, एवढीच माझी प्रार्थना आहे. जर आपण माझी इच्छा तृप्त केली नाहीं, तर मी आपणापुढें देहत्याग करीन; व त्यायोगें आपणाला स्त्रीवधाचा दोष लागेल. असें तिचें भाषण ऐकून विश्वामित्र म्हणतो; हे देवांगने ! मी व्रताचरण करीत असून ब्रह्म-चारी आहे. मी पाशुपतव्रतानें आज शंभर वर्षें तप करीत आहे; करितां तूं या भानगडींत न पडतां येथून निघून जाणेंच तुला श्रेयस्कर आहे; व असें जर तूं न करिशील तर माझा क्रोध मोठा भयंकर आहे, हें पक्कें समज.

## अध्याय ४४ वा.

### विश्वामित्रेश्वरमाहात्म्य.

सूत म्हणतात,–नंतर मेनकेनें पुष्कळप्रकारें विश्वामित्राच्या विनवण्या केल्या; परंतु विश्वामित्रानें सांगितलें कीं, स्त्रीवधापेक्षां व्रतभंगाचा दोष अधिक आहे.

करितां तूं जरी आपला देहत्याग केलास तरी मला लागणाऱ्या स्त्रीवधदोषाच्या नाशार्थ मी प्रायश्चित्त आचरून दोषमुक्त होईन; परंतु व्रतभंग करून तुझी इच्छा पूर्ण करणार नाहीं. असें निर्वाणीचें विश्वामित्राचें भाषण ऐकून मेनका म्हणते कीं, ज्यापेक्षां तूं माझ्या इच्छेचा अनादर केलास; त्यापेक्षां तुला शाप देणेंच योग्य आहे, असें म्हणून मेनकेनें शाप दिला कीं, तुझ्या अंगाला सुरकुत्या पडून व तुझे केंस पांढरे होऊन तुला वृद्धावस्था प्राप्त होईल; आणि तूं कुरूप होशील. असा मेनकेचा शाप ऐकतांच, विश्वामित्राला राग आला; व त्यानें हातांतल्या कमंडलूंतील उदक घेऊन 'तूंहि माझ्याप्रमाणेंच वृद्ध हो' असा शाप दिला; उभयतांचे शाप होतांच त्यांना वृद्धावस्था प्राप्त झाली. नंतर विश्वामित्र व मेनका याच विश्वामित्रकुंडांत स्नान करितांच पूर्ववत् तरुण व सुरूप होऊन तीं शापमुक्त झालीं. नंतर मेनकाहि स्वस्थानाला निघून गेली; व विश्वामित्रहि स्वदेशाला निघून गेला. नंतर हा त्या कुंडाचा महिमा जाणून कालांतरानें विश्वामित्रानें त्या कुंडासन्निध विश्वामित्रेश्वर नांवानें लिंग स्थापून त्याची आराधना केली; आणि त्यायोगें तो कृतकृत्य झाला. विश्वामित्रकुंडांत स्नान करून, श्राद्धादि करणारा; सर्व पापापासून मुक्त होऊन, सत्यलोकाला प्राप्त होतो.

---

## अध्याय ४५ वा.

### त्रिपुष्करमाहात्म्य.

सूत म्हणतात; एकदां विश्वामित्र चमत्कारक्षेत्रांत राहत असतां; व कार्तिकी पूर्णिमा प्राप्त झाली असतां विश्वामित्राला पुष्करकुंडांत स्नान करण्याची इच्छा झाली. मूळचें पुष्करक्षेत्र व पुष्करतीर्थ फारच दूर असल्यामुळें तिकडे जाणें तर अशक्य आहे. त्या वेळीं विश्वामित्रानें तेथें तीन कुंडें निर्माण करून शिवप्रसादानें व पुष्करतीर्थाच्या अनुग्रहानें लोकोपकारार्थ त्यांत पुष्करोदकानें पूर्तता केली; व त्यास त्रिपुष्कर हें नांव दिलें. नंतर विश्वामित्र तेथें स्नान करून स्वतःची इच्छा पूर्ण करून घेता झाला. त्या तीर्थाचें माहात्म्य अवर्णनीय आहे. एके दिवशीं बृहद्बलनांवाचा राजा मृगया करीत करीत त्रिपुष्करतीर्थाजवळ प्राप्त झाला. तेथें विश्वामित्राची व त्या राजाची मुलाखत झाल्यावर तो बृहद्बल राजा स्नान करण्यांकरितां एका कुंडांत उतरला; व तेथें असणारें अत्युत्तम कमळ हातांत धरणार इतक्यांत त्या कमळांतून एक भयंकर ध्वनि उत्पन्न झाला. तो ध्वनि ऐकतांच राजा घाबरून गेला; व त्या कुंडाचे बाहेर येऊन आपल्या शरी-

राकडे पाहूं लागला, तों आपल्या शरीरावर कुष्ठ उत्पन्न झालें आहे, असें त्यास आढळलें. नंतर विश्वामित्राच्या सांगण्यावरून बृहद्बलराजानें कार्तिकी-पूर्णिमेला त्रिपुष्करतीर्थांत स्नान केलें; व तो कुष्ठमुक्त झाला.

## अध्याय ४६ वा.

### सरस्वतीतीर्थमाहात्म्य.

सूत म्हणतात;—पूर्वी एक बलवर्धन नांवाचा राजा होता. त्याला अंबुवीची नांवाचा एक मुका पुत्र झाला. त्या पुत्राच्या सातवे वर्षी बलवर्धन राजा युद्धांत शत्रूकडून मारला गेला. नंतर प्रधानांनीं त्या मुक्या राजपुत्राला राज्यावर बसविलें. एकदा वसिष्ठ मुनि त्या राज्यांत आले असतां प्रधानांनीं वसिष्ठाला प्रश्न केला कीं, हा अंबुवीची नामक राजा मुका आहे, तो बोलका होण्यास कोणता उपाय योजावा? नंतर वसिष्ठ म्हणतात कीं, चमत्कार क्षेत्रांत एक सरस्वतीतीर्थ आहे, तेथें स्नान केलें असतां मुका प्राणी बोलका होतो. असें वसिष्ठभाषण ऐकतांच प्रधानांनीं अंबुवीचीला सरस्वतीतीर्थांत नेऊन स्नान घातलें; व त्यायोगें तो सरस वाणी बोलूं लागला. हा प्रकार पाहून अंबुवीचीनें त्या तीर्थाचे कांठी एक सुंदर सरस्वतीची मूर्ति स्थापित केली; व तिची यथासांग पूजा केली. त्याच्या पूजनानें सरस्वती प्रसन्न होऊन अंबुवीचीला इच्छित वर देती झाली.

## अध्याय ४७ वा.

### महाकालेश्वरमाहात्म्य.

सूत म्हणतात; पूर्वी सूर्यवंशांत उत्पन्न झालेला एक रुद्रसेन नांवाचा राजा होता. त्याची पद्मावतीनांवाची भार्या होती. तीं उभयतां कांतीनगरींत राहून प्रजेचें पालन उत्तमतऱ्हेनें करीत होतीं. एकदां तो रुद्रसेन राजा पत्नीसह वैशाखाचे महिन्यांत चमत्कारनगरांत जाऊन महाकालपूजन व रात्रीं जागरण करीत असतां त्याचे जवळ अनेक देशांतून आलेले विद्वान् ब्राह्मण प्राप्त झाले. नंतर त्या ब्राह्मणांनीं महाकालापुढें पुराण, कीर्तन, भजन वगैरे करण्यास प्रारंभ केला. हा त्या ब्राह्मणांचा उपक्रम पाहून राजानें त्यांना साष्टांग नमस्कार घातला. नंतर ब्राह्मण राजाला म्हणतात; राजन्! तूं दरवर्षी येथें येऊन जागरणादि

करितील, तरी त्यापासून काय फायदा आहे? तें आम्हाला सांगा. असा ब्राह्मणांचा प्रश्न ऐकून राजा म्हणतो; मी पूर्वी विदिशानगरांत वैश्यजातींत जन्माला आलों होतो. त्या काळीं मी अत्यंत दरिद्री असल्यामुळें बंधुवर्गांनीं मला सोडून दिलें. एकदां विदिशानगरांत पर्जन्य न पडल्यामुळें दुष्काळ पडला; व त्यामुळें पुष्कळच मनुष्यहानी झाली; व काहीं जिवंत राहिले ते पळून देशान्तराला गेले. मीहि पत्नीसह त्या नगरांतून जों निघालों तों फिरत फिरत ह्याच चमत्कारक्षेत्राला प्राप्त झालों. ह्या क्षेत्रांत एक सर्वांगसुंदर सरोवर पाहून मी त्यांत स्नानादि कर्में उरकून घेतलीं. नंतर आम्ही उभयतांनीं विचार केला कीं, ह्या सरोवरांत चांगलीं फुललेलीं कमळें काढून घ्यावीं व बाजारांत विकावीं; व जे पैसे मिळतील त्यावर निर्वाह करावा. असें म्हणून व कमळें काढून विकण्याकरितां मी बाजारांत गेलों; परंतु कोणीहि तीं कमळें मजपासून विकत घेईना. ते दिवशीं सायंकाळ होतांच मी एका मोडक्या शिवमंदिरांत पत्नीसह निद्रित झालों असतां मध्यरात्रीं गायनाचा ध्वनि मला ऐकूं आला; व आज कोठें तरी जागरण चाललें आहे, अशी कल्पना करून मी तीं कमळें त्या ठिकाणीं विकण्याकरितां घेऊन गेलों. तेथील एका ब्राह्मणानें कमळांच्या मोबदला मला भोजन देण्याचें कबूल केलें; परंतु मी आपल्या मनांत विचार केला कीं, जन्माला आल्यापासून माझे हातून एकहि पुण्य कर्म घडलें नाहीं; करितां मला भोजनास मिळालें नाहीं तरी हरकत नाहीं; परंतु मी ह्या कमळांनीं आतां महाकालाचें पूजन करणार. ते दिवशीं वैशाखस्नान होता. जरी माझी पत्नी अन्नावांचून मरणोन्मुख झाली होती, तरीसुद्धां तिनें मला माझ्या मताला अनुमोदन दिलें. नंतर आम्ही उभयतांनीं स्नान करून आणिलेलीं कमळें महाकालाला वाहून त्याचें पूजन केलें. दुसरे दिवशीं सकाळीं मी व माझी पत्नी अन्नाभावामुळें मृत झालों. त्याच ह्या पुण्यप्रभावानें आज मी राजकुळांत जन्माला आलों; व ही माझी पत्नि झाली. ह्या कारणास्तव मी प्रतिवर्षी येथें येऊन महाकालपूजन व जागरण करितों. हें राजाचें भाषण ऐकून ब्राह्मणांनीं त्या राजाची वाहवा केली; व त्यास सांगितलें कीं, आम्हींहि प्रतिवर्षी येथें येऊन जागरणादि करूं. तुमच्या सहवासानें आज आम्ही कृतार्थ झालों आहों. असें म्हणून ब्राह्मणांनीं राजाला धन्यवाद दिले. नंतर राजा पत्नीसह ब्राह्मणांची आज्ञा घेऊन सैन्यासह स्वनगराला परत गेला. हें महाकालमाहात्म्य श्रवण केलें असतां सर्व पातकें लयाला जाऊन मोक्षप्राप्तिहि होते.

# अध्याय ४८ वा.

## उमामहेश्वरमाहात्म्य.

सूत म्हणतात; ह्या महाकालाचे सन्निध एक हरिश्चंद्र राजाचा आश्रम आहे. त्या आश्रमांत हरिश्चंद्रानें उमामहेश्वराची स्थापना करून घोर तपश्चर्या केली. नंतर शौनकादिऋषींनीं सूताला हरिश्चन्द्राची कथा विचारिली असतां सूत म्हणतात; मुने! हरिश्चन्द्र हा त्रिशंकु राजाचा मुलगा होय. हा अयोध्येचा राजा होता. त्याच्या राज्यांत कधींहि दुष्काळ पडत नसे. त्या हरिश्चन्द्रानें पुत्रप्राप्तीकरितां घोर तप केलें. त्या तपानें शंकर प्रसन्न होऊन पुत्रप्राप्तीबद्दल राजाला वर देते झाले. राजानें फक्त शंकराचीच आराधना केली; व माझी केली नाहीं, असें पाहून पार्वतीला राग आला; व तिनें शंकराची निर्भर्त्सना करून हरिश्चंद्रराजाला शाप दिला कीं, तुला जरी पुत्र झाला तरी लवकरच तुला पुत्रशोकहि प्राप्त होईल. असा शाप देऊन पार्वती शंकरासह गुप्त झाली. हा पार्वतीचा शाप ऐकून राजाला फार वाईट वाटलें; व त्यानें पुनः त्या ठिकाणीं शिवपार्वतीची आराधना करण्यास प्रारंभ केला. कित्येक वर्षांनीं शंकर पार्वतीसह पुनः हरिश्चन्द्राजवळ येऊन त्यास आश्वासन देते झाले. त्या वेळीं पार्वती राजाला म्हणते कीं, मी दिलेला शाप खोटा होणार नाहीं, तथापि तुझा मुलगा बाल्यावस्थेंतच मृत होऊन पुनः माझ्या कृपाप्रसादानें तो जिवंत होईल. नंतर शंकरानेंहि राजाला इच्छित वर दिला; व ते उभयतां स्वस्थानीं निघून गेले. नंतर तो प्रतिवर्षीं चमत्कारक्षेत्रांत येऊन उमामहेश्वराचें पूजन करीत असे. हें उमामहेश्वराख्यान श्रवण केलें असतां पुत्रपौत्रादिकांची प्राप्ति होऊन मोक्षहि मिळतो.

---

# अध्याय ४९ वा.

## कलशराजाला व्याघ्रजन्मप्राप्ति.

सूत म्हणतात; उमामहेश्वरासन्निध एक कलशेश्वर नांवाचें स्थान आहे. त्या कलशेश्वराच्या दर्शनानें मनुष्य सर्व पापापासून मुक्त होतो. पूर्वीं यादवकुळांत कलशनांवाचा एक राजा उत्पन्न झाला होता. एके दिवशीं त्या राजाकडे दुर्वासऋषी प्राप्त झाले. ते येताच राजा त्या दुर्वासाला सामोरा जाऊन त्याचें पाया-

द्विजांनीं आतिथ्य करिता झाला. नंतर राजा ऋषीला म्हणतो कीं, हें माझें राज्य, हें धन, हे पुत्रपौत्र वगैरे आपल्या प्रसादेंकरून सुखरूप आहेत; आपलें कांहीं कार्य कर्तव्य असल्यास सांगावें. असें राजाचें भाषण ऐकून दुर्वासऋषि म्हणतात; राजन्! तुझ्या राज्याशीं किंवा पुत्रपौत्राशीं मला कांहीं एक कर्तव्य नाहीं. मला क्षुधा लागली आहे, करितां फक्त मला भोजनाची अपेक्षा आहे. असें ऐकतांच राजानें ऋषीला यथाशक्ति भोजन दिलें. तथापि ऋषीच्या भोजनामध्यें मांस वाढिल्यामुळें ऋषीला राग आला; व राजाला दुर्वासानें 'व्याघ्र हो' असा शाप दिला. नंतर राजा म्हणतो कीं, जें कांहीं माझें घरांत पक्व झालेलें अन्नादि तयार होतें, तें मी आपणास भोजनास दिलें असतां आपण मला शाप कां दिला? तें सांगा. असें राजाचें भाषण ऐकून दुर्वास म्हणतो कीं ब्राह्मण हे फक्त श्राद्ध व यज्ञ ह्या कर्मांतच मांसभक्षण करितात. अन्यत्र करीत नाहींत, हें तुला माहीत नाहीं काय? तूं मला भोजनास मांस दिल्यामुळें माझें चातुर्मास्यव्रत भग्न झालें आहे, करितां मी जो शाप दिला तो अगदीं बरोबर आहे. नंतर राजानें उच्छाप मिळण्याविषयीं ऋषीची प्रार्थना केल्यावरून दुर्वास ऋषि म्हणतात कीं, ज्या वेळीं नंदिनी नामक कामधेनु तुला बाणलिंग दाखवील, तेव्हां तूं ह्या माझ्या शापापासून मुक्त होशील, असें म्हणून दुर्वासाऋषि तेथून निघून गेले; व राजाला व्याघ्रजन्म प्राप्त झाला.

---

## अध्याय ५० वा.

—:O:—

### व्याघ्रनंदिनीसंवाद.

सूत म्हणतात; मुने! त्याप्रमाणें तो व्याघ्र निबिड अरण्यांत हिंडत असतां कित्येक काळ निघून गेला. एके दिवशीं ज्या अरण्यांत व्याघ्र हिंडत होता तेथें गोपाळमंडळी गाई चारण्याकरितां प्राप्त झाली. त्यांमध्यें एक नंदिनी नांवाची कामधेनु होती. ती नंदिनी तृणलोभानें चरत चरत बाणलिंगाजवळ प्राप्त झाली. ती नंदिनी त्याप्रमाणें नित्य तेथें येऊन आपल्या दुधानें बाणलिंगाला स्नान घालीत असे. त्या वेळीं त्या नंदिनीची व त्या व्याघ्राची गांठ पडली. नंदिनीनें व्याघ्राला पाहून गोठ्यांत बांधलेल्या वांसराचें चिंतन केलें, व फारच शोक केला. तिनें घाबरेपणानें चोहोंकडे अवलोकन केलें. नंतर व्याघ्र नंदिनीजवळ येऊन म्हणतो कीं, आतां शोक कां करितेस? तूं आतां माझ्या तावडींत सांपडली आहेस. तेव्हां धेनु म्हणते; मी स्वतःकरितां शोक करीत नसून आपल्या

वासराकरितां शोक करीत आहे; करितां मी घरीं जाऊन; व वांसराला दूध पाजून परत तुझे जवळ येते; व जर मी परत तुझेजवळ न येईन तर मला ब्रह्महत्त्यादि पातकें केल्याचा दोष प्राप्त होईल. अशातऱ्हेनें अनेकप्रकारच्या शपथा घेऊन तिनें व्याघ्रावर विश्वास बसविण्याबद्दलचा प्रयत्न केला; व ती त्याच्या आज्ञेनें स्वगृहाला निघून गेली.

---

## अध्याय ५१ वा.

—:०:—

### नंदिनीचें पुनरागमन.

नंदिनी स्वगृहाला जाऊन; व आपल्या पुत्राला दुध पाजून अरण्यांत घडलेला सर्व वृत्तांत तिनें वत्साला सांगितला. हा प्रकार जाणून नंदिनीचा पुत्र आपल्या मातेला म्हणाला कीं, मीहि तुझ्याबरोबर येतो. तुझ्याशिवाय मला तरी जिवंत राहून काय करावयाचें आहे; तेव्हां जी तुझी स्थिति तीच माझी होईल, करितां मी तुजबरोबर येणार. असें पुत्रवाक्य ऐकतांच नंदिनी पुत्रासह जेथें गाई चरत होत्या त्या अरण्यांत प्राप्त झाली. इतर गाईंनीं नंदिनीला व्याघ्राजवळ न जाण्याविषयीं पुष्कळ सांगितलें; परंतु तें तिला आवडलें नाहीं. शेवटीं ती आपल्या पुत्राला गाईच्या हवालीं करून व्याघ्राकडे जाण्यांस सिद्ध झाली. पुत्रदर्शनाच्या लालसेनें नंदिनी तर फारच शोक करीत व्याघ्राजवळ प्राप्त झाली; व व्याघ्राला म्हणते कीं, तुझ्याजवळ शपथ केल्याप्रमाणें आल्यें आहे. आतां तुझ्या इच्छेप्रमाणें माझी काय हवीती व्यवस्था लाव. हें नंदिनीचें भाषण ऐकतांच त्या व्याघ्राला उपरती होऊन व तिला अभयवचन देऊन तो बोलला कीं; मी महापापी आहे, आजपर्यंत माझ्या हांतून पुष्कळ हत्त्या घडल्या आहेत; तेव्हां तूं माझा उद्धार कर. असें त्या व्याघ्राचें भाषण ऐकून नंदिनीनें व्याघ्रास ज्ञानोपदेश करून संनिध असलेल्या बाणलिंगाचें पूजन करण्यांस सांगितलें. नंतर तो व्याघ्र नंदिनीच्या सांगण्याप्रमाणें लिंगपूजन करतांच दुर्वासशापापासून मुक्त होऊन; व पुनः पूर्ववत् राजा होऊन नंदिनीला आपलें पूर्ववृत्त सांगता झाला. नंतर तो कलशनामक राजा नंदिनीची आज्ञा घेऊन चमत्कारक्षेत्रांत आपले नांवानें एक शिवलिंग स्थापिता झाला; व त्याच्या आराधनेनें तो राजा कृतार्थ होऊन शिवलोकाला प्राप्त झाला. जे कोणी ह्या कलशेश्वराचें पूजन करून तेथें जागरण करितात ते पापमुक्त होऊन मोक्षाला प्राप्त होतात.

---

## अध्याय ५२ वा.

### रुद्रकोटिमाहात्म्य.

सूत म्हणतात;-उमामहेश्वराचें सन्निध एक कुंड आहे. त्या कुंडाचे नजीक अगस्त्यकुंडाजवळ एक वापी आहे. त्या वापींत फाल्गुनमहिन्यांत स्नान केलें असतां इच्छित वस्तूंची प्राप्ति होते. त्या वापीच्या दक्षिणेस कपिलानामक नदी आहे; ज्या नदींत स्नान केल्यामुळें हजारों लोक मुक्त झाले. त्या नदीच्या नजीक एक विष्णुशिला आहे; व त्या विष्णुशिलेच्या उत्तरेस रुद्रकोटितीर्थ आहे. त्या तीर्थाचे काठीं कोट्यावधि दाक्षिणी ब्राह्मणांनीं लिंगें स्थापिल्यामुळें त्या तीर्थाला रुद्रकोटि हें नांव प्राप्त झालें आहे. सहस्रावधिजन्मामध्यें केलेलीं घोर पातकें रुद्रकोटितीर्थाच्या स्नानानें नष्ट होतात. ह्या रुद्रकोटितीर्थांत स्नान करून व शिवलिंगाचें पूजन करणाराला यज्ञयागादि कर्मे केल्याचें फल प्राप्त होतें.

---

## अध्याय ५३ वा.

### भ्रूणगर्तामाहात्म्य.

सूत म्हणतात; ह्या ठिकाणीं एक उज्जयिनीपीठ आहे. त्या ठिकाणीं महाकालेश्वराच्या पूजनानें व तेथें केलेल्या श्राद्धविधीनें सर्व इष्ट वासना पूर्ण होऊन ते सद्गतीला प्राप्त होतात. त्या महाकालेश्वरानजीक भ्रूणगर्ता नांवाची एक गर्ता ( खळगा ) आहे. ह्या गर्तेंत स्नानादि केल्यामुळें सौदास हा ब्रह्महत्त्यादि पातकांपासून मुक्त झाला. पूर्वीं एक सूर्यवंशांत सौदास नांवाचा राजा होता. तो सद्धर्मानें वागणारा असून प्रजापालन उत्तमतऱ्हेनें करीत असे. एकदां सौदास मृगया करण्याकरितां अरण्यांत गेला असतां त्याचेकडून एका राक्षसाचा वध झाला. हा प्रकार त्या राक्षसाच्या भावानें दुरून पाहिला व तो राक्षस त्या सौदासाचे घरीं भावाला मारल्याबद्दल सूड उगविण्याच्या इच्छेनें स्वयंपाक्याचा वेष घेऊन प्राप्त झाला. एके दिवशीं सौदासाचें घरीं वसिष्ठ ऋषि भोजनास बसले असतां, स्वयंपाक्याचा वेष घेतलेल्या राक्षसानें नरमांस शिजवून वसिष्ठाच्या पानांत वाढिलें. तें पाहून वशिष्ठाला राग आला व त्याला राक्षसाचें कपट न समजून तो ऋषि राजाला दोष देऊं लागला. राजानें हें कृत्य मुद्दाम कपटानें मला फसविण्याच्या बुद्धीनें केलें असावें, असें पक्कें समजून वशिष्ठानें सौदासास शाप दिला कीं, तूं बारा वर्षेपर्यंत राक्षस होऊन अर-

ण्यांत हिंडत राहशील. विनाकारण आपणाला शाप दिला हें मनांत आणून सौदासानेंहि वशिष्ठाला शाप देण्याकरितां हातांत उदक घेतलें; परंतु स्त्रीच्या सांगण्यावरून त्यानें तसें करण्याचें नाकारिलें; व त्यामुळें सौदासानें हातांतील उदक आपल्या पायांवर टाकिलें. त्या उदकाच्या योगानें सौदासाचे पाय दग्ध होऊन काळे पडले. त्या दिवसापासून त्याला कल्माषपाद हें दुसरें नांव प्राप्त झालें; व तो राक्षस होऊन अरण्यांत हिंडूं लागला. त्या कपटि राक्षसानें कृत्रानें नरमांस शिजवून वशिष्ठाला वाढिलें. त्या राक्षसाचें मोठें युद्ध होऊन त्यांत तो कपटि राक्षस मारला गेला. कल्माषपादाला ह्मणजे सौदासाला राक्षसत्व प्राप्त झालें असतां त्याचे हातून अज्ञानानें अनेक ब्राह्मणांचा वध झाल्यामुळें त्यास ब्रह्महत्येचें पाप लागलें होतें; नंतर तो सौदास बारा वर्षें पुरीं होतांच वशिष्ठ ऋषीच्या सांगण्यावरून ब्रह्महत्येच्या नाशार्थ चमत्कारक्षेत्रांत जाऊन भ्रूणगर्तेमध्यें स्नान करिता झाला. स्नान करितांच आकाशवाणी झाली कीं, राजा ! तुझीं सर्व पातकें आज ह्या गर्तेत स्नान केल्यामुळें दग्ध झालीं आहेत. आतां निष्पाप झाला आहेस. ही आकाशवाणी ऐकतांच राजा स्वगृहाला येऊन व राज्यावर आपल्या पुत्राला स्थापून तो मोक्षाला प्राप्त होता झाला.

---

## अध्याय ५४ वा.

### चर्ममुण्डामाहात्म्य.

सूत म्हणतात,—त्या भ्रूणगर्तेसन्निध एक चर्ममुण्डा नांवाची देवी नलराजानें स्थापिली आहे. पूर्वी वीरसेनाला नल नांवाचा एक पुत्र झाला होता; त्या नलाची दमयंती नांवाची एक पत्नि होती. त्या नलाच्या शरीरांत कलीचा प्रवेश होऊन, त्यानें द्यूत खेळून सर्व राज्य गमाविलें. सरतेशेवटीं नलराजा दमयंतीसह एका वस्त्रानिशीं जों राज्यांतून बाहेर पडला; तों थेट एका अरण्यांत गेला. नलराजानें विचार केला कीं, दमयंती जर आपल्या पित्याकडे परत जाईल, तर हे तिचे होणारे हाल दूर होतील; व ही दमयंती तर माझ्या सांगण्यानें तसें करणार नाहीं, करितां मी हिचा येथें त्याग करून जर निघून गेलों तरच ही अनायासें पित्याच्या घरीं जाईल; व हिचें अरण्यांत होणारे हाल वांचतील. असा विचार करून नलराजानें रात्रीं दमयंती निजली असतां तिचा रानांत त्याग केला; व तो दुसरीकडे निघून गेला. सकाळीं दमयंती जागी होऊन पाहते, तो नलराजा कोठें दिसेना. नलराजाच्या अदर्शनामुळें दमयंतीनें शोक केला;

आणि ती फिरत फिरत पित्याच्या घरीं गेली. इकडे नलराजा अरण्यांतून फिरत फिरत चमत्कारक्षेत्रांत जाऊन; व नवमीचे दिवशीं चर्ममुण्डादेवीचें पूजन करून, तिची प्रार्थना करिता झाला. नंतर ती देवी प्रसन्न होऊन नलाला वर देती झाली; व तिच्या वरानें नलाला पुनः दमयंतीची व राज्याची प्राप्ति झाली.

---

## अध्याय ९५ वा.

### नलेश्वरमाहात्म्य.

नलराजानें ज्या वेळीं चर्ममुण्डापूजन केलें; त्याच वेळीं तेथें शिवाराधना करून नलेश्वर नांवाचें एक लिंग स्थापित केलें. ह्या नलेश्वराचें पूजन माघ शुद्ध षष्ठीचे दिवशीं केलें असतां सर्व इच्छा पूर्ण होतात. ह्या लिंगाच्या दर्शनानें कंडू, खरूज, दद्रु, कुष्ठ वगैरे रोग नष्ट होतात. नलेश्वरासन्निध एक कुंड आहे, त्या कुंडांत दर सोमवारीं स्नान करून नलेश्वराचें पूजन करणारे निष्पाप व सुखी होत्साते शिवसायुज्यतेला प्राप्त होतात.

---

## अध्याय ९६ वा.

### सांबादित्यमाहात्म्य.

नलेश्वरनजीक एक सांबादित्य नांवाचें स्थान आहे. हें स्थान गालवमुनीनें पुत्रप्राप्त्यर्थ सूर्याराधना करून स्थापित केलें. सूर्याच्या कृपेनें गालवाला वटेश्वर नांवानें एक पुत्र झाला. कांहीं दिवसांनीं वटेश्वरानेंहि सूर्याराधना करून वटादित्याची स्थापना केली. वटादित्य व सांबादित्य ह्या उभय देवतांच्या पूजनानें पुत्रप्राप्ति होते. नारदऋषीनेंहि एकदा वटादित्य व सांबादित्य ह्यांचा प्रभाव वर्णिला आहे, तो असा कीं, जी कोणी स्त्री ह्या सांबादित्याचें किंवा वटादित्याचें पूजन करील, मग ती वंध्या असो, शंभर वर्षांची म्हातारी असो, किंवा दुर्दैवी असो, तिला सुद्धा संतति होईल. ह्या सांबादित्य माहात्म्याच्या केवळ श्रवणानेंहि संतति प्राप्त होऊन मोक्ष मिळेल.

---

## अध्याय ५७ वा.

### भीष्मादित्यमाहात्म्य.

त्याच चमत्कारक्षेत्रांमध्यें भीष्मानें स्थापिलेलें भीष्मादित्य नांवाचें एक स्थान आहे. पूर्वी एकदां भीष्म व परशुराम ह्यांचें युद्ध होऊन त्यांत परशुरामाचा पराभव झाला. पुढें अंबेनें भीष्माशीं लग्न लाविण्याचा निश्चय केला असतांहि भीष्मांनीं तिचा स्वीकार न केल्यामुळें तिनें प्रतिज्ञा केली कीं, जर तूं माझ्याशीं लग्न लावणार नाहींस तर मी तुला मारण्याकरितां दुसरा जन्म घेईन; व तुझा नाश करीन. अशी प्रतिज्ञा ऐकून सुद्धां भीष्मानें अंबेचा स्वीकार केला नाहीं. स्त्रीजनाशीं केव्हांहि द्रोह करूं नये, असें धर्मशास्त्र असतां भीष्मानें अंबेचा द्रोह केल्यामुळें भीष्माला पश्चात्ताप झाला; व त्यानें मार्कण्डेयाला तद्दोषनाशार्थ प्रायश्चित्त विचारिलें. मार्कण्डेयानें तीर्थयात्रा करण्यास सांगितल्यावरून भीष्म तीर्थें हिंडत हिंडत चमत्कारक्षेत्रांत प्राप्त झाला. भीष्म त्याठिकाणीं अनेक तीर्थांत स्नान करून श्राद्धादि करीत असतां आकाशवाणी झाली कीं; भीष्मा! तूं स्त्रीचा अपमान केल्यामुळें महादोषी आहेस, करितां श्राद्धादि करण्याचा तुला अधिकार नाहीं; म्हणून तूं येथून जवळच असणाऱ्या शर्मिष्ठातीर्थांत स्नान कर म्हणजे दोषमुक्त होशील. नंतर भीष्म शर्मिष्ठातीर्थांत स्नान करून दोषमुक्त झाला; व त्यानें तेथें श्राद्धादि केलें. नंतर भीष्मानें त्याठिकाणीं आदित्याची भीष्मादित्य ह्या नांवानें स्थापना करून त्याची पूजा व आराधना केली. जे कोणी भीष्मादित्याचें पूजन व ध्यान करितील ते ऐश्वर्यसंपन्न व पापमुक्त होऊन सूर्यलोकाला प्राप्त होतील.

---

## अध्याय ५८ वा.

### शिवगङ्गामाहात्म्य.

सूत म्हणतात; याप्रमाणें भीष्मांनीं भीष्मादित्याची स्थापना केल्यानंतर शिवगंगेची स्थापना केली. ह्या शिवगंगाकूपांत स्नान करून जे असत्य भाषण करितील ते यमलोकाला प्राप्त होतील. एक पौंड्रक नांवाचा शूद्र त्या शिवगंगाकूपानजीक राहत असे. तो लहान असतांना बाल्यभावाला अनुसरून एका मित्राचें पुस्तक चोरता झाला. मित्रानें पौंड्रकाला विचारिलें असतां पौंड्रकानें त्यास ठाऊक नाहीं; म्हणून सांगितलें. या असत्य भाषणाच्या योगें पौंड्रकाला

कुष्टरोग जडला. त्यामुळें त्याचा इष्टमित्रांनीं त्याग केला. तात्पर्य हा सर्व प्रकार असत्य भाषण केल्यामुळें झाला आहे; करितां कोणींहि ह्या शिवगंगाकूपांत स्नान करून असत्य भाषण करूं नये.

## अध्याय ५९ वा.

### वटादित्यमाहात्म्य.

सूत म्हणतात; मुने ! ह्या चमत्कारक्षेत्रांत विदुरानें वटादित्य नांवाचें एक स्थान स्थापित केलें आहे. त्या वटादित्याच्या पूजनानें सूर्यलोकांची प्राप्ति होते. एकदां हस्तिनापुरांत विदुराच्या घरीं गालवमुनी आले असतां त्यांस विदुरानें प्रश्न केला कीं, मला पुत्र नाहीं, तेव्हां मला कोणत्या उपायानें सद्गति प्राप्त होईल तें सांगा. नंतर गालव म्हणतो; विदुरा ! तूं म्हणतोस ती गोष्ट खरी आहे. अपुत्राला नरकाशिवाय दुसरी गति नाहीं. असें गालवाचें भाषण ऐकतांच विदुराला फारच दुःख झालें. नंतर गालव म्हणतो कीं, तूं दुःख करूं नको. मी तुला एक उपाय सांगतों; तो ऐक. हाटकेश्वरक्षेत्रांत जावून तूं एक वडाचें झाड लाव; व त्याचे खालीं एक सूर्याची स्थापना कर; म्हणजे त्याच्या कृपेनें कृतार्थ होशील. नंतर विदूर गालवाच्या सांगण्याप्रमाणें वटादित्याची स्थापना करून निर्दोष होत्साता सद्गतीला प्राप्त होऊन मुक्त झाला.

## अध्याय ६० वा.

### नरादित्यमाहात्म्य.

पूर्वी एकदां अगस्त्यमुनीनें देवकार्यासाठीं शोषिणीनांवाची विद्या संपादन करून समुद्राचें शोषण केलें; व माहित्थादेवीची स्थापना केली. त्या माहित्थादेवीच्या भक्तियुक्त आराधनेनें सर्व कार्यें सफल होतात. त्याचप्रमाणें माहित्थादेवीच्या नजीक एक नरानें स्थापिलेला नरादित्य आहे. जे कोणी रविवारीं षष्ठीतिथीला ह्या नरादित्याचें पूजन करितात ते कधींहि शत्रूंकडून पराजित होत नाहींत. जो रोगी असेल तो ह्याच्या पूजनानें रोगमुक्त होईल. जो दरिद्री असेल तो श्रीमान् होईल. त्याचप्रमाणें कार्तिक शुक्ल प्रतिपदेला तेथेंच असणाऱ्या गोवर्धनधारी विष्णूचें जे पूजन करितात तेहि रोगरहित व श्रीमान् होऊन अंतीं

मुक्त होतात. नरादित्याजवळ स्थापिलेल्या नरनारायणांचें जे पूजन करितात ते जरामरणरहित होऊन सद्गतीला प्राप्त होतात. ज्या वेळीं अर्जुन तीर्थयात्रा करीत करीत चमत्कारक्षेत्रांत आला त्या वेळीं त्यानें प्रथम तेथें नरादित्याची स्थापना करून नंतर नरनारायणाची स्थापना केली. हें आख्यान श्रवण केलें असतां सर्वत्र विजय व सुख मिळून शेवटीं मोक्षहि मिळतो.

## अध्याय ६१ वा.

### विषकन्योत्पत्ति.

सूत म्हणतात; पूर्वी सोमवंशांत एक वृक नांवाचा राजा असता झाला. तो ब्राह्मणांचें रक्षण करणारा असून शरण आलेल्याला साहाय्य करणारा होता. त्याला वृद्धावस्थेमध्यें एक मुलगी झाली; नंतर राजानें ज्योतिष्यांना बोलावून मुलीचें जातकर्मादि फल विचारिलें. त्या वेळीं ब्राह्मण म्हणतात; राजा! ही कन्या चित्रा नक्षत्रावर चंद्र असतां चतुर्दशीला जन्माला आली असल्यामुळें ती विषकन्या होय; व अशातऱ्हेनें उत्पन्न झालेल्या विषकन्येचें जो पाणिग्रहण करील तो सहा महिन्याच्या आंत मृत्यु पावेल. विषकन्या ज्या मंदिरांत जन्माला येईल, तें मंदिर वैभवहीन होईल; करितां तुम्ही हिचा त्याग करावा. असें ज्योतिष्यांचें भाषण ऐकून राजा ह्मणतो कीं, ह्या मुलीच्या व आमच्या नशिबीं जें व्हावयाचें आहे तें होईल; परंतु मी हिचा त्याग करणार नाहीं. कारण, जर माझी हानि व्हावयाची निश्चित असेल तर ती हिच्या त्यागानें थोडीच दूर होणार आहे. आयुष्य, कर्म, द्रव्य, विद्या व मरण हीं पांच कर्में प्रत्येकाच्या जन्माचे आरंभींच ठरलेलीं असतात. तेव्हां मी माझ्या दैवावर भरंवसा ठेवून मी हिला आपल्या घरीं ठेवणार.

## अध्याय ६२ वा.

### शर्मिष्ठातीर्थमाहात्म्य.

ह्याप्रमाणें निश्चय करून राजानें आपल्या मुलीचा त्याग केला नाहीं. त्या मुलीचें शर्मिष्ठा असें नांव ठेविलें. शर्मिष्ठा नामक विषकन्येला मंदिरांत ठेविल्यामुळें थोड्याच दिवसांत राजा शत्रूकडून पराजित होऊन राज्यभ्रष्ट झाला. त्याच्या राज्यांतील लोक विषकन्येची निंदा करूं लागले. कांहीं दिवसांनीं वृक-

राजाचाहि अंत झाला. शेवटीं ग्रामस्थांनीं विचार केला कीं, ह्या विषकन्येमुळें आपल्या सर्वांना दुःख भोगावें लागत आहे, करितां हिलाच ठार मारावी; म्हणजे सर्वांचें क्षेम होईल. हें वर्तमान शर्मिष्ठानामक विषकन्येला समजतांच तिनें आपल्या जीविताचा धिक्कार करून पश्चात्तापानें त्याच रात्रीं तेथून प्रस्थान केलें. ती विषकन्या फिरत फिरत हाटकेश्वरक्षेत्रांत असणाऱ्या चमत्कार नगरांत येऊन तेथें असणाऱ्या एका कुंडानजीक पार्वतीची स्थापना करिती झाली. नित्य ती पार्वतीचें पूजन करून घोर तप आचरती झाली. तिच्या तपानें संतुष्ट असलेली पार्वती शंकरासह शर्मिष्ठानामक विषकन्येजवळ येऊन वर मागण्याविषयीं तिला सांगूं लागली. त्या वेळीं शर्मिष्ठेनें योग्य वर मिळवून रूपादिक संपत्ति मिळविली. ज्या कुंडांत स्नान करून शर्मिष्ठा कृतकृत्य झाली, त्या कुंडाला शर्मिष्ठातीर्थ हें नांव प्राप्त झालें. हें आख्यान नित्य सकाळीं पठण केल्यास शिवलोकप्राप्ति होईल.

---

## अध्याय ६२ वा.

### सोमनाथोत्पत्ति.

सूत म्हणतात,—हें लिंग सोमानें स्थापिलें असल्यामुळें, ह्याला सोमनाथलिंग म्हणतात. एकदां सोमानें म्हणजे चंद्रानें, दक्षाच्या सत्तावीस मुलींशीं लग्न लाविलें. चंद्राची सत्तावीस नायकांपेक्षां रोहिणीवर फारच प्रीति होती; तेव्हां इतर सव्वीस नायकांनीं आपला पिता जो दक्ष त्याला हें वर्तमान कळविलें असतां, दक्षाला चंद्राचा राग आला; व त्यानें चंद्राला शाप दिला कीं, तूं क्षयरोगी होशील. शाप देतांच चंद्र क्षयी होऊन, कृशपणाला प्राप्त झाला. चंद्रानें क्षयरोगाच्या नाशार्थ पुष्कळ उपाय योजिले; पण व्यर्थ. शेवटीं चंद्रानें तीर्थयात्रा करण्याचा विचार करून, प्रभासादि तीर्थांमध्यें पर्यटण केलें. नंतर चंद्राला रोमकऋषीची गांठ पडली असतां, त्याच्या सांगण्यावरून चंद्रानें चमत्कारक्षेत्रांत एक शिवलिंग स्थापिलें; व त्याचें पूजन करून शिवाराधना आरंभिली, त्यायोगें शंकर प्रसन्न होऊन चंद्राला क्षयमुक्त करिता झाला. त्या दिवसापासून शंकरानें त्या लिंगाला सोमनाथ हें नांव दिलें. हें सोमनाथआख्यान श्रवण करणारास, सोमनाथपूजनाचें फल मिळून शिवलोक प्राप्त होतो

---

## अध्याय ६४ वा.

### चमत्कारीदुर्गामाहात्म्य.

ह्या चमत्कारनगरामध्यें एक चमत्कारीनांवाची देवी आहे. तिची स्थापना चमत्कारराजानें केली आहे. ह्याच चमत्कारी दुर्गेनें महिषासुरादि दैत्यांचा वध केला होता. ह्या देवीच्या पूजनानें सर्व दुःखें नामशेष होतात. ह्या देवीच्या आराधनेनें पूर्वी पुष्कळ राजांना सिद्धि प्राप्त झाल्या होत्या. जे कोणी श्रद्धायुक्त अन्तःकरणानें ह्या दुर्गादेवीचें पूजन करितात ते सर्वसंपत्तीनें युक्त व दुःखमुक्त होऊन दुर्लभ अशा मोक्षाला प्राप्त होतात. हें आख्यान मुक्ति देणारें आहे.

## अध्याय ६५ वा.

### आनर्तेश्वरमाहात्म्य.

चमत्कारी दुर्गेसन्निध एक तलाव आहे. तो तलाव देवांनीं निर्माण केलेला आहे. ह्या तलावांत स्नान केल्यामुळें आनर्तदेशाचा राजा जो सुहय, त्याला सिद्धि प्राप्त झाल्या होत्या. एकदां सुहयराजाचा शत्रूंनीं पराभव केल्यामुळें तो पळून मरुदेशांत गेला. तेथें अन्नपाणी न मिळाल्यामुळें त्याचें जीवित चिन्तारूप असतें झालें. एके दिवशीं पितरांचा राजा आपल्या मित्रमंडळींसह सुहयराजाजवळ येऊन व त्याला अन्नपाणी देऊन त्याचा सत्कार करिता झाला. त्या वेळीं राजाला अत्यानंद होऊन व पितरांच्या राजाचें त्यानें फार फार आभार मानिले. नंतर पितरांच्या राजानें सुहय राजाला आज्ञा केली कीं, तूं चमत्कारक्षेत्रांत जाऊन; व तेथें देवस्थापित अशा तलावांत स्नान करून आमच्या नांवानें श्राद्ध कर; ह्मणजे आम्ही मुक्त होऊन तुला आशीर्वाद देऊं. ह्या कृत्याच्या अनुष्ठानानें तुझाहि पुष्कळ फायदा होण्याचा संभव आहे. असें पितृपतीचें भाषण ऐकून सुहयराजा तत्काळ चमत्कारपुरांत जाऊन; व तेथें स्नान आणि श्राद्धविधि करून पितरांची मुक्तता करिता झाला. ह्या राजानें त्या तलावाचे काठीं एक शिवलिंगस्थापून शिवाराधनाहि केली. शंकराच्या प्रसादानें सुहयराजाला पुनः राज्यप्राप्ति व सुखप्राप्ति; आणि मोक्षप्राप्तिहि झाली. शंकरानें त्याच सुहयनामक आनर्तदेशाधिपतिस्थापित लिंगाला आनर्तेश्वर हें नांव देऊन त्याचें माहात्म्यहि मुमुक्षुजनांना सांगितलें आहे. जे कोणी देवस्थापित तलावांत स्नान व आनर्तेश्वरलिंगाचें पूजन करितात; व त्याच

ठिकाणीं पितृश्राद्धादि कर्मै करितात ते सर्व पापापासून मुक्त होऊन व इहलोकीं सुख भोगून अंतीं पितरासह मुक्त होतात. ह्या आनर्तेश्वरासंनिध असणाऱ्या शृंङ्केश्वराचेंहि जे पूजन करितात तेहि मोक्षाला जातात. ह्या तीर्थासमीप गंगा व यमुना ह्यांचा संगम असल्यामुळें ह्याचें माहात्म्य अवर्णनीय आहे.

## अध्याय ६६ वा.

### जमदग्निवध.

सुत म्हणतात; ऋचीकनामक ऋषीला जमदग्नि नांवाचा एक पुत्र झाला. त्या जमदग्नीला चार मुलगे होते. पैकीं सर्वांत लहान मुलगा परशुराम ह्या नांवानें प्रसिद्ध होता. एके दिवशीं जमदग्नीचे चारहि पुत्र अरण्यांत कंदमूलफलादि आणण्याकरितां गेले असतां हैहय देशाचा राजा सहस्रार्जुन जमदग्नीकडे आला. जमदग्नीनें उत्तमतऱ्हेनें सैन्यासह सहस्रार्जुनाचा आतिथ्यादि सत्कार केला. हा प्रकार पाहून सहस्रार्जुनाला फारच आश्चर्य वाटलें कीं, ह्या अरण्यांत राहणारा व कंदमुलादि भक्षण करणारा गरीब ऋषि असतां, राजाला योग्य असा सैन्यासह सत्कार करण्याइतकें ऐश्वर्य ह्याच्याजवळ कोठून प्राप्त झालें. नंतर सहस्रार्जुनानें चौकशी करितां हा प्रभाव ऋषीचा नसून त्याजवळ असणाऱ्या कामधेनूचा आहे, असें त्यास समजलें; व तो हैहयराजा जमदग्नीजवळ कामधेनूची याचना करूं लागला. जमदग्नीनें सहस्रार्जुनाला कामधेनु देण्याचें नाकारिल्यामुळें, सहस्रार्जुनानें जमदग्नीचा आपल्या तीक्ष्ण शस्त्रानें वध केला; व तो राजा कामधेनूला घेऊन आपल्या राजधानींत परत आला. जमदग्नीच्या वधानें रेणुकेलाहि फार दुःख झालें. जमदग्नीच्या वधानें कामधेनूलाहि फार दुःख झालें; व तिनें आपल्या सामर्थ्यानें हैहयराजाचा पराभव केला.

## अध्याय ६७ वा.

### सहस्रार्जुनवध.

जमदग्नीचा वध करून सहस्रार्जुन आपल्या राजधानींत परत गेल्यावर परशुरामादि जमदग्नीचे पुत्र स्वाश्रमांत परत आले. आपल्या आश्रमांत येऊन पाहतात तों सर्व आश्रम उद्ध्वस्त झाला आहे. हा सर्व प्रकार पाहून त्या जम-

ऋषिपुत्रांनीं त्याबद्दल चौकशी केली. चौकशीअंतीं सहस्त्रार्जुनानें आपल्या पित्याला ठार मारून मातेलाहि त्रास दिल्याबद्दलचें समजलें; नंतर परशुरामानें सहस्त्रार्जुनाला मारण्याची प्रतिज्ञा करून जमदग्नीचें और्ध्वदेहिक केलें. त्यानंतर राम हातांत परशु घेऊन सहस्त्रार्जुनाला मारण्याकरितां माहिष्मती नगरींत प्राप्त झाला. परशुराम आपल्याबरोबर युद्ध करण्याकरितां येत आहे, हें समजतांच सहस्त्रार्जुनहि सैन्यासह नगरीच्या बाहेर परशुरामाबरोबर युद्ध करण्याच्या तयारीनें आला. सैन्यासह सहस्त्रार्जुनानें जमदग्नीला मारल्यामुळें त्याला ब्रह्महत्त्येचें पातक लागलें होतें; व त्या पातकाच्या योगें ससैन्य अशा सहस्त्रार्जुनाचें क्षात्रतेज निर्बल झालें होतें. सहस्त्रार्जुन जरी पराक्रमी होता तरी त्याला परशुरामाचा पराजय करितां आला नाहीं. परशुरामानें नाम हातांत परशु ( कुऱ्हाड ) घेऊन कोपानें सहस्त्रार्जुनाचे हजार हात तोडून त्याचा शिरच्छेद केला.

---

## अध्याय ६८ वा; व ६९ वा.

### रामह्रदोत्पत्तिमाहात्म्य.

परशुरामानें सहस्त्रार्जुनाला मारिल्यानंतर त्या सहस्त्रार्जुनाच्या अंगापासून निघालेल्या रक्ताचे घट भरून त्या रक्ताचे योगें जमदग्नीचें पैतृकर्म करून परशुराम पुत्रकर्मापासून निवृत्त झाला. नंतर परशुरामानें एकवीसवेळां निःक्षत्रिय पृथ्वी केली; व अश्वमेधयज्ञहि केले. युद्ध करून जिंकिलेली सर्व पृथ्वी परशुरामानें ब्राह्मणांना दान दिली. नंतर ब्राह्मणांनीं परशुरामाला सांगितलें कीं, तुम्ही दान दिलेली सर्व भूमि आमची असल्यामुळें तुम्हाला आतां ह्या आमच्या भूमींत राहणें प्रशस्त नाहीं; करितां ह्या आमच्या भूमीच्या बाहेर तुम्ही राहावें. परशुरामानें सर्वच भूमि दान दिल्यामुळें ह्याशिवाय दुसरी भूमि परशुरामाजवळ नव्हती; व ब्राह्मणांच्या आज्ञेप्रमाणें ह्या भूमींत राहणेंहि अप्रशस्त; तेव्हां आतां काय करावें ! व कोठें राहावें; हा विचार परशुरामाच्या अन्तःकरणांत उत्पन्न झाला. नंतर परशुरामानें सह्याद्रीच्या पायथ्याशीं समुद्र–किनाऱ्यावर उभें राहून, समुद्राला बारा कोसपर्यंत मागें हटावयास सांगितलें; व स्वतः ह्या समुद्राच्या मागें हटण्यानें राहिलेल्या *भूमींत परशुराम सुखानें राहते झाले. नंतर परशुरामानें चमत्कारनगरींत येऊन; व तेथें एक खळगा खणून, आणि त्यांत एकवीस वेळा

---

* ही भूमि परशुरामांनीं समुद्राला हटवून उत्पन्न केल्यामुळें, हिला परशुरामक्षेत्र म्हणतात; व हल्लीं आपण ह्यालाच कोंकणपट्टी म्हणतों.

निःक्षत्रिय पृथ्वी करून संपादिलेलें क्षत्रियांच्या अंगाचें रक्त घालून; तो खळगा भरून काढिला; व तेथेंहि पितृश्राद्ध केलें. त्या श्राद्धाच्या योगें पितर तृप्त होऊन, त्यांनींच ह्या खळग्याचें नांव रामह्रद असें ठेविलें; आणि परशुरामास सांगितलें कीं, तुझ्या ह्या कृत्यानें आम्ही संतुष्ट झालों आहों. जे कोणी ह्या रामह्रदांत स्नान करून पितृश्राद्ध करितील ते पितरांचा उद्धार करून स्वतःहि मुक्त होतील.

## अध्याय ७० वा.

### तारकवरप्रदान.

सूत म्हणतात; एकदां तारक नांवाचा दैत्य गोकर्णक्षेत्रांत येऊन पर्णादिकाच्या भक्षणानें शंकराची आराधना करूं लागला. त्याच्या घोर तपानें शंकर संतुष्ट होऊन तारकाला अजेयत्व देता झाला. शंकराच्या वरानें संतुष्ट झालेला तारक उन्मत्तपणानें इंद्रादि देवांना जिंकता झाला. तारकाकडून पराजित झालेले देव ब्रह्मादिकांना शरण गेले. ब्रह्मादिकांनीं इंद्रादि देवांना सांगितलें कीं, ज्या वेळीं शंकराला कार्तिकस्वामी नांवाचा मुलगा होईल, तेव्हां तो शिवपुत्र तारकाचा नाश करील, तरी तुम्ही शंकराला लवकर पुत्र उत्पन्न होईल, असा एखादा उपाय योजा. नंतर इंद्रादिदेवांनीं शंकर व पार्वती एकांतांत रममाण होत असतां प्रथम वायूला आंत शंकराकडे पाठविलें. वायू शंकराकडे जाताच वायूच्या प्रभावानें शंकराचें वीर्य स्थानच्युत होऊन निष्फळ झालें. त्या वेळीं वायूबरोबर शंकरानें देवीकडे निरोप पाठविला कीं, जर माझें वीर्य धारण करण्याकरितां अग्नीला माझ्या मंदिरांत पाठवाल तर तुमचा कार्यभाग होईल. नंतर वायूच्या सांगण्याप्रमाणें अग्नीला शंकराकडे पाठविलें; व त्यायोगें अग्नि गरोदर राहिला.

## अध्याय ७१ वा.

### कार्तिकेयोत्पत्ति.

नंतर तो अग्नि शिववीर्य असह्य झाल्यामुळें गंगेमध्यें जाऊन स्नान करिता झाला. अग्नि गंगेंत स्नान करतांच अग्नीचे ठिकाणीं असणारें शिववीर्य गंगेंत प्रविष्ट झालें. तत्काळ साहा कृत्तिका त्याच गंगेंत स्नानाकरितां आल्या असतां गंगेंत स्नान करिताच गंगेमध्यें असणारें शिववीर्य साहा कृत्तिकांच्या उदरांत

शिरलें; व त्या साही जणीं गरोदर राहिल्या. आपले पति आपणास दोष देतील ह्या भीतीनें त्या साही जणींनीं तो गर्भ तेथील हंतरलेल्या दर्भावर टाकिला तत्काळ तीं बाळें एकरूप होऊन सहामुखाचें; व बारा हातांचें असें एक बाळक तेथें दृष्टीस पडलें. तत्काळ पार्वतीसह शंकर त्या ठिकाणीं येऊन त्या बालकाचें नांव त्यांनीं कार्तिकस्वामी असें ठेविलें; व ते त्यास घेऊन परत कैलासाला गेले शंकराला पुत्र झाला असें समजतांच सर्व देव शंकराजवळ प्राप्त झाले; व त्यांनीं शिवपुत्राला अनेक आयुधेंहि दिलीं. शंकरानेंहि देवकार्यासाठीं आपल्या पुत्राला देवांचा सेनापति करून तारकाशीं युद्ध करण्याकरितां पाठविलें. तारकाचें व कार्तिकस्वामीचें युद्ध सुरू असतां कार्तिकस्वामीनें तारकावर एक शक्ति फेंकिली. ती शक्ति तारकाचें हृदय भेदून जी निघाली ती थेट चमत्कारनगरींत जाऊन पडली. नंतर कार्तिकस्वामीनें तारकाचा नाश केल्यावर चमत्कारक्षेत्रांत पडलेल्या शक्तीची आपल्या नांवानें स्थापना केली. ह्या शक्तीचें पूजन करणारे रोगमुक्त होऊन शिवलोकाला प्राप्त होतात.

---

# अध्याय ७२ वा.

## कौरवयात्राप्रस्थान.

सूत म्हणतात; दुर्योधनादि शंभर पुत्र, पांडव व भीष्मद्रोणादि सर्व परिवार यात्रा करण्याकरितां बाहेर निघाला. सर्व कौरव आनर्तादि देशांतून फिरत फिरत हाटकेश्वराच्या सन्निध प्राप्त झाले, तेथील सर्व शोभा पाहून ते काशी, गया, प्रयाग वगैरे यात्रा करून व त्या त्या ठिकाणीं सर्व तीर्थविधि उरकून काञ्चीक्षेत्राला प्राप्त झाले. नंतर त्या ठिकाणीं भीष्म धृतराष्ट्राला व दुर्योधनादि कौरवांना ह्मणतात कीं; हें क्षेत्र फारच पुण्यदायक आहे; करितां येथें पांच दिवस राहून नंतर दुसरीकडे जावें, असा माझा मानस आहे. नंतर सर्व कौरवांनीं तेथें स्नानादि विधि उरकून श्राद्धादिहि धर्मकर्में आचरण केलीं; व पुष्कळ ब्राह्मणांना आमंत्रण देऊन अनेक दानेंहि दिलीं. त्या ठिकाणीं आपआपल्या नांवांनीं अनेक पुण्यस्थानें व लिंगें स्थापून त्यांचीं महात्म्येंहि वृद्धिंगत केलीं. नंतर कौरवांनीं तेथें भगवन्नामाचा जयजयकार करीत पांच दिवस आक्रमिल्यावर ते कृतकृत्य होत्साते आपल्या परिवारासह द्वारकेला प्राप्त झाले.

---

## अध्याय ७३ वा.

### कौरवप्रासादस्थापन.

सर्व कौरव द्वारकेंत आल्यावर भानुमतीशीं दुर्योधनाचा विवाह झाला. त्या विवाहोत्सवामध्यें अनेकप्रकारचा वाद्यघोष चालला होता. कांहीं दिवस द्वारकेंत राहिल्यावर भीष्मप्रमुख मंडळींनीं हस्तिनापुरांत जाण्याची इच्छा दर्शित केली असतां कृष्णानें त्यांना राहण्याविषयीं पुष्कळ आग्रह केला. कृष्णाच्या आग्रहाबद्दल आभार मानून भीष्म म्हणतात; कृष्णा ! आम्हीं हस्तिनापुराहून येथें येत असतां वाटेंत हाटकेश्वर नांवाचें एक क्षेत्र होतें; त्या क्षेत्रांत अनेकप्रकारचीं लिंगें पाहून आम्हांलाही आपआपल्या नांवानें लिंगें स्थापण्याची इच्छा झाली आहे; करितां आम्ही आतां लवकरच तेथें जाणार. असें भीष्माचें भाषण ऐकून श्रीकृष्णप्रमुख सर्व मंडळीहि कौरवांबरोबर हाटकेश्वरक्षेत्रांत जाण्यास निघाली. नंतर सर्व मंडळींनीं हाटकेश्वरक्षेत्रांत जाऊन; व अनेक ब्राह्मणांना आमंत्रण देऊन तेथें प्रत्येकानें प्रासाद ( देवालय ) बांधून त्यांत शिवलिंगहि स्थापिलें.

---

## अध्याय ७४ वा.

### लिंगप्रतिष्ठा.

धृतराष्ट्रानें शंभर पुत्रांसह एकशेंएक प्रासाद व लिंगें स्थापिलीं. पांच पांडवांनीं पांच लिंगें स्थापिलीं. द्रौपदी, कुंती, गांधारी व भानुमती ह्या चौघींनीं चार लिंगें स्थापिलीं. विदुरादिकांनींहि एक एक लिंग स्थापिलें. श्रीकृष्णानें सर्वांत उंच देवालय बांधून एक लिंग स्थापिलें. श्रीकृष्णाच्या रुक्मिणीपासून झालेल्या दहा मुलांनींहि एक एक शिवलिंग स्थापित केलें.

---

## अध्याय ७५ वा.

### देवयजनमाहात्म्य.

पूर्वीच्या कल्पामध्यें हें क्षेत्र शंकरानें महादेवाला दिलें होतें. नंतर शंकराच्या आज्ञेवरून कार्तिकस्वामीनें हाटकेश्वरक्षेत्रांत वास केला. जे कोणी कार्तिक-

महिन्यांत कृत्तिकानक्षत्र असतां ह्या हाटकेश्वरक्षेत्रांत येऊन कार्तिकस्वामींचें दर्शन घेतील ते सात जन्मपर्यंत श्रीमान् व विद्वान् अशा ब्राह्मणकुळांत जन्माला येतील. हाटकेश्वरक्षेत्रांत असणारा कार्तिकस्वामीचा प्रासाद फारच मनोहर आहे; व इतका उंच आहे कीं, जणुंकाय आकाशप्राशन करण्याकरितांच उंच जात आहे; असा पाहणारास भास होतो. ही हाटकेश्वराची उत्तम शोभा पाहून देवांनाहि त्या क्षेत्रांत जाण्याची इच्छा होऊन ते त्याठिकाणीं प्राप्त झाले. यज्ञ करण्यास योग्य व सर्व गोष्टींनीं अनुकूल अशी ही हाटकेश्वरक्षेत्राची पुण्यभूमि पाहून देवांनाहि त्या ठिकाणीं यज्ञ करण्याची इच्छा झाली; व त्यांनीं अनेक ब्राह्मणांचें साहाय्य घेऊन यज्ञास प्रारंभ केला. तो यज्ञ यथासांग संपूर्ण होतांच देवांनीं त्या ब्राह्मणांस योग्य दक्षिणा देऊन त्यांचें सत्कारादि पूजन केलें. यज्ञकर्मांच्या पुण्यदिव्यानें प्रतिष्ठान्तःकरणाचे; व त्यामुळें झालेले देव परत स्वर्गाला जाते झाले. त्या दिवसापासून ह्या स्थानाला 'देवयजन' हें नांव प्राप्त झालें. या देवयजन स्थानांत यज्ञ केला असतां कोट्यावधि यज्ञ केल्याचें फळ मिळतें.

---

## अध्याय ७६ वा.

---

## त्रिभास्करमाहात्म्य.

सूत म्हणतात,–आतां तुम्हाला मुण्डीर, कालप्रिय; व मूलस्थान अशा तीन भास्करांचें माहात्म्य सांगतों. एक विटंक नांवाच्या नगरामध्यें ब्राह्मण राहत होता; त्याची भार्या कुष्ठरोगानें पीडित असती झाली; त्या कुष्ठरोगाच्या नाशार्थ तिनें अनेक उपाय केले; परंतु त्यांचा कांहीं उपयोग झाला नाहीं. एकदां त्या ब्राह्मणाचे घरीं एक अतिथी प्राप्त झाला, त्या अतिथीचा सत्कार कुष्ठी स्त्रीनें उत्तमतऱ्हेनें केल्यामुळें; अतिथी प्रसन्न होऊन त्या स्त्रीस म्हणतो कीं, तुझ्याप्रमाणें मीहि कुष्ठरोगानेंच पीडित होतों; परंतु मुण्डीर, कालप्रिय व मूलस्थान ह्या त्रिभास्करक्षेत्रांत स्नानादि केल्यामुळें माझें कुष्ठ समूळ नष्ट झालें आहे; करितां तूंहि त्या ठिकाणीं जाऊन स्नानादि कर; म्हणजे कुष्ठमुक्त होशील; असें अतिथीचें भाषण ऐकून, त्या कुष्ठी ब्राह्मणस्त्रियेनें त्रिभास्करक्षेत्रांत जाण्याचा निश्चय केला. नंतर अतिथि निघून गेल्यावर ती कुष्ठी स्त्री पतीसह त्रिभास्करक्षेत्रांत जाण्याकरितां निघाली. व स्नानादि करून त्या ठिकाणीं सूर्याची उपासना करीत असतां, त्या मुण्डीरादि त्रिभास्कराच्या कृपेनें ती स्त्री कुष्ठरहित होऊन पतीसह आनंदांत राहती झाली. हें त्रिभास्करमाहात्म्य श्रवण करणारे दोषमुक्त व कुष्ठमुक्त होतात.

---

## अध्याय ७७ वा.

### हराश्रयवेदिकामाहात्म्य.

ब्रह्मदेवाच्या उजव्या पायाच्या अंगठ्यापासून, दक्षप्रजापति उत्पन्न झाला. त्या दक्षाला पांचशें कन्या झाल्या; त्यांपैकीं सर्वांत वडील सती नांवाची कन्या होती, दक्षानें सतीचा विवाह शंकराशीं लाविला. शंकर–पार्वती होम करीत असतां, ब्रह्मदेवाच्या मनांत पार्वतीचें मुख अवलोकन करण्याचें आल्यामुळें, त्यांनीं होमांत ओलीं इंधनें [ लाकडें ] टाकून व तुपाच्या आहुती कमी करून, जिकडेतिकडे धूर करून सोडला. शंकराचे डोळे धुरानें पीडित झाल्यामुळें, त्यानें आपल्या हातांनीं डोळे झाकले. ही संधी साधून ब्रह्मदेवानें पार्वतीच्या मुखावरील बुरखा बाजूला सारून, यथेच्छ तिच्या मुखाचें अवलोकन करून आपली इच्छा पूर्ण केली. पार्वतीचें मुख पाहतांच, ब्रह्मदेवाचें रेत स्खलित झालें. हा प्रकार ज्ञानदृष्टीनें शंकराला समजतांच, त्यानें त्याला शिक्षा करण्याचा बेत मनांत आणिला असतां, ब्रह्मदेव शंकराला शरण गेल्यामुळें; शंकरानें ब्रह्मदेवाला त्या दोषाच्या नाशार्थ प्रायश्चित्त सांगितलें. ज्या ठिकाणीं शंकर–पार्वतीनें विवाहहोम केला; व ब्रह्मदेवाला दोषमुक्तता प्राप्त झाली, त्या वेदीला हराश्रयवेदिका म्हणतात. ह्या हराश्रयवेदीवर साक्षात् शंकर पार्वतीसह वास करितात. जे कोणी ह्या ठिकाणीं स्नान करून शंकरपार्वतीचें पूजन करितात, ते सर्व पापापासून मुक्त होऊन शिवलोकाला प्राप्त होतात. जी स्त्री ह्या ठिकाणीं शिवपार्वतीचें दर्शन घेईल, ती पुत्रपौत्रवती होऊन मोक्षाला जाईल.

---

## अध्याय ७८ वा.

### रुद्रशीर्षमाहात्म्य.

शंकरानें सांगितल्याप्रमाणें ब्रह्मदेव प्रायश्चित्त आचरण करण्याकरितां म्हणून हराश्रयवेदिकेच्या वायव्येला जाऊन तप करिता झाला. त्या स्थानाला रुद्रशीर्ष म्हणतात. त्या ठिकाणीं एकदा एक स्त्री परपुरुषाशीं व्यभिचार करीत असतां तिच्या पतीनें तिला पाहिलें. त्या वेळीं तो पति त्या स्त्रियेला म्हणाला कीं, जर तूं शुद्ध असलीस तर चिता पेटवून त्यांत आपला देह दग्ध करून घे. जर तुला अग्नीनें जाळिलें तर तूं पापी आहेस, असें आम्ही समजूं; व जर तुला

अग्नीनें जाळिलें नाहीं, तर तूं निष्पाप आहेस; असें आम्ही समजूं; व तुझा स्वीकार करूं. नंतर त्या स्त्रीनें बरें आहे, असें म्हणून, व रुद्रशीर्षाला नमस्कार करून चितेंत उडी टाकिली. चितेंत उडी टाकितांच अग्नि शांत झाला; व तिला अग्नि दग्ध करूं शकला नाहीं. हें पाहून तिच्या पतीला राग आला; व म्हणाला कीं, धडधडीत व्यभिचार केलेला मी पाहिला असतां अग्नीनें ही शुद्ध आहे, असें कां निदर्शित केलें. ज्यापेक्षां अग्नीनें खोटी सिद्धता केली, त्यापेक्षां मी आज अग्नीला दग्ध करणार; असें म्हणून तो ब्राह्मण हातांत उदक घेऊन जमिनीवर टाकणार, इतक्यांत अग्नि प्रगट होऊन ब्राह्मणास म्हणतो कीं, जरी तुझी पत्नी व्यभिचार करणारी आहे, तरी सुद्धां तिनें रुद्रशीर्षाचें दर्शन घेतल्यामुळें तुझी स्त्री दोषमुक्त आहे; व ह्मणूनच मी तिला जाळिलें नाहीं. असें अग्नीचें भाषण ऐकतांच ब्राह्मणाला आनंद झाला; व त्या पत्नीसह तो आनंदानें राहूं लागला. तात्पर्य, रुद्रशीर्षाच्या दर्शनानें मोठमोठे व्यभिचारादि दोषसुद्धां नष्ट होतात; मग सामान्य दोष नष्ट होतील, हें सांगावयास नकोच.

## अध्याय ८० वा.

### वालखिल्याश्रममाहात्म्य.

रुद्रशीर्षाच्या दक्षिणेस वालखिल्य ऋषींनीं स्थापिलेलें एक शिवलिंग आहे. त्या शिवलिंगाच्या प्रभावानें वालखिल्याश्रमाला अत्यंत पवित्रता प्राप्त झाली आहे. एकदां दक्षप्रजापति यज्ञ करीत असतां वालखिल्य मुनि त्या यज्ञांत जाण्याकरितां निघाले. वाटेंत अकालीं पर्जन्य पडल्यामुळें जागोजागीं नद्या तुडुंब भरून गेल्या होत्या व त्यामुळें मुनींना फार त्रास झाला. इंद्रानें अकालीं पर्जन्य पाडून आम्हांला त्रास दिला, असें समजून त्याचे जागीं दुसरा इंद्र नेमावा, असा वालखिल्यांनीं विचार केला; नंतर वालखिल्यांनीं इंद्राच्या नाशार्थ एक यज्ञ आरंभिला. त्यायोगें इंद्राला अपशकुन होऊं लागले व तो घाबरून गेला. आपल्या नाशार्थ वालखिल्यांनीं यज्ञ आरंभिल्यामुळें आपणाला अपशकुन होतात, हें गुरुमुखानें समजतांच इंद्र वालखिल्यांजवळ जाऊन केलेल्या अपराधाची क्षमा मागता झाला. वालखिल्यांनीं प्रसन्न होऊन इंद्राला अभयवचन देऊन त्या स्थानाला वर दिला कीं, जे कोणी ह्या कुंडांत होम करितील व येथें स्थापिलेल्या शिवलिंगाचें पूजन करितील त्याचे सर्व इच्छित मनोरथ सफल होतील. असें म्हणतांच इंद्र वालखिल्यमुनींना ऐरावतावर बसवून दक्षयज्ञामध्यें घेऊन जाता झाला. वालखिल्य आलेले पाहून दक्षानें त्यांचा योग्य सत्कार केला; व त्यांच्या साहाय्यानें स्वतःचा यज्ञ यथासांग समाप्त केला.

## अध्याय ८० वा.

### विष्णुदर्शन.

एके गरुडाचा भृगुकुळांत उत्पन्न झालेला मित्र होता. त्या मित्राला माधवी नांवाची एक कन्या झाली. त्या मित्रानें माधवीच्या विवाहार्थ योग्य वर पाहण्याविषयीं गरुडाची विनंती केली. गरुड म्हणतो मित्रा! तूं व तुझी मुलगी उभयतां माझ्या खांद्यावर बसून सर्वत्र भ्रमण करा; व तुम्हीच हिला योग्य वर पाहा. मी तुम्हाला मित्र ह्या नात्यानें अशाप्रकारें मदत देऊं शकेन. नंतर गरुडाच्या सांगण्याप्रमाणें तो ब्राह्मण व माधवी उभयतां गरुडावर बसून सर्वत्र भ्रमण करूं लागली. गरुड फिरत फिरत त्यांना घेऊन श्वेतद्वीपाचे ठिकाणीं प्राप्त झाला. त्या ठिकाणीं नारदाची गांठ पडून विष्णुदर्शनाबद्दल माधवी व तो गरुडमित्र उभयतां नारदाजवळ प्रश्न करते झाले कीं, आम्हाला विष्णूचें दर्शन घ्यावयाचें आहे; व तें कोठें होईल तें सांगा. नंतर नारद म्हणतात; ब्रह्मन्! विष्णु हाटकेश्वरक्षेत्रामध्यें राहत असतात; करितां आपण तेथें जावें. मीहि तिकडे जाण्याकरितांच निघालों आहे. असें म्हणून नारद, गरुड, ब्राह्मण व माधवी सर्व हाटकेश्वरक्षेत्रांत प्राप्त झालीं. विष्णूजवळ येतांच ब्राह्मणाला गरुड म्हणतो कीं, विष्णूचें तेज तुम्हाला सहन होणार नाहीं; करितां तुम्ही येथेंच बसा, व मी पुढें विष्णूजवळ जातों. असें म्हणून त्यांना तेथें ठेविलें; व गरुड आणि नारद विष्णूजवळ प्राप्त झाले. नंतर नारद विष्णूला म्हणतो कीं, कालनेमिप्रमुख राक्षसांनीं पृथ्वीला त्रास दिला आहे; व ती ब्रह्मदेवाला शरण गेली आहे. आतां तुम्ही पृथ्वीचें रक्षण करून कालनेमिप्रमुख राक्षसांचा नाश करावा, अशी आमची इच्छा आहे; व आम्ही आपणाला ही सूचना देण्याकरितां आलों आहों.

## अध्याय ८१ वा.

### गरुडपक्षनाश.

अशातऱ्हेनें नारदाचें भाषण संपताच विष्णूनें गरुडाला आगमनाचें कारण विचारिलें. नंतर गरुड म्हणतो; विष्णो! माझ्या एका मित्राची माधवी नांवाची एक मुलगी आहे; व तिचा विवाहहि व्हावयाचा आहे. तिला योग्य वर मिळावा; म्हणून सर्वत्र फिरलों; परंतु मला तिच्या योग्य असा एकहि वर दिसला नाहीं.

शेवटीं तिला आपणच एक योग्य आहां, असा विचार करून मी ती मुलगी आपणाला देण्याचा विचार केला आहे; व आपण तिचा स्वीकार कराल, अशी माझी आशा आहे. त्याच कारणास्तव मी आपणांकडे आलों आहे. असें गरुडाचें भाषण ऐकून विष्णु म्हणतात कीं, त्या मुलीला इकडे घेऊन या; व जर ती मला पसंत पडली तर मी कबूल होईन. असें विष्णुवाक्य ऐकतांच गरुड माधवीला; व मित्राला घेऊन विष्णूकडे आला. गरुडाचा मित्र गरुडाजवळ बसला; परंतु माधवी बाल्यभावाला अनुसरून विष्णुशय्येवर बसली. हें माधवीचें वर्तन जवळ बसलेल्या लक्ष्मीला न आवडून तिनें माधवीला शाप दिला कीं, तूं अश्वमुखी हो. माधवीला शाप दिलेला ऐकून ब्राह्मणाला राग आला; व त्यानें लक्ष्मीला तूं हत्तीण होशील, असा शाप दिला; नंतर विष्णूनें उभयतांचें सांतवन केलें व ब्राह्मण आणि माधवी स्वस्थानाला निराश होऊन निघून गेलीं; नंतर गरुडाची शांडिली नामक ऋषीला गांठ पडली असतां, तो तिला अनेकप्रकारें त्रास देऊं लागला. त्या वेळीं शांडिलीनें गरुडाचे दोन पंख तोडून टाकिले.

## अध्याय ८२ वा.

### गरुडेश्वरमाहात्म्य.

गरुडाचे पंख तुटल्यामुळें त्यास फार वाईट वाटलें व तो विष्णूला शरण गेला. विष्णूनें शंकराची आराधना करण्यास सांगितल्यावरून गरुडानें हाटकेश्वरक्षेत्रांत गरुडेश्वर नांवानें लिंग स्थापून त्याची आराधना करण्यास सुरुवात केली. त्याच्या आराधनेनें शंकर प्रसन्न होऊन गरुडाला पूर्वीप्रमाणें पंख उत्पन्न झाले; नंतर शंकर गरुडाला म्हणतात; गरुडा ! मी ह्या लिंगाचेठिकाणीं वास केला आहे. आजपासून जे कोणी ह्या गरुडेश्वराचें पूजन करितील ते शापादिपीडाजनित क्लेशापासून मुक्त होतील. जे कोणी ह्या लिंगाचें पूजन करून अनुष्ठान करितील ते जरी ब्रह्महत्या, मद्यपान; चोरी बालहत्या इत्यादि दुष्कर्म करणारे असले तरी दोषमुक्त होतील. ह्याच्या पूजनानें शिवसायुज्यहि प्राप्त होतें.

## अध्याय ८३ वा.

### गरुडेश्वरमाहात्म्य. ( पुढें चालू )

आतां गरुडेश्वरमहात्म्याला उद्देशून एक कथानक सांगतों; ऐका. पूर्वी सूर्यवंशांत उत्पन्न झालेला एक वेणु नांवाचा राजा होता. तो दुर्वर्तन करणारा व

ब्राह्मणांना त्रास देणारा असा होता. त्यानें सर्व स्त्रिया आपल्या दुराचरणानें भ्रष्ट केल्या होत्या. तो राजा प्रजांना आज्ञा करी कीं, मी राजा असल्यामुळें तुम्ही माझें पूजन करा, देवादिकांचें पूजन करूं नका. त्या राजानें एकहि पुण्यकृत्य केलें नव्हतें. त्याच्या दुष्कृत्याच्या परिणामानें तो राजा कुष्ठादि रोगानें पीडित झाला. त्या राजाचा पुत्रादिकांनीं त्याग केला असतां तो फिरत फिरत हाटकेश्वरक्षेत्रांत प्राप्त झाला. नंतर गरुडेश्वरासन्निध येऊन त्याचें दर्शन घेतांच तो राजा रोगरहित होऊन शिवलोकाला जाता झाला. शिवलोकीं गेलेल्या त्या राजाला पाहून पार्वती शंकराला प्रश्न करिते कीं, हे पुण्यपुरुष कोण आहेत? वगैरे त्यांची हकीगत मला सांगा. त्या वेळीं शंकर पार्वतीला म्हणतात, प्रिये! हा राजा भूलोकांत राहणारा असून ह्यानें पूर्वी पुष्कळ पापकर्म केलें होतें. शेवटीं स्वतःच्या दुष्कर्मानें त्याला कुष्ठरोग प्राप्त झाला; व त्यायोगें स्वजनांनीं त्याचा त्याग केल्यामुळें हा फिरत फिरत हाटकेश्वराजवळ येऊन गरुडेश्वराचें दर्शन घेता झाला. त्याच्या दर्शनानें निष्पाप होऊन सांप्रत हा माझ्या लोकाला प्राप्त झाला आहे. असें शंकराचें भाषण ऐकून पार्वतीला मोठा आनंद झाला; व त्यानें वेणुब्राह्मणाला धन्यवाद दिले. गरुडेश्वरासंनिध प्राणत्याग करणारे मुक्त होतात. हें माहात्म्य श्रवण करणारेहि शिवलोकाला जातात.

---

## अध्याय ८४ वा.

### सुभद्राख्यान.

पूर्वी सांगितल्याप्रमाणें माधवीला लक्ष्मीनें अश्वमुखी हो, असा शाप दिला असतां माधवीच्या बापानें तिला शापापासून निवृत्त करण्याकरितां तपश्चर्या आरंभिली. इकडे कांहीं दिवसांनीं जेव्हां विष्णूनें कृष्णावतार घेतला, त्या वेळीं वसुदेवाच्या सुप्रभानामक स्त्रीचे ठिकाणीं ही अश्वमुखी कन्या उत्पन्न झाली. कृष्ण व बलिराम ह्यांना आपली बहीण अश्वमुखी झाली आहे, असें पाहून फार वाईट वाटलें; व ते तिला घेऊन ब्रह्मदेवाकडे गेले. ब्रह्मदेवानें प्रसन्न होऊन तिला रूपवती करून तिचें नांव सुभद्रा असें ठेविलें. नंतर कांहीं काळानें अर्जुनानें सुभद्रेशीं विवाह लाविला. अर्जुनापासून सुभद्रेला अभिमन्यु नांवाचा एक मुलगा झाला. तो अभिमन्यु फारच पराक्रमी असता झाला.

## अध्याय ८५ वा.

### महालक्ष्मीमाहात्म्य.

ब्राह्मणानें लक्ष्मीला जो शाप दिला त्या शापाचे योगें ती हत्तीप्रमाणें अशा त्याच्या मुखानें युक्त अशी असतां झाली. हत्तीचें मुख प्राप्त झालेली लक्ष्मी ह्या क्षेत्रामध्यें येऊन तप करिती झाली. तिच्या तपानें महादेव संतुष्ट होऊन म्हणतात; लक्ष्मी ! मी प्रसन्न झालों आहे. वर माग. नंतर लक्ष्मी म्हणते; महादेव ! मला आपण शापमुक्त करून पूर्वीप्रमाणें रूपवती करा. असें लक्ष्मीचें भाषण ऐकून महादेव म्हणतात; देवी ! तूं आजपासून शापमुक्त झाली आहेस. तुझें नांव मी महालक्ष्मी असें ठेविलें आहे. हत्तीचें मुख असलेल्या तुझें जे पूजन करितील ते गजान्तलक्ष्मीचा उपभोग घेतील. असा वर देऊन महादेव निघून गेले.

## अध्याय ८६ वा.

### सप्तविंशतिकामाहात्म्य.

त्याच हाटकेश्वरक्षेत्रामध्यें सत्तावीस नक्षत्रांनीं स्थापिलेली, सप्तविंशतिका नांवाची एक देवी आहे. पूर्वी चंद्रानें दक्षाच्या अश्विनीप्रमुख अठ्ठावीस मुलींशीं विवाह लाविला. चंद्र रोहिणीनामक स्त्रीवरच फक्त प्रेम करितो; आमच्या-वर करीत नाहीं, असा विचार करून अश्विन्यादि नक्षत्रांनीं; ह्या क्षेत्रामध्यें एक देवी स्थापून तिची आराधना केली. कांहीं काळानें देवी संतुष्ट होऊन अश्वि-न्यादिकांस म्हणते कीं, तुम्हीं इच्छित वर मागून घ्या. नंतर अश्विन्यादिकांनीं इष्ट वर मागून घेतला असतां त्यांच्या इच्छा पूर्ण करून, सप्तविंशतिका नामक देवी अश्विन्यादिकांस म्हणते; जे कोणी ह्या सप्तविंशतिकानामक माझें पूजन करितील, त्या पतीसह सुखानें युक्त होऊन शेवटीं पतीसह माझ्या लोकाला येतील.

## अध्याय ८७ वा.

### सोमप्रासादमाहात्म्य.

ह्या हाटकेश्वरक्षेत्रांत, एक सोमप्रासाद नांवाचें स्थान आहे. सोमवारीं चंद्र-ग्रहण असतां जे कोणी सोमप्रासादाचें दर्शन घेतील, ते सर्व पापापासून मुक्त

होतील. ह्याच प्रासादाचें दर्शन घेऊन अंबरीष, धुंधुमार व इक्ष्वाकु हे तीन राजे सत्यलोकाला प्राप्त झाले. सौम्यनक्षत्र[1], सोमवार, सौम्यमास[2], सोमदेवताक तिथि[3] व सोमग्रहण[4] ह्या सोमपंचकांनीं युक्त अशा योगांवर तयार केलेल्या सोमप्रासादाचें माहात्म्य वर्णन करणें हें ब्रह्मादि देवांनाही अशक्य आहे. हें चंद्रप्रासादमाहात्म्य श्रवण करणारेहि शिवलोकाला प्राप्त होतात.

## अध्याय ८९ वा.

### अंबावृद्धामाहात्म्य.

सूत म्हणतात; शौनकादि ऋषिहो ! चमत्कारराजानें ज्या वेळीं हाटकेश्वरक्षेत्र निर्माण केलें, त्या वेळीं त्या क्षेत्राचें रक्षणार्थ पूर्वोक्त चमत्कारी, माहित्था, महालक्ष्मी व ही अंबावृद्धा अशा चार देवता स्थापित केल्या. त्या चमत्कार राजाची अंबा नावाची एक कन्या होती; व दुसरी वृद्धा नांवाची कन्या होती. अंबा व वृद्धा ह्या दोनही राजकन्येशीं काशीराजानें विवाह लाविला होता. मध्यंतरीं कांहीं काळ निघून गेल्यावर काशीराजाचें कालयवनाबरोबर मोठें युद्ध झालें. त्या युद्धांत काशीराजाचा अंत झाल्यामुळें अंबा व वृद्धा ह्यांना वैधव्य प्राप्त झालें. अंबा व वृद्धा ह्यांनीं हाटकेश्वरक्षेत्रांत गमन करून शत्रुनाशार्थ घोरतर देवताराधन आरंभिलें. देवता प्रसन्न होत नाहीं, असें जाणून त्या दोघींनीं हातांत सुऱ्या घेतल्या व आपल्या अंगाचें मांस उकरून देवतांना अर्पण करण्याकरितां होमकुंड तयार करून त्यांत तें मंत्रपूर्वक अर्पण केलें. इतकें निर्वाण करितांच एकाएकीं त्या कुंडांतून एक स्त्री उत्पन्न झाली. त्या देवतारूप स्त्रीला पाहून दोघींनीं तिची पुष्कळ स्तुति केली; व आपला दुष्ट हेतु तिला कळविला. नंतर अंबा व वृद्धा ह्यांच्या शत्रुनाशार्थ देवीनें असंख्य देवता निर्माण करून तें काशीराजाचें राज्य शत्रुरहित केलें. अंबा व वृद्धा ह्यांनींहि त्या देवतांची उत्तमप्रकारें संभावना केली. नंतर चमत्कारराजानें हाटकेश्वरक्षेत्रामध्यें अंबावृद्धा नांवाचें मंदिर तयार करून तेथें देवींची स्थापना केली. महानवमीचे दिवशीं जे अंबावृद्धादेवींचें पूजन करितील ते मुक्त होतील.

---

१ मृगनक्षत्र, २ श्रावणमास, ३ त्रयोदशी, ४ चंद्रग्रहण.

## अध्याय ८९ वा.

### श्रीमातृपादुकामाहात्म्य.

श्रीमातानामक देवीनें लोककल्याणार्थ हाटकेश्वरक्षेत्रांत अंबावृद्धेच्या समीप आपल्या पादुका स्थापित करून सर्व देवांना सांगितलें कीं, जे कोणी ह्या माझ्या पादुकांचें पूजन करितील ते निर्भय व दोषमुक्त होऊन सुखानें माझ्या लोकाला प्राप्त होतील व जे मद्यमांसादिकांनीं मला तृप्त करितील तेंहि चिरकाल माझ्या लोकाला प्राप्त होतील. असें देवीचें भाषण ऐकून त्या दिवसापासून पुष्कळ लोक मद्यमांसादिकांनीं श्रीमातेच्या पादुकांना नैवेद्य दाखवून मुक्त होते झाले. हा प्रकार पाहून धर्माभिमानी व मद्यमांसांचा द्वेष करणारे ब्राह्मण शंकराजवळ जाऊन ह्मणतात कीं, देवदेवा ! पुष्कळ लोक श्रीमातेचें मद्यादि निंद्य पदार्थांनीं पूजन करून स्वतः ते धर्मबाह्य पदार्थ प्रसाद ह्मणून भक्षण करतात, व त्यायोगें मुक्त होतात, हा प्रकार तरी काय आहे ? तें सांगा. ह्यामुळें सर्व लोक धर्मभ्रष्ट व अभक्ष्य–भक्षण करणारे झाले आहेत; तेव्हां आपण ह्याचा विचार करून लोक पूर्ववत् धर्मिष्ठ होतील असें करा; नंतर शंकर ब्राह्मणांना म्हणतात: ब्राह्मण हो ! श्रीमाता ही साक्षात् आदिशक्ति आहे. तिच्या कृत्यांत व्यत्यय आणणें अशक्य आहे, तरीसुद्धां मी यथाशक्ति तुमचें हित साधण्याविषयीं खटपट करितों. असें ह्मणून शंकरानें एक देवता निर्माण करून तिच्याकडून मद्यमांसाच्या नैवेद्याबद्दलच्या विधीचा परिहार करविला, व सांगितलें कीं श्रीमातेला अर्पण केलेल्या मद्यादिकांचें भक्षण दोषरूप होत नाहीं, असा त्या स्थानाला वर दिला. जे कोणी श्रीमातादेवीचें व तिच्या पादुकांचें माहात्म्य श्रवण करितील, ते सर्व बंधापासून मुक्त होऊन शिवलोकीं जातील.

## अध्याय ९० वा.

### वसोर्धारामाहात्म्य.

पूर्वीं सोमवंशांत प्रतीप नांवाचा एक राजा असता झाला. त्याला देवापि व शंतनु असे दोन पुत्र होते. प्रतीप राजा शिवलोकीं गेल्यावर देवापिहि अरण्यांत तप करण्याकरितां निघून गेला. नंतर प्रधानांनीं शंतनूला राज्याभिषेक केला असतां, त्याच्या राज्यांत बारा वर्षें दुष्काळ पडला. एकदां विश्वामित्र फिरत

फिरत चांडाळाचे घराजवळ प्राप्त झाला असतां, आपद्धर्माला अनुसरून त्यानें तेथें पडलेल्या मृत कुत्र्याचें मांस काढून होम केला; व तें मांस भक्षण केलें. विश्वामित्रानें कुत्र्याचें मांस अग्नीला अर्पण केल्यामुळें, तो त्या कुंडांतून जो निघाला तो एका गुहेंत दडून बसला. त्रैलोक्यांत कोठेंहि अग्नि नाहीं, असें पाहून ब्रह्मादिदेव अग्नीच्या शोधार्थ बाहेर पडले. शोधतां शोधतां पुष्कळ काळानें ब्रह्मादिदेवांना अग्नीची गाठ पडली. देवांनीं अग्नीला लपून बसण्याचें कारण विचारिलें असतां, अग्नि म्हणतो; देवहो! मी इंद्रावर फार रागावलों आहे. इंद्रानें पर्जन्य न पाडल्यामुळें सर्वत्र दुष्काळ पडला आहे; व त्यामुळें विश्वामित्रानें कुत्र्याचें मांस मला खावयास घातलें, करितां मी त्या भीतीनें येथें लपून बसलों आहे; असें अग्नीचें भाषण ऐकून इंद्र देवांना म्हणतो कीं, शंतनु वडिल भावाला वडिलोपार्जित राज्यावर न बसवितां स्वतः बसला, हा त्यानें मोठा अपराध केला आहे; करितां मी त्याचें राज्यांत पर्जन्य पाडला नाहीं, ह्यांत माझा मुळींच दोष नाहीं. असें इंद्राचें भाषण ऐकतांच, ब्रह्मदेवानें इंद्राला पाऊस पाडण्याची आज्ञा केली; व सर्वत्र शांतता झाली. जेथें अग्नि लपून बसला होता, त्या स्थानाला वह्नितीर्थ हें नांव प्राप्त झालें. ब्रह्मदेवानें वह्नितीर्थाला वर दिला कीं, जे कोणी ह्या तीर्थाचे सन्निध होमहवन करून, अग्नीला तुपाच्या योगें वसोर्धारा अर्पण करून तृप्त करितील, ते पापरहित होत्सातें सूर्यलोकाला प्राप्त होऊन मोक्षाला जातील. ज्या वेळीं शिबिनामक राजा ह्या ठिकाणीं वसोर्धाराविधीनें तुला तृप्त करील; तेव्हां तूं पुष्टतेला प्राप्त होशील, असें अग्नीला सांगून ब्रह्मादिदेव स्वस्थानीं निघून गेले. हें माहात्म्य श्रवण केलें असतां, श्रेष्ठलोक प्राप्त होतो.

---

## अध्याय ९१ वा.

---

### अग्नितीर्थोत्पत्ति.

त्या दिवसापासून अग्नि सर्वत्र वास्तव्य करून आपआपले हविर्भाग ग्रहण करूं लागला. ह्या अग्नितीर्थांत स्नान करून जो होमहवनादि सत्कृत्य करितो, तो सर्व पातकापासून मुक्त होतो. सर्व देव, ऋषि वगैरे ह्या अग्नितीर्थांत स्नान करून कृतकृत्य झालें. ह्या अग्नितीर्थाचे ठिकाणीं देवांनीं एक मंदिर निर्माण करून तेथें अग्नीची स्थापना केली. अग्नितीर्थाचें पूजन केल्यामुळें इंद्र सुद्धां ब्रह्महत्यादि दोषापासून मुक्त झाला. ह्या अध्याय श्रवण व पठण केला असतांहि सर्व दुःखें नष्ट होऊन अनेक प्रकारच्या सुखाची व मोक्षाचीहि प्राप्ति होते.

## अध्याय ९२ वा.

### ब्रह्मकुण्डमाहात्म्य.

हें ब्रह्मकुंड मार्कण्डेय मुनीनें निर्माण केलें आहे. जे कोणी कृत्तिकानक्षत्रीं चंद्र असतां कार्तिक महिन्यांत ह्या कुंडांत स्नान करून भीष्मपंचकव्रत करितात, ते शूद्र असले तरी ब्रह्मलोकाला प्राप्त होतात. एकदां एक गवळी त्या ब्रह्म-कुंडांत स्नान करून भीष्मपंचकव्रताचें आचरण करिता झाला. त्यायोगानें त्याला सद्गति प्राप्त झाली. ह्याप्रमाणें ब्रह्मकुंडाचें माहात्म्य श्रवण करून तेथील सर्व लोकांनीं ब्रह्मकुंडांत स्नानें करून भीष्मपंचकव्रताला आरंभ केला; व त्यामुळें त्या सर्वांना ब्रह्मलोकाची प्राप्ति झाली. हें आख्यान श्रवण करणारेहि ब्रह्मरूप होतात.

## अध्याय ९३ वा.

### गोमुखतीर्थमाहात्म्य.

पूर्वी चमत्कारक्षेत्रामध्यें एक कुष्ठरोगानें पीडित असा गवळी राहत असे. कांहीं काळानें त्याच रस्त्यानें एक गाईंचा कळप प्राप्त झाला. त्या गाई फारच तृषित व क्षुधित झाल्या होत्या. त्यांपैकीं एका गाईनें दुरूनच एक हिरव्या गवतानें पूर्ण भरलेलें असें कुरण पाहिलें; व ती तेथें धावत जाऊन तेथील तृण भक्षूं लागली. गाईनें तृणभक्षणाला प्रारंभ करतांच एकाएकी त्या तृणापासून एक जलधारा निर्माण झाली. थोडक्याच अवधींत त्या कळपांतील सर्व गायींनीं तृण भक्षण करून व तेथील जल प्राशन करून परत गोठ्यांत जाण्यास प्रारंभ केला. इतक्या तेथें एक कुंड निर्माण होऊन त्या कुंडांत त्या जलधारेचें उदक शिरलें; व तें कुंड उदकपूर्ण झालें. हा सर्व प्रकार पाहून कुष्ठी अशा गवळ्यालाहि मोठें आश्चर्य वाटलें; व तो त्या कुंडाजवळ येऊन स्नानादि करिता झाला. स्नान करून जलप्राशन करताच त्या गवळ्याचें सर्व कुष्ठ नष्ट झालें. हा चमत्कार पाहून तो गवळी सर्व लोकांना ह्या कुंडाचें माहात्म्य व पूर्ववृत्तांत सांगता झाला. हें तीर्थ गायीच्या मुखाच्या संपर्कानें उत्पन्न झालें म्हणून ह्यास गोमुखतीर्थ म्हणतात. ह्या तीर्थाचे काठीं पूर्वी अंबरीष राजानें पुत्रप्राप्त्यर्थ तप केलें असतां त्याला सुवर्चा नांवाचा एक पुत्र झाला. तो सुवर्चा कुष्ठरोगानें पीडित असतां ह्याच तीर्थांत स्नान करून कुष्ठमुक्त होता झाला.

## अध्याय १४ वा.

### लोहयष्टिमाहात्म्य.

पूर्वी परशुरामानें निःक्षत्रीय पृथ्वी करून मिळविलेलें राज्य व संपत्ति ब्राह्मणांना देऊन; व पितरांना तृप्त करून ह्या ठिकाणीं हातांतील कुठार (परशु) खालीं ठेविली. ज्या ठिकाणीं परशुरामानें परशु खालीं ठेविला त्या स्थानाला लोहयष्टि म्हणतात. तेथें परशुरामानें एक तीर्थ निर्माण करून तो कृतार्थ झाला. जे कोणी राजे ह्या लोहयष्टितीर्थात स्नान करितील ते वैकुंठाला प्राप्त होतील.

---

## अध्याय १५ वा.

### अजापालेश्वरीमाहात्म्य.

अजापाल नांवाचा एक राजा होता. त्याच्या मनांत तपश्चर्या करण्याचें आल्यामुळें त्या राजानें वसिष्ठाला प्रश्न केला, कीं, गुरो! सर्व तीर्थांत उत्तम तीर्थ कोणतें? कीं, जेथें तप केलें असतां लवकर सिद्धि प्राप्त होईल. असा राजाचा प्रश्न ऐकून वसिष्ठ म्हणतात; राजन्! ह्या पृथ्वीतलावर अडसष्ट क्षेत्रें असून साडेतीन कोटी तीर्थें आहेत. तथापि हाटकेश्वरक्षेत्रांत चंडिकादेवी आहे, तिचें आराधन कर, म्हणजे तुझा कार्यभाग लवकर होईल. वसिष्ठाच्या सांगण्याप्रमाणें अजापालराजानें चंडिकेचें आराधन करितांच ती प्रसन्न होऊन राजास इष्ट वर देती झाली. त्या दिवसापासून त्या देवीला अजापालेश्वरी हें नांव प्राप्त झालें. अजापाल राजाला त्या चंडिकेच्या प्रसादानें दीर्घायुष्य व सुख मिळून अंतीं शिवलोकहि प्राप्त झाला. हें आख्यान श्रेष्ठ गति देणारें आहे.

---

## अध्याय १६ वा.

### दशरथ—शनैश्चरसंवाद.

त्या अजापाल राजाचे पश्चात्, त्याचा मुलगा दशरथ राज्यपदारूढ झाला. तोहि बापाप्रमाणें पराक्रमी व धार्मिष्ठ होता. त्या राज्यांत एक ज्योतिषी राहत होता. त्यानें राजाला भविष्य सांगितलें कीं, थोडक्याच दिवसांत शनैश्चर

रोहिणीशकटाचा भेद करील; व त्यायोगें राज्यांत मोठा दुष्काळ पडेल. असें ज्योतिषाचें भविष्य ऐकून राजाला फारच राग आला; व वाईट वाटलें. नंतर तो राजा विमानांत बसून, रागारागानें इंद्राकडे जाऊन सर्व वर्तमान निवेदन करिता झाला. इंद्रानें त्या राजाला दुसरें विमान देऊन, शनैश्वराकडे जाण्यास सांगितलें. नंतर तो विमानांत बसून शनैश्वराकडे गेला; व त्यास म्हणतो कीं, हे शनैश्वरा ! तूं हा रोहिणीमार्ग सोडून दुसऱ्या मार्गानें जा; नाहीं तर मी तुला मारून टाकीन. शनैश्वरानें ‘तूं कोण ?’ म्हणून प्रश्न केला असतां राजा म्हणतो, मी दशरथराजा आहे; व मला ज्योतिषानें सांगितलें आहे कीं, तूं जर रोहिणीशकटाचा भेद करिशील तर माझे राज्यांत दुष्काळ पडेल; करितां त्या येणाऱ्या आपत्तीचें नाशन व्हावें; म्हणून मी तुझ्याकडे आलों आहे; असें दशरथराजाचें भाषण ऐकून, शनैश्वराला मोठा आनंद झाला व तो दशरथाला म्हणतो कीं, तूं स्वस्थानीं जा. माझ्यामुळें तुला बिलकूल त्रास होणार नाहीं. तुला इष्ट वर मागावयाचा असल्यास माग. नंतर राजा म्हणतो कीं, तुझ्या वारीं जे तैलाभ्यंग करितील, त्यांना तूं कधींहि पीडा देऊं नये. जे तुला उद्देशून तिलदान अथवा लोहदान करितील त्यांनाहि तुझी पीडा होऊं नये.

---

## अध्याय ९७ वा; व ९८ वा.



### दशरथाख्यान.

त्या दिवसापासून शनैश्वर रोहिणीशकटाचा भेद करीनासा झाला. हें वृत्तांत इंद्राला समजल्यामुळें त्यानें दशरथाची वाहवा केली; व त्याच्याशीं मित्रत्व संपादिलें; व त्यास सतत देवसभेंत अर्ध्या आसनावर बसण्याची परवानगी दिली. दशरथाच्या ह्या वरील कृत्यांनीं त्याचे राज्यांत जिकडे तिकडे आनंदीआनंद सुरू झाला. दशरथ नित्य देवसभेंत जाऊन गायनादि श्रवण करीत असे. कांहीं काळानें नारदाच्या व इंद्राच्या सांगण्यावरून आपणास पुत्र नाहीं; व त्यामुळें आपण अपवित्र आहों. असें समजतांच दशरथानें पुत्रकामेष्टि यज्ञ करण्याचा निश्चय केला. प्रथम दशरथानें हाटकेश्वरक्षेत्रांत जाऊन राजवापीनांवाचें एक कुंड निर्माण केलें; व विष्णूची आराधना केली. विष्णूनेंहि सांगितलें कीं, दशरथराजा ! तूं पुत्रकामेष्टि यज्ञ कर, म्हणजे मी चार स्वरूपानें तुझें ठिकाणीं पुत्ररूपानें अवतीर्ण होईन. असें सांगून राजवापीकुंडाचें माहात्म्यहि वर्णन केलें. नंतर दशरथराजा विष्णूनें सांगितल्याप्रमाणें ऋष्यशृंगाला

बोलावून पुत्रकामेष्टि यज्ञाला आरंभ करिता झाला. यज्ञाचे योगें अग्नि संतुष्ट होऊन दशरथाला प्रसाद म्हणून पायस ( खीर ) देता झाला. दशरथानें तें पायस आपल्या मुख्य स्त्रिया ज्या कौसल्या, सुमित्रा व कैकयी ह्या तिघींना वांटून दिलें. त्यांनीं तें प्राशन करतांच त्या गरोदर राहिल्या; व दशमास पूर्ण होतांच प्रसूत झाल्या. कौसल्येला राम, कैकयीला भरत; व सुमित्रेला लक्ष्मण व शत्रुघ्न असे पुत्र झाले. पुढें रामानें राक्षसांचा नाश करून, पित्याला कृतार्थ केलें.

---

## अध्याय ९९ वा.

### रामदुर्वाससमागमः.

सूत म्हणतात; ऋषिहो ! सीता कांहीं दिवस रावणाचे घरीं राहिली असल्यामुळें ती भ्रष्ट झाली असेल, अशा लोकापवादामुळें रामानें सीतेचा त्याग केला. नंतर रामानें यज्ञ करण्याकरितां दुसरा विवाह न करितां सोन्याची सीतेची मूर्ति तयार केली; व आपला कार्यभाग उरकून घेतला. पुढें ब्रह्मचर्यव्रताचा स्वीकार करून रामानें अकरा हजार वर्षें राज्य केलें. अकरा हजार वर्षें पूर्ण होताच देवाचा दूत रामाजवळ येऊन बोलला कीं, इंद्रानें मला आपणाकडे कांहीं गुप्त गोष्ट सांगण्या करितां पाठविलें आहे. नंतर रामचंद्रानें लक्ष्मणाला सांगितलें कीं, मी देवदूताजवळ कांहीं गुप्त गोष्टी बोलणार आहे, करितां तूं दरवाजावर उभा राहून माझ्या हुकुमाशिवाय आंत कोणालाहि पाठवूं नकोस. जर कोणी माझ्या आज्ञेवाचून आंत आला तर मी त्याला स्वतः आपल्या हातानें ठार मारीन. ह्याप्रमाणें लक्ष्मणाची द्वारावर योजना करून, रामचंद्र व देवदूत एकांतीं बोलत बसले असतां देवदूत रामाला म्हणतो,—रामा ! तुम्हीं रावणादि दुष्ट राक्षसांच्या नाशार्थ अवतार धारण करून तें कार्य सिद्धीलाहि नेलें आहे. आतां आपण लवकरच अवतारकृत्य संपवून, स्वर्गाला प्राप्त व्हावें. अशातऱ्हेनें रामाचें व दूताचें भाषण होत आहे तोंच दुर्वासऋषी लक्ष्मणाजवळ त्वरेनें येऊन, राम कोठें आहेत वगैरे चौकशी करूं लागला. त्या वेळीं लक्ष्मण दुर्वासाला म्हणतो कीं, राम कांहीं विशिष्ट कार्यांत गुंतले आहेत. आपण माझ्यावर कृपा करून दोन घटका येथें विश्रांति घ्यावी; व नंतर मी आपल्याला रामाची भेट करून देतो. ह्याप्रमाणें लक्ष्मणाचें भाषण ऐकून दुर्वासाला राग आला; व तो लक्ष्मणाला बोलला कीं, जर आतां मला रामाची भेट तूं करून दिली नाहींस तर मी तुमच्या सर्व कुलाचा शापून नाश करीन. हें दुर्वासाचें क्रोधयुक्त भाषण ऐकून, लक्ष्मण रामाजवळ आला; व त्यानें रामास दुर्वास आल्याची वर्दी दिली. रामानें देव-

दूताला सांगितलें कीं, मी एक वर्षाचे आंत स्वर्गाला येतो; असें सांगून रामानें दूताची रवानगी केली; व तो लक्ष्मणासह दुर्वासाकडे प्राप्त झाला. रामाचें व दुर्वासाचे कुशलप्रश्न झाल्यावर रामानें त्याचें आदरातिथ्य करून त्यास संतुष्ट केलें. ह्याप्रमाणें आतिथ्याचा स्वीकार करून दुर्वासमुनि स्वाश्रमाला निघून गेला.

---

## अध्याय १०० वा.

### लक्ष्मणनिर्याण.

दुर्वासमुनि निघून गेल्यावर लक्ष्मणानें हातांत तरवार घेऊन रामास सांगितलें कीं, जेव्हां देवदूताचें व तुमचें भाषण एकांतांत चालू होतें, त्या वेळीं तुम्ही प्रतिज्ञा केली होती कीं, जो कोणी आमचें भाषण पुरें होण्यापूर्वीं माझ्या हुकुमावांचून आंत मजजवळ येईल, त्याचा मी आपल्या हातानें शिरच्छेद करीन. तेव्हां दुर्वासाच्या आग्रहामुळें तुमचें भाषण पुरें होण्यापूर्वीं मी तुमच्याजवळ आलों. करितां तुम्ही आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें ही माझे हातांतील तरवार घेऊन माझा शिरच्छेद करा, व आपण प्रतिज्ञामुक्त व्हा. असें रामानें लक्ष्मणाचें भाषण ऐकून त्याला म्हटलें कीं, मी जरी पूर्वी अशी प्रतिज्ञा केली होती, तरी मी तुझा आपल्या हातानें कधींहि वध करणार नाहीं. तुला माझी एवढी आज्ञा आहे कीं, तूं ह्या देशांतून निघून परदेशांत जाऊन राहा; व मला पुनः तूं आपलें तोंड दाखवूं नको. एकाद्याचा वध करणें किंवा त्यास देशांतून घालवून देऊन पुनः त्याचें मुखावलोकन न करणें हीं दोन कृत्यें सारख्या अधिकाराचीं आहेत. असें रामाचें भाषण ऐकून लक्ष्मण जो तेथून निघाला तो थेट सरयू नदींत स्नान करून त्या नदीचे कांठीं प्राणायामविधीनें देह विसर्जन करिता झाला. देहांतील ज्योति निघून जाताच लक्ष्मणाचा देह सरयूचे कांठीं काष्ठाप्रमाणें निश्चेष्ट होऊन पडला. लक्ष्मणाचें निर्याण म्हणजे स्वर्गगमन झालेलें श्रवण करून रामाला फारच वाईट वाटलें, व तो त्याजबद्दल फारच शोक करूं लागला. प्रधानांनीं रामचंद्राची पुष्कळ समजूत घातली तरी त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं आकाशवाणीनें रामास सुचविलें कीं, रामचंद्रा ! तुम्ही शोक करूं नका. लक्ष्मण हा ब्रह्मलोकाला प्राप्त झाला आहे. लक्ष्मण हा संन्यासकर्माचें अनुष्ठान करणारा असल्यामुळें त्याचा देह अग्निसंस्कारानें दग्ध करणें योग्य नाहीं. त्याचें और्ध्वदेहिक दुसऱ्या संस्कारानें करा; व तुम्ही आतां शोकरहित होऊन स्वमंदिराला परत जा. नंतर राम म्हणतो कीं, मी लक्ष्मणाला घेतल्याशिवाय परत कसा जाऊं ? मी येथेंच प्राणत्याग करणार, असा संकल्प करून रामानें बिभीषणादि राक्षसांचें

स्मरण केलें; व सुग्रीवादि वानरांजवळ जाऊन त्यांना झालेलें सर्व वर्तमान निवेदित केलें. सुग्रीवादि वानरांनींहि फार शोक करून रामाचें सांतवन केलें. नंतर रामचंद्र त्या रात्रीं सुग्रीवाचे घरीं राहून दुसरेदिवशीं वानरमंडळीसह बिभीषणाला भेटण्याकरितां त्याचे मंदिरांत प्राप्त झाला.

---

## अध्याय १०१ वा.

—:O:—

### रामेश्वरप्रतिष्ठा.

दुसरे दिवशीं सकाळीं रामचंद्र नित्य स्नानसंध्यादि विधि आटोपल्यावरें सुग्रीव, सु.ण, तार, कुमुद, अंगद, कुंड, मारुती, गवाक्ष, नल, व जांबवान् ह्या दाहा वानरांसह पुष्पकविमानांत बसून, बिभीषणाला भेटण्याकरितां लंकेला प्राप्त झाले. रामचंद्र आलेले पाहून बिभीषणाला फार आनंद झाला; व त्यानें पुत्रपौत्रादिकांचें क्षेम रामचंद्राला कळविलें; व म्हटलें कीं, रामचंद्रा! आपण येथें वानरमंडळींसह एकटेच आला! लक्ष्मण व सीता कोठें आहे? त्यांना आपण कां बरें आणिलें नाहीं? हा बिभीषणाचा प्रश्न ऐकून. रामचंद्र शोकाकुल होऊन झालेलें सर्व वर्तमान बिभीषणाला निवेदन करिते झाले. शेवटीं रामानेंहि स्वतःचा लक्ष्मणाच्या मागोमाग स्वर्गाला जाण्याचा विचार बिभीषणास सांगितला; व अनेकप्रकारच्या हिताच्या गोष्टीहि सांगून त्यास संतुष्ट केलें. दहा दिवस लंकेंत राहून अकरावे दिवशीं बिभीषणालाहि बरोबर घेऊन, रामचंद्र अयोध्येस परत जाण्यास निघाले. वाटेंत जेथें पूर्वीं सेतु बांधिला होता; त्या ठिकाणीं रामानें रामेश्वर नांवाचें एक शिवलिंग स्थापिलें. त्या वेळीं बिभीषण रामाला म्हणतो, रामा! ह्या रामेश्वराच्या दर्शनास अनेक जनसमाज प्राप्त होईल; व त्या वेळीं क्रूरकर्म करणारे राक्षस ह्या सेतुमार्गानें लंकेहून येऊन लोकांना पीडा देतील; त्याचप्रमाणें सोन्याची लंका पाहण्याकरितां कलियुगांत पुष्कळ दरिद्री लोक मुद्दाम द्रव्यलोभानें येथें प्राप्त होतील; व त्यांना राक्षसांकडून फार त्रास होईल; आणि त्यायोगें आपली आज्ञा मोडिल्याचा आरोप माझ्यावर येईल, करितां आपण त्याचा प्रथमच बंदोबस्त करावा. अशातऱ्हेनें बिभीषणाचें भाषण श्रवण करून रामचंद्रानें विचार केला कीं, बिभीषण म्हणतो तें खरें आहे; व त्याचा कांहीं तरी बंदोबस्त केलाच पाहिजे, असें म्हणून रामचंद्रानें हातांत धनुष्य घेऊन त्या धनुष्याला कीर्तिरूप असा बाण लावून, ज्या शिखरावर रामेश्वर नांवाचें लिंग स्थापिलें होतें; त्या शिखराच्या मुळाशीं तो बाण सोडिला. तात्काळ तें शिखर लिंगासह मुळासकट

उडून जाऊन, समुद्रांत जसेच्या तसें पडलें. त्यामुळें त्या शिखरावर जाणें मनुष्यास अशक्य झालें. ह्या कर्माच्या योगें विभीषणालाहि मोठा आनंद झाला. नंतर रामचंद्र विभीषणादि राक्षस व वानरमंडळी ह्यांसह अयोध्येला प्राप्त झाले.

---

## अध्याय १०२ वा.

### लक्ष्मणेश्वरप्रतिष्ठा.

एकदां रामचंद्र विभीषणादि राक्षसमंडळीसह व सुग्रीवादि वानरमंडळीसह पुष्पकविमानांत बसून हाटकेश्वरक्षेत्रांत प्राप्त झाले. तेथें सर्वमंडळीसह अनेक तीर्थें व शिवमंदिरें अवलोकन करून रामानें पूर्वजांनीं स्थापिलेल्या चंडिकादि देवतांचें व राजवाप्यादि तीर्थांचें दर्शन घेतलें. नंतर रामचंद्रानें लक्ष्मणाचें स्मारक म्हणून त्याच्या नांवानें एक शिवलिंग स्थापिलें. ह्याप्रमाणें दुसरींहि रामचंद्रानें शिवलिंगें स्थापित केलीं. लक्ष्मणेश्वरादि लिंगांचें पूजन करणारे शिवलोकीं गमन करितात. त्याठिकाणीं वानरांनींहि आपआपल्या नांवानें लिंगें स्थापन केलीं. जे कोणी ह्या लिंगांचें पूजन करितात त्यांस अश्वमेधयज्ञ केल्याचें पुण्य लागतें.

---

## अध्याय १०३ वा.

### आनर्ततीर्थमाहात्म्य.

एकदां रामचंद्रानें अगस्त्यऋषीस आनर्ततीर्थाचें माहात्म्य विचारिलें असतां अगस्त्य म्हणतात; रामा ! एके दिवशीं मी मध्यरात्रीचे सुमारास उठून आकाशाकडे पाहूं लागलों तों एक देदीप्यमान विमान मला दिसलें; व मी त्या विमानांत बसलेल्या पुरुषाला प्रश्न केला कीं, तुह्मी कोण; व येथें कशाकरितां आलां आहांत. नंतर तो पुरुष म्हणतो कीं, मी श्वेतनांवाचा आनर्तदेशाचा राजा आहे. मी फार पापी होतों; व एका पुण्यजलांत मला मरण आल्यामुळें मी विमानांत बसून ब्रह्मलोकाला प्राप्त झालों. मी क्षुधित होऊन ब्रह्मदेवाजवळ अन्न मागूं लागलों असतां ब्रह्मदेव मला म्हणाला कीं, तूं पूर्वीं फार पाप केल्यामुळें तुला क्षुधा लागत आहे; व तूं ह्या विमानांत बसून पूर्वीं केलेल्या दुष्कर्माचें फल म्हणून स्वतःचें शरीर भक्षण कर. अशी ब्रह्मदेवाची आज्ञा होतांच मी विमानांत बसून येथें

आलों आहे. आपण माझें रक्षण करा. अशी राजाची वाणी ऐकून मला त्याची दया आली व त्याला घेऊन ह्या आनर्कतीर्थाजवळ मी प्राप्त झालों. ह्या आनर्क तीर्थांत स्नान करताच त्याची क्षुधा वगैरे व्याधी नष्ट होऊन तो श्वेतराजा त्याच विमानांत बसून ब्रह्मलोकाला जाऊन आनंदानें राहता झाला.

## अध्याय १०४ वा.

### कुशलवेश्वरमाहात्म्य.

पूर्वी रामचंद्रादि मंडळींनीं स्थापिलेल्या रामेश्वरादि लिंगांच्या दर्शनास येणाऱ्या लोकांना दुष्ट राक्षस फार त्रास देऊं लागल्यामुळें सर्व लोक कुशलवांजवळ येऊन राक्षसांचा नाश करण्याविषयीं विनवूं लागले. कुशलवांनीं त्यांचें भाषण ऐकून आपल्या प्रधानांना राज्यव्यवस्था पाहण्यास सांगून स्वतः सैन्यासह हाटकेश्वरक्षेत्रांत राक्षसांच्या वधार्थ प्रयाण केलें; व आपला एक दूत बिभीषणाकडे पाठविला व कळविलें कीं, राक्षस इकडे येऊन हाटकेश्वरक्षेत्रांत लोकांना फार त्रास देतात, तरी त्यांचा बंदोबस्त करा. असें जर न कराल तर तुमचा सर्वांचा नाश करीन, अशी धमकी देऊन राक्षसांचा बंदोबस्त केला; नंतर त्या ठिकाणीं बिभीषणहि प्राप्त झाला व त्यानें रामेश्वराची स्तुति करून कुशलवांकडून एक कुशेश्वर व दुसरें लवेश्वर अशीं दोन लिंगें स्थापन करविलीं. त्या दिवसापासून सर्व लोक राक्षसत्रासापासून मुक्त झाले.

## अध्याय १०५ वा.

### लिंगपुनरुज्जीवन.

मध्यंतरीं पुष्कळ काळ निघून गेल्यावर एकदां राक्षसांनीं जेथें रामेश्वरादि लिंगें स्थापिलीं होतीं, ती भूमि वाळूनीं भरून काढली, त्यामुळें तें स्थान ओसाड व लिंगरहित झालें. पुढें पुष्कळ काळानें बृहदश्वनामक राजा शाल्वदेशाहून तेथें आला. त्यानें ती ओसाड भूमि पाहून त्याठिकाणीं राजवाडा बांधण्याचा विचार केला. राजवाडा बांधण्याकरितां खोल पाया खणीत असतां पूर्वीं वाळूंत पुरलीं गेलेलीं लिंगें राजाच्या दृष्टीस पडलीं. व त्यानें त्यांची पूजनादि मांगलिक कृत्यें करून राजवाडा बांधण्याचा बेत रहित केला.

# अध्याय १०६ वा.

## लुप्ततीर्थपरिगणन.

बृहद्श्वराजा ज्या ठिकाणीं राजवाडा बांधण्याकरितां पाया खणीत होता त्या ठिकाणची तेवढींच लिंगें प्रगट झालीं; व त्याचे आसपासचीं कित्येक लिंगें जशींच्यातशीं वाळूंतच गुप्तरीतीनें राहिलीं. तेव्हां आतां गुप्त राहिलेलीं तीर्थें किती आहेत, तें सांगतों; ऐका. वाळूंत गुप्त झालेलीं तीर्थें असंख्य आहेत, त्या सर्व तीर्थांचें वर्णन करणें अशक्य आहे; तथापि कांहीं मुख्य मुख्य सांगतों. पहिलें चक्रतीर्थ, नंतर मातृतीर्थ, तसेंच मुचकुंदेश्वर व नगरेश्वर हींहि लुप्ततीर्थें होत. त्याचप्रमाणें वसुप्रेणेश्वर, ककुत्स्थेश्वर, ऐलेश्वर, चंद्रदेवेश्वर, काशीराजेश्वर, आग्निवेशेश्वर, रैभ्येश्वर, च्यवनेश्वर, भृग्वीश्वर, याज्ञवल्क्येश्वर, हारीतेश्वर, हर्षेश्वर, कुत्सेश्वर, वसिष्ठेश्वर, नारदेश्वर, त्रितेश्वर वगैरे लिंगें अदृश्य असतीं झालीं. तसेंच कात्यायनी, शांडिली, मैत्रेयी वगैरे ऋषिपत्न्यांनीं स्थापिलेलीं पुष्कळ लिंगें लुप्तस्थितींत असतीं झालीं.

# अध्याय १०७ वा.

## चित्रशर्मेश्वरस्थापन.

सूत म्हणतातः चमत्कारक्षेत्रामध्यें चित्रशर्मा नांवाचा एक ब्राह्मण होता. त्यांनीं पाताळांत जाऊन तेथून हाटकेश्वराची स्थापना चमत्कारक्षेत्रांत करावी असा विचार केला; व त्याकरितां तपश्चर्याहि आरंभिली. कालान्तरानें शंकर प्रसन्न होऊन चित्रशर्म्यास म्हणतात कीं, ब्रह्मन् ! तुझी इच्छा सफल होईल; व हाटकेश्वराची स्थापना चमत्कारक्षेत्रांत करून तूं त्याचें पूजन कर; म्हणजे तुझें कल्याण होईल. असें सांगून शंकर स्वस्थानीं गेल्यावर शंकराच्या सांगण्याप्रमाणें चित्रशर्म्यानें चमत्कारक्षेत्रांत हाटकेश्वराची स्थापना; व पूजा केली. त्या दिवसापासून पुष्कळ लोक लांबून येऊन हाटकेश्वराचें पूजन करूं लागले; व त्या पूजनाच्या योगें पुष्कळांना सिद्धि प्राप्त झाली. चित्रशर्म्यानें त्या लिंगाचें नांव चित्रशर्मेश्वर असें ठेविलें; व माहात्म्य वाढविलें.

# अध्याय १०८ वा.

## अष्टषष्टितीर्थवर्णन.

आतां अष्टषष्टि म्हणजे अडसष्ट तीर्थांचीं नांवें सांगतों. पूर्वीं एकदा पार्वतीनें शंकराला तीर्थमाहात्म्य विचारिलें असतां शंकर पार्वतीला म्हणतात; प्रिये ! तीर्थ-शब्दाचा अर्थ धर्मकृत्य असा आहे. आतां धर्मकृत्यांचीं जीं स्थानें त्यांना तीर्थें म्हणतात. माता पिता, गंगादि नद्या, धर्माचिंतन, नियम, यम, पुराणकथा, ऋषींचे आश्रम, देवालयें, क्षेत्रें हीं सर्व तीर्थशब्दांत गोंविलेलीं आहेत. काशी, प्रयाग, नैमिष, गया, कुरु, प्रभास, पुष्कर, विश्वेश्वर, अट्टहास, महेन्द्र, उज्जयिनी, मरुकोटि, शंकुकर्ण, गोकर्ण, रुद्रकोटि, स्थलेश, वृषभध्वज, केदार, मध्यमकेश्वर, सहस्राक्ष, कार्तिकेश्वर, वस्त्रमार्ग. कनखल, भद्रकर्ण, दण्डक, त्रिदण्ड, कृमि-जाङ्गल, एकाम्र, छागलक, कालिंजर, मण्डलेश्वर, काश्मीर, मरुकेश, हरिश्चन्द्र, पुरश्चंद्र, वामेश, कुकुटेश्वर, भस्मगात्र, ॐकार, त्रिसंध्या, विरजा, अर्केश्वर, नेपाल, दुष्कर्ण, करवीरक, जागेश्वर, श्रीशैल, अयोध्या, पाताल, कायाव-रोहण, देविका, भैरव, सप्तगोदावरी, निर्मलेश, कर्णिकार, कैलास, गंगाद्वार, जललिंग, वाडव, बदरीतीर्थ कोटितीर्थ, विंध्याचल, हेमकूट, गंधमादन, लिंगे-श्वर, लंकाद्वार, नलेश्वर, मध्येश, सुवर्ण हीं सर्व तीर्थें होत.

---

# अध्याय १०९ वा.

## अष्टषष्टितीर्थलिंगें.

आतां प्रत्येकतीर्थाचे ठिकाणीं असणाऱ्या शिवलिंगांचीं नावें; व त्यांचीं महात्म्यें सांगा; असा शौनकादिकांचा प्रश्न ऐकून सूत म्हणतात;—ऋषिहो ! काशीमध्यें जें लिंग आहे त्याला महादेव अशी संज्ञा आहे. प्रयागांतील लिंगास महेश्वर म्हणतात. तसेंच नैमिषांतील लिंगास देवदेव, गयेमध्यें प्रपितामह, कुरुक्षेत्रांत स्थाणु, प्रभासांत शशिशेखर, पुष्करक्षेत्रांत अजागन्धि, विश्वेश्वरक्षे-त्रांत विश्व, अट्टहासक्षेत्रांत महानाद, महेन्द्रक्षेत्रांत महाव्रत, उज्जयिनीमध्यें महाकाल, मरुकोट क्षेत्रांत महोत्कट, शंकुकर्ण क्षेत्रांत महातेज, गोकर्णक्षेत्रांत महाबल, रुद्रकोटितीर्थांत महायोग, स्थलेश्वरांत महालिंग, हर्षितक्षेत्रांत हर्ष, वृष-भध्वजक्षेत्रांत वृषभ, केदारांत ईशान, मध्यमकेश्वरक्षेत्रांत शर्व, सहस्राक्षक्षेत्रांत

सुपर्ण, कार्तिकेश्वरक्षेत्रांत सुसूक्ष्म, अशीं त्या त्या क्षेत्रांत भिन्न भिन्न शिवलिंगांचीं मुख्य नांवें आहेत. त्याचप्रमाणें अनुक्रमानें वस्त्रापथ, कनखल, भद्रकर्ण, दण्डक, त्रिदण्ड, कृमिजांगल, एकाम्र, छागलेय, कालिंजर, मंडलेश्वर, काश्मीर, मरुकेश्वर, हरिश्चंद्र, पुरश्चंद्र, वामेश्वर, कुक्कुटेश्वर, भस्मगात्र, ॐकार ह्या क्षेत्रामध्यें भव, उग्र, शिव, दण्डी, ऊर्ध्वरेत, चण्डीश, कृत्तिवास, कपर्दी, नीलकंठ, श्रीकंठ, विजय, जयंत, हर, शंकर, जटि, सौम्य, भूतेश्वर व अमरकंटक ह्या नांवांनीं शिवलिंगें स्थापित झालीं आहेत. नरोचन–हेलें त्रिसंध्या, विरजा, अर्केश्वर, नेपाळ, दुष्कर्ण, करवीरक, जागेश्वर, श्रीशैल, अयोध्या, पाताळ, कायावरोहण, देविका, भैरव, पूर्वसागर, सप्तगोदावरी, निर्मलेश्वर, कर्णिकार, कैलास, गंगाद्वार, जललिंग, वाडव, बदरिकाश्रम, श्रेष्ठ, विन्ध्यपर्वत, हेमकूट, गन्धमादन, लिंगेश्वर, लंका ह्या क्षेत्रामध्यें अनुक्रमानें त्र्यंबक, त्रिलोचन, दीप्त, पशुपालक, यमलिंग, कपाली, त्रिशूली, त्रिपुरांतक, रोहण, हाटकेश्वर, नकुलीश, उमापति, भैरवाकार, अमरभीम, गणाध्यक्ष, स्वयंभू, गणाधिप, हिमस्थान, जलप्रिय, अनल, भीम, कोटीश्वर, वाराह, विरूपाक्ष, भुर्भुव, वरद; व नरांतक ह्या नांवांचीं लिंगें स्थापिलेलीं आहे. हीं अडसष्ट क्षेत्रांत अष्टसष्ट लिंगें मुख्यत्वानें वास्तव्य करितात. ह्या लिंगांचें पठन करणारांना सुखप्राप्ति होऊन मोक्षप्राप्ति होते. हीं लिंगनामें क्षेत्रांसह एका कागदावर लिहून घरांत ठेवणारांना भूत, प्रेत, सर्प, चोर इत्यादिकांचे भय न राहून व्याध्यादिहि प्राप्त न होतां मोक्ष मिळतो.

## अध्याय ११० वा.

### अष्टषष्टितीर्थमाहात्म्य.

ह्या अडसष्ट तीर्थांमध्यें नैमिष, केदार, पुष्कर, कृमिजांगल, काशी, कुरु, प्रभास, हाटकेश्वर हीं आठ तीर्थें मुख्य आहेत. ह्या आठ तीर्थांत स्नान करणाराला अडसष्ट तीर्थांत स्नान केल्याचें फळ मिळतें. ह्या आठहि मुख्य क्षेत्रामध्यें हाटकेश्वर क्षेत्र सर्वश्रेष्ठ आहे. ह्या हाटकेश्वरक्षेत्रांत अडसष्ट क्षेत्रांचा समावेश होतो; करितां ह्या हाटकेश्वर क्षेत्राचें अवश्य सेवन करावें. हें अष्टषष्टि तीर्थांचें नाममाहात्म्य जे श्रवण करितील त्यांस त्या तीर्थांत स्नान केल्याचें फळ मिळेल.

# अध्याय १११ ते ११५ वा.

## अष्टषष्टिगोत्रवर्णन.

पूर्वी एकदा आनर्तदेशचा राजा कुष्ठरोगानें पीडित असतां, त्या राजाला बाहात्तर मुनींनीं शंखतीर्थांत स्नान करण्याविषयीं उपदेश केला. ब्राह्मणांच्या सांगण्याप्रमाणें शंखतीर्थांत स्नान करतांच, त्याचें कुष्ठ नष्ट होऊन तो निरोगी झाला. त्या योगें तो राजा आनंदानें त्या बाहात्तर ब्राह्मणांजवळ येऊन ह्मणतो कीं, तुमच्या प्रसादानें मी कुष्ठरहित झालों आहे, करितां तुह्मी सोनें, गाई, घोडे किंवा राज्यसुद्धां जें कांहीं मागाल तें सर्व तुम्हांला देण्यास मी तयार आहे. असें राजाचें भाषण ऐकून ब्राह्मण म्हणतात कीं, राजन्! आम्ही वानप्रस्थाश्रमाचा स्वीकार केलेले ब्राह्मण आहोंत, करितां तुमचें राज्य; व ऐश्वर्य घेऊन आम्हांला काय करावयाचें आहे. नंतर त्या राजानें आपल्या राजधानींत जाऊन तेथें एक शिवमंदिर बांधलें; व ब्राह्मणांच्या उपकाररूपी ऋणांतून मुक्त कसें व्हावें, ह्याबद्धल तो विचार करीत बसला. शेवटीं त्यानें एक युक्ति योजून विचार केला कीं, स्त्रिया ह्या द्रव्यलोभी असतात; तेव्हां जरी ब्राह्मणांनीं आपल्यापासून द्रव्य घेतलें नाहीं, तरी त्यांच्या स्त्रिया घेतील; व आपण उपकारऋणांतून मुक्त होऊं. असा विचार करून राजानें आपल्या दमयंती नांवाचे पत्नीस सांगितलें कीं, प्रिये! तूं हाटकेश्वरक्षेत्रांत जाऊन ब्राह्मणस्त्रिया एकट्यांच आश्रमांत असतां त्यांना गाठ; व मी जे तुला अलंकार देतों ते त्या स्त्रियांना नेऊन दे. असें राजाचें भाषण ऐकतांच दमयंतीनें राजाच्या भाषणाप्रमाणें ती संधी साधून राजानें दिलेले अलंकार ब्राह्मणपत्नींना दिले; व ती परत राजाकडे आली. बाहात्तर ब्राह्मणपत्नींपैकीं चौघींनींच पतींचा अभिप्राय जाणून दमयन्तीपासून कांहींहि दान घेतलें नाहीं. कांहीं काळानें त्या बाहात्तर ब्राह्मणांना आपल्या पत्नींनीं राजपत्नीपासून अलंकार घेतले, असें समजतांच त्यांनीं राजपत्नी जी दमयंती तिला 'शिला होऊन पड' असा शाप दिला. पुढें राजाला हें वर्तमान समजतांच तो स्त्रीविरहानें शोक करूं लागला. कांहीं दिवस मध्यंतरीं निघून गेल्यावर ज्यांच्या स्त्रियांनीं भूषणें घेतलीं होतीं, ते अडसष्ट ब्राह्मण राजाजवळ येऊन त्याचें मन स्थीर करून ह्मणते झाले कीं, आम्ही तुमच्या स्त्रीला उगीच शाप दिला. आतां आम्हांला आपण हाटकेश्वरक्षेत्रांत घरें बांधून द्या; व आम्ही आतां गृहस्थाश्रम स्वीकारणार आहोंत. असें ब्राह्मणांचें भाषण ऐकून राजानें कलाकौशल्यवान् असे सुतार बोलावून अडसष्ट

ब्राह्मणांना घरें बांधून दिलीं. तीं अडसष्ट गोत्रें पुढें त्यांच्या त्यांच्या वंशांना प्राप्त झालीं. त्यांपैकीं उपमन्यु, क्रौंच, कैशोर्य व त्रैवर्णेय हीं चार गोत्रें निर्वंश होतीं झालीं; व तीं शेषाच्या भयानें नष्ट झालीं; व बाकीची चौसष्ट गोत्रें खालीं लिहिल्याप्रमाणें आहेत. तीं कौशिक, लक्ष्मण, भारद्वाज, रैतिक, पाराशर्य, गर्ग, और्व, गौतम, आलूभायन, मांडव्य, बव्हृच, सांकृत्य, आंगिरस, आत्रेय, शुक्लात्रेय, वात्स्य, कौत्स, शांडिल्य, भार्गव, मौद्गल्य; बौधायन, कौशलआथर्व, मौनस, याजुष, च्यावन, आगस्त्य, जैमिनेय, नैवृत, पाठीन, गोभिल, काक्र, औशनस, दाशार्ह, लौकाख्य, ऐणिश, कापिष्ठल, शार्कर, दत्त, शार्कव, दार्व्य, कात्यायन्य, वैदिश, कृष्णात्रेय, दत्तात्रेय, नारायण, शौनकेय, जाबाल, गोपाल, जामदग्न्य, शालिहोत्र, कर्णिक, भागुरायणक वगैरे चौसष्ट गोत्रें होत. ह्याप्रमाणें ह्या मुख्य गोत्रांतून उत्पन्न झालेलीं अशी पुष्कळ गोत्रें आहेत. सर्व मिळून लहान मोठ्या गोत्रांची संख्या करूं गेलों तर पंधरा हजार इतकीं गोत्रें होतील. पुढें त्या सर्व गोत्रांची वृद्धि होऊन तो प्रदेश त्यांनीं परिपूर्ण करून सोडला. तें हाटकेश्वर क्षेत्र ज्याप्रमाणें प्रत्येक सांध्याला दूर्वांचें अंकूर फुटून त्यांचा मोठा विस्तार होतो त्याप्रमाणें ह्या गोत्रांची वृद्धि होऊन तें स्थान विस्ताराप्रत प्राप्त होतें झालें. हें गोत्रांच्या विस्ताराचें कथानक जे श्रवण किंवा पठण करितील ते पापमुक्त होऊन शेवटीं सुखरूप अशा मोक्षाला प्राप्त होतील.

---

## अध्याय ११९ वा.

### अंबारेवतीतीर्थमाहात्म्य.

एकदां शेषानें सर्वांना हाटकेश्वरक्षेत्राच्या नाशार्थ आज्ञा केली असतां शेषपत्नीनें पुढें होऊन प्रथम एका कुटुम्बसहित ब्राह्मणाचा नाश केला. हें त्या ब्राह्मणाच्या भट्टिका नांवाच्या मुलीनें पाहून रागानें शेषपत्नीला शाप दिला कीं, तुला पुढील जन्मीं मनुष्यजन्म प्राप्त होऊन तुला स्त्रीपुत्रादिकांकडून विरहजन्य दुःख प्राप्त होईल. असा भट्टिकेचा शाप ऐकून शेषपत्नीला राग आला; व तिनें ब्राह्मणकन्येला दंश करून मारून टाकिलें. तथापि ब्राह्मणकन्येच्या शापानें भिऊन गेलेल्या त्या रेवतीनामक शेषपत्नीनें सर्व वृत्तान्त सर्पास निवेदन केला. रेवतीला फारच दुःख झालें; व तिनें शापनिवृत्त्यर्थ अंबेची स्थापना व पूजन केलें; आणि घोर तपश्चर्या केली. त्यायोगें देवी अंबा प्रसन्न झाली; व तिनें रेवतीला सांगितलें कीं, तक्षकनावाचा सर्प रेवतनांवानें सौराष्ट्रदेशाचा राजा

होईल; व त्याची क्षेमकरी नांवाची तूं भार्या होशील; व तेथें तुला कोणत्याहि तऱ्हेचा विशेष त्रास न होतां तूं शापमुक्त होशील. ह्याप्रमाणें देवीचें भाषण ऐकून रेवती स्वस्थानाला निघून गेली. रेवतीनें जेथें अंबेची स्थापना केली त्या अंबेला अंबारेवती असें नांव पडलें; व त्या तीर्थाला अंबारेवतीतीर्थ म्हणतात. त्याचें पूजन व स्नान केलें असतां दोषनिवृत्ति होते.

---

## अध्याय ११७ वा.

### भट्टिकातीर्थोत्पत्ति.

भट्टिका ही लहानपणींच वैधव्ययुक्त होऊन अनेकप्रकारचीं शास्त्रें श्रवण करिती झाली. नंतर भट्टिकेनें अनेक तीर्थयात्रा केल्या; व ती केदाराजवळ येऊन गायनादि करती झाली. तिच्या गायनानें पाताळांतून तक्षक व वासुकी हे ब्राह्मणाचें रूप घेऊन तिजजवळ आले. तिच्या गायनाला अत्यंत लुब्ध होऊन त्या तक्षकादिकांनीं तिला पाताळीं नेलें; व विचारिलें कीं, तूं आमची पत्नि हो. असें तक्षकादिकांचें भाषण ऐकून भट्टिका रागावून म्हणते कीं, ज्यापेक्षां तुम्ही मनुष्यरूप घेऊन मला फसवून पाताळीं आणिलें, त्यापेक्षां तुम्हांला मनुष्यजन्म प्राप्त होवोत; व हे तक्षका! ही तुझी भार्याहि मनुष्यजन्माला येऊन तुझीच पत्नि होईल. असें सांगितल्यावर भट्टिकेनें स्वशरीराच्या शुद्ध्यर्थ एक चिता तयार केली; व त्यांत ती उडी टाकणार इतक्यांत आकाशवाणी झाली कीं, तूं शुद्ध आहेस. उगीच अग्नींत आपला देह नष्ट करूं नकोस. ज्याठिकाणीं तूं चिता पेटविली आहेस त्याठिकाणीं एक भट्टिकानांवाचें तीर्थ निर्माण होईल. जे कोणी कार्तिक शुक्ल द्वादशीला ह्या भट्टिकातीर्थांत स्नान करितील ते श्रेष्ठ अशा सिद्धीला प्राप्त होतील. असें भट्टिकेला सांगून आकाशवाणी बंद झाली.

---

## अध्याय ११८ वा.

### रैवतेश्वरमाहात्म्य.

भट्टिकेनें तक्षकाला शाप दिला असतां तक्षक हा सौराष्ट्र देशांत रैवत नावानें उत्पन्न झाला. त्या रैवतराजाचें शत्रूंबरोबर युद्ध होऊन त्यांत रैवताचा पराभव झाला. पुढें कांहीं काळानें पुनः त्याला शत्रूंचा पाडाव करून राज्यप्राप्तिहि झाली.

त्याला रेवती नांवाची कन्या झाली. रैवताला पुत्र नसल्यामुळें अनुष्ठानादि विधीनें देवता प्रसन्न करून क्षेमजित् नांवाचा पुत्र होता झाला. पुढें रैवत वृद्ध झाला असतां पुत्राला राज्यावर बसून हाटकेश्वर क्षेत्रांत शिवलिंगाच्या स्थापनेनें आराधना करिता झाला. त्याच शिवलिंगाला रैवतेश्वर असें नांव प्राप्त झालें आहे. ह्या रैवतेश्वराच्या पूजनानें राज्य, पुत्र, सुख, वगैरे प्राप्त होतें.

---

## अध्याय ११९ ते १२१ वा.

### कात्यायनीमाहात्म्य.

पूर्वी हिरण्याक्षनामक दैत्याला महिष नांवाचा पुत्र झाला होता. त्यानें शंकराची आराधना करून वर मागितला कीं, एक स्त्रीशिवाय दुसऱ्या कोणत्याहि प्राण्याकडून मी अवध्य असावें. असा वर मिळतांच महिषासुर उन्मत्तपणानें सर्वत्र फिरूं लागला. महिषासुराच्या भीतीनें इंद्रादि देवहि भिऊन ब्रह्मलोकांत राहूं लागले. त्यामुळें महिषासुराला आयतीच संधी मिळाल्यामुळें तो इंद्रपदावर आरूढ होऊन त्रैलोक्याचें राज्य उपभोगिता झाला. हा सर्व प्रकार देवांना सहन न होऊन त्यांनीं महिषासुराच्या नाशार्थ काय उपाय योजावा, असा विचार चालविला; इतक्यांत नारद ऋषीनें कार्तिकस्वामीजवळ येऊन महिषासुराचें दुश्चेष्टित सांगितलें. तें ऐकून कार्तिकस्वामीला महिषासुराचा फारच राग आला; व त्या रागाच्या सपाट्यांत क्रोधापासून कात्यायनी नांवाची एक स्त्री निर्माण झाली; नंतर त्या स्त्रीला इंद्रादि देवांनीं आपआपलीं वज्रादि आयुधें अर्पण केलीं. देवीनें देवांच्या आज्ञेप्रमाणें महिषासुराला मारण्याकरितां सिंहावर बसून विंध्यपर्वतावर प्रयाण केलें. महिषासुराच्या दूतांनीं विंध्याचलावर असणाऱ्या कात्यायनीला पाहून तिच्याबद्दल सर्व हकीगत महिषासुराला कळविली. महिषासुर कात्यायनीच्या प्राप्तीची लालसा धरून तिच्या विनवण्या करीत असतां तशातऱ्हेनें ही वश होत नाहीं, असें पाहून तिच्याशीं युद्ध करण्याकरितां महिषासुर सैन्यासह तिच्याजवळ आला. महिषासुराचें व कात्यायनीचें मोठें युद्ध झालें. कात्यायनीनें महिषासुराचें सर्व सैन्य नष्ट करून शेवटीं महिषासुराचा नाश करणार तोंच त्याला कृतकर्माचा पश्चात्ताप होऊन तो कात्यायनीची स्तुति करूं लागला. त्या दिवसापासून महिष दैत्य सर्व संगाच्या त्यागानें व कात्यायनीच्या प्रसादानें शिवलोकाला प्राप्त झाला. कात्यायनीनें इंद्राला इंद्रपद देऊन, सर्व त्रैलोक्य सुखी केलें. ज्या ठिकाणीं महिषासुराबरोबर कात्यायनीचें युद्ध झालें, त्यास कात्यायनीतीर्थ म्हणतात.

---

## अध्याय १२२ वा.

### केदारोत्पत्ति.

पूर्वी स्वायंभुव मनूच्या कारकीर्दींत हिरण्याक्ष नांवाचा दैत्य त्रैलोक्य पादाक्रांत करून धर्मबाह्य वर्तन करूं लागला असतां इंद्रपदापासून भ्रष्ट झालेला इंद्र गंगाद्वाराजवळ येऊन तपश्चर्या करूं लागला. तपश्चर्येनें शंकर प्रसन्न होऊन इंद्राला म्हणाला कीं, "*के दारयामि" मी कोणाचा नाश करूं. असें शिववाक्य ऐकतांच इंद्रानें आपला सर्व वृत्तांत शंकराला निवेदन केला. शंकराला हिरण्याक्षाचा राग आला; व त्यानें हिरण्याक्षप्रमुख पांच दैत्यांचा नाश केला; व इंद्राला इंद्रपदाची प्राप्ति करून दिली. शंकराच्या त्या कृत्यानें इंद्राला आनंद झाला; व त्यानें तेथेंच शंकराला लिंगरूपानें राहण्यास सांगितलें. शंकरानेंहि इंद्राच्या सांगण्याप्रमाणें तेथें राहण्याचें कबूल केलें. शंकरानें प्रथम इंद्राला "के दारयामि" असा प्रश्न केल्यामुळें त्या शिवलिंगाला 'केदार' हें नांव प्राप्त झालें. जे कोणी ह्या केदार नामक इंद्रस्थापित लिंगाची आराधना करितील ते शत्रूंच्या तापापासून मुक्त होऊन ऐश्वर्यवान् होत्साते स्वर्गलोकाला प्राप्त होतील. हें आख्यान ऐहिक सुखाची प्राप्ति करून देणारें; व अंतीं मोक्ष देणारें आहे.

## अध्याय १२३ वा.

### शुक्लतीर्थमाहात्म्य.

सूत म्हणतात;—आतां शुक्लतीर्थाचें माहात्म्य सांगतों. पूर्वी चमत्कारक्षेत्रांत शुद्धकनांवाचा एक परीट होता. त्यानें एकेदिवशीं चुकीनें ब्राह्मणांचीं मौल्यवान् वस्त्रें नीळवर्णाच्या रंगांत टाकून दिलीं. मागून ही चूक त्या परीटाच्या ध्यानीं येऊन ब्राह्मण रागावतील ह्या भीतीनें तो तेथून देशांतराला जाण्यास निघाला.

---

* 'के दारयामि' ह्याठिकाणीं वास्तविक 'कं दारयामि' असें पाहिजे. कारण 'दारयामि' ह्या क्रियापदाचें 'कं' हें कर्म आहे, व 'के' हें प्रथमांत-कर्तृस्थानीय पद आहे. तथापि 'केदार' ह्या पदाची सिद्धि करावयाची असल्यामुळे 'के' ह्या पदाला आर्षनियमानें द्वितीयात्व अर्थात् कर्मत्व कल्पून व अलुक्समास करून 'केदार' शब्दाची संगति लाविली आहे.

ही बातमी परिटाच्या मुलीला समजताच तिनें आपल्या सखीला सर्व हकीगत निवेदन केली. त्या वेळीं ती सखी परीटाला म्हणते कीं, नीलवर्णांत टाकिलेलीं जीं ब्राह्मणांचीं वस्त्रें आहेत तीं तेथून जवळच एक सरोवर आहे, त्यांत बुडवून काढा, म्हणजे ती पूर्वीप्रमाणें शुक्लवर्णाची होऊन त्यांचा नीलवर्ण दूर होईल. असें त्या मुलीच्या सखीचें भाषण ऐकतांच परीटाला मोठा आनंद झाला; व त्यानें तीं वस्त्रें त्या सरोवरांत बुडवितांच अत्यंत शुक्लवर्णानें युक्त झालीं. त्या दिवसापासून त्या सरोवराला शुक्लतीर्थ असें नांव प्राप्त झालें. एकदां श्वेतद्वीप हें कलिकालाच्या संपर्कानें कृष्णवर्णाचें झालें असतां त्या कृष्णवर्णाच्या श्वेतद्वीपाला ह्या सरोवरांत बुडविलें; व त्यायोगें ह्या श्वेतद्वीपाला पुनः शुक्लत्व प्राप्त झालें. जे कोणी ह्या शुक्लतीर्थांत स्नान करतात ते निष्कल्मष होत्साते मुक्त होतात.

---

# अध्याय १२४ वा.

## मुखारतीर्थमाहात्म्य.

सूत म्हणतात; आतां तुम्हांला मुखारतीर्थाचें माहात्म्य सांगतों. ह्या तीर्थांत स्नान केल्यामुळें वाल्मीकिमुनीला सिद्धि प्राप्त झाली. पूर्वी चमत्कारक्षेत्रांत मांडव्य गोत्रांत उत्पन्न झालेला एक लोहजंघ नांवाचा ब्राह्मण होता. एकदां दुष्काळ पडला असतां लोहजंघाला उदरंभरणार्थ चोरी करण्याचा प्रसंग प्राप्त झाला. मध्यंतरीं ह्याप्रमाणें कित्येक दिवस निघून गेल्यावर लोहजंघाला सप्तर्षींचें दर्शन झालें. सप्तर्षींना मारून त्यांचे जवळ जें कांहीं द्रव्य असेल तें घेऊन जाण्याच्या इरादानें लोहजंघ कांठी उगारून त्यांचे अंगावर धांवत गेला. त्या-वेळीं सप्तर्षि दीनवाणीनें लोहजंघास म्हणतात कीं, तूं ब्राह्मण असून हें दुष्कर्म कां करितोस? आमच्यासारख्या दीन ब्राह्मणांना मारून तुला काय मिळणार आहे? असें ऋषींचें भाषण ऐकून लोहजंघ म्हणतो कीं, तुमच्या जवळचीं वस्त्रें, वल्कलें, आसनें; व पादत्राणें वगैरे जें काय असेल तें मला अर्पण करा. नंतर ऋषि म्हणतात; हे ब्राह्मणा! हें दुष्टकृत्य तूं कशाकरितां आचरितोस? असें ऋषिवाक्य ऐकून लोहजंघ म्हणतो; मी हें कृत्य स्त्रीपुत्रादि कुटुंबाच्या पोषणार्थ करीत आहे. ह्यांत माझा दुसरा कोणताहि उद्देश नाहीं. तेव्हां ऋषि त्या ब्राह्मणाला विचारतात कीं, जर तूं हें दुष्कृत्य स्वतःकरितां करीत नसून स्त्रीपुत्रा-दिकांकरितां करीत आहेस, तर ह्या तुझ्या दुष्कर्माचे भागीदार तेहि झाले पाहिजेत, तेव्हां घरीं जाऊन तूं आपल्या स्त्रीपुत्रांना विचार कीं, मी तुमच्यासाठीं जें दुष्कर्म करितों त्याचे भागीदार तुम्ही आहां काय? असें ऋषींचें भाषण ऐकतांच

लोहजंघानें घरीं जाऊन आपल्या स्त्रीपुत्रादिकांस "तुम्ही माझ्या दुष्कृत्याचें पापभागी आहां काय ?" असा प्रश्न केला. त्या वेळीं त्या सर्वांनीं त्यास "नाहीं" असें साफ उत्तर दिलें. हें ऐकतांच लोहजंघाला पश्चात्ताप झाला; व ऋषीजवळ येऊन तो त्यास शरण गेला. तेव्हां ऋषींनीं लोहजंघावर अनुग्रह-करून "जाटघोटा" ह्या मंत्राचा जप करीत बसण्यास सांगितलें; व ते ऋषी तीर्थयात्रा करण्याकरितां निघून गेले. कालान्तरांनीं पुनः तेच ऋषि तेथें आले असतां त्या लोहजंघाचे शरीरावर मोठें वारूळ उत्पन्न झालें आहे. व त्या वारूळांतून "जाटघोटा" ह्या मंत्राचा ध्वनी निघत आहे; असें पाहून ऋषींनी लोहजंघाला हांक मारून सांगितलें कीं, तूं आज कृतार्थ झाला आहेस. आज तुझा हा वारुळापासून म्हणजे वल्मीकापासून दुसरा जन्मच झाल्यामुळें तुला वाल्मीकि हें दुसरें नांव प्राप्त झालें आहे. ह्या स्थानाला व तीर्थाला मुखर-तीर्थ हें नांव प्राप्त झालें आहे. असें म्हणून ऋषि निघून गेले.अजून सुद्धां तो ऋषि त्या ठिकाणीं वास करीत आहे.त्याचें पूजन करणारा कवि होऊन मोक्षाला जातो.

---

## अध्याय १२५ व १२६ वा.

### सत्यसंधेश्वरमाहात्म्य.

पूर्वी सत्यसंधेश्वर नांवाचा एक राजा होता. त्याला कर्णोत्पला नांवाची एक कन्या झाली. कर्णोत्पला उपवर झाली असतां, सत्यसंध मुलीला वर शोधण्या-करितां ब्रह्मदेवाकडे गेला. ब्रह्मदेव त्या वेळीं समाधींत निमग्न असल्यामुळें सत्यसंधाला कांहीं वेळ तेथें खोळंबावें लागलें; नंतर ब्रह्मदेवाची समाधी उतर-तांच सत्यसंधानें ब्रह्मदेवास विचारिलें कीं, ही माझी मुलगी मी कोणाला देऊं. त्या वेळीं ब्रह्मदेव ह्मणतो; तूं ह्या मुलीचा आतां विवाह करूं नकोस. कारण, तुझ्या येण्यानें भूलोकांत तीन युगांइतका काल निघून गेला आहे. असें ब्रह्म-वाक्य ऐकतांच सत्यसंध मुलीला घेऊन भूलोकांत येऊन पाहतो तों सर्व स्थानें त्यास अपरिचित व अनोळखीचीं दिसतीं झालीं व त्या उभयतांचे देहहि वृद्ध-त्वाला प्राप्त झाले. हें वर्तमान तेथील राजाला समजतांच त्यानें त्यांचा चांगला सत्कार करून सर्व वृत्तांत श्रवण केला; नंतर सत्यसंध मुलीसह हाटकेश्वरक्षे-त्रांत जाऊन शंकराची आराधना करून कृतकृत्य झाला. जे कोणी कार्तिक महिन्यांत सत्यसंधराजानें स्थापिलेल्या सत्यसंधेश्वराचें पूजन करितात, ते सर्व संपत्तीनें युक्त होऊन व सर्व दुःखापासून मुक्त होऊन अंतीं शिवसायुज्याला प्राप्त होतात. हें आख्यान सर्वप्रकारच्या सिद्धि देणारें आहे.

## अध्याय १२७ वा.

### कर्णोत्पलातीर्थमाहात्म्य.

नंतर सत्यसंधराजाची कन्या जी कर्णोत्पला तिनें यौवनप्राप्त्यर्थ व सुस्वरूप पतीच्या प्राप्त्यर्थ देवीची आराधना केली. तिच्या आराधनेनें देवी प्रसन्न झाली; व कर्णोत्पलेला म्हणाली कीं, तूं शनिवारीं तृतीया आली असतां ह्या सरोवरांत स्नान कर; म्हणजे तुला यौवन व उत्तम पति प्राप्त होईल. नंतर तिनें त्याप्रमाणें करितांच तिला यौवन प्राप्त झालें; व तिचा विवाह प्रत्यक्ष मदनाबरोबर झाला. कर्णोत्पला ज्या सरोवरांत स्नान करिती झाली, त्या सरोवराला कर्णोत्पलातीर्थ हें नांव प्राप्त झालें. ह्या तीर्थांत स्नान केलें असतां इच्छा पूर्ण होतात.

## अध्याय १२८ वा.

### अटेश्वरोत्पत्ति.

बृहद्बल राजाला अटनांवाचा एक मुलगा झाला. त्यानें हाटकेश्वरक्षेत्रांत येऊन एक शिवलिंग स्थापून त्याची अत्यंत आराधना केली. त्यायोगें शंकर प्रसन्न होऊन त्यांनीं अटराजाला इष्ट वर दिले; व त्या लिंगाचें अटेश्वर असें नांव ठेविलें. जे कोणी माघ वद्य चतुर्दशीला अटेश्वराचें पूजन करितील त्यांस संतति व संपत्ति प्राप्त होऊन ते निर्भय अशा मोक्षाला प्राप्त होतील. अटेश्वरासमीप असणाऱ्या सुतप्रद कुंडांत जी स्त्री स्नान करून अटेश्वराचें पूजन करील ती पुत्रवती होईल, ह्यांत बिलकुल संशय नाहीं.

## अध्याय १२९ वा.

### याज्ञवल्क्याश्रममाहात्म्य.

एकदां याज्ञवल्क्यमुनीचे गुरु जे शाकल्य ऋषि त्यांनीं याज्ञवल्क्याला सांगितलें कीं, राजाला राज्याभिषेक व्हावयाचा आहे, करितां तूं तेथें माझ्यातर्फें जा. अशी गुरूची आज्ञा होताच याज्ञवल्क्यानें सांगितलें कीं,तो राजा उद्दामपणानें वर्तन करणारा आहे, तेव्हां मीं तिकडे जाणार नाहीं. शाकल्यगुरूनें पुनः आग्रहपूर्वक

जाण्यास सांगितलें असतांहि जेव्हां तो याज्ञवल्क्य ऐकेना, तेव्हां शाकल्याला राग आला व त्यानें याज्ञवल्क्याला सांगितलें कीं, तूं मजजवळ अध्ययन करून शिष्यत्व पत्करण्यास अयोग्य आहेस, करितां जें कांहीं अध्ययन केलें असशील तें मला परत दे व तूं येथून निघून जा; असें ह्मणून गुरूनें आथर्वणिकमंत्रानें उदक अभिमंत्रून याज्ञवल्क्याला प्राशन करण्यास दिलें. त्यानें तें प्राशनकरतांच त्याला वांति होऊन अध्ययन केलेलीं सर्व वेदाक्षरें त्याचें मुखांतून ओकून बाहेर पडलीं; नंतर याज्ञवल्क्य शाकल्याच्या आश्रमापासून जो निघाला तो थेट हाटकेश्वरक्षेत्रांत येऊन सूर्याची उपासना करूं लागला. सूर्य प्रसन्न होतांच याज्ञवल्क्यानें त्यास वेदाध्ययनाची लालसा दाखवून गुरु होण्याबद्धल विनंति केली. तेव्हां सूर्य म्हणतो कीं, ह्या नजीक असणाऱ्या कुंडांत मी वेद टाकतों व तूं त्यांत स्नान करतांच तें तुला मिळतील; नंतर सूर्याच्या सांगण्याप्रमाणें तेथें स्नान करतांच याज्ञवल्क्याला सर्व वेद प्राप्त झाले; नंतर ते त्यानें जनक, कात्यायन वगैरेंना शिकविले. शेवटीं याज्ञवल्क्य देह विसर्जन करून ब्रह्मरूप होता झाला.

---

# अध्याय १३० वा; व १३१ वा.

## पंचपिंडागौरीमाहात्म्य.

याज्ञवल्क्याला दोन बायका होत्या. पैकीं एकीचें नांव कात्यायनी व दुसरीचें नांव कल्याणी. कात्यायनीलाच कात्यायन नांवाचा मुलगा झाला. कात्यायनी व कल्याणी ह्या दोघींनीं त्या ठिकाणीं आपआपल्या नांवांनीं दोन कुंडें निर्माण केलीं. त्यांपैकीं कल्याणीतीर्थांत स्नान केलें असतां पतिसुख उत्तमतऱ्हेनें प्राप्त होतें. एकदां कात्यायनीनें कल्याणीला विचारिलें कीं, ज्यायोगें पति आपणावर प्रेम करील असा उपाय सांगा. नंतर कल्याणी म्हणते. एके दिवशीं मी पितृगृहीं असतां त्या ठिकाणीं नारदऋषि आले. त्या वेळीं माझा पिता शांडिलऋषि नारदाला विचारितां झाला कीं, ही मला एकच मुलगी आहे, करितां हिच्या कल्याणाचा एकादा उपाय आपण सांगा. तेव्हां नारद म्हणतो. पूर्वीं पार्वतीनें शंकराच्या प्राप्तीकरितां मातीचे पांच गोळे तयार करून त्यांस पृथ्वी, आप, तेज, वायु; व आकाश अशीं नांवें दिलीं; व ती नित्य त्या पंचपिंडाचें पूजन करीत असे. त्या योगें शंकर प्रसन्न होऊन तिच्या सर्व इच्छा पूर्ण करते झाले. करितां आतां तूंहि तेथें जाऊन पंचपिंडागौरीची पूजा कर, म्हणजे तुझ्या मुलीला सत्पतीची प्राप्ति होऊन ती सुखी होईल. असें सांगून नारद निघून गेले. नंतर माझा पिता शांडिल माझ्यासह पंचपिंडागौरी-

समीप येऊन तिचें पूजन करिता झाला. त्यायोगें माझा पति माझी उत्तम-तऱ्हेनें संभावना करून माझ्यावर प्रेम करितो. तूंहि त्या ठिकाणीं जाऊन पंच-पिंडागौरींचें पूजन कर; म्हणजे तुझ्यावर माझ्याप्रमाणें पति प्रेम करील. असें कल्याणीचें भाषण ऐकून कात्यायनी पंचकुंडा गौरीजवळ जाऊन अनुष्ठान करूं लागली. एक वर्ष पूर्ण होताच याज्ञवल्क्य तेथें येऊन तिच्या सर्व इच्छा पूर्ण करितां झाला. पुढें कात्यायनीला कात्यायन नांवाचा पुत्र झाला; व कात्यायनाला वररुचि नांवाचा मुलगा झाला. त्यानें गणपतीची आराधना करून विद्या संपादन केली; व व्याकरणासारखे ग्रंथ निर्माण केले.

## अध्याय १३२ वा.

### वास्तुपदोत्पत्ति.

याज्ञवल्क्याला झालेला जो कात्यायन नांवाचा मुलगा त्यानें वास्तुपद नांवाचें एक तीर्थ निर्माण केलें. ह्याठिकाणीं अठ्ठेचाळीस देवतांना सिद्धि प्राप्त झाली. एकदां शंकुकर्ण, कृशास्य, ऊर्ध्वकेश वगैरे दैत्य देवांना त्रास देण्याकरितां उत्पन्न झाले असतां देव ब्रह्मदेवाला शरण गेले. विष्णु त्या दैत्यांजवळ येऊन त्यांचें समाधान करितां झाला. नंतर ब्रह्मदेवाच्या सांगण्यावरून कात्यायनानें स्थापिलेलें जें वास्तुपद तीर्थ त्यांचें पूजन करितांच इंद्रादि देवांना शत्रुभय न राहतां ते स्वर्ग लोकाचा उपभोग घेऊं लागले. हें माहात्म्य सिद्धि देणारें आहे.

## अध्याय १३३ वा.

—:0:—

### अजागृहमाहात्म्य.

पूर्वीं एक अजापाल नांवाचा राजा होता. तो राजा अजापाल म्हणजे शेळ्यांचें पालन करणारा असल्यामुळें सर्व व्याधी शेळ्यांचें रूप घेऊन त्या राजाजवळ येत. अजापाळ हा मोठें घर तयार करून त्यांत सर्व शेळ्याचें पालन करीत असें. त्या गृहाचें नांव अजागृह असें होते. एकदां एक ब्राह्मण अजागृहांत रात्रीं राहिला असतां अजारूपधारी व्याधींच्या समागमानें तो व्याधिग्रस्त झाला. हा प्रकारपाहून त्या ब्राह्मणाला मोठें आश्चर्य वाटलें. इतक्यांत अजापाल राजा तेथें येऊन ब्राह्मणास विचारिता झाला कीं, तूं असा व्याधिग्रस्त कसा झालास ?

तेव्हां तो ब्राह्मण म्हणतो कीं, मी ह्या शेळ्यांजवळ आज रात्रीं निजलों असतां मी हा असा व्याधिग्रस्त झालों आहे. असें ऐकतांच अजापालाला राग आला; व तो शेळ्यांना धाक दाखवून सर्व वर्तमान विचारिता झाला. त्या वेळीं शेळ्या म्हणतात कीं, हा ब्राह्मण तीन रोगांनीं पीडित झाला आहे. एक क्षय, दुसरें कुष्ठ व तिसरी खरूज. पैकीं पहिल्या दोन व्याधी असाध्य आहेत. त्या अनुष्ठानाशिवाय नष्ट होणार नाहींत. नंतर तो ब्राह्मण ब्रह्मानुष्ठानानें व्याधिमुक्त झाला.

## अध्याय १३४ वा.

### खंडशिलासौभाग्यमाहात्म्य.

पूर्वीं हारीत नांवाचा एक ब्राह्मण होता. त्यानें वानप्रस्थाश्रमामध्यें पुष्कळ तप केलें. त्याची पूर्णकला नांवाची एक बायको होती. एकदां ब्रह्मदेवसुद्धां त्या पूर्णकला नामक ब्राह्मणपत्नीला पाहून काममोहित झाला. एकदां मदन रतीसह शंकराच्या दर्शनाकरितां शिवालयांत आला असतां, पूर्णकलाहि शिवपूजन करण्याकरितां त्याच वेळीं तेथें आली. मदनहि पूर्णकलेला पाहतांच रतीचा त्याग करून व काममोहित होऊन एका वृक्षाखालीं मूर्च्छित पडला. पूर्णकलाहि मदनाला पाहून मोहित झाली; व त्याजपुढें येऊन उभी राहिली. त्या वेळीं मदन सावध होऊन तिला सर्व वर्तमान विचारीत असतां पूर्णकलेनें आपलें सर्व वर्तमान त्याला सांगितलें. इकडे हारीत अजून पत्नी कां येत नाहीं, ह्मणून तिचा शोध करण्याकरितां जो शिष्यासह निघाला, तो जेथें मदन व हारीतपत्नी पूर्णकला बोलत बसली होती, तेथें प्राप्त झाला; व एका झुडपाच्या आड उभें राहून त्या उभयतांचीं भाषणें ऐकूं लागला. त्यांच्या कामिक भाषणानें हारिताला राग आला व त्यानें मदनाला "तूं कुष्ठरोगानें पीडित हो" असा शाप दिला व पूर्णकलेला "तूं शिला (दगड) होऊन पडशील" असा शाप दिला, व तो आश्रमाला परत गेला. हारीताच्या शापाप्रमाणें पूर्णकला ही खंडित अशा शिलेप्रमाणें झाली व मदन कुष्ठरोगानें युक्त झाला. एकदां देवांनीं मदनाला कुष्ठरोग उत्पन्न होण्याचें कारण विचारिलें, असतां, मदनानेंहि हारीतानें दिलेल्या शापाचें वर्तमान निवेदन केलें. पुढें देवांनीं मदनाला सांगितलें कीं, जेथें पूर्णकला पतिशापानें खण्डितशिलेप्रमाणें पडली आहे व त्या कारणास्तव जिला खंडशिला म्हणतात, तिचें पूजन कर; म्हणजे कुष्ठरोगापासून तूं मुक्त होशील; नंतर मदन देवांच्या सांगण्याप्रमाणें खण्डशिलेचें पूजन करितांच रोगमुक्त झाला. व सौभाग्यसंपन्न होऊन त्रैलोक्यांत मान्य झाला. जे कोणी पुरुष खण्डशिलासौभाग्याचें पूजन करितील ते दोषमुक्त होतील.

# अध्याय १३५ वा.

## दीर्घिकोत्पत्ति.

पूर्वी वीरशर्मा नांवाचा एक द्विज होता. त्याला अत्यंत दीर्घ म्हणजे उंच अशी दीर्घिका नांवाची एक मुलगी झाली. अति उंच मुलीशीं विवाह लावणारा साहा महिन्यांत मृत्यु पावतो, असा शास्त्रनियम सर्वांस माहिती असल्यामुळें कोणीहि तिच्याशीं विवाह लावीना. हा प्रकार पाहून त्या कुमारिकेला फार वाईट वाटलें; व तिनें चांद्रायणादि व्रतें करण्यास प्रारंभ केला. अशा रीतीनें व्रताचरणांत बराच काळ निघून गेल्यामुळें त्या कुमारिकेला वृद्धत्व प्राप्त झालें. एके दिवशीं एक कुष्ठरोगानें पीडित द्विज येऊन दीर्घिकेला म्हणाला कीं, जर तूं माझ्या सांगण्याप्रमाणें वागशील तर मी तुझें पाणिग्रहण करीन. नंतर दीर्घिकेनें त्या द्विजाच्या सर्व अटी कबूल करून त्याच्याशीं लग्न लाविलें; व काय आज्ञा आहे! असा प्रश्न केला. तेव्हां तो द्विज तीर्थयात्रेची इच्छा प्रदर्शित करिता झाला. दीर्घिकाहि पूर्वोक्त नियमाला अनुसरून पतीला खांद्यावर घेऊन तीर्थयात्रा करण्याकरितां निघाली. दीर्घिका पतीसह अनेक तीर्थें हिंडत हिंडत हाटकेश्वर क्षेत्रांत प्राप्त झाली. त्या ठिकाणीं पतीला खांद्यावर घेऊन दीर्घिका श्मशानाच्या रस्त्यानें चालली असतां वाटेंत सुळावर चढविलेल्या माण्डव्य ऋषीला तिच्या पतीच्या पायाचा धक्का लागला. त्या योगें माण्डव्याला राग आला; व त्यानें दीर्घिकेला शाप दिला कीं, तुझा पति उद्या सूर्योदय होतांच मृत होईल. असा शाप ऐकतांच दीर्घिकेनें मनांत निश्चय केला कीं, उद्यां सूर्योदयच होऊं दिला नाहीं, म्हणजे आपला कार्यभाग झाला; असें म्हणून दीर्घिका पतीसह तेथेंच बसली. पतीनें त्या वेळीं पाणी पिण्यास मागितलें असतां तिनें पतीच्या चरणाचें स्मरण करून एक जोरानें जमिनीवर लाथ मारिली. तात्काळ तेथें एक जलप्रवाह निर्माण झाला; त्या योगें पतीची तृष्णाहि शांत झाली. दीर्घिकेनें सूर्याला उगवूं न दिल्यामुळें सर्वत्र होमहवनादि कृत्यें बंद पडलीं; व त्यामुळें सर्व देव दीर्घिकेजवळ प्राप्त झाले. देवांनीं तुझ्या पतीला आम्ही जिवंत करितों, असें सांगून तिच्याकडून सूर्योदय करविला; व देवांनीं तिचा पति जिवंत केला; व उभयतांना तरुण; व स्वरूपवान् केलें.

## अध्याय १३६ वा.

### दीर्घिकामाहात्म्य.

दीर्घिकेचा पति जीवंत झाल्यानंतर सर्व देव मांडव्याजवळ प्राप्त झाले व त्यास वर माग, असे म्हणूं लागले. त्या वेळीं मांडव्यमुनि देवांना ह्मणतों कीं, मी असें कोणतें पाप केलें होतें कीं, ज्याच्या योगें माझ्यावर चोरीचा वृथारोप येवून मला शूळावर चढविण्याची येथील राजाला इच्छा झाली. असें मुनिवचन ऐकून यमधर्म म्हणतो; मुने! पूर्वजन्मीं तूं लहान असतांना एका बगळ्याला सुईनें टोंचून त्रास दिलास; त्यामुळें तुला ही शिक्षा भोगावी लागली. असें ऐकून मुनीला फार वाईट वाटलें व म्हणाला कीं, धर्मा! अज्ञानावस्थेंत केलेल्या ह्या सूक्ष्म अपराधाबद्दल तूं मला एवढी मोठी शिक्षा ज्यापेक्षां दिलीस त्यापेक्षां तुला शूद्रयोनींत जन्म घ्यावा लागेल, असा धर्मराजास मुनीनें शाप दिला; नंतर सर्व देव स्वस्थानीं निघून गेले. जेथें दीर्घिकेनें लाथ मारून जल उत्पन्न केलें व पतीची तृष्णा शमविली त्या तीर्थाला देवांनीं दीर्घिकातीर्थ हें नांव ठेविलें. जे कोणी ह्या दीर्घिकेंत स्नान करितात ते सर्व पापापासून मुक्त होऊन सद्गतीला प्राप्त होतात. सूर्य कन्याराशीला गेला असतां, पंचमीच्या दिवशीं जे ह्या तीर्थांत स्नान करितील, ते पुत्ररहित असले तरी पुत्रयुक्त होतील; नंतर ती दीर्घिका त्या तीर्थाच्या प्रसादानें पतीसह आनंदानें राहून सौभाग्य व ऐश्वर्य यांचा उपभोग घेऊन अंतीं मुक्त झाली. हें दीर्घिकाख्यान श्रवण किंवा पठण केलें असतां सुख, सौभाग्य, ऐश्वर्य व मोक्ष हीं प्राप्त होतात.

---

## अध्याय १३७ वा.

### मांडव्यवृत्तान्त.

एकदां मांडव्य ऋषि तीर्थयात्रा करीत हिंडत असतां विश्वामित्रतीर्थाचे ठिकाणीं प्राप्त झाला. तो तेथें स्नान करून नित्य कर्म करीत असतां त्याठिकाणीं कांहीं चोर प्राप्त झाले, व त्यांनीं चोरून आणलेलें राजद्रव्य मांडव्याजवळ टाकून देऊन ते पळून गेले. मागाहून राजदूत येऊन त्यांनीं मांडव्याला विचारिलें असतां तो कांहीं एक बोलला नाहीं. नंतर त्यांना मांडव्याचा संशय येऊन हाच चोर आहे, असें समजून त्यांनीं त्याला धरून राजासमीप नेलें. राजानेंहि त्या

मुनीवर चोरीचा आरोप शाबीत करून त्याला सुळावर चडविण्याचा हुकूम आपल्या दूतांना केला. त्या वेळीं त्यांनीं राजाज्ञेप्रमाणें मांडव्याला श्मशान-भूमीवर आणून तेथें लोखंडाचा तप्त सूळ उभा केला; व त्याला त्यावर चढविलें. जरी मांडव्याला सुळावर चढविलें होतें तरी त्या मांडव्याचा नाश झाला नाहीं.

# अध्याय १३८ ते १४० वा.

## धर्मराजेश्वरमाहात्म्य.

पूर्वीं हाटकेश्वरक्षेत्रांत कश्यप-कुळांत उत्पन्न झालेला असा उपाध्याय नांवाचा ब्राह्मण होता. त्याला वृद्धावस्थेंत एक पांच वर्षांचा पुत्र होऊन तो मृत झाला व त्यायोगें तो ब्राह्मण यमधर्माकडे जाऊन त्यास शाप देता झाला कीं, मला जसें तूं अपुत्र केलेस, तसा तूंहि अपुत्र होशील व अपूज्य होशील; नंतर त्या पुत्राला उपाध्यायानें यमापासून सोडवून आणिलें; नंतर स्वशापाच्या निरासार्थ यमधर्मानें धर्मेश्वर नावांनें एक लिंग स्थापिलें व यमधर्म स्वदोषापासून मुक्त झाला. त्याच्या पूजनानें सर्व दुःखें नष्ट होऊन सर्व संपत्ति व ऐश्वर्य प्राप्त होतें.

# अध्याय १४१ वा.

## मिष्टान्नदेश्वरमाहात्म्य.

पूर्वीं वसुसेननांवाचा एक राजा होता. त्यानें पुष्कळ दानधर्म केला; परंतु अन्न व पाणी हें सुलभ्य आहे, अशा दृष्टीनें कधींहि कोणाला दिलें नाहीं. कांहीं काळानें त्याला मृत्यु आला असतां त्याचा सत्यसेन नांवाचा मुलगा प्रधानांनीं राज्यासनावर आरुढ केला. वसुसेनाला दानादि पुण्यकर्माचरणामुळें स्वर्गप्राप्त झाला; परंतु अन्नोदक दान न दिल्यामुळें त्याची क्षुधा व तृषा ही कायम राहून त्यास अन्नोदक मिळेनासें झालें. त्यावेळीं क्षुधेनें व तृषेनें व्याकूळ होऊन वसुसेन इंद्राजवळ येऊन म्हणतो, इंद्रा! हा मला स्वर्ग नरकाहूनहि अधिक पीडा देणारा असा भासत आहे. ह्या स्वर्गापेक्षां नरकांत पडलों असतों तर बरें झालें असतें. अशी वसुसेनाची दीन वाणी ऐकून इंद्र त्यास म्हणतो, राजा! तूं पूर्वीं पुष्कळ दानें दिलींस त्यामुळें तुला स्वर्ग प्राप्त झाला आहे; व तूं पूर्वीं अन्नोदक दान न दिल्यामुळें तुला क्षुधेची व तृषेची बाधा होत आहे. आतां जर तुझा पुत्र ब्राह्मणांना अन्नोदक दान करील तरच तुझी क्षुधा व तृषा शांत होईल.

नंतर वसुसेनानें नारदाकडून आपल्या पुत्राला अन्नोदकदान देण्याबद्दल निरोप पाठविला. त्याप्रमाणें सत्यसेन अन्नोदकदान देत असतां दुष्काळ पडल्यामुळें तेंहि मिळेनासें झालें. नंतर सत्यसेन अन्नोदकप्राप्त्यर्थ मिष्टान्नदेश्वर नांवानें लिंग स्थापून त्याच्या पूजनानें पुष्कळ अन्न व उदक मिळवून व ब्राह्मणांना देऊन पितरांनाहि अन्नोदकानें तृप्त करितां झाला. जे कोणी ह्या मिष्टान्नदेश्वराचें पूजन करितील त्यांना मिष्टान्नोदक प्राप्ति होईल व मोक्षहि मिळेल.

## अध्याय १४२ वा.

### गणपतित्रयमाहात्म्य.

पूर्वी लोकांनीं सत्कर्मे आचरून स्वर्गप्राप्ति करून घेतली, त्या वेळीं सर्व स्वर्गलोक मनुष्यांनीं व्याप्त झालेला पाहून इंद्राला वाईट वाटलें व त्यानें शंकराला सांगितलें कीं, सर्व मानव पुण्यकर्मे करून माझ्या लोकाला प्राप्त होतात; व त्यायोगें स्वर्गाला त्यांचा फार उपद्रव होतो, तरी त्याचा आपण बंदोबस्त करा. असें देवांचें भाषण ऐकून शंकरानें पार्वतीकडे अवलोकन केलें. तत्काळ पार्वतीनें आपल्या अंगाचा मळ काढून त्याची गणपतीची मूर्ति तयार केली व लोकांना पुण्यकर्मांत विघ्न करण्याकरितां भूतलावर पाठविली. गणपति आपल्या कृत्यांत विघ्न उत्पन्न करितो, असें लोकांस समजतांच त्यांनीं हेरंब, मोक्षद व मर्त्यद अशा नांवांनीं हाटकेश्वरक्षेत्रांत गणपतीची स्थापना केली, व त्या तीन गणपतींच्या पूजनानें लोकांचीं सर्व विघ्नें नष्ट होऊन त्यांना पूर्वीप्रमाणें सत्कर्मांनीं स्वर्गप्राप्तिरूप फळें मिळूं लागलीं. ह्याचें पूजन विघ्ननाश करणारें व मुक्ति देणारें आहे.

## अध्याय १४३ व १४४ वा.

### चित्रांगदाख्यान.

एकदां जाबाली नामक ऋषीची घोर तपश्चर्या पाहून त्याच्या तपांत विघ्न उपस्थित करण्याकरितां इंद्रानें रंभेला पाठविलें असतां रंभा जाबालीला कृत्रिम हावभावानें मोहित करून त्याच्याशीं रममाण झाली, व त्यायोगें रंभा आपल्या गरोदर झाली. दहा महिनें पूर्ण होताच तिला एक मुलगी झाली. रंभेनें ती मुलगी जाबालीपासून झाल्यामुळें त्याच्याच स्वाधीन केली. जाबालीहि प्रेमवश

होऊन तिचें सांगोपन करिता झाला. कांहीं दिवसांनीं ती उपवर झाली असतां, चित्रांगद नांवाचा गंधर्व विमानांत बसून तिच्याजवळ आला व कामवश होत्साता तिला सर्व हकीकत विचारिता झाला. त्या कन्येची सर्व हकीगत विचारून घेतल्यानंतर ती नको ह्मणत असतांहि तिला विमानांत बसवून चित्रांगद स्वस्थानाला निघून गेला; व तिच्याशीं यथेच्छ विलासभोग भोगूं लागला. इकडे जाबाली मुलीचा शोध करीत असतां अत्यंत विलाप करूं लागला. शेवटीं जाबाली स्वर्गलोकांत चौकशी करीत असतां चित्रांगदा-सह आपली मुलगी क्रीडा करीत आहे, असें त्यास आढळलें. जाबाली आलेला पाहून चित्रांगदानें जाबालीजवळ केलेल्या अपराधाची क्षमा मागितली; तथापि जाबालीनें चित्रांगदाला शाप दिला कीं, तूं कुष्ठव्याधीनें पीडित होऊन पृथ्वीवर पडशील. नंतर चित्रांगद शापनिवृत्त्यर्थ कुष्ठरोगानें पीडित असा पत्नीसह हाटकेश्वर क्षेत्रांत येऊन तेथें शिवलिंग स्थापून त्याची उपासना करूं लागला. त्या योगें शंकरानें प्रसन्न होऊन; व चित्रांगदाला शापमुक्त करून चित्रांगदानें स्थापिलेल्या चित्रांगदेश्वराचें माहात्म्य वर्णन केलें, ह्या चित्रांगदे-श्वराच्या पूजनानें अनेक सिद्धि प्राप्त होतात; व मोक्षहि मिळतो.

## अध्याय १४५ व १४६ वा.

### अमरकेश्वरमाहात्म्य.

पूर्वीं दितीपासून दैत्य व अदितीपासून देव उत्पन्न झाले. दैत्य देवांचा वारंवार पराभव करतात, हें अदितीला सहन न होऊन तिनें शंकर प्रसन्न करून घेतला, व देवांना जय मिळण्याबद्दलचा उपाय विचारिला. तेव्हां शंकरानें अदितीला सांगितलें कीं, हें अमरकेश्वर नांवाचें माझें लिंग नित्य पूजित जा; ह्मणजे तुझी इच्छा पूर्ण होईल. असें शिववाक्य ऐकतांच देवांना व दितीलाहि फार आनंद झाला. नंतर देवांनीं अमरकेश्वराच्या पूजनानें दैत्यांचा पराभव केला. नंतर हा अमरकेश्वराचा पराक्रम जाणून देवांनीं त्याची स्थापना हाटके-श्वरक्षेत्रांत केली. वृषभध्वज, शर्व, मृगव्याध, अजेकपाद, अहिर्बुध्न्य, पिनाकी, दहन, ईश्वर, कपाली, वृषाकपि, व त्र्यंबक हीं शंकराचीं अकरा स्वरूपें ह्या अमरकेश्वराचे ठिकाणीं वास्तव्य करितात. तसेच धर, ध्रुव, सोम, मख, अनिल, अनल, प्रत्यूष व प्रभास हे आठ वसु ह्या अमरकेश्वराच्या पूजनानें सिद्धि मिळ-विते झाले. अमरकेश्वरासन्निध असणाऱ्या बारा सूर्यांची उपासना करणारेहि ज्ञानसंपन्न होऊन मुक्त होतात. हें आख्यान श्रवण करणारेहि विजयी होतात.

## अध्याय १४७ व १४८ वा.

### वटिकेश्वरमाहात्म्य.

व्यासाला गृहस्थाश्रमी व्हावें, अशी इच्छा उत्पन्न होऊन त्यानें जाबालीच्या वटिका नामक कन्येशीं विवाह लाविला. कालान्तरानें ती गरोदर झाली व तिला शुक नांवाचा पुत्र झाला. शुक हा विरक्त असल्यामुळें वटिकेला शुकापासून सुख झालें नाहीं; तेव्हां तिनें दुसरा पुत्र होण्याच्या इच्छेचें तप करण्याकरितां व्यासाजवळ परवानगी मागितली. व्यासानें वटिकेला आज्ञा दिली असतां हाटकेश्वरक्षेत्रांत शिवलिंग स्थापून त्याची उपासना करून तप करिती झाली. तिच्या तपानें शंकर प्रसन्न होऊन तिला इष्ट वर देते झाले. वटिकेनें स्थापिलेल्या वटिकेश्वरलिंगाच्या पूजनानें पुत्रप्राप्ति, सुख व अंतीं मोक्ष प्राप्त होतो.

## अध्याय १४९ व १५० वा.

### केलीश्वरीमाहात्म्य.

दक्षाच्या दिति नामक कन्येचे ठिकाणीं कश्यपापासून हिरण्यकशिपु नामक दैत्य उत्पन्न झाला. त्या हिरण्यकशिपूनें देवांना पीडा दिल्यामुळें विष्णूनें त्याचा नाश केला. हिरण्यकाशिपूच्या नंतर प्रह्लादाला राज्यावर बसविण्याकरितां लोकांनीं आग्रह केला असतां त्यानें तें नाकारल्यामुळें त्या जागीं हिरण्यकशिपूचा दुसरा पुत्र जो अंधक त्याला स्थापित केलें. अंधकानें तप करून ब्रह्मदेवापासून विजयप्राप्त्यर्थ वर मिळविला; नंतर अंधकानें देवांचा पराभव केला असतां, शंकरानें अंधकाला मारण्याकरितां केलीप्रमुख कृत्या निर्माण केल्या. त्या कृत्यांनीं दैत्यसैन्य भक्षण करण्याचा सपाटा चालविल्यामुळें अंधकानें आपल्यामायेनें सर्वत्र काळोख उत्पन्न केला.; त्यामुळें कृत्यांना कांहींएक दिसेनासें झालें; नंतर केलीश्वरीप्रमुख कृत्यांनीं तो अंधकार नष्ट करून सर्व दैत्यांचा फडशा पाडला; व शेवटीं अंधक दैत्य युद्धांतून पळून शुक्राचार्यांकडे गेला. युद्धाच्या जागीं केलीश्वरीची स्थापना झाली. तिच्या पूजनानें शत्रु नाश पावतात.

# अध्याय १५१ वा.

## भैरवक्षेत्रमाहात्म्य.

अंधकदैत्याला जय मिळावा, म्हणून शुक्राचार्यांनें हाटकेश्वरक्षेत्रांत असणाऱ्या केलीश्वरीच्या आराधनेनें केलीश्वरीची कृपा संपादन केली. हें वर्तमान अंधकाला समजताच त्याला मोठा आनंद झाला; व त्यानें पुनः शंकराबरोबर युद्ध करण्यास प्रारंभ केला, शंकरानेंहि आपले शिवगण अंधकाबरोबर युद्ध करण्यास पाठविले; ज्या वेळीं अंधकानें सर्व शिवगणांचा पराभव केला तेव्हां स्वतः शंकरानें अंधकावर कुबेरास्त्राचा प्रयोग केला. त्यायोगें अंधक मूर्च्छित झाला; आणि बोलला कीं, माझी दुष्टबुद्धी समूळ नष्ट झाली आहे; मी तुझा सेवक आहे, असें समजून आपण मला काय ती आज्ञा करावी. नंतर शंकरानें अंधकाला दुसरें भृंगिरिटी हें नांव देऊन त्यास आपल्या गणांत मिळविलें. नंतर भृंगिरिटानें हाटकेश्वर क्षेत्रांत येऊन शंकराची स्थापना केली; व त्यास भैरव असें नांव दिलें. ज्या ठिकाणी भैरव आहे; त्या स्थळालाहि भैरवक्षेत्र असें नांव प्राप्त झालें आहे. भृंगिरिटीनें त्या भैरवाचें पूजन करितांच भैरव प्रसन्न होऊन त्यास इच्छित वर देता झाला. सुरथनामक राजानें भैरवाचें पूजन करून नष्ट झालेलें राज्य संपादन केलें. जे कोणी भैरवाची उपासना करितील त्यांचें सर्व दैन्य नष्ट होऊन ते स्वेष्ट वस्तूंचा लाभ करून घेतील. तसेंच त्यांचीं सर्व कार्यें सिद्ध होऊन त्यास मुक्ति मिळेल.

---

# अध्याय १५२ वा.

## चक्रपाणिमाहात्म्य.

शौनकादि ऋषींनीं तीर्थमाहात्म्यश्रवणाची इच्छा प्रदर्शित केल्यावरून सूत म्हणतात, ऋषिहो! शिवलिंगें व शिवतीर्थें अनंत आहेत; परंतु विशेषतः शंखतीर्थांत स्नान करून, जे एकादशीचे दिवशीं एकादशरुद्रांचें पूजन करितात; ते सर्व सिद्धींना मिळवून कृतार्थ होतात; तसेंच षष्ठीचे दिवशीं जे वटादित्याचें पूजन करितील त्यांना बारा सूर्य अवलोकिल्याचें श्रेय मिळेल. त्याप्रमाणेंच माहित्थादेवीच्या दर्शनानें सर्व दुर्गांच्या दर्शनाचें फल मिळतें. गणेशाचें दर्शन घेणाऱ्यांना विनायकांच्या दर्शनाचें फल मिळतें. केवळ चक्रपाणीच्या दर्शनानें त्रैलोक्यांतील सर्व तीर्थांच्या व लिंगांच्या दर्शनाचें फल मिळतें. ह्या चक्र-

पाणीची स्थापना द्वापारयुगांत पंडुपुत्र अर्जुनानें केली आहे. ह्या चक्रपाणीच्या पूजनानानें ब्रह्महत्त्यादि सर्व पातकें नष्ट होतात. ब्रह्मदेवाच्या प्रार्थनेंवरून नर व नारायण ह्या दोघांनीं द्वापारयुगांत अर्जुन व कृष्ण ह्या नांवानें भूभार हरण करण्याकरितां अवतार धारण केले होते. एकदां द्रौपदीसह धर्मराज आपल्या पर्णकुटिकेंत निजले असतां, व ब्राह्मणांच्या गाई शत्रूंच्या हांतून सोडवून आणण्याकरितां अर्जुन शस्त्रगृहांत शिरला असतां, धर्मराजानें अर्जुनाकडे अवलोकन केलें. नंतर अर्जुन शस्त्राच्या साह्यानें गाईना सोडवून आणिल्यावर; दुसरे दिवशीं धर्मराजास म्हणाला कीं, बा धर्मा! काल मी आपण द्रौपदीसह एकांतांत असतां कांहीं अपरिहार्य कारणामुळें मला शस्त्रें आणण्याकरितां तुमच्या एकांतांत यावें लागलें; करितां मी दोषी आहे; व त्या दोषाच्या नाशार्थ मी तीर्थयात्रा करण्याकरितां जाणार आहे; करितां आपण मला आज्ञा द्यावी. अशातऱ्हेनें सांगून व धर्मराजाची आज्ञा घेऊन, अर्जुन तीर्थयात्रा करण्याकरितां निघाला. तो फिरत फिरत ह्या चक्रपाणीतीर्थांत प्राप्त झाला. नंतर अर्जुनानें अर्जुनेश्वर नांवानें एक लिंग स्थापून तेथेंच एक चक्रपाणि नांवाचें दुसरें शिवलिंग स्थापिलें. ह्याच्या पूजनानें अर्जुन दोषमुक्त होऊन, स्वस्थानीं प्राप्त झाला.

---

## अध्याय १५३ वा.

### अप्सरःकुण्डोत्पत्तिमाहात्म्य.

सूत म्हणतात; मुने! ह्याठिकाणीं एक रूपतीर्थ नांवाचें तीर्थ आहे. ह्या रूपतीर्थांत स्नान केलें असतां मनुष्य रूपवान् होतो. ब्रह्मदेवानें प्रथम चार प्रकारची सृष्टि उत्पन्न केल्यावर एक रूपवती अप्सरा निर्माण केली. तिला निर्माण करितांना ब्रह्मदेवानें सर्व देवांच्यापासून थोडा थोडा तात्त्विक उच्चतम स्वरूपांश घेतला असल्यामुळें तिचें स्वरूप फारच मोहक असतें झालें. नंतर ती अप्सरा ब्रह्मदेवाच्या आज्ञेवरून कैलासपर्वतावर शंकराला भेटण्याकरितां गेली. तिला पाहून शंकर मोहित झाले; परंतु जवळ बसलेली पार्वती रागावेल ह्या भीतीनें पार्वतीला हा स्वतःच्या मनश्चांचल्याचा प्रकार दृष्टोत्पत्तीस आणून दिला नाहीं. ज्या वेळीं अप्सरा शंकराला प्रदक्षिणा घालूं लागली त्या वेळीं सुद्धां पार्वती जवळ असल्यामुळें तिच्याकडे मान वळवून पाहणेंहि शंकरास अशक्य झालें; तेव्हां स्वतःची इच्छा पूर्ण करून घेण्याकरितां शंकरानें चार दिशेला चार मुखें धारण केलीं; व अप्सरेकडे पाहण्याचें व नेत्रसुख घेण्याचें काम शंकरानें पार्वतीला न समजतां अव्याहत चालूं ठेविलें. इतक्यांत नारदऋषी पार्वतीजवळ येऊन त्यानें

शंकराचें अप्सरेविषयींचें प्रेम व वरील कपट तिच्या मनांत भरवून दिलें. हें शिवकपट पार्वतीला समजतांच शंकर ज्या नेत्रांनीं अप्सरेकडे पाहत होते ते नेत्र पार्वतीनें झाकून टाकिले. त्या वेळीं त्रैलोक्यांत प्रलय सुरू झाला. तेव्हां नारदानें पार्वतीला शंकराचे नेत्र सोडण्याविषयीं पुष्कळ विनवणी केली; व सांगितलें कीं जर तूं तसें करणार नाहींस, तर सर्व त्रैलोक्य नष्ट होईल. इतकें नारदानें सांगितलें असतांहि पार्वती डोळे सोडीना तेव्हां शंकरानें ललाटापासून एक तिसरा नेत्र निर्माण करून जगद्रक्षण केलें. त्या दिवसापासून शंकराला त्र्यंबक हें नांव प्राप्त झालें. नंतर पार्वतीनें शंकराचे झाकलेले डोळे सोडून अप्सरेला रागानें 'विरूप हो' असा शाप दिला. हा प्रकार ब्रह्मदेवाला समजतांच ब्रह्मदेव अप्सरेला घेऊन रूपतीर्थाजवळ प्राप्त झाले; व तेथें स्नान करितांच कुरूप झालेली अप्सरा स्वरूपवती अशी झाली. तत्काळ पार्वती त्याठिकाणीं पुनः प्राप्त होऊन अप्सरेला इच्छित वर देती झाली. ज्याठिकाणीं अप्सरेनें स्नान केलें त्या स्थानीं एक कुंड निर्माण करून त्यास अप्सरःकुंड असें नांव ठेविलें; व तेथें पार्वतीची स्थापना केली. ज्या स्त्रिया अप्सरःकुंडांत स्नान करून पार्वतीचें पूजन करितात, त्या सुख, सौभाग्य इत्यादि मिळवून मोक्षहि मिळवितात.

---

## अध्याय १५४ वा.

---

### चित्रेश्वरीपीठमाहात्म्य.

सूत म्हणतात; जे कोणी अप्सरःकुंडांत स्नान करून पार्वतीचें पूजन करितात त्यांस रूपसौभाग्यादि प्राप्त होऊन ते मुक्त होतात. त्याचेंच शेजारीं एक विजया कुंड आहे; त्यांत स्नान केलें असतां; व विजयादेवीचें पूजन केलें असतां पुत्रपौत्रादिकांची प्राप्ति होऊन शिवलोकप्राप्तीहि होते. ह्या ठिकाणीं मुख्य अशीं सत्ताविस लिंगें आहेत. त्यांच्या पूजनानें सर्व सिद्धि प्राप्त होतात. त्याचप्रमाणें चित्रेश्वरीपीठाचेंहि माहात्म्य अगाध आहे. हें पीठ चित्रशर्मराजानें स्थापिलें आहे. ह्या ठिकाणीं एकादश ( अकरा ) रुद्रांची स्थापना केली आहे. जे कोणी विश्वामित्रकुंडांत स्नान करून ह्या अकरा रुद्रांचें पूजन करितात ते ऐहिक सुख भोगून अंतीं शिवलोकाला जातात.

# अध्याय १५५ ते १५८ वा.

## मणिभद्राख्यान.

सूत म्हणतात; ह्या ठिकाणीं याज्ञवल्क्यानें स्थापिलेलें पुष्पादित्य नांवाचें एक लिंग आहे. त्या लिंगाच्या पूजनानें सर्व इष्ट वस्तु प्राप्त होतात. आतां पुष्पादित्याची स्थापना कशी केली, तें कथानक सांगतों; ऐका. एक विदिशा-नगरींत चित्रवर्मा नांवाचा राजा होता. त्याच नगरींत एक मणिभद्र नांवाचा क्षत्रिय अत्यंत धनाढ्य असा राहत असे. तो स्वरूपानें हीन असूनहि कृपण होता. त्या मणिभद्रानें एका गरीब अशा क्षत्रियाची सर्वलक्षण-संपन्न कन्या पाहून त्याजवळ याचना केली. शेवटीं त्या क्षत्रियानें जरी मणिभद्र कुरूप होता तरी सुद्धां आपल्या पत्नीची समजूत घालून त्यास देण्याचें ठरविलें. एकदां तो मणिभद्र हात पाय धुवून क्षत्रियाजवळ कन्या-दानाचें उदक घेण्याकरितां तयार झाला असतां क्षत्रिय मणिभद्रास म्हणतो कीं, आताची ही वेळ वैधव्य उत्पन्न करणारी आहे. करितां चांगला मुहूर्त पाहून मी तुझ्या हातांवर कन्यादानाचें उदक सोडीन. इतकें त्या क्षत्रियानें सांगितलें असतांहि मणिभद्र म्हणतो कीं, मी तुला हवेंतितकें द्रव्य देईन; परंतु मला ह्या वेळीं कन्यादानाचें उदक दिलें पाहिजेस; कारण सांप्रत फाल्गुनमास आहे; व ह्या विवाहाला योग्य आहे. मी आतांच तुला कन्यादानाची घाई करितों, ह्याचें कारण मी सांप्रत कामबाधेनें ग्रस्त आहे; आतां ह्या वेळीं जर तूं मला कन्या देशील तरच मला तिचा उपयोग आहे; नाहींपेक्षां मागाहून तुझी कन्या घेऊन मला काय करावयाचें आहे. असें मणिभद्राचें भाषण ऐकून क्षत्रियानें त्यापासून पुष्कळ द्रव्य घेऊन, आपली कन्या मणिभद्राला अर्पण केली. मणिभद्र आपल्या पत्नीला घेऊन स्वगृहीं गेला, व तिच्यासह आपली इच्छा पूर्ण करिता झाला. तो मणिभद्र घरीं येणाऱ्या ब्राह्मणास पत्नीकडे पाहण्याविषयीं सक्त मनाई करीत असे. एकदां पुष्पनावाचा एक ब्राह्मण फिरत फिरत मणिभद्राकडे आला असतां त्यानें त्या ब्राह्मणाला सांगितलें कीं, मी तुला भोजन देतों; परंतु भोजन करते वेळीं, माझ्या पत्नीकडे तूं पाहतां कामा नये, जर कां तूं माझ्या पत्नीकडे पाहशील तर मी तुला शिक्षा करीन. असें सांगून त्या ब्राह्मणाला भोजनास बसविलें. भोजन करते वेळीं त्या पुष्प ब्राह्मणानें सहज एकदां मणिभद्राच्या पत्नीकडे पाहिलें, त्यामुळें मणिभद्राला राग आला व त्यानें पुष्प ब्राह्मणाला पुष्कळ मार दिला; व त्यास एका चौकीवर नेऊन सोडिलें. कालांतरानें तेथें बरीच मंडळी एकत्र जमली असतां, पुष्प

ब्राह्मण त्यांस म्हणतो कीं, येथें कोणी असा ब्राह्मण नाहीं का ? कीं जो ह्या मणिभद्राचा नाश करील. असें ह्याचें भाषण ऐकतांच लोकांनीं पुष्पाला याज्ञवल्क्याकडे जावयास सांगितलें. नंतर तो पुष्प ब्राह्मण याज्ञवल्क्याकडे जाऊन त्याच्या मतानें तो तप करूं लागला. तपानें सूर्य प्रसन्न होऊन त्यानें पुष्पाला दोन गोळ्या दिल्या. त्या गोळ्या मुखांत धरिल्या असतां इष्ट सिद्धि प्राप्त होते. नंतर पुष्प ब्राह्मण विदिशानगरींत मुखांत गोळ्या धरून व मणिभद्राचें स्वरूप घेऊन सर्वत्र फिरत असे. हें वर्तमान मणि-भद्राला समजतांच त्यानें आपल्या द्वारपाळाला ताकीद दिली कीं, माझें रूप घेतलेला जर कोणी दुसरा येथें येईल तर त्यास आंत न घेतां तूं यथेच्छ शिक्षा कर. असें मणिभद्राचें भाषण ऐकतांच द्वारपाळानें त्याप्रमाणें वागण्याची व्यवस्था ठेविली; नंतर पुष्प ब्राह्मण मणिभद्र घरांत नाहीं, असें पाहून व मुखांत सूर्यानें दिलेली गोळी धरून मणिभद्राचें स्वरूप प्राप्त झालेला असा तो पुष्प ब्राह्मण त्याचे घरांत शिरला; व त्या मणिभद्रपत्नीबरोबर तो भोजनादिहि करितां झाला. कांहीं वेळानें मणिभद्र बाहेर गेला होता तो घराजवळ आला असतां द्वारपाळाला वाटलें कीं, घरांत असणारा मणिभद्र हाच खरा मणिभद्र होय; व हा दुसरा मणिभद्र कपटवेषधारी मणिभद्र होय. अशा समजुतीनें द्वारपाळानें त्या बाहेर उभ्या असलेल्या खऱ्या मणिभद्राला घरांत सोडलें नाहीं. तो मणिभद्र घरांत बलात्कारानें शिरूं लागला असतां द्वारपाळानें त्याला काठीनें खूप ताडण केलें. शेवटीं मणिभद्रवेषधारी पुष्प ब्राह्मण व मणिभद्रपत्निहि तेथें द्वारपाळाजवळ आलीं. खऱ्या व खोट्या मणिभद्रांचें तेथें मोठें युद्ध झालें. शेवटीं सर्व लोक जमून मणिभद्रद्वयांना; व त्या पत्नीला निवाडा करण्याकरितां राजाकडे नेलें; निर्णय करितां करितां पुष्प ब्राह्मण हाच खरा मणिभद्र; असें ठरलें; व खऱ्या मणिभद्राला फाशीची शिक्षा झाली. नंतर पुष्प ब्राह्मण मणिभद्रपत्नीसह स्वगृहीं आनंदानें राहता झाला.

---

## अध्याय १५९ व १६० वा.

### पुष्पब्राह्मणचरित्र.

पुष्प ब्राह्मणानें विषयभोग क्षणिक आहेत, असें समजून त्यानें आपल्या इष्टमित्र ब्राह्मणांना बोलावून जितकें द्रव्य जवळ होतें तें सर्व दानादि विधीनें अर्पण केलें; व तो आपणाला कृतार्थ समजता झाला. पुढें कांहीं दिवसांनीं हें मणिभद्रस्वरूप कपटाचें आहे, असें समजतांच मणिभद्रपत्नीनें त्याला सर्व हकीकत विचारून

हें स्वरूप तुम्हाला कसें घेतां आलें वगैरे विचारिलें. नंतर पुष्पब्राह्मण म्हणतो कीं, मी पूर्वीं एकदां तुझ्या घरीं अतिथीरूपानें आलों असतां तुझ्याकडे पाहिल्यामुळें मणिभद्रानें मला खूप मार देऊन चव्हाट्यावर टाकिलें; तोंच मी सूर्याची उपासना करून त्याच्या प्रसादानें मला दोन गोळ्या मिळाल्या आहेत, त्या घेऊन मी तोंडांत धरल्यामुळें मला हें रूप प्राप्त झालें आहे, असें म्हणून पुष्पानें आपल्या मुखांतून सूर्यदत्त गोळी बाहेर काढितांच त्याला पूर्वींप्रमाणेंच पुष्पब्राह्मणाचें स्वरूप प्राप्त झालें. हा प्रकार पाहून मणिभद्रपत्नीला फारच आनंद झाला; ती मोठ्या उत्सुकतेनें मणिभद्रवेषधारी पुष्पाची सेवा करून सुखोपभोग घेती झाली. पुढें कांहीं काळानें त्या पुष्पब्राह्मणाला पुत्रपौत्रादि संततीहि होती झाली. पुष्पाला वृद्धावस्थेंत पूर्वकृत कर्माचा पश्चात्ताप होऊन तद्दोषनाशार्थ तो हाटकेश्वरक्षेत्रांत पुरश्चरणादि करितां झाला. नंतर त्या ठिकाणीं पुष्पादित्य नांवानें सूर्याची स्थापना करून त्यानें पुत्रांच्या साहाय्यानें एक मंदिर तयार केलें. त्या पुष्पब्राह्मणानें पुरश्चरण समाप्त होतांच तत्सांगतासिद्ध्यर्थ अनेक विद्वान् ब्राह्मणांना बोलावून पुष्कळ दानधर्म केला.

## अध्याय १६१ वा.

### पुष्पादित्यमाहात्म्य.

पुष्पब्राह्मणानें स्थापिलेल्या पुष्पादित्याचें यथाविधी पूजन करणारे सर्व दोषापासून मुक्त होतात. रविवारीं सप्तमी असतां जर ह्या आदित्याचें पूजन केलें, तर व्यभिचारादि दोष समूळ नाश पावतात; व ह्याच पुष्पादित्याच्या प्रभावानें पुष्पनामक ब्राह्मण पूर्वकृत परस्त्रीगमनादि दोषापासून मुक्त झाला; असा ह्या पुष्पादित्याचा महिमा अगाध आहे.

## अध्याय १६२ वा.

### पुरश्चरणसप्तमीव्रत.

शौनकादि ऋषींनीं पुरश्चरणसप्तमीव्रताचा विधि व फलश्रुति विचारिल्यावरून सूत म्हणतात,—मुने! पूर्वीं एकदां रोहिताश्वराजानें असाच प्रश्न मार्कण्डेयाला केला होता, व मार्कण्डेयानें त्यास जें सांगितलें तेंच मी तुम्हाला सांगतों, ऐका. एकदां रोहिताश्वराजा सात कल्पपर्यंत आयुष्य असणाऱ्या मार्कण्डेयाकडे जाऊन

प्रश्न करिता झाला कीं, हे मार्कण्डेया! आपण सर्वज्ञ आहां, करितां मला पुरश्चरणसप्तमीव्रताचा विधि सांगा. असा राजाचा प्रश्न ऐकतांच, मार्कण्डेय म्हणतात,–राजा! पातकें तीनप्रकारचीं आहेत, त्यांपैकीं मनानें होणारें पातक पश्चात्तापानें नष्ट होतें, वाणीनें केलेलें पातक लोकांना निवेदन केलें असतां नष्ट होतें, व देहानें केलेलें पातक प्रायश्चित्तानें नष्ट होतें. पुरश्चरणाचे योगें कायिक, वाचिक; व मानसिक अशी तीनहि प्रकारचीं पातकें नष्ट होतात. माघ महिन्यांतील सप्तमीला पुरश्चरणसप्तमीव्रत करावें. त्या दिवशीं पाखंडी, नास्तिक वगैरे लोकांशीं संभाषण करूं नये; व प्रातःकाळीं उठून समंत्रक दंतधावन करावें. त्या सप्तमीचे दिवशीं उपोषण करून सूर्याच्या प्रतिमेची पूजा करावी. शेवटीं प्रार्थना करून ब्राह्मणादिकांना भोजन घालावें. नंतर फाल्गुन महिन्यामध्यें कुंदाच्या फुलांनीं सूर्याची पूजा करावी. अशातऱ्हेनें बारा महिन्यामध्यें बारा प्रकारच्या फुलांनीं सूर्याचें पूजन करावें; व अशातऱ्हेनें सूर्यपूजन करून गायत्रीपुरश्चरण आचरावें; म्हणजे गायत्रीमंत्राचा चोवीस लक्ष जप करावा; व शेवटीं त्याच्या सांगतेप्रीत्यर्थ उद्यापन करावें.

---

## अध्याय १६३ वा.

### ब्रह्मनागरोत्पात्ति.

वर सांगितलेलें पुरश्चरणसप्तमीव्रत पुष्प ब्राह्मणानेंहि केलें; व त्यायोगें तो ऐहिकसुख भोगून अंतीं स्वर्गाला गेला. त्याच नगरामध्यें एक चंडशर्मानांवाचा ब्राह्मण होता; व त्याच ब्राह्मणापासून पुढें नागरजातींच्या ब्राह्मणांची उत्पत्ति झाली आहे. तो प्रकार पुढें येणारा असल्यामुळें त्याचा येथें संक्षेप केला आहे.

---

## अध्याय १६४ वा.

### नागरेश्वरमाहात्म्य.

नंतर पुष्प ब्राह्मण आपल्या परिवारासह चंडशर्माच्या घरीं जाऊन बोलला कीं, मी तुझ्याकरितां स्वदेहत्याग करून सूर्याची आराधना केली असल्यामुळें त्याच्या कृपेनें तुझें पतितत्व नष्ट झालें आहे. तुझे सर्व वंशज नागर ह्या नांवानें प्रसिद्ध होतील. आतां तूं मजबरोबर सरस्वतीतीरावर आश्रम बांधून रहा.

माझे जवळ पुष्कळ द्रव्य आहे, मी तुम्हां सर्वांचा उदरनिर्वाह चालवीन, असें पुष्पाचें भाषण ऐकून चंडशर्मा आपल्या परिवारासह सरस्वतीच्या तीरीं राहून तेथें त्यानें एक शिवलिंग स्थापिलें. त्यानें त्या शिवलिंगाची आराधना करितांच शंकर प्रसन्न झाले; व चंडशर्म्याला इच्छित वर देते झाले. चंडशर्म्यानें त्या लिंगाचें नागरेश्वर असें नांव ठेविलें. शंडशर्म्याची शाकंभरी नांवाची बायको होती. तिनें सरस्वतीनदीचे काठीं दुर्गादेवीची स्थापना व आराधना केली. त्यायोगें देवी प्रसन्न होऊन शाकंभरीला बोलली कीं, जे कोणी आश्विन शुक्ल नवमीला ह्याठिकाणीं असणाऱ्या माझी पूजा करितील, त्यांना सर्वप्रकारचीं इष्ट फलें प्राप्त होतील. असें म्हणून देवी अंतर्धान पावल्यावर शाकंभरीनें त्या स्थापित दुर्गादेवीचेंहि शाकंभरी असेंच नांव ठेविलें. ह्या शाकंभरीचें माहात्म्य श्रवण करणारांची संतानवृद्धि होऊन त्यांस सद्गति प्राप्त होते.

---

## अध्याय १६५ वा.

—:O:—

### अश्वतीर्थोत्पत्तिमाहात्म्य.

पूर्वी एकदा विश्वामित्रानें सरस्वतीला कांहीं कारणास्तव शाप दिल्यामुळें त्या नदीचे काठीं राक्षसांचा निवास होऊं लागला. सरस्वतीला कां शाप झाला, असा शौनकादिकांचा प्रश्न ऐकून सूत म्हणतात; एकदां ऋचीक नांवाचा ब्रह्मपुत्र तीर्थयात्रा करीत करीत विश्वामित्री नदीच्या काठीं येऊन स्नान करीत आहे, इतक्यांत एक राजकन्या त्या ठिकाणीं प्राप्त झाली. तिला पाहून ऋचीक कामपीडित होऊन तिच्याबद्दल तेथें असणाऱ्या सर्व लोकांना माहिती विचारूं लागला. लोकांच्या सांगण्यावरून ही गाधि नामक राजाची मुलगी आहे, असें समजतांच ऋचीक गाधि राजाच्या घरीं जाऊन त्याजवळ मुलीबद्दल मागणी करितां झाला. तें ऋचीकाचें भाषण ऐकून गाधीला त्या मुनीच्या प्रश्नाचें उत्तर देण्यास फारच विचार पडला. जर मी ह्या ब्राह्मणाला मुलगी देतों, असें ह्मटलें तर मी क्षत्रिय आहें व हा गरीब ब्राह्मण आहे, अर्थात् त्यांत मला कमीपणा आहे; व जर मी ह्याला मुलगी देत नाहीं, म्हणून म्हटलें तर हा तामसी ब्राह्मण मला शाप देऊन माझें भस्म करील, असा त्यास विचार पडून त्यानें एक युक्ति योजिली. ती ही कीं, हे मुने! माझी एक प्रतिज्ञा आहे कीं, जो मला ह्या मुलीच्या मोबदला एकसारख्या रंगाचे सातशें श्यामकर्ण घोडे आणून देईल, त्याला मी आपली मुलगी देईन; करितां आपण माझी प्रतिज्ञा पुरी करावी, व माझी मुलगी घेऊन जावी. हें गाधीचें भाषण

होतांच बरें आहे, असें म्हणून ऋचीक मुनि कान्यकुब्ज नामक देशांत येऊन तेथें गंगानदीचे काठीं प्राप्त झाला. त्या ठिकाणीं ऋचिकानें "अश्वो वोढा" ह्या चौसष्ट मंत्रांच्या सूक्ताचें पठण करून जपाला प्रारंभ केला. त्या अनुष्ठानानें एकाएकीं एक हजार श्यामकर्ण घोडे तेथें अकस्मात् उत्पन्न झाले. ज्या ठिकाणीं अश्व ( घोडे ) उत्पन्न झाले त्या स्थानाला अश्वतीर्थ हें नांव प्राप्त झालें. हें कान्यकुब्ज देशांत गंगेच्या काठीं आहे. ह्या तीर्थांत स्नान करून नित्यकर्माचें अनुष्ठान करणारांना अश्वमेधयज्ञाचें फळ प्राप्त होईल.

---

# अध्याय १६६ वा.

---

## परशुरामोत्पत्ति.

पूर्वीं सांगितल्याप्रमाणें ऋचीकाला अश्वतीर्थांत अश्वांची प्राप्ति झाल्यानंतर तो ते घेऊन गाधिराजाकडे गेला; व त्याजवळ त्याच्या कन्येची याचना करूं लागला. तें ऋचीकाचें कृत्य पाहून गाधीला आश्चर्य वाटलें, व त्यानें आपली कन्या ऋचीकाला अर्पण केली. एकदां ऋचीकानें आपल्या पत्नीला म्हटलें कीं, मी आज अरण्यांत तप करण्याकरितां जाणार आहे; तेव्हां तूं इच्छित वर माग. हें ऋचीकाचें भाषण ऐकून तिला वाईट वाटलें; व ती आपल्या मातेला ह्याबद्दल विचारिती झाली. त्या वेळीं गाधिपत्नि ऋचीकपत्नीला म्हणते कीं, जर तुझा पति तुला वर देण्यास उद्युक्त झाला असेल तर तुला व मला एक एक पुत्र होईल; असा तूं वर माग. नंतर मातेच्या सांगण्याप्रमाणें गाधिकन्येनें ऋचीकाजवळ वर मागितला असतां ऋचीकानें पुत्रकामेष्टि यज्ञ करून दोन जलपूर्ण घट मंत्रून ठेविलें. पैकीं जो घट गाधिपत्नीकरितां तयार केला होता त्यांत क्षात्रतेज ठेविलें; व दुसऱ्यांत ब्रह्मतेज ठेविलें; व ऋचीकानें पत्नीला सांगितलें कीं, क्षात्रतेजानें युक्त असलेला घट तूं आपल्या मातेला प्यावयास दे; व वडाच्या झाडाला सहस्र प्रदक्षिणा घालावयास सांग; म्हणजे क्षात्रियकुलाला अनुरूप असा तिला पुत्र होईल; व तूं स्वतः ब्राह्मतेजयुक्त हा दुसरा घट प्राशन कर; व ब्रह्मादि त्रिमूर्ति जेथें स्वस्वरूपानें राहतात, अशा पिंपळाच्या झाडाला तूं हजार प्रदक्षिणा घाल; म्हणजे तुला ब्रह्मतेजानें युक्त असा योग्य पुत्र होईल. असें सांगून ऋचीक निघून गेला; परंतु गाधीपत्नीच्या मनांत कपट आल्यामुळें तिनें कन्येकरितां ठेविलेला उदकपूर्ण घट स्वतः प्राशन केला; व स्वतःचा तिला दिला. हें कांहीं दिवसांनीं ऋचीकाला समजतांच त्याला राग आला; व पत्नीला

म्हणाला कीं, ज्यापेक्षां तूं मंतरलेल्या उदकांची अदलाबदल केलीस त्यापेक्षां तुला क्षत्रिय मुलगा होईल. असें म्हटल्यावर ऋचीकाला जमदग्नि नांवाचा पुत्र झाला; व त्या जमदग्नीलाच पुढें परशुराम नांवाचा पुत्र झाला.

## अध्याय १६७ वा.

### विश्वामित्रराज्यत्याग.

गाधीपत्नीलाहि ऋचीकाच्या मंत्रप्रभावानें विश्वामित्र नांवाचा एक मुलगा झाला. तो मोठा होतांच गाधीनें विश्वामित्राला राज्यारूढ केलें. विश्वामित्र हा ब्रह्मतेजानें युक्त असल्यामुळें तो राज्याचा स्वीकार करण्यास नाखुष होता. तो नित्य वेदाध्ययन व ब्रह्मकर्म करून कालक्रमणा करीत असे. एकदां विश्वामित्र मृगया करण्याकरितां अरण्यांत गेला असतां वसिष्ठाच्या आश्रमाला प्राप्त झाला. कामधेनूच्या साहाय्यानें वसिष्ठानें केलेलें आदरातिथ्य पाहून विश्वामित्राला आश्चर्य वाटलें; व तो कामधेनूची मागणी करूं लागला. वसिष्ठानें कामधेनु देत नाहीं, असें म्हणतांच विश्वामित्राला राग आला; व तो तिला बलात्कारानें नेऊं लागला. त्यामुळें कामधेनूला राग येऊन तिनें आपल्या शरीरापासून सशस्त्र असे भिल्ल व म्लेच्छ उत्पन्न केले; व त्यांच्याकडून विश्वामित्राचा पराभव करविला. त्यामुळें विश्वामित्र खिन्न होऊन विचार करूं लागला कीं, ज्यापेक्षां वसिष्ठाच्या कामधेनूनें ब्रह्मतेजाचा आश्रय केल्यामुळें माझा पराजय केला त्यापेक्षां क्षात्रतेजाहून ब्राह्मतेज श्रेष्ठ होय; व तेंच संपादन केलें पाहिजे. अशातऱ्हेनें विचार केल्यानंतर विश्वामित्र आपल्या राजधानींत येऊन व सर्व राज्यभार प्रधानांच्यावर सोंपवून स्वतः ब्रह्मतेज मिळविण्याकरितां तपोवनांत जाऊन तप करूं लागला.

## अध्याय १६८ वा.

### धारोत्पत्ति.

विश्वामित्राची घोर तपश्चर्या पाहून इंद्राला भीति वाटली; व त्याच्या तपांत विघ्न उत्पन्न करण्याकरितां अप्सरादिकांची रवानगी केली; परंतु त्याचा उपयोग न झाल्यामुळें इंद्र स्वतः विश्वामित्राजवळ येऊन वर मागण्याविषयीं म्हणूं लागला असतां विश्वामित्र म्हणतो; इंद्रा! मी ब्रह्मतेजाच्या प्राप्तीकरितां तप

करीत आहे; असें विश्वामित्राचें भाषण ऐकून इंद्र म्हणतो कीं, तूं क्षत्रिय आहेस; तेव्हां ह्याच देहानें तुला ब्राह्मणत्व कसें प्राप्त होणार. इत्यादि सांगितलें असतांहि विश्वामित्राचा निश्चय पाहून, तो इंद्र स्वर्गाला निघून गेला. इंद्र गेल्यानंतर विश्वामित्रानें पुनः तप करण्यास प्रारंभ केला. नंतर ब्रह्मदेव ऋषींसह विश्वामित्राजवळ येऊन म्हणतात कीं, तुला मी ब्राह्मणत्व दिलें आहे; आतां तपश्चर्या समाप्त कर; तथापि त्या ऋषींमध्यें वसिष्ठानें मात्र विश्वामित्राला ब्राह्मण म्हणण्याचें नाकारलें. वसिष्ठाशिवाय इतर सर्व लोक विश्वामित्राला ब्रह्मर्षि म्हणूं लागले. वसिष्ठ तेथून निघून हाटकेश्वरक्षेत्रांत तप करण्याकरितां गेले. वसिष्ठानें ब्रह्मर्षि म्हणण्याचें नाकारल्यामुळें, विश्वामित्रानें वसिष्ठाच्या नाशार्थ एक कृत्या निर्माण केली; व वसिष्ठाकडे पाठविली. कृत्या वसिष्ठाजवळ जाताच, तेथें कुंठितगति होऊंन जमिनीवर थाडकन् पडली. हा सर्व प्रकार जाणून; वसिष्ठानें त्या कृत्येला धारा हें नांव देऊन म्हटलें कीं, तुझें पूजन करणारे निरोगी होतील.

---

## अध्याय १६९ व १७० वा.

### धारामाहात्म्य.

एकदां अरुंधतीनें ह्या धारेची स्तुति करून तिला संतुष्ट केलें होतें. त्या वेळीं ती धारादेवी म्हणते कीं, जो कोणी ह्या ठिकाणीं नागर जातीचा ब्राह्मण माझी पूजा करील, तो सर्व दुःखापासून मुक्त होऊन निरोगी होत्साता मुक्त होईल. ह्याच धाराशक्तीला विश्वामित्रानें वसिष्ठाला मारण्याकरितां पाठविलें असतां वसिष्ठाजवळ येतांच तिच्या अंगांतून घामाच्या धारा वाहूं लागल्या; व तेंच धारातीर्थ ह्या नांवानें तेथें प्रसिद्ध झालें. ह्या धारातीर्थांत स्नान करणारे पाप मुक्त होतात.

---

## अध्याय १७१ ते १७३ वा.

### साबरमतीनदीमहात्म्य.

आपण पाठविलेली शक्ति वसिष्ठप्रभावानें निरुपयोगी झाली, असें पाहून विश्वामित्राला राग आला; व त्यानें वसिष्ठावर ब्रह्मास्त्र सोडिलें. हें विश्वामित्रानें आपल्याला मारण्याकरितां ब्रह्मास्त्र सोडलें आहे, असें जाणून वसिष्ठानेंहि दर्भाच्या काडीवर ब्रह्मास्त्राचा प्रयोग करून ती काडी विश्वामित्राच्या ब्रह्मास्त्राच्या नाशार्थ

पाठविली. त्याप्रमाणें विश्वामित्राचें ब्रह्मास्त्र नष्ट झालें असतां, त्यानें वसिष्ठावर वज्रास्त्रादि पुष्कळ अस्त्रें सोडिलीं; परंतु ती सर्व फुकट गेलीं. शेवटीं वसिष्ठाचा नाश होत नाहीं; असें जाणून विश्वामित्रानें सरस्वतीनदीला बोलावून सांगितलें कीं, वसिष्ठ जेव्हां तुझ्येठिकाणीं स्नान करण्याकरितां येतील तेव्हां तूं त्यांना आपल्या जलौघाच्या वेगानें मजजवळ घेऊन ये; म्हणजे मी त्यांचा नाश करीन. तें सरस्वतीनें नाकारिल्यामुळें विश्वामित्राला राग आला; व त्यानें तिला शाप दिला कीं, तुझें उदक रक्ताप्रमाणें लाल होईल. असा शाप देऊन विश्वामित्र पुनः तप करण्याकरितां हाटकेश्वरक्षेत्रांत निघून गेले. नंतर सरस्वती वसिष्ठाजवळ येऊन म्हणते कीं, तुझ्यामुळें मला विश्वामित्रानें शाप दिला आहे; करितां आपण त्या शापाची मुक्तता करावी. नंतर सरस्वतीचा जेथें उगम झाला त्या ठिकाणीं जाऊन आपल्या तपः सामर्थ्यानें वसिष्ठानें सरस्वतीचे दोन प्रवाह निर्माण केले. पैकीं, एक प्रवाह सरस्वती ह्या नांवानें उत्पन्न झाला; व दुसरा प्रवाह भ्रमण करीत म्हणजे भोंवऱ्याप्रमाणें फिरत फिरत उत्पन्न झाला; म्हणून त्याला साभ्रमती हें नांव मिळालें; हल्लीं आपण त्या प्रवाहाला साबरमती नदी म्हणतो. त्या दोनहि प्रवाहांचीं उदकें पूर्वीप्रमाणें स्वच्छ झालीं; व त्यायोगें सरस्वतीला मोठा आनंद झाला. ही साबरमती मुमुक्षुजनांचीं सर्व दुःखें निरसन करणारी असून मोक्ष देणारी आहे. हें सारस्वताख्यान व साबरमतीमाहात्म्य जे पठण करितील किंवा श्रवण करितील त्यांची बुद्धि विकसित होऊन त्यांस ब्रह्मज्ञानाची प्राप्ति होईल.

---

## अध्याय १७४ ते १७६ वा.

### याज्ञवल्क्येश्वरमाहात्म्य.

याज्ञवल्क्याची कंसारी नांवाची एक बहीण होती. ती लहानपणापासून ब्रह्मचर्यव्रताचा स्वीकार करून तप करीत असे. एकदां याज्ञवल्क्याचें स्वप्नांत रेतस्खलन होऊन सर्व वस्त्र त्यामुळें दुष्ट झालें. तें वस्त्र याज्ञवल्क्यानें प्रातःकाळीं सोडून दुसरें परिधान केलें. कंसारीनें याज्ञवल्क्यानें सोडिलेलें वस्त्र स्नानाकरितां परिधान केलें व स्नान करूं लागली. त्या वेळीं याज्ञवल्क्याचें वीर्य त्याचें वस्त्र परिधान केल्यामुळें कंसारीच्या योनींत शिरलें व ती गरोदर झाली. दाहा महिने पूर्ण होतांच तिला मुलगा झाला. कंसारीला लाज वाटून तिनें त्या मुलाला एका पिंपळाचे झाडाखालीं ठेविलें; व ती पुत्रप्रेमामुळें शोक करूं लागली. त्या वेळीं आकाशवाणी झाली कीं, तूं शोक करूं नकोस. हा उतथ्याच्या शापामुळें बृह-

स्पति अवतीर्ण झाला आहे. हा पिप्पलाद नांवानें प्रसिद्ध होईल. नंतर पिप्पलाद मोठा झाल्यावर त्यानें नारदाच्या तोंडून आपली उत्पत्ति श्रवण केली; व त्यामुळें खिन्नान्तःकरणाचा होऊन पिप्पलाद सूर्याराधना करूं लागला. याज्ञवल्क्यालाहि पिप्पलादाच्या उत्पत्तीचा प्रकार समजतांच फारच वाईट वाटलें; व तो रेतःस्खलनाच्या दोषापासून मुक्तता होण्याकरितां हाटकेश्वरक्षेत्रांत येऊन व तेथें शिवाराधना करून, याज्ञवल्क्येश्वर नांवाचें लिंग स्थापिता झाला. पिप्पलादानेंहि मातेची शुद्धि व्हावी; म्हणून कंसारीश्वर नांवाचें एक शिवलिंग स्थापिलें.

## अध्याय १७७ व १७८ वा

### पंचपिंडिकागौरीमाहात्म्य.

सूत म्हणतात; पूर्वी जयसेन नांवाचा एक काशीक्षेत्राचा राजा होता. त्याला एक हजार बायका होत्या. त्यांपैकीं लक्ष्मीच्या अंशापासून उत्पन्न झालेली विष्वक्सेन राजाची मुलगी व जयसेनाची बायको नित्य सौभाग्यवृद्धीकरितां मातीचे पांच गोळे करून त्यांची गौरीच्या नांवानें पूजा करीत असे. त्यामुळें जयसेनाच्या इतर बायकांपेक्षां हिचें सौभाग्य दिवसेंदिवस वाढत चाललें. ही एकेदिवशीं पंचपिंडिकागौरीचें पूजन करीत असतां त्याठिकाणीं दुर्वास ऋषि तेथें येऊन त्यानें तिला आशीर्वाद देऊन ह्या गौरीपूजनाचा विधीहि सांगितला; व ह्या पंचपिंडिकेची हाटकेश्वरक्षेत्रांत स्थापना करावयास सांगितली. तिनेंहि दुर्वासाची यथायोग्य संभावना करून रवानगी केली. नंतर जयसेनाच्या पत्नीनें दुर्वासाच्या सांगण्याप्रमाणे हाटकेश्वरक्षेत्रांत जाऊन तेथें पांच मातीचे गोळे स्थापित करून गौरीची पूजा केली. तत्काळ गौरी प्रसन्न होऊन व तिला इच्छित वर देऊन सौभाग्यादिकही अर्पण करिती झाली. ज्या स्त्रिया हें पंचपिंडिकामाहात्म्य श्रवण करितात त्यांच्या सुखसौभाग्याची वृद्धि होऊन त्यांना अन्तीं मोक्षसिद्धि प्राप्त होते. गौरीपूजन करणारे अष्टैश्वर्यानें युक्त होऊन लोकांत मान्यतेला प्राप्त होतात.

## अध्याय १७९ ते १९३ वा.

### ब्रह्मदेवाचा यज्ञसमारंभ.

एकदां ब्रह्मदेवाला यज्ञ करण्याची इच्छा होऊन त्यानें इंद्रादि देवांना यज्ञमंडप तयार करण्याची आज्ञा केली; व बृहस्पतीला यज्ञाला योग्य असे ऋत्विज

आणण्यास सांगितलें. इंद्राला ब्राह्मणांची सेवा करण्याचें काम दिलें. दक्षिणा देण्याचें काम कुबेराकडे सोंपविलें. विष्णूकडे व्यवस्थापकाचें काम दिलें. अशातऱ्हेनें ब्रह्मदेवानें प्रत्येकाकडे एक एक काम योग्यतेनुरूप नेमून दिलें होतें. होतृस्थानीं भृगुमुनि, मैत्रावरुणनामक ऋत्विजाचे जागीं च्यवनाची स्थापना, व अच्छावाकाचे स्थानीं मरीचीची नेमणूक केली. तसेंच गालव, पुलस्त्य, अत्रि, रैभ्य, सनातन, नारद, गर्ग, भरद्वाज, व्यास, गोभिल, कौथुम, शांडिल्य, अंगिरा इतक्यांची अनुक्रमें ग्रावस्तुद्, अध्वर्यु, प्रस्थाता, नेष्टा, उन्नेता, ब्रह्मा, ब्राह्मणाच्छंसी, आग्नीध्र, होता, उद्गाता, प्रस्तोता, प्रतिहर्ता, सुब्रह्मण्य इतक्या स्थानीं नेमणूक केली; व स्वतः ब्रह्मदेवानें दीक्षा घेऊन यज्ञारंभाची सिद्धता केली. ब्रह्मदेवानें यज्ञाला प्रारंभ करण्यासाठीं ब्रह्मपत्नी जी सावित्री तिला बोलावण्याकरितां नारदाला पाठविलें असतां सावित्री म्हणते कीं, यज्ञमंडपांत मोठमोठे ऋषि व देव जमले असतां मी एकटी तेथें कशी येऊं, जरा थांबा, मी इंद्राणी, पार्वती लक्ष्मी ह्यांनाहि बरोबर घेऊन येतें. असें ऐकतांच हें वर्तमान नारदानें ब्रह्मदेवाला सांगितलें. यज्ञारंभाचा मुहूर्त भरत आल्यामुळें ब्रह्मदेवाला सावित्रीच्या भाषणाचा राग आला; व इंद्राला सांगितलें कीं, तूं आताचें आतां अरण्यांत जाऊन एखादी स्त्री घेऊन ये; व तिच्यासह आपण यज्ञाला प्रारंभ करूं. ह्याप्रमाणें ब्रह्मदेवाचें भाषण ऐकून इंद्रानें अरण्यांत जाऊन एक गवळ्याची मुलगी धरून ब्रह्मदेवाजवळ आणिली. नन्तर ब्रह्मदेवानें त्या गोपकन्येला शुद्ध करून ‘ गायत्री ’ असें तिचें नांव ठेविलें; व तिच्याशीं लग्न लावून यज्ञारंभ केला. इतक्यांत एक कुत्सित वेष घेऊन हातांत नरकपाल घेतलेला मनुष्य त्या ठिकाणीं प्राप्त झाला. ऋत्विजांनीं त्या अशुद्ध मनुष्याचा धिक्कार करून त्याचे हातांतील नरकपाल बाहेर फेंकून दिलें असतां तेथें अनन्त नरकपालें निर्माण झालीं. त्या वेळीं जिकडे तिकडे हाहाःकार होऊन सर्वत्र अशांतता पसरली. शेवटीं ब्रह्मदेवाला ज्ञानदृष्टीनें असें समजलें कीं, हा नरकपाल धारण करणारा सामान्य मनुष्य नसून साक्षात् शंकर आहे; त्या वेळीं त्यानें व इतर ऋषींनीं त्या शंकराची पूजा व सत्कार करून त्यास उच्चासनावर बसविलें. त्या यज्ञमंडपांत कोट्यावधि ऋषि यज्ञ पाहण्याकरितां आले होते. ह्याप्रमाणें यज्ञाचा पहिला दिवस समाप्त होऊन दुसऱ्या दिवसाला प्रारंभ झाला. त्या वेळीं कोणी एक बटु त्या ठिकाणीं हातांत सर्प घेऊन प्राप्त झाला; व त्यानें तो यज्ञमंडपात सोडला. त्या सर्पानें होत्याच्या शरीराला वेढा घातला असतां सर्व देव व ऋत्विज भयभीत झाले. त्या वेळीं च्यवनऋषीनें बटूला तूं सर्प हो, असा शाप दिला; पुढें सर्पजन्माला प्राप्त झालेल्या बटूनें शापनिवृत्त्यर्थ हाटकेश्वरक्षेत्रांत नागतीर्थ निर्माण करून शिवाराधना केली व तो शापमुक्त झाला; नन्तर

दुसरें दिवशीचें यज्ञकर्म समाप्त होतांच पूर्वींप्रमाणें तिसरें दिवशीहि यज्ञाला प्रारंभ झाला त्या वेळीं ब्राह्मणभोजन सुरू असतांना तेथें एक अतिथि प्राप्त झाला अतिथीचा सत्कार करून त्यास प्रश्न केला कीं. तुला इतकें ज्ञान कोठून मिळालें; त्या वेळीं अतिथि म्हणतो; ऋत्विज हो ! मी साहा गुरु केले आहेत; पैकीं पिंगला नामक वेश्येपासून विषयाप्रमाणें ईश्वराचे ठिकाणीं आसक्ति ठेवावी, हें शिकलों. कुररपक्ष्यापासून निरिच्छतेचा स्वीकार करण्याचें शिकलों. त्याचप्रमाणें साप, मृग, सुतार व मुलगी ह्यांच्यापासून यथालाभ ज्ञान संपादिलें. असें अतिथींचें भाषण ऐकून ऋत्विजांना आनंद झाला व त्यांनीं त्या अतिथीचा सत्कार करून त्याची रवानगी केली; व यज्ञाला प्रारंभ केला. ह्याप्रमाणें यज्ञाचा तिसरा दिवस संपूर्ण झाल्यावर चवथे दिवशीहि यज्ञाला प्रारंभ झाला असतां, त्या दिवशीं होणारें सोमपानादि कर्महि समाप्त झालें; नंतर पांचवें दिवशीं यज्ञीय कर्म समाप्त होऊन अवभृथस्नानही करण्यांत आलें. नागून सावित्री देवस्त्रियांसह यज्ञमंडपांत येऊन पाहते तों ब्रह्मदेवानें गोपकन्येशीं विवाह करून यज्ञारंभ केला, हें समजतांच सावित्रीनें रागावून ब्रह्मदेवास शाप दिला कीं, तूं लोकांत अपूज्य होशील; असें म्हणून ती सावित्री तेथून निघून हाटकेश्वरक्षेत्रांत राहती झाली. जे कोणी ह्या सावित्रीचें पूजन करतील ते सर्व दुःखापासून मुक्त होतील. हें आख्यान श्रवण करणारे मुक्त होऊन सुखी होतील.

---

## अध्याय १९४ वा.



### कुमारिकातीर्थमहात्म्य.

गायत्रीच्या साहाय्यानें ब्रह्मदेवाचा यज्ञ समाप्त झाल्यामुळें, ब्रह्मदेवानें गायत्रीला यथेष्ट वरप्रदान दिलें. सर्व देवांनीं गायत्रीला आशीर्वाद देऊन सांगितलें कीं सर्व प्राणी विशेषतः ब्राह्मण तुझी उपासना करितील. जे कोणी ब्रह्मदेव व सावित्री ह्यांचे पूजन करितील ते श्रेष्ठ गतीला प्राप्त होतील; असें गायत्रीमाहात्म्य सांगितल्यानंतर सूतांनीं शौनकादिकांना कालक्रमाचें वर्णन करून कालवधि सांगितला. सूत म्हणतात,–मुनिहो ! चार निमेष म्हणजे त्रुटि, दोन त्रुटि म्हणजे लव, पंधरा लव म्हणजे काष्ठा, पंधरा काष्ठा म्हणजे कला, तीस कला म्हणजे क्षण, बारा क्षण म्हणजे मुहूर्त ( २ घटिका ) तीस मुहूर्त म्हणजे अहोरात्र दिवस, तीस दिवस म्हणजे महिना, दोन महिने म्हणजे ऋतु, तीन ऋतु म्हणजे अयन, दोन अयन म्हणजे वर्ष, १७२८००० वर्षें कृतयुग

१२९६००० वर्षें त्रेतायुग, ८६४००० वर्षें द्वापरयुग, ४३२००० वर्षें कलियुग, हीं चार युगें हजार वेळां निघून गेलीं कीं, ब्रह्मदेवाचा एक दिवस, तशातऱ्हेनें ब्रह्मदेवाचे अहोरात्र तीस दिवस झालें कीं ब्रह्मदेवाचा एक महिना; आणि बारा महिनें झालें कीं, ब्रह्मदेवाचें वर्ष होय, अशातऱ्हेनें ब्रह्मदेवाचेंहि शंभर वर्षे आयुष्यप्रमाण आहे. हल्लीं ब्रह्मदेवाचें वय साडे आठ वर्षांचें असून त्याच्या आरंभाच्या दिवसाचा दुसरा प्रहर हल्लीं चालू आहे. ब्रह्मदेवाचे वर्ष म्हणजे विष्णूचा एक दिवस. तोहि आपल्या मानानें शंभर वर्षेंच जगणारा आहे. विष्णूचें वय पंचावन्न वर्षांचें आहे. हल्लीं छपन्नाव्या वर्षांचे पांच दिवस पुरे होऊन सहाव्या दिवसाचा अर्धा प्रहर झाला आहे. विष्णूचें एक वर्ष झालें कीं, शंकराचा एक दिवस होतो. एकंदर शंकराचें आयुष्य शंभर वर्षेंच आहे, काल हा अनादि असल्यामुळें अनंत आहे. नंतर शौनकादि ऋषींनीं ब्रह्मज्ञानाच्या प्राप्तीचा उपाय विचारिला असतां सुत म्हणतात कीं, हाटकेश्वरक्षेत्रामध्यें ब्रह्मज्ञानाची प्राप्ती करून देणारी दोन तीर्थे आहेत. तीं तीर्थें ब्राह्मणाच्या कुमारिकेनें व राजाच्या कुमारिकेनें स्थापिलीं असल्यामुळें त्यांना कुमारीतीर्थ म्हणतात. या दोन तीर्थांत अष्टमी व चतुर्दशी ह्या दिवशीं स्नान केलें असतां ब्रह्मज्ञानाची प्राप्ती होऊन मोक्षप्राप्ति होते. मी व माझे वडील उभयतां ह्याच तीर्थांत स्नान करून ब्रह्मज्ञानसंपन्न झालें. अशातऱ्हेनें सूतांचा ब्रह्मज्ञानप्राप्तीचा उपदेश ऐकून शौनकादि ऋषींनींहि स्वतः ब्रह्मज्ञानाच्या प्राप्तीकरितां कुमारिकातीर्थांत स्नान करण्याची आपली इच्छा प्रदर्शित केली.

---

# अध्याय १९५ ते १९८ वा.

## कुमारितीर्थद्वयोत्पत्ति.

शौनकांनीं कुमारितीर्थांची उत्पत्ति विचारिली असतां सूत म्हणतात: मुनिहो पूर्वी एक छांदोग्य नांवाचा नागरजातीचा ब्राह्मण होता. त्याला वृद्धावस्थेंत ब्राह्मणी नांवाची कन्या झाली. ब्राह्मणीच्या स्वरूपाप्रमाणें स्वरूप धारण करणारी अशी एक अनर्तदेशच्या राजाला मुलगी झाली. त्या मुलीचें नांव रत्नावती होतें. ती रत्नावती ब्राह्मणीची मैत्रीण होती. रत्नावती आठ वर्षांची झाली असतां तिच्या पित्यानें विवाहाची सिद्धता केली. तें पितृकृत्य तिला न आवडून ती आपल्या सखीला व छांदोग्याला सर्व वर्तमान सांगती झाली. त्या वेळीं छांदोग्य राजाला म्हणतो; तुझी मुलगी माझ्या मुलीची संगती सोडण्यास

असमर्थ असल्यामुळें तुझी ही विवाहाची तयारी रत्नावलीला आवडत नाहीं. जर तुला हिचा विवाह करावयाचा असेल तर मी सांगतो तसें कर. नंतर छांदोग्यानें राजाला युक्ति सांगितल्याप्रमाणें राजानें आपली मुलगी दशार्णदेशच्या राजाला देण्याचा निश्चय केला; व त्या राजाच्या उपाध्याला ब्राह्मणी देण्याचें ठरविलें; परंतु ते उभयतां कबूल होईनात. त्यावेळी रत्नावती व ब्राह्मणी ह्या उभयतांनीं विरक्त होऊन तप करण्याकरितां हटकेश्वरक्षेत्रांत प्रयाण केलें; व तेथें दोन तीर्थे निर्माण करून त्या दोन कुमारिका कृतार्थ होत्या झाल्या.

## अध्याय १९९ व २०० वा.

### नागरजातिवर्णन.

कुरुक्षेत्र, हाटकेश्वरक्षेत्र व प्रभासक्षेत्र अशीं मुख्य तीन क्षेत्रें आहेत. हीं तीनच क्षेत्रें सर्व पातकें दूर करणारीं आहेत. पुष्करारण्य, नैमिषारण्य व धर्मारण्य हीं तीन मुख्य अरण्यें आहेत. काशी, द्वारका व अवंती ह्या तीन पुऱ्या आहेत. वृंदावन, खांडववन व द्वैतवन हीं तीन पुण्यदायक वनें होत. आतां चमत्कारक्षेत्रांत नागरजातीची उत्पत्ति कशी झाली तें सांगतो. पूर्वी एक कुंभक नांवाचा चांडाळ होता. त्याला एक सच्छिल असा मुलगा झाला. तो द्विजरूप धारण करून चमत्कारक्षेत्रांत प्राप्त झाला. हा ब्राह्मण आहे, असें समजून सुभद्र नांवाच्या ब्राह्मणानें आपली मुलगी त्याला दिली. हा चांडाळ आहे ब्राह्मण नव्हे हें त्या कन्येला समजतांच तिनें अग्नींत उडी टाकून देहनाश करण्याचा विचार केला. हा तिचा निश्चय पाहून इतर ऋषींनीं तिला एक प्राणायामाचा विधि व प्राकृत मंत्राचा उपदेश केला; व सांगितलें कीं, ह्या मंत्राच्या योग्य विधीनें एक वर्षपर्यंत जप कर म्हणजे दोषमुक्त होशील; व तुला ह्या द्विजरूपधारी चांडाळापासून जी प्रजा होईल, ती नागर ह्या संज्ञेनें प्रसिद्ध होईल. नागर ही जात श्राद्धादि कर्माला अनधिकारी आहे. क्षेत्रप्राधान्यानें जरी त्या जातीला ब्राह्मणत्व येत असेल तरी ती जात ब्रह्मकर्माला अयोग्य होय.

## अध्याय २०१ ते २०३ वा.

### नागरशुद्धि.

ज्या वेळीं नागरजतीला आपण अशुद्ध आहों, असें वाटलें त्या वेळीं त्यांनीं आपल्या ज्ञातीची शुद्धि होण्याकरितां एक उपाय योजिला. नागरांनीं सोळा ब्राह्मण बोलावून शुभ वेळीं सर्वप्रकारें प्रायश्चित्ताचें ग्रहण केलें. त्या वेळीं सर्व ऋषींनीं व इतर ब्राह्मणांनीं नागरजातीला आशीर्वाद देऊन सांगितलें कीं, आजपासून नागरजाति शुद्ध असून ती सत्य भाषण करणारी होईल. आजपासून नागरजाति वेदाध्ययन करण्यास अधिकारी होईल. असें सांगित ल्यावर त्यांनीं नागरब्राह्मणांना चारहि वेद शिकविलें. त्यानंतर सर्व नागर वेदाध्ययन व अग्निहोत्रादि विधानानें आपलें कुल पवित्र करते झाले.

## अध्याय २०४ वा.

### प्रेतश्राद्धवर्णन.

पुर्वी हिरण्याक्ष नांवाचा एक दैत्य होता. त्याचें व इंद्राचें युद्ध सुरू असतां इंद्राचा पराभव झाला. त्यावेळीं इंद्र विष्णुला ह्मणतो कीं युद्धांत मेलेल्यांना कोणती गति प्राप्त होते तें सांगा; नंतर विष्णु ह्मणतात; इंद्रा! जे देव किंवा मनुष्य युद्धांत मृत झाले असतील,-ते प्रेतत्वाला प्राप्त होतात; व त्यांचे कन्याराशिस्थ सुर्य असतां श्राद्ध करावें; म्हणजे त्यांस मुक्ति मिळते. तें श्राद्ध केव्हां करावें, असा इंद्राचा प्रश्न ऐकून विष्णु म्हणतात; भाद्रपद कृष्ण चतुर्दशीचे दिवशीं युद्धांत मृत झालेल्या लोकांचे श्राद्ध करावें; म्हणजे त्यास मुक्ति मिळते. त्या दिवशीं युद्धांत मृत झालेल्यांचें श्राद्ध जे न करतील त्यांचे पितर नरकांत जातील.

## अध्याय २०५ वा.

### गयाश्राद्धफल.

विष्णु म्हणतात,-इंद्रा! जर तुझी इच्छा युद्धांत मेलेल्या देवांना सद्गति मिळावी अशी असेल, तर तूं गयाश्राद्ध कर. त्याप्रमाणें हाटकेश्वरक्षेत्रामध्यें

एक तीर्थ आहे, तेथें अमवास्येचें दिवशीं व चतुर्दशीचे दिवशीं गयागमन होतें; करितां त्या दिवशीं ह्या तीर्थांत श्राद्धविधि करावा; म्हणजे पितर मुक्त होतात. अशातऱ्हेनें इंद्रानें विष्णूचें भाषण ऐकून घेऊन, हिमालयपर्वतावर प्रस्थान केलें; आणि त्या ठिकाणीं राहणाऱ्या ब्राह्मणांचे आशीर्वाद घेऊन, नंतर ऐरावतावर बसून तो चमत्कारपूरांत हाटकेश्वरक्षेत्रामध्यें प्राप्त झाला.

## अध्याय २०६ वा.

### बालमण्डनतीर्थमाहात्म्य.

इंद्र हाटकेश्वरक्षेत्रांत येऊन व तेथील ब्राह्मणांचा योग्य सत्कार करून, त्यां कडून योग्य आशीर्वाद घेता झाला. त्या तीर्थांत स्नान करून, श्राद्धकर्म केल्यावर इंद्र आपल्याबरोबर कश्यप, कौंडिन्य, उक्षणाश्च, शार्कव, द्विष, बैजावाप, कापिष्ठल, द्विक, वगैरे ह्या आठ मुख्य ब्राह्मणांना घेऊन; गयेला जाण्याम निघाला, त्याच वेळीं ब्रह्मदेव गयेला प्राप्त झाला होता. इंद्र व ब्रह्मदेव उभयतां एकाच वेळीं गयेंत श्राद्ध करीत असल्यामुळें अग्निष्वात्तादि पितर ब्रह्मदेवाकडे गेले असतां, इंद्राला फार वाईट वाटलें. नंतर इंद्रानें ज्या श्राद्धांत अग्निष्वात्तादिकांचा किंवा विश्वेदेवाचा संबंध नाहीं, असें श्राद्ध करून सर्व युद्धांत मेलेल्या देवांना सद्गति दिली. त्या वेळीं आकाशवाणी झाली कीं, इंद्रा! तुझ्या ह्या श्राद्धविधीनें प्रेतत्वाला प्राप्त झालेले देव मुक्त झाले आहेत, अशी आकाशवाणी ऐकून इंद्राला मोठा आनंद झाला; व तो गयातीर्थाची प्रशंसा करूं लागला. इतक्यांत विश्वेदेव व अग्निष्वात्तादि पितृगणहि ब्रह्मदेवाच्या आरंभलेल्या श्राद्धकर्मांतून इंद्राची स्तुति करीत त्याजकडे आले. त्या वेळीं इंद्र म्हणाला कीं, हे विश्वेदेव हो! ज्यापेक्षां तुम्ही माझ्या कर्मांत आगमन केलें नाहींत, त्यापेक्षां आजपासून लोक एकोद्दिष्टविधीनेंच श्राद्ध करितील, व त्यामुळें तुम्हांला हविर्भाग मिळणार नाहीं. हें इंद्राचें भाषण ऐकून विश्वेदेवादि गणांना फारच दुःख झालें; व ते रुदन करूं लागले. त्या गणांच्या नेत्रोदकांपासून अनेक बाल ( लहान ) अंडीं निर्माण झालीं, व त्या अंड्यांपासून अनेक घोर व क्रूर असे प्राणी उत्पन्न झाले. नंतर क्रूर प्राण्यांनीं ब्रह्मलोकीं गमन करून ब्रह्मदेवाला क्षुधाशान्त्यर्थ उपाय विचारिला असतां ब्रह्मदेवानें त्या प्राण्यांना कूष्मांड हें नांव ठेऊन सांगितलें कीं, जे कोणी " यद्देवा देव हेडनं " ह्या यजुर्वेदांतील तीन मंत्रांनीं तुम्हांला उद्देशून हवन करितील, त्यांला कोटिहोम केल्याचें पुण्य प्राप्त होईल असें म्हणून ब्रह्मदेव निघून गेले. त्या दिवसापासुन कूष्माण्डांना

लोकांकडून हविर्भाग मिळून ते आनंदित झाले. नंतर इंद्रानें त्याठिकाणीं शिवलिंग स्थापून त्याचें बालमण्डन असें नांव ठेविलें. बालमण्डन हें सर्व तीर्थांत, क्षेत्रांत व लिंगांत श्रेष्ठ आहे. ह्या बालमंडनतीर्थाच्या सेवनानें संपूर्ण ब्रह्महत्त्यादि पापें नष्ट होतात. ह्याच लिंगाच्या आराधनानें पराजित झालेला इंद्र पुनः इंद्रपदारूढ झाला, असें ह्याचें माहात्म्य अगम्य आहे.

## अध्याय २०७ वा.

### इंद्रमहोत्सव.

पूर्वी बृहत्कल्पामध्यें जयत्सेन नांवाचा इंद्र होता. त्यानें एकदां गौतमपत्नी जी अहिल्या तिच्याशीं कपटानें संबंध ठेविला; व आपली इच्छा पूर्ण केली. हें इंद्राचें कापट्य नारदाकडून गौतमाला समजलें. तत्काळ गौतमानें इंद्राला शाप दिला कीं, तूं ज्यापेक्षां माझ्या स्त्रीशीं दुष्टपणानें आचरण केलेंस त्यापेक्षां तुझ्या शरीरावर योनीच्या आकाराची हजार छिद्रें पडतील; व अहिल्येला तूं शिळारूप होऊन पडशील असा शाप दिला. गौतमाचा शाप ऐकून इंद्राला फार वाईट वाटलें; व तो मेरुपर्वताच्या गुहेंत जाऊन बसला. हें वर्तमान बृहस्पतीला समजतांच तो इंद्राला घेऊन गौतमाजवळ येऊन त्याची स्तुति करूं लागला. तेव्हां गौतम म्हणतो: गुरो ! मी जें बोललों तें खोटें होणार नाहीं. असें म्हणून गौतमानें इंद्राचे शरीरावरून हात फिरविला; व तीं योनिरूप छिद्रें नेत्रांप्रमाणें दिसूं लागलीं. त्या दिवसापासून इंद्राला सहस्राक्ष हें नांव प्राप्त झालें. तत्काळ तेथें देवांनीं गौतमासमक्ष इंद्राचा मोठा उत्सव केला; व सर्वत्र आनंदीआनंद झाला. त्या वेळीं गौतम म्हणतात, जे कोणी ह्या दिवशीं म्हणजे शरदृतूमध्यें इंद्रमहोत्सव करितील, ते सर्वदुःखांपासून मुक्त होऊन स्वर्गलोकाला जातील. ह्या उत्सव श्रवणनक्षत्रापासून पांच रात्रीं ( पांच दिवस ) करावयाचा असल्यामुळें ह्याला पंचरात्रमहोत्सव असें म्हणतात. ह्या पंचरात्रमहोत्सवाच्या कथा श्रवण केल्यानें मनुष्यांचा व्यभिचारादिकांचा दोष नष्ट होतो.

## अध्याय २०८ वा.

### गौतमेश्वरादिलिंगमहात्म्य.

गौतमाचा पुत्र जो शतानंद त्यानें आपली माता जी अहिल्या तिला गौतमानें शाप दिला, असें समजतांच शतानंदाला फारच दुःख झालें व तो गौतमाजवळ

अहिल्यामातेचा उद्धार होण्याविषयीं उपाय विचारूं लागला. त्यावेळीं गौतम म्हणतात कीं, स्त्रियांची शुद्धि होणें अशक्य आहे. तथापि तुझा जर फारच आग्रह असेल तर मी उच्छाप देतों कीं, त्रेतायुगीं राम या नांवानें स्वतः विष्णु अवतार घेऊन, जेव्हां शिलारूप झालेल्या तुझ्या मातेला पादस्पर्श करील त्यावेळीं तुझी माता शापमुक्त होऊन पूर्ववत् होईल. असें ऐकून शतानंदाला फारच आनंद झाला. पुढें कालांतरानें त्या सर्व गोष्टी घडून अहिल्येचा उद्धार झाला. ती अहिल्या कृतकर्मांच्या पश्चात्तापानें मुक्त होऊन हाटकेश्वरक्षेत्रांत जाती झाली. अहिल्या हाटकेश्वर क्षेत्रांत गेलेली समजतांच शतानंद व गौतम उभयतांहि हाटकेश्वर क्षेत्रांत आले. तेथें अहिल्येसह आनंदांत राहून व शिवाराधना करून त्या तिघांनीं आपआपल्या नांवांनीं एक एक लिंग स्थापन केलें. अहिल्येश्वर, गौतमेश्वर, व शतानंदेश्वर अशा ह्या तीन शिवलिंगाचें जे पूजन करितात, त्यांस व्यभिचारजन्य पाप बिलकूल लागत नाहीं. जे कोणी ह्या लिंगांचें दर्शन घेतात ते निर्दोष होत्साते त्यास अनेक यज्ञांचें फल प्राप्त होतें. हें आख्यान श्रवण करणारे शिवलोकाला प्राप्त होतात.

---

## अध्याय २०९ वा.

### शंखतीर्थोत्पत्ति.

पूर्वी शंख व लिखित या नांवाचे ब्राह्मण होते. शंख हा लिखिताचा लहान भाऊ असल्यामुळें त्याच्या आज्ञेविरुद्ध कधींहि वर्तन करीत नसे. शंख एकदां लिखिताच्या दर्शनाकरितां त्याच्या उपवनांत गेला असतां, तेथें लिखित नाहीं, असें पाहून तेथील चांगलीं पिकलेलीं फळें काढून घेऊं लागला. इतक्यांत लिखित त्या उपवनांत येऊन पाहतों तों आपला भाऊ शंख मला न विचारतां फळें तोडीत आहे असें दिसलें. तात्काळ लिखित शंखाला म्हणाला कीं, तूं हें फारच वाईट काम केलेंस. तूं चोरी केल्यामुळें तुझी तपश्चर्या व्यर्थ गेली आहे. असें लिखिताचें भाषण ऐकतांच शंख म्हणतो कीं, असें जर आहे तर तुम्ही मला माझ्या दुष्कर्मांबद्दल शिक्षा करा; म्हणजे मी दुष्कर्मापासून निवृत्त होईन. असें शंखाचें भाषण ऐकून लिखितानें ज्या हातानें शंखानें चोरी केली होती, तो हात तोडून टाकिला. तत्काळ शंख हाटकेश्वरक्षेत्रांत येऊन तेथें एक तीर्थ निर्माण करून व एक शिवलिंग स्थापून त्याची आराधना करूं लागला. हजार वर्षें लोटल्यावर शंकर प्रसन्न होऊन शंखाला वर मागण्याविषयीं सांगूं

लाघलें; नंतर शंखानें तोडलेला हात पूर्ववत् व्हावा, असा वर मागून त्या तीर्थाचें माहात्म्यहि वाढविलें. शंकरानें त्या तीर्थाला शंखतीर्थ हें नांव ठेविलें. त्या तीर्थांत स्नान केलें असतां अध्यंगता प्राप्त होते.

## अध्याय २१० वा.

---:०:---

### तांबूलमाहात्म्य.

पूर्वी दैत्यांकडून ज्या वेळीं देवांचा पराभव झाला; तेव्हां देवांनीं दैत्यांजवळ कृत्रिम सख्य करून समुद्रमंथनाला सुरवात केली; व त्यायोगें लक्ष्मीप्रमुख चौदा रत्नें निर्माण केलीं. त्यांपैकीं अमृत हें देवांनीं प्राशन करून अमरत्व संपादिलें, व दैत्यांचा पराभव केला. देवांनी अमृत प्राशन करून जें शिल्लक राहिलें, तें जेथें हत्ती बांधले होते तेथें चुकीनें ठेविलें. हत्तीनें तें अमृतपात्र उघडें करून, त्यांतील अमृत जमिनीवर सांडिलें. त्या अमृताच्या संयोगानें तेथें एक वल्ली उत्पन्न झाली; ती वल्ली ( वेल ) नागानें ( हत्तीनें ) अमृत सांडिल्यामुळें उत्पन्न झाली, यास्तव तिला नागवल्ली* हें नांव प्राप्त झालें. त्या नागवल्लीचीं पत्रें घेऊन, देव तांबूल भक्षण करितात. फाटकीं नागवल्लीचीं पानें, भक्षण केलीं असतां दारिद्र प्राप्त होतें. सुरेख पक्व झालेलीं नागवल्लीचीं पानें मोत्यांचा चुना, स्वच्छ सुपारी, कात ह्या पदार्थांनीं मिश्र असा तांबूल सेवन केला असतां, लक्ष्मीप्राप्ति होते. नित्य ब्राह्मणाला तेरा गुणानें संपन्न असा तांबूल अर्पण केला असतां, सर्व सिद्धि प्राप्त होतात. जो स्वतः तांबूलाचें भक्षण करितो; व ब्राह्मणाला देत नाहीं, त्याला पुढील जन्मीं मुळींच तांबूल मिळत नाहीं. तांबूल-भक्षण सर्व दोषांची मुक्तता करून, रक्तवृद्धि व देहशुद्धि करणारें आहे.

---

* ज्या वल्लीला आपण नागवेल, पानवेल, ह्या शब्दानें ओळखतों, व तिचीं जीं पानें त्याला विड्याचीं पानें असें म्हणतों; त्या पानांचा तांबूल—भक्षणाचे प्रसंगीं उपयोग करतों.

## अध्याय २११ वा.

### आनर्तनृपराज्यारोहण.

वाल्मीकिमुनि आनर्त देशच्या राजाला शंखतीर्थाचें माहात्म्य सांगत असतां त्यायोगें आनर्तदेशाचा राजा त्या माहात्म्यश्रवणानें तल्लीन झाला. नंतर तो राजा वाल्मीकींची आज्ञा घेऊन शंखतीर्थामध्यें स्नान करून व शंखेश्वराचें पूजन करून निष्पाप व दुःखमुक्त झाला. शंखतीर्थांत स्नान केल्यामुळें त्या राजाचे सर्व शत्रु नष्ट होऊन त्याला पुनः शत्रूंच्या हातीं गेलेलें राज्य मिळालें. प्रजाजनांना त्यायोगें आनंद होऊन तो राजा सुखानें राज्योपभोग घेऊन मोक्षाला गेला.

## अध्याय २१२ वा.

### रत्नादित्यमाहात्म्य.

एकदां रत्नेश्वर नांवाचा एक अयोध्येचा राजा होता. पूर्वजन्मीं केलेल्या दुष्कृत्यामुळें ह्या जन्मीं त्याला कुष्ठादि व्याधि प्राप्त झाली; नंतर तो राजा हाटकेश्वरक्षेत्रांत जाऊन त्या ठिकाणीं त्यानें सूर्याची आराधना केली; नंतर सूर्य प्रसन्न होऊन त्यानें त्याचें सर्व शरीर कुष्ठरहित केलें व सांगितलें कीं, ह्या ठिकाणीं तूं माझी रत्नादित्य ह्या नांवानें स्थापना कर; म्हणजे मी सर्वांच्या इच्छा पुर्ण करीन. जे माझें पूजन करितील ते सर्व रोगांपासून मुक्त होऊन सद्गतीला प्राप्त होतील. असें सांगून सूर्य अंतर्धान पावला व राजा नगरांत आला.

## अध्याय २१३ वा.

### सांबादित्यमाहात्म्य.

श्रीकृष्णाला जांबवंतीचे ठिकाणीं सांब नांवाचा मुलगा झाला. तो इतका स्वरूपवान् होता कीं, त्याच्या स्वरूपाला पाहून श्रीकृष्णाच्या रुक्मिणीप्रमुख स्त्रियाहि मोहित होत. एकदां नंदिनी नांवाची श्रीकृष्णाची स्त्री सांबपत्नीचें रूप घेऊन सांबाजवळ आली; व तिच्यांशीं सांबानें पत्नी ह्या बुद्धीनें सर्व व्यवहार चालविला. मध्यरात्र उलटल्यानंतर सांबाला समजलें कीं, आपण जिच्याशीं

संबंध ठेविला, ती पत्नी नसून आपली सावत्र आई व श्रीकृष्णाची पत्नी होय. मागून सांबाला पश्चात्ताप झाला; व तो त्या दुष्कृत्याबद्दल प्रायश्चित्त विचारण्याकरितां एका ब्राह्मणाकडे गेला. ब्राह्मणानें सांगितलें कीं, * सिंगिनीच्या विधीशिवाय ह्या दुष्कृत्याला दुसरें प्रायश्चित्त नाहीं. असें ब्राह्मणाचें भाषण ऐकून सांबानें तींगिनीविधीनें आत्मशुद्धि करण्याचा निश्चय केला; व झालेलें वर्तमान श्रीकृष्णाला कळविलें. तें ऐकून कृष्णालाहि फार वाईट वाटलें. नंतर कृष्ण सांबाला म्हणतात कीं, तूं हें दुष्कृत्य मुद्दाम केलें नसून चुकीनें केलें आहेस. करितां आतां तुला एवढें घोर प्रायश्चित्त स्वीकारण्याची जरूर नाहीं. तूं हाटकेश्वरक्षेत्रांत जाऊन सूर्याराधना कर; म्हणजे दोषमुक्त होशील. नंतर सांब कृष्णाच्या सांगण्याप्रमाणें हाटकेश्वरक्षेत्रांत सांबादित्य नांवानें सूर्याची स्थापना करून त्याच्याच आराधनेनें दोषमुक्त झाला. ह्या सांबादित्याच्या पूजनानें मातृगमनादि दोष दूर होऊन सद्गति प्राप्त होते; व संसारबंधनें नाश पावतात.

---

## अध्याय २१४ वा.

—— :०: ——

### गणपतिपूजामाहात्म्य.

एकदां विश्वामित्र सैन्यासह मृगया करण्याकरितां गेला असतां अतिशय श्रमीत झाल्यामुळें वशिष्ठ ऋषींच्या आश्रमाला प्राप्त झाला. वशिष्ठानें कामधेनूच्या साहाय्यानें सैन्यासह विश्वामित्राची फारच आतिथ्याला योग्य अशी व्यवस्था ठेविली. हें कामधेनूचें सामर्थ्य पाहून विश्वामित्रानें वशिष्ठाजवळ तिची याचना केली. वशिष्ठानें ब्रह्मतेजाच्या सामर्थ्यानें कामधेनु विश्वामित्राला न देतां त्याचा उलट पराभव केला. त्यामुळें विश्वामित्राला वाटलें कीं, ब्रह्मतेज क्षात्रतेजाहून श्रेष्ठ आहे; करितां आपण ब्रह्मतेज मिळविण्याचा प्रयत्न करावा. असा विचार करून विश्वामित्रानें आपल्या रोहिताश्व नांवाच्या मुलाला राज्यासनावर बसवून, स्वतः तो तप करण्याकरिता कैलासपर्वतावर गेला. त्याच्या

---

* तिंगिनीचा विधिः—ज्या मनुष्याला प्रायश्चित द्यावयाचें, त्याच्या शरीराच्या प्रमाणाचा खोल खळगा खणून त्याला त्यांत निजता येईल इतका तो लांब असावा. नंतर त्या खळग्यांत त्याला निजवावें; व त्याचा खाली व वरती गोंवऱ्यांच्या बारीक पुडीचा थर द्यावा; व अग्नि लावावा अग्नीच्या बाधेनें ओरडू नये; व शोक आणि दुःख करूं नये; व ईश्वरभजन करीत राहावें. अशातऱ्हेनें जिविताचा नाश झाला असतां देहशुद्धि होते. ह्या विधीला तिंगिनीविधि म्हणतात.

तपानें शंकर प्रसन्न होऊन विश्वामित्रास म्हणतात; राजन्! तूं पार्वतीच्या शरीराच्या मळापासून उत्पन्न झालेल्या गणपतीची पूजा कर; म्हणजे तुला ब्रह्मतेज प्राप्त होईल. नन्तर विश्वामित्रानें शंकराच्या सांगण्याप्रमाणें विनायकी चतुर्थीला, म्हणजे माघशुद्ध चतुर्थीला गणपतीचें यथाविधि पूजन केलें; व त्यायोगें त्याला ब्रह्मतेज प्राप्त होऊन तो जगद्विख्यात आणि सप्तर्षींत प्रमुख असा झाला. ह्या गणपतीच्या पूजनानें पुत्र, धन, सुख; व मोक्ष प्राप्त होतो.

## अध्याय २१५ ते २२६



### श्राद्धविचार.

एकदां विश्वामित्राचा पुत्र जो रोहिताश्व त्यानें मार्कण्डेयाला श्राद्धविधिसंबंधीं माहिती विचारिली असतां मार्कण्डेय रोहितश्वाला म्हणतात कीं, वेदाध्ययनाचें फल अग्निहोत्र स्वीकारणें हें होय, अनेक ग्रंथांच्या श्रवणाचें फळ सत्स्वभावानें वागणें हें होय, स्त्रीच्या समागमाचें फळ पुत्रप्राप्ती होय; व द्रव्याचें फळ दानधर्म करणें किंवा स्वतः त्या द्रव्याचा उपभोग घेणें हें होय. मृत पुरुषांना सुख होण्याकरितां पुत्रादिकांनीं श्रद्धेनें करावयाचें जें कर्म त्यास श्राद्धकर्म म्हणतात, मन्वादि, युगादि, संक्रांत, व्यतीपात, गजच्छाया, ग्रहण, अक्षय्यतृतीय इत्यादि पर्वकाळ श्राद्धाला योग आहेत, श्राद्धार्ह ब्राह्मण मिळाल्यास पर्वणी नसतांहि श्राद्ध करावें. कृष्णपक्षांत केलेल्या श्राद्धाचें फळ विशेष आहे. श्राद्धकर्म जर केलें नाहीं; तर पितरांना दुःख होतें व ते पुत्रांना शाप देऊन त्याचा कुलक्षय करितात. कन्याराशीला सूर्य गेला असतां कृष्णपक्षांत श्राद्ध केलें असतां एक वर्षपर्यंत पितर तृप्त होतात. श्राद्धविधि हा आपण शुद्ध रीतीनें व स्वधर्मानें मिळविलेल्या द्रव्याच्या साहाय्यानें करावा. अन्यायानें मिळविलेलें द्रव्य श्राद्धकर्मांत खर्चिल्यास तें श्राद्धकर्म पितरांना दुःखदायक होतें. शुद्धाचरण करणारे वृद्ध व ज्ञानकर्मसंपन्न असे ब्राह्मण श्राद्धाला बोलवावेत. अनधिकारी ब्राह्मण श्राद्धाला बोलाविल्यास तें श्राद्ध फुकट जातें. अमावास्येला केलेल्या श्राद्धाचेंहि फळ विशेष आहे. श्राद्धाच्या आदले दिवशीं ब्राह्मणांना आमंत्रण द्यावें. भिक्षुक व सद्धर्मानें वागणारा ब्राह्मण न मिळेल तर गृहस्थांना आमंत्रण द्यावें. नन्तर दुसरे दिवशीं म्हणजे श्राद्धदिवशीं ब्राह्मण आले असतां त्यांची यथाविधि पूजा करून प्रार्थना व नमस्कारपूर्वक प्रदक्षिणादि करावें. श्राद्धाला मांसान्न तयार केलें पाहिजे, असा सर्वसामान्य नियम आहे, तथापि कलियुगांत मांसभक्षण वर्ज्य असल्यामुळें मांसाच्या ऐवजीं माष म्हणजे उडीद घेऊन त्याचे पदार्थ

श्राद्धाला उपयोजावेत; म्हणजे श्राद्धविधि सफल होतो. अश्विन शुक्ल नवमी, कार्तिक शुक्ल द्वादशी, माघ शुक्ल तृतीया, भाद्रपद शुक्ल तृतीया, फाल्गुन कृष्ण अमावास्या, पौष शुक्ल एकादशी, आषाढ शुक्ल दशमी, माघ शुक्ल सप्तमी, श्रावण कृष्ण अष्टमी, आषाढ शुक्ल पौर्णिमा, कार्तिक शुक्ल पौर्णिमा; फाल्गुन शुक्ल पौर्णिमा, चैत्र शुक्ल पौर्णिमा ह्या तिथींना मन्वादि म्हणतात. ह्या तिथी श्राद्धाला योग्य आहेत. दक्षिणारहित श्राद्ध निष्फळ होय. सुंदर स्त्रीची इच्छा करणाऱ्यानें प्रतिपदेला श्राद्ध करावें. सुंदर कन्या होण्याची इच्छा करणाऱ्यानें द्वितीयेला श्राद्ध करावें. घोड्यावर बसण्याची इच्छा करणाऱ्यानें तृतीयेला श्राद्ध करावें. आपल्या गोठ्यांत पुष्कळ गाई असाव्या, अशी ज्यांची इच्छा असेल त्यानें चतुर्थीला श्राद्ध करावें. पंचमीला पुत्रेच्छु जनानें श्राद्ध करावें. परलोकेच्छा करणाऱ्यांनीं षष्ठीला श्राद्ध करावें. कृषिकर्मांत सिद्धि मिळविणाऱ्यांनीं सप्तमीला श्राद्ध करावें. व्यापारांत जय मिळावा, अशी इच्छा करणाऱ्यानें अष्टमीला श्राद्ध करावें. सौभाग्यप्राप्तीकरितां नवमीला श्राद्ध करावें. इष्टसिद्धीकरितां दशमीला श्राद्ध करावें. धनधान्याच्या इच्छेनें एकादशीला श्राद्ध करावें. राजप्रसादाची इच्छा करणाऱ्यानें द्वादशीला श्राद्ध करावें. मोक्षेच्छूनें त्रयोदशीला श्राद्ध करावें. युद्धांत किंवा अपघातानें मेलेल्यांचें श्राद्ध चतुर्दशीला करावें. अमावास्येला श्राद्ध करणाराच्या सर्व इच्छा पूर्ण होतात. गजच्छायादि पर्वकाळहि श्राद्धकर्माला अत्यंत पवित्र आहेत. दौहित्र, कुतुप व तिळ हे श्राद्धाला अवश्य असावें. पितृकार्य अपसव्यानें करावें; व देवकार्य सव्यानें करावें. पितृस्थानीं तीन किंवा एक ब्राह्मण बसवावा; व देवस्थानीं एक किंवा दोन ब्राह्मण बसवावेत. ब्राह्मणपूजन, भोजन, अग्नौ-करण व पिंडदान हीं श्राद्धांत अवश्य करावीत. ह्या कर्मांशिवाय केलेलें श्राद्ध निष्फळ होय. शेवटीं "वाजे वाजे" ह्या मंत्रानें श्राद्धविसर्जन करावें, व "आमा वाजस्य" ह्या मंत्रानें ब्राह्मणांना प्रदक्षिणा कराव्या. एकोद्दिष्ट श्राद्ध हें जेथें प्राण्याचा मृत्यु झाला असेल तेथें करावें. एकोद्दिष्टांत आवाहन करूं नये. 'अभिरम्यतां' ह्या मंत्रानें ब्राह्मणविसर्जन करावें. "ये समाना" ह्या मंत्रानें ब्राह्मणाचे पाय धुवून व पूजन करून पिंडप्रदान करावें. सापिण्डश्राद्धानंतर एकोद्दिष्ट करूं नये. मृतपित्याला मृत होऊन जर एक वर्ष झालें नसेल तर त्या-पूर्वी त्याचें सपिण्डक श्राद्ध करूं नये. पितामहादिकांचें योग्य तिथीला श्राद्ध करण्यास हरकत नाहीं. एकदां धर्मराजानें नरक किती आहेत; असा प्रश्न भीष्माला विचारिला असतां भीष्म म्हणतात; धर्मा! एकंदर नरक एकवीस आहेत. पापी लोक त्या त्या नरकांत जाऊन पडतात. कराल, विकराल, बकनास, महोदर, सौम्य, शांत, नंद, सुवाक्य, हे आठ यमदूत होत. पहिलें

चार दूत पाप्यांना नेऊन पीडा देतात; व पुढील चार पुण्य पुरुषांना नेऊन सुखांत ठेवितात. मृत्युकाळीं मृताला उद्देशून जे गोदान करितात, ते गोपुच्छाचा आश्रय करून निष्पाप होत्साते तत्काळ मुक्त होतात.

## अध्याय २२७ वा.

### नरकयातनाविध्वंस.

एकदा भीष्माला धर्मराजानें नरकयातनांपासून प्राण्यांची मुक्तता होण्याचा उपाय विचारिला असतां भीष्म म्हणतात; धर्मा ! ज्या प्राण्यांच्या अस्थि गंगेंत पडल्या असतील; त्या प्राण्यांना नरकयातना भोगाव्या लागत नाहींत. ज्यांचे पुत्र पित्याला उद्देशून गंगेचे कांठीं श्राद्ध करितात, त्यांचे पितर विमानांत बसून स्वर्गाला जातात. कितीहि पापी मनुष्य असो, त्यानें जर गंगेचे कांठीं सुवर्ण-दान केलें तर त्याचें सर्व पाप नष्ट होऊन त्यास मोक्ष–प्राप्ति होते. जे वीर पुरुष लढाईंत देहत्याग करितात तेहि श्रेष्ठ गतीला प्राप्त होतात. काशी, कुरु, नैमिष, नागर, प्रयाग व प्रभास इत्यादि ठिकाणीं जे आपलें शरीर टाकतात तेहि नरक-यातनांपासून मुक्त होतात. ज्याच्या विवाहांत वृषभदान केलें जातें, त्या पुरुषाच्याहि यमयातना नष्ट होतात. जो मरणकाळीं ईश्वराचें चिंतन करितो, त्यास स्वर्गलोक प्राप्त होतो. जे गरीबानां, अंधळ्यांना व यात्रेकरूंना अन्नदान करितात तेहि मोक्षाला जाऊन आनंदांत राहतात. जलधेनु व तिलधेनु ह्यांचें दान, चंद्रग्रहणकाळीं सोमनाथदर्शन, समुद्रस्नान, सरस्वतीनदींत केलेलें स्नान, चंद्रग्रहणकाळीं सोमनाथदर्शन, समुद्रस्नान, सरस्वतीनदींत केलेलें स्नान, कार्तिकांत त्रिपुष्कराला प्रदक्षिणा, गो–ब्राह्मणरक्षण इत्यादि सर्व पुण्य–कृत्यें नरक–मोचन करणारीं असून मोक्ष देणारीं आहेत.

## अध्याय २२८ वा.

### अंधकासुरकथा.

पूर्वी हिरण्यकशिपु नांवाचा एक दैत्य होता. विष्णूनें नारसिंह अवतार धारण करून, त्या दैत्याचा नाश केला. त्या हिरण्यकशिपूला प्रल्हाद व अंधक असे दोन पुत्र होते. प्रधानांनीं हिरण्यकशिपूच्या पश्चात् प्रल्हादाला राज्यावर बस-विण्याचा निश्चय केला असतां, प्रल्हादानें राज्यारूढ होण्याचें नाकारिलें; त्या

वळा अंधकाला राज्यारूढ केलें. अंधकानें त्रैलोक्य जिंकून अमरत्व मिळविण्याकरितां तप करून ब्रह्मदेवाकडून अमरत्व संपादिलें. नंतर अंधकासुरानें वराच्या जोरावर इंद्रादिकांना जिंकून, त्रैलोक्याधिपधित्व संपादिलें. इंद्र राज्यभ्रष्ट झाला असतां, पुनः राज्य मिळण्याच्या इच्छेनें शिवाराधना करूं लागला. शंकरानें प्रसन्न होऊन इंद्राला अभयवचन दिलें; व अंधकासुराकडे आपले दूत पाठवून सांगितलें कीं, तूं इंद्राचें राज्य इंद्राला परत दे, नाहीं तर मी तुझा नाश करीन. असें शिवभाषण दूतमुखानें ऐकून अंधकासुराला राग आला; व तो शिवदूतांना म्हणतो कीं, तुं दूत असल्यामुळें मी तुझा नाश करीत नाहीं. शंकर मला ओळखीत नाहीं काय? माझा नाश करणारा असा शंकर कोण आहे? मी इंद्राल स्वर्गराज्य शंकराच्या धमकीनें देणारा, असा भित्रा नाहीं. माझा शंकराला निरोप सांगा कीं, थोडक्याच दिवसांत मी कैलास पर्वतावर झडप घालणार आहे, तेव्हां तुम्हीं सर्व तेथून निघून काशीला जाऊन राहा. मी कैलास पर्वतावर आपल्या वृकनांवाच्या पुत्राला ठेवणार आहें. हें अंधकाचें दुर्भाषण ऐकून शिवदूत परत शिवलोकाला येऊन त्यांनीं शंकराला सर्व वर्तमान कळविलें.

---

## अध्याय २२९ वा.

### शिवांधकयुद्ध.

अंधकाचा निरोप ऐकतांच शंकराला फारच राग आला व तो सैन्यासह अंधकाबरोबर युद्ध करण्यास तयार झाला; नंतर अंधकसैन्य व शिवसैन्य यांचें शस्त्रास्त्रांनीं हजार वर्षेपर्यंत युद्ध झालें. शेवटीं शंकराला अंधकाचा राग आला व त्यानें आपल्या त्रिशूलानें अंधकावर प्रहार केला. तरीसुद्धां ब्रह्मदेवाच्या वरानें त्याचा नाश झाला नाहीं. अंधकानेंहि शिवाचे अंगावर गदेचे पुष्कळ प्रहार केले; पण फुकट गेले; नंतर शंकरानें आपला त्रिशूल अंधकाच्या शरीरांत रोवून तो अंधकशरीरासह गरगर फिरविला. त्या वेळीं अंधक शंकराला शरण येऊन त्यानें त्याची पुष्कळप्रकारें स्तुति केली. त्याच्या स्तुतीनें शंकराला आनंद झाला व त्यानें अंधकाला त्रिशूलापासून मुक्त केलें; नंतर शंकरानें अंधकाचें भृंगिरिटी असें नांव ठेऊन त्याची आपल्या शिवगणांत योजना केली. अंधकानेंहि स्वदेह शिवसेवेला अनन्यभावनेनें अर्पण केला.

---

# अध्याय २३० वा.

## वृकासुरकथा.

अंधकासुर शिवगणांत मिळाला असतां दैत्यसैन्य शंकराला भिऊन पाताळांत जाऊन राहिलें, व इंद्राला स्वर्गाची प्राप्ति झाली. हें अंधकपुत्र जो वृकासुर त्याला न आवडून त्यानें हाटकेश्वर क्षेत्रांत पांच हजार वर्षे घोर तप करून ब्रह्मदेवाच्या प्रसादानें इष्ट असें अमरत्व मिळविल्यामुळें वृकानें रैवतकपर्वतावर जाऊन इंद्राबरोबर युद्ध करण्याकरितां सैन्याची तयारी चालविली. वृकासुरानें युद्ध करून इंद्राला राज्यांतून हांकलून लाविलें व स्वतः इंद्रपदारूढ झाला.

# अध्याय २३१ वा.

## एकादशीव्रतमाहात्म्य.

वृकानें आपले दूत सर्वत्र पाठवून सांगितलें कीं, जे कोणी देवांना उद्देशून होमहवनादि पुण्यकृत्यें करितील त्यांचा त्या कर्मासह विध्वंस करून टाका. अशा तऱ्हेनें वृकदूत त्रैलोक्यांत हिंडत असतां कोणीही कर्मठ ब्राह्मण उघडपणें होमादि कृत्य करीत नसे. एक त्यांपैकीं विद्वान् स्वधर्मनिष्ठ असा सांकृतिनांवाचा ब्राह्मण गुप्तरीतीनें होमहवनादि शुभ कृत्य करीत होता. त्या वृकासुराचे दूत येऊन सांकृतीवर शस्त्रप्रयोग करूं लागले; परंतु तो विष्णुप्रमुख देवतांचें पूजन करीत असल्यामुळें त्या दूतांचे कांहीं एक चाललें नाहीं. हें वर्तमान वृकाला समजतांच तो स्वतः हातांत तरवार घेऊन आला; व त्या सांकृतीवर ती मारणार तोंच त्या तरवारीचे तिळाएवढे बारीक तुकडे झाले. तत्काळ सांकृतीलाहि राग आला; व त्यानें वृकाला शाप दिला कीं, तूं पांगळा होशील. शाप देतांच वृक पांगळा झाला; वृक पांगळा झाल्यामुळें इंद्राला स्वराज्यप्राप्ति झाली, व वृक पुनः तप करूं लागला. वृक दुष्ट असल्यामुळें ब्रह्मदेवानें प्रसन्न होऊन सांकृतीकडून वृकाला वर देवविला कीं, तूं चार महिनें [ चातुर्मास्यांत ] पादयुक्त होशील; व इतर काळांत तूं पांगळाच राहशील. त्या दिवसापासून चार महिने वृक देवांना पीडा देत असे; तेव्हां सर्व शेषशायी विष्णूजवळ जाऊन म्हणतात कीं, वृकासुर आम्हाला चार महिने फारच पीडा देतो; करितां आमचें रक्षण करून आम्हाला सुरक्षित राहण्यास एकादें स्थान द्या; किंवा हें आमचें दुःख

नष्ट होण्यास एकादा उपाय सांगा. नंतर विष्णु इंद्रादि देवांना म्हणतात कीं, मी चार महिने लक्ष्मीसह हाटकेश्वरक्षेत्रांत शयन करून राहीन; म्हणजे त्यायोगें वृकापासून तुम्हांला बाधा होणार नाहीं. तुम्हीहि चार महिने मजजवळ हाटकेश्वरक्षेत्रांत राहण्यास यावें; व आठ महिनें स्वर्गांत राहावें. आषाढशुक्ल एकादशीला भगवान् विष्णु हाटकेश्वरक्षेत्रांत लोकहितार्थ शयन करितात; करितां ते दिवशीं उपोषण व भगवच्चिंतन केलें असतां सुखप्राप्ति होऊन, मोक्षप्राप्तिहि होते.

## अध्याय २३२ वा.

### चातुर्मास्यव्रतनियम.

आषाढ शुक्ल एकादशीला भगवान् विष्णु शयन केल्यापासून तो कार्तिक शुक्ल एकादशीला पुनः भगवान् जागृत होईपर्यंत जे मध्यंतरीं चार महिनें निघून जातात त्याला चातुर्मास्य अशी संज्ञा आहे. ह्या चातुर्मास्यांत व्रतोपवासादि नियमाचरण करणारे सर्व पातकापासून मुक्त होऊन वैकुंठाला प्राप्त होतात. श्रावणमहिन्यांत भाजीपाला खाऊं नये, भाद्रपदांत दहीं खाऊं नये, आश्विनमहिन्यांत दूध खाऊं नये व कार्तिकांत द्विदलधान्य खाऊं नये. चातुर्मास्यांत मीठ न खाणारा विष्णुप्रिय होतो. जो चातुर्मास्यांत तीळ व अक्षता ह्यांनीं होम करतो तो निरोगी होतो. जे चातुर्मास्यांत ब्राह्मणभोजन, वेदपठण, देवालयांत नृत्य, गायन व जागरणादि करितात ते भगवंताला आवडते होऊन त्यांस भगवान् सद्गति देतो. काश्याचें पात्र, मांस, क्षीर, मध, दुसऱ्यांदा भोजन व मैथुन हीं चातुर्मास्यांत वर्ज्य करावींत. जे कोणी कार्तिकांत देवालयांत दीपमाळा लावितात ते रूपसौभाग्यादि गुणांनीं युक्त होतात. चातुर्मास्यांतील नियमांचें आचरण केलें असतां भगवंताच्या कृपेनें जें जें इष्ट असेल तें तें सर्व प्राप्त होईल. जे चातुर्मास्यांतील नियम पाळीत नाहींत ते मूर्ख लोक जिवंत असून मेल्याप्रमाणेंच समजावेत. हें नियममाहात्म्य श्रवण करणाराहि सर्व पापापासून मुक्त होतो.

## अध्याय २३३ वा.

### गंगास्नानफल.

सर्व तीर्थें व सर्व दानें विष्णूला आश्रयें करून राहिलीं असल्यामुळें विष्णुशयनव्रताचें माहात्म्य विशेष आहे. चातुर्मास्यांत विष्णूनें शयन केलें असतां

जो भक्तिभावानें व्रतादि करितो, त्याला मोक्षप्राप्ति होते. चातुर्मास्यामध्यें पुष्कर, प्रयाग इत्यादि पुण्यक्षेत्रांत जे स्नान करितात त्यांना अनंत पुण्य प्राप्त होतें. तसेंच नर्मदादि पुण्यनदीमध्यें स्नान करणारे अक्षय्य अशा वैकुंठलोकांप्रत प्राप्त होतात. जो नित्य गंगास्नान करितो, त्याच्या बेचाळीस कुळांचा उद्धार होतो. गंगास्मरणानेंहि गंगास्नानाची फलप्राप्ति होते. गंगास्मरण केलें असतां विष्णु प्रसन्न होऊन आपलीं पापें हजार प्रकारानें नष्ट करितो. गंगेमध्यें सर्व तीर्थें असल्यामुळें गंगास्नानाचें फल अनुपम आहे. चातुर्मास्यांत जर मनुष्याच्या हातून दहा गंगास्नानें घडलीं, तर त्याला देवत्व प्राप्त होतें. ईश्वराचा वास आपल्या हृदयांत व्हावा, आपण निष्पाप व्हावें, सर्व देवता आपणावर संतुष्ट व्हाव्या इत्यादि जर शुद्ध भावना अंतःकरणांत उत्पन्न व्हावी, अशी इच्छा असेल तर एकदां तरी मनुष्यानें गंगास्नान केलें पाहिजे. स्नान करण्यास जर कोणी असमर्थ असेल तर त्यानें भस्मस्नान करावें; किंवा मंत्रानें अभिमंत्रित केलेल्या शीतोदकानें स्नान करावें; म्हणजे त्यास गंगास्नानाचें फल मिळेल. हें गंगत्स्नानमहात्म्य श्रवण करणारेहि विष्णुरूप होऊन विष्णुलोकाला जातात.

---

## अध्याय २३४ वा.

---

### चातुर्मास्यनियम.

चातुर्मास्यांत गंगोदकानें किंवा मंत्रपूर्वक शीतोदकानें स्नान करून पितृतर्पण करावें. नदीसंगमावर स्नान केल्यास अधिक फलाची प्राप्ति होते. चातुर्मास्यामध्यें जपहोमादि कर्में केल्यास त्यांचें अनंतपटीनें फळ प्राप्त होतें. कोणत्याहि शुभकर्माचें आचरण करण्यापूर्वी विष्णूचें नामस्मरण करावें. चातुर्मास्यांत साधूंची पूजा, गुरु, देवता व अग्नि ह्यांचा सत्कार व त्यांस हविर्भाग देणें इत्यादि कर्में अवश्य करावीं, तसेंच गोप्रदान, वेदाध्ययन, चांगल्या क्रिया; व खरें भाषण इत्यादि कर्में करण्यास कधींहि विसरूं नये. चातुर्मास्यांत इंद्रियनिग्रह, कामक्रोधादि साहा शत्रूंचा जय, क्षमासत्यादि गुणांचें पालन, योगाभ्यास, हिंसादि दुष्कृत्यांचा त्याग, व पंचमहापातकांचा त्याग केला असतां त्यांस मोक्ष मिळतो.

# अध्याय २३५ वा.

## दानमाहात्म्य.

चातुर्मास्यांत केलेलीं दानें अनंतपटीनें अधिक फल देणारीं होतात. अन्न हें ब्रह्म आहे, अन्नावर प्राण अवलंबून आहेत, करितां अन्नदानाहून दुसरें श्रेष्ठ दान नाहीं. अन्नदान, जलदान, गोप्रदान, वेदाध्ययन, यज्ञादि सत्कर्मे हीं चातुर्मास्यांत आचरिलीं असतां पुष्कळ मोठमोठीं फलें प्राप्त होतात. विष्णूसह वैकुंठांत सुखानें राहावें, अशी जर इच्छा असेल, तर अन्नदान हें अवश्य दिलें पाहिजे. देवांच्यासुद्धां सर्व इच्छा अन्नदानानें सफल होतात. चातुर्मास्यांत नृत्यगीतादि करून विष्णूपुढें जागरण केल्यास त्यास विष्णुलोक प्राप्त होतो. जे कोणी चातुर्मास्यांतील नियमांचें पालन करीत नाहींत ते जिवंत असूनहि मृत झाल्याप्रमाणेंच समजावेत. हें माहात्म्य पठण करणारेहि निष्पाप होतात.

---

# अध्याय २३६ वा.

## इष्टवस्तुत्याग.

जी वस्तु आपणास प्रिय आहे त्या वस्तूंचा चातुर्मास्यांत त्याग करून ती त्याग केलेली वस्तु ब्राह्मणाला चातुर्मास्यसमाप्तीचे दिवशीं अर्पण केली असतां अक्षय्य सुखाची प्राप्ती होते. चातुर्मास्यांत कांस्यपात्राचा त्याग करावा; म्हणजे दुसऱ्या जन्मीं राज्यप्राप्ति होतो. पळसांच्या पत्रावळीवर चातुर्मास्यांत भोजन केलें असतां ब्रह्मलोकाची प्राप्ती होते. तांब्याच्या ताटांत कधींहि भोजन करूं नये. रुईच्या किंवा वडाच्या पानांच्या पत्रावळीवर भोजन केलें असतां इष्ट वस्तूंची सिद्धि होते. चातुर्मास्यांत मिठाचा त्याग केल्यास ऐश्वर्यप्राप्ति होते. गव्हांचें अन्नाचा त्याग केल्यास लोकमान्यता प्राप्त होते, भाजीचा त्याग केल्यास दीर्घायुष्य प्राप्त होतें. दूध वगैरे पातळ पदार्थांचा त्याग केल्यास चांगलें नेत्र प्राप्त होतात. मुगांचा त्याग केल्यास शत्रुनाश, उडिदांचा त्याग केल्यास द्रव्यलाभ, तांदुळांचा त्याग केल्यास घोड्यांची प्राप्ति होते. फलत्यागानें पुत्रलाभ, तेलाच्या त्यागानें सौंदर्य, मद्यादिकांच्या त्यागानें मोक्ष प्राप्त होतो. ह्याप्रमाणें दुसरेहि अनेक प्रिय पदार्थ सोडले असतां त्या त्या प्रमाणें इष्ट फलें प्राप्त होतात. दुसऱ्याची कधींहि निंदा करूं नये. चातुर्मास्यांत नखें, केंस वगैरे पदार्थ काढूं नयेत. नखकेंसांचें धारण केलें असतां गंगास्नानाचें फळ प्राप्त होते.

# अध्याय २३७ वा.

## व्रतमहिमा.

कर्कसंक्रांत आली असतां, भक्तियुक्त अंतःकरणानें विष्णूची पूजा करून; जांभळें, नारिंगें, आम्रफल, इत्यादि फळें हातांत घेऊन, विष्णूला अर्घ्यप्रदान करावे. अर्घ्य देतांना " * **षण्मासाभ्यंतरे मृत्युर्यत्र क्वापि भवेन्मम । तन्मया वासुदेवाय स्वयमात्मा निवेदितः ॥** " हा मंत्र म्हणावा. विष्णुसेवेसारखें दुसरें श्रेष्ठ कोणतेंहि कर्म नाहीं. ' सर्व व्रतामध्यें ब्रह्मचर्यव्रत हें श्रेष्ठ व्रत आहे. व्रताचरणानें केव्हांहि मोठमोठीं फळें प्राप्त होतात. ब्रह्मचर्यव्रत व विष्णुव्रत हीं दोन चातुर्मास्यांत पाळिलीं असतां विष्णुसायुज्यता प्राप्त होते. चातुर्मास्यव्रतांच्या आचरणानें सर्व सिद्धि प्राप्त होतात.

---

# अध्याय २३८ वा.

## तपश्चर्यामाहात्म्य.

चातुर्मास्यांतील तप म्हणजे पंचमहायज्ञांचें आचरण करणें हेंच होय. शौच दोन प्रकारचें आहे. एक आभ्यंतर शौच व दुसरें बाह्य शौच. ज्ञानानें व आस्तिक्यबुद्धीनें जें बुद्धिप्रमुख ज्ञानेंद्रियांची शुद्धि केली जाते त्यास आभ्यंतर शौच म्हणतात; व जलादिकांनीं कर्मेंद्रियांची जी शुद्धि ती बाह्यशुद्धि होय. शौचाचरण करणें हेंहि एक तपच आहे. विषयलालसा व संकल्पादि क्रिया वर्ज्य करणें ह्यालाहि तप म्हणतात. विष्णुपूजा, साधुसेवा इत्यादि सत्कर्मे करणें हेंहि तपच होय. अशा नियमानें तपाचरण करणारे विष्णुरूप होऊन व सर्व कार्यांची सिद्धि मिळवून आनंदानें विष्णुलोकीं वास करितील.

---

* साहा महिन्यांच्या दरम्यान म्हणजे कर्कसंक्रांतीपासून, मकरसंक्रांतीपर्यंत म्हणजे दक्षिणायनांत जर मला कोणत्याहि स्थळीं मृत्यु येईल तर हा मी आपला आत्मा विष्णूला अर्पण केला आहे. हा वरील मंत्राचा अर्थ होय. असा संकल्प करण्याचें कारण दक्षिणायनांत मृत्यु येऊं नये; व आल्यास सद्गति मिळत नाहीं, असा नियम असल्यामुळें दक्षिणायनाच्या पूर्वींच आपला देह ईश्वरार्पण केला म्हणजे आपणाला केव्हांहि मृत्यू आला तरी सद्गतीच मिळणार.

## अध्याय २३९ वा.

### दीपमाहात्म्य.

सर्वांहून विष्णुभक्ति श्रेष्ठ आहे. विष्णुपूजनानेंच जगाचें रक्षण होतें. आकाशापासून वेद निघाला. पूर्वीं वेद एकच होता; परंतु पुढें व्यासानें त्या वेदाचे ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद ह्या नांवानें चार भाग कल्पिले व ते चार पैलादि शिष्यांना शिकविले. वेदाध्ययनानें ब्रह्महत्यादि पातकांचा नाश होतो. प्रथम देवतांचें ध्यान करून नंतर षोडशोपचार विधीनें त्यांचें पूजन करावें. पुरुषसूक्ताच्या ज्या सोळा ऋचा ( मंत्र ) आहेत, त्यांपैकीं प्रत्येक ऋचेनें क्रमाक्रमानें आवाहन, आसन, पाद्य, अर्घ्य, आचमन, स्नान, वस्त्र, यज्ञोपवीत, चंदन, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य, प्रदक्षिणा, नमस्कार व मंत्रपुष्प हे सोळा उपचार विष्णूला अर्पण करावे. ह्या सोळा उपचारांमध्येंहि विष्णूला दीप अर्पण केला असतां त्याचें फल विशेष आहे. द्वादशीला विष्णूपुढें दीप लाविला असतां मोक्षप्राप्ति होते. चातुर्मास्यांत दीपदान करणारांचीं सर्व पातकें एका क्षणांत नष्ट होतात. विष्णूला दीप दाखविला असतां ज्ञानप्राप्ति व कार्यसिद्धि होते.

## अध्याय २४० वा.

### विष्णुभक्ति.

विष्णु हा सर्व देवांत श्रेष्ठ व पूज्य असल्यामुळें त्याचें ध्यान अवश्य केलें पाहिजे. विष्णूभक्तीहून श्रेष्ठ कर्तव्य दुसरें नाहीं. त्रयोदशीला भक्तीनें अन्नदान करावें; म्हणजे सुखप्राप्ति होते. चतुर्दशीला भक्तियुक्त अन्तःकरणानें विष्णूला नमन करून त्यास शरण जावें; म्हणजे तो आपल्या सर्व इच्छा पूर्ण करितो. जो पुरुष विष्णुभक्तीहीन आहे तो पुरुष जिवंत असून मेल्याप्रमाणेंच समजावा.

## अध्याय २४१ वा.

### कर्तव्याकर्तव्यविचार.

एकंदर वर्ण चार आहेत; ते अनुक्रमें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, व शूद्र हे होत. शूद्रांमध्येंहि तीन भेद आहेत; ते अनुक्रमें सच्छूद्र, असच्छूद्र व

अतिशूद्र असे होत. जे फक्त शूद्रजातींतच उत्पन्न झालेले, परंतु ज्यांचें वर्तन ब्राह्मणादिकांप्रमाणें शुद्ध आहे त्यांस सच्छूद्र म्हणतात. जे शूद्रजातींत उत्पन्न होऊन शूद्राप्रमाणेंच अशुद्ध वर्तन करणारे त्यांस असच्छूद्र म्हणतात. ज्यांना स्पर्श केला असतां अशुद्धता प्राप्त होते असे माहार, चांभार, धेड वगैरे जातीचे जे लोक त्यांस अतिशूद्र म्हणतात. असच्छूद्र व अतिशूद्र हे तर दुर्वर्तनामुळें वेदाधिकारी नाहींतच हें निर्विवाद आहे; परंतु ज्याची वर्तणूक ब्राह्मणाप्रमाणें आहे त्यांस वेदाध्ययनाचा अधिकार कां नसावा, हा मात्र वादाचा विषय आहे; परंतु ते शूद्रबीजापासून उत्पन्न झाल्यामुळें व वर्णधर्माला बीजाचें प्राधान्य असल्यामुळ सच्छूद्रहि वेदाध्ययनाला अनधिकारी आहेत. सच्छूद्रानें पुराणश्रवण करावें. सच्छूद्र हे सजातीय पत्नीशी विवाह लावून धर्मनियमानें प्रजोत्पादन करीत असल्यामुळें त्या प्रजेलाहि सच्छूद्रच म्हणतां येईल. सच्छूद्रांच्या विवाहविधीचे दाहा प्रकार आहेत. ते अनुक्रमें प्राजापत्य, ब्राह्म, आर्ष, दैव, गांधर्व, आसुर, राक्षस, पैशाच, प्रातिभ, घातन ह्या नांवानें प्रसिद्ध होत. सच्छूद्रांची संततीहि दहा प्रकारची आहे. ती अनुक्रमें औरस क्षेत्रज, दत्तक, कृत्रिम, गूढोत्पन्न, अपविद्ध, कानीन, सहोढज, क्रीत व पौनर्भव ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. सच्छूद्रानें विष्णुभक्ती करून सद्वर्तन करावें, म्हणजे त्यास मोक्षप्राप्ति होईल.

---

## अध्याय २४२ वा.

### वर्णधर्मविचार.

ज्या वेळीं सृष्टीची उत्पत्ति झाली; त्या वेळीं सृष्टि उत्पन्न करण्याची इच्छा करणाऱ्या विष्णूच्या नाभिकमलापासून ब्रह्मदेव उत्पन्न झाला. नंतर ब्रह्मदेवानें चार प्रकारची सृष्टि उत्पन्न केली. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र अशी सृष्टि निर्माण करून, त्यांना यथाधिकार कर्में करण्याची परवानगी दिली. अध्ययन, अध्यापन, दान, प्रतिग्रह, यजन व याजन हीं साहा कर्में ब्राह्मणांना नेमून दिलीं. क्षत्रियांनीं अध्ययन, दान, यजन, प्रजापालन, तपश्चर्या, व धर्मरक्षण हीं कर्में करावीं; असें ठरविलें. वैश्यांनीं व्यापार, द्रव्यार्जन, गोरक्षण, यजन, अध्ययन, व दान हीं कर्में करावीं; व शूद्रानें त्रिवर्गाची सेवा, विष्णुभक्ति, पुराणश्रवण इत्यादि कर्में करावीं; असें ठरविलें. शूद्रानें चातुर्मास्यव्रताचें पालन केल्यास, तो विष्णुरूप होतो. शूद्रामध्यें मुख्य जाती अठरा आहेत; पैकीं शिंपी, सोनार, सुतार, तांबट, कुंभार, लोहार त्या साहा जाती श्रेष्ठ होत. गाढव, उंट, व घोडे

ह्यांच्यावर आरोहण करून त्यांची सेवा करणारे, गोपाळ व गवंडी हे पांचप्रकारचे शूद्र मध्यम होत; आणि परीट, चांभार, नाटकी, बुरुड, कोळी, भिल्ल; व माहार हे सात अंत्यज म्हणजे नीच जातीचे शूद्र होत. शिंपी, सोनार वगैरे श्रेष्ठ दरजाच्या साहा शूद्रांना सच्छूद्र म्हणतात. मध्यमवर्गातील शूद्रांना असच्छूद्र म्हणतात; व इतरांना अंत्यज म्हणतात. सर्व धर्मामध्यें विष्णुभक्ति श्रेष्ठ आहे.

## अध्याय २४३ व २४४ वा.

### पैजवनचरित्र.

पूर्वी त्रेतायुगामध्यें पैजवन नांवाचा एक शूद्र होता. तो स्वधर्मानें वागणारा असून विष्णु व ब्राह्मण ह्यांची पूजा करणारा होता. त्याची पतिव्रताधर्मानें वागणारी स्त्री होती; व त्याला तीन मुलगे झाले होते. तो पैजवन द्रव्यवान् व सुखी होता. एकदां त्या पैजवनाच्या घरीं गालव ऋषीचें शिष्यांसह आगमन झालें. गालवमुनीचें आदरातिथ्य करून पैजवनाला धन्यता वाटली. नंतर पैजवनानें गालवाला मुक्तीचा उपाय विचारिला असतां गालव म्हणतात कीं, शालिग्रामपूजन सर्व इष्ट वस्तूंची प्राप्ति करून देणारें आहे. शालिग्रामाच्या मूर्तीचे चोवीस भेद आहेत. ते अनुक्रमें केशव, मधुसूदन, संकर्षण, दामोदर, वासुदेव, प्रद्युम्न, विष्णु, माधव, अनंत, पुरुषोत्तम, अधोक्षज, जनार्दन, गोविंद, त्रिविक्रम, श्रीधर, हृषीकेश, नृसिंह, विश्वयोनि, वामन, नारायण, पुण्डरीकाक्ष, उपेंद्र, हरि; व कृष्ण ह्या नांवानें प्रसिद्ध आहेत. मार्गशीर्ष महिन्याला आरंभ करून शुक्लपक्ष व कृष्णपक्ष ह्या भेदानें वर्षाचे जे चोवीस पक्ष त्या प्रत्येक पक्षापक्षाला वरील चोवीस नांवांपैकीं क्रमानें एक एक नांवानें शालिग्रामाचें पूजन केल्यास सर्व सिद्धि प्राप्त होतात. जो कोणी हें पूजाविधान श्रवण करील त्याच्यावर विष्णु प्रसन्न होऊन त्याच्या सर्व इच्छा पूर्ण करील.

## अध्याय २४५ व २४६ वा.

### शालिग्रामोत्पत्ति.

पूर्वी ब्रह्मदेवाच्या अंगठ्यापासून दक्षप्रजापति उत्पन्न झाला. त्याची सती नांवाची एक मुलगी होती. तिच्याशीं शंकरानें विवाह लाविला. दक्षप्रजापतीनें

यज्ञाला आरंभ करून त्यांत सतीचा व शंकराचा अपमान झाल्यामुळें सतीला राग आला व तिनें आपला देह क्रोधाग्नींत भस्म करून घेतला, नंतर ती सती हिमालयपर्वताच्या मेनका नामक पत्नीचे ठिकाणीं पार्वती नांवानें उत्पन्न झाली. नंतर तिनें तपश्चर्येनें शंकराला प्रसन्न करून घेऊन त्याच्याशींच विवाह लाविला. नंतर शंकराच्या पुत्राचे हातून तारकासुराचा नाश व्हावयाचा असल्यामुळें ब्रह्मादि देवांनीं शिवपार्वतींचा संयोग करण्याकरितां कामाला ( मदनाला ) शंकराकडे पाठविलें. शिव व पार्वती एकांतांत क्रीडा करीत असतां देवांनीं अग्नीला कबुतराच्या रूपानें शंकराकडे पाठविलें. हें देवांचें कपट पाहून शंकराला राग आला व त्यानें देवांना शाप दिला कीं, तुम्ही पृथ्वीवर दगड होऊन पडाल. असा शाप ऐकून देव शंकराजवळ उच्छाप मागूं लागले असतां शंकरानें प्रसन्न होऊन देवांना सांगितलें कीं, जरी तुम्ही दगड होऊन पडाल तरी त्यांत विष्णूचें तेज राहील व त्यास शालिग्राम हें नांव प्राप्त होईल. जे कोणी ह्या शालिग्रामाचें पूजन करितील त्यांस विष्णुपूजनाचें फळ मिळेल.

---

## अध्याय २४७ वा.

### अश्वत्थमाहात्म्य.

पूर्वी एकदां देवदैत्यांचें युद्ध सुरू असतां त्यांत देवांचा पराजय झाला. नंतर देव ब्रह्मदेवाला शरण गेले; व झालेलें वर्तमान ब्रह्मदेवाला निवेदन करते झाले. त्या वेळीं ब्रह्मदेव देवांना म्हणतात; देवहो! एकदां शिवभक्त व विष्णुभक्त ह्यांच्यामध्यें एक मोठा वाद झाला. हा भयंकर वाद ऐकून शंकरानें मोठें स्वरूप धारण केलें; व ते विष्णुगणासह क्रीडा करूं लागले. त्या वेळीं शंकराच्या देहाचे दोन भाग होऊन त्यापासून विष्णु व शंकर ह्या दोन मूर्ति निर्माण झाल्या. हा चमत्कार पाहून विष्णुभक्त व शिवभक्त ह्यांची खात्री झाली कीं, शिव व विष्णु ह्यांत मुळींच भेद नाहीं; व आपण विनाकारण अभिमानानें वाद करीत आहोंत. नंतर शिवविष्णुस्वरूप शंकराची मूर्ति मंदरपर्वतावर कायमची राहिली, असें ऐकतांच ब्रह्मदेव इतर देवांसह मंदरपर्वतावर येऊन त्या विराट्रूपी शिवमूर्तीचा शोध करूं लागले; परंतु कोठेंहि शिवमूर्ति दिसेना व त्यामुळें देव कष्टी होऊन दुःख करूं लागले असतां आकाशवाणी झाली कीं, सर्वत्र ईश्वराची व्याप्ति असल्यामुळें ह्या ठिकाणीं शंकर व विष्णु येथील वृक्षांत गुप्तरूपानें राहिले आहेत. ह्या पर्वतावर जो अश्वत्थवृक्ष ( पिंपळ ) आहे त्या ठिकाणीं शिववि-

ष्णूंचा नित्य वास असल्यामुळें तुम्ही त्याचें आराधन करा; म्हणजे तुम्हांला शिवविष्णूंची प्राप्ति होऊन तुम्ही इष्टसिद्धीला मिळवाल. अशी आकाशवाणी ऐकतांच देवांनीं अश्वत्थसेवा करून स्वराज्य मिळविलें.

## अध्याय २४८ वा.

### पालाश [ पळस ] महिमा.

अश्वत्थाप्रमाणेंच पळसाच्या वृक्षाचेंहि माहात्म्य आहे. ज्याप्रमाणें अश्वत्थामध्यें विष्णु व शंकर ह्यांचें वास्तव्य आहे; तसेंच पळसाचे वृक्षांत विष्णूचें वास्तव्य आहे. पळसाच्या सेवेनें व पूजनानें हजारों अश्वमेधयज्ञाचें फळ मिळतें. चातुर्मास्यांत उदकानें किंवा दुधानें जे पळसाचें पूजन करितात, त्यांस अक्षय्य फल व मोक्ष प्राप्त होतो. पळसाचे मूळाशीं शंकर राहतो; मध्यें ब्रह्मदेव व अंतीं गणपति व सर्वत्र विष्णु राहतो. हा वृक्ष ब्रह्मस्वरूप आहे.

## अध्याय २४९ वा.

### तुलसीमाहात्म्य.

जो गृहस्थाश्रमी पुरुष आपल्या घरीं तुळस लावून तिचें पूजन करितो, त्याला कधींहि दारिद्र्य प्राप्त होत नाहीं. तुळशीच्या केवळ दर्शनानेंच अनंत पापें नष्ट होतात; तुळस ही अमृतापासून उत्पन्न झाल्यामुळें, तिच्या सेवनानें ऐश्वर्य, सुख, व अमृतत्व प्राप्त होतें. तुळसीचे ठिकाणीं साक्षात् लक्ष्मीचा वास असल्यामुळें तिच्या सेवेनें विष्णु प्रसन्न होऊन, भक्तांस इष्ट लाभ करून देतो. चातुर्मास्यांत रोज तुळशीला नमस्कार केला असतां, मोक्षप्राप्ति होते. विष्णुस्मरण, तुळशीला पाणी घालणें, व तुळशीची भक्ति हीं चातुर्मास्यांत दुर्लभ आहेत.

## अध्याय २५० वा.

—:O:—

### बिल्व ( बेल ) माहात्म्य.

पूर्वी एकदां पार्वती क्रीडा करीत असतां तिच्या मस्तकांतून श्रमाच्या योगें घामाचे बिंदु पडूं लागले, व त्या बिंदूंपासून बेलाच्या झाडाची उत्पत्ति झाली;

नंतर पार्वतीनें आपल्या मैत्रिणीला बेलाचें माहात्म्य सांगितलें. जे कोणी बेलाच्या पत्रांनीं माझी किंवा शंकराची पूजा करितील, त्यांस आह्मी प्रसन्न होऊन सर्व सिद्धींचा लाभ करून देऊं. बिल्ववृक्षाच्या मूळाशीं पार्वतीचा वास आहे. बिल्ववृक्षाच्या फांद्यांचे ठिकाणीं नऊ कोटी शक्ती राहत असतात.

## अध्याय २५१ वा.

### विष्णुशापवर्णन.

पिंपळ, पळस, तुळशी व बेल ह्या चार वृक्षांचीं माहात्म्यें चातुर्मास्यांत श्रवण करून त्यांचें अर्चन करणारे कृतार्थ होतात. पार्वतीनें विष्णु व शंकर ह्या उभयतांनाहि शाप दिला असतां विष्णु शालिग्रामशिलेंत आपल्या तेजानें राहिले व शंकर लिंगाकृतीनें पाषाणरूप होऊन राहिले. जे कोणी शालिग्रामरूपी विष्णूचें किंवा शिवलिंगाचें पूजन करितात ते मुक्त होतात. शिलारूपी विष्णूचें दर्शन घेणारेहि निष्पाप होऊन विष्णुलोकाला प्राप्त होतात. अशा पुण्यवानांना यमलोकाची बाधा होत नाहीं. शिवलिंगाच्या पूजकालाहि सद्गति प्राप्त होते.

## अध्याय २५२ वा.

### वृक्षमाहात्म्य.

सर्व देवता व पितर वृक्षांचे ठिकाणीं राहतात; आणि ते सर्व वृक्ष चातुर्मास्यांत पर्जन्यद्वारें पडणाऱ्या अमृतरूपी उदकाचें पान करितात; त्यामुळें चातुर्मास्यांत अशातऱ्हेनें अमृतरूपीं जलांचें प्राशन करून तृप्त झालेल्या वृक्षांची सेवा केली असतां सर्व पितर व देवता तृप्त होतात. ब्रह्मदेव वडाचे झाडाचा आश्रय करून राहतात; सावित्री तिळांच्या वृक्षांचा आश्रय करिते; ह्याकरितां चातुर्मास्यांत वटपूजा करून तिळांचें सेवन केलें असतां भगवान् विष्णु संतुष्ट होतात. इंद्राचें वास्तव्य धान्यामध्यें आहे; व इंद्र हे विष्णूचें स्वरूप आहे; करितां धान्याच्या सेवनानें विष्णु संतुष्ट होतात. दक्षादि प्रजापति आम्रवृक्षामध्यें वास करितात; करितां संततीची इच्छा करणाऱ्या मनुष्यानें चातुर्मास्यांत आम्रवृक्षाचें पूजन करावें. चंदनामध्यें गंधर्व, धूपांत गणपति, वेतांत समुद्र, णसांत गुह्यक वगैरे अनेक वृक्षांत भिन्नभिन्न देवता राहत असल्यामुळें प्रत्येक

वृक्षाचें चातुर्मास्यांत वृक्ष सेवन करावें. चातुर्मासांत तोडूं नयेत. यज्ञाकरितां समिधां तोडण्याच्या हेतूनें जरी वृक्षच्छेद करण्याचा प्रसंग आला तरीसुद्धां तो करूं नये.

## अध्याय २५३ वा.

### शिवलीला.

पार्वतीनें विष्णूला व देवांना शाप दिला असतां ती शंकराला म्हणते कीं, विष्णुप्रमुख सर्व देव पाषाणत्वाला जरी प्राप्त झाले तरी त्या पाषाणांच्या मूर्ति तयार करून त्या मूर्तींचें भक्तीनें पूजन करणारे लोक सर्व दुःखापासून मुक्त होतील; व हें सामर्थ्य देवांमध्यें प्राप्त झालें आहे. आपलें सांनिध्य नसल्यामुळें देवांना शाप देण्याचें दुष्कृत्य माझे हातून घडलें आहे; आपण मला सोडून न जाण्याबद्दल देवाग्नींच्या साक्षीनें प्रतिज्ञा केली आहे, व ती आपल्याकडून पाळली गेली नाहीं; हें ठीक झालें नाहीं. आम्ही आपणाला उपदेश करणें; म्हणजे पुत्रानें पित्याला, शिष्यानें गुरूला किंवा क्षत्रियानें ब्राह्मणाला उपदेश केल्याप्रमाणें आहे. तूं विषभक्षण करणारा असून; तुला माता, पिता, भाऊ व इष्टमित्र वगैरे कोणीहि नाहीं. तूं जटाधारण करणारा, मुंडमाळा धारण करणारा दुष्टबुद्धीचा असा तूं आहेस; ह्याकरितां तूं माझे समोर उभें राहून भाषण करण्यासहि अयोग्य आहेस, असें म्हणून पार्वती रुदन करूं लागली. अशाप्रकारें पार्वतीचें भाषण ऐकून शंकर म्हणतात, प्रिये! तूं मला अत्यंत प्रिय आहेस. तूं मला जी आज्ञा करिशील; ती पाळण्यास मी तयार आहे. नंतर पार्वतीनें चातुर्मास्यांत शंकराला नृत्य करण्यास सांगितल्यावरून, शंकरानें पार्वतीसह तांडवनृत्याला प्रारंभ करून अनेकप्रकारच्या लीलेनें पार्वतीला संतुष्ट केलें.

## अध्याय २५४ वा.

### शिवतांडवनृत्य.

ज्यावेळीं पार्वतीच्या तुष्ट्यर्थ शंकरानें तांडवनृत्याला प्रारंभ केला. त्या वेळीं तें नृत्य पाहण्याकरितां मंदरपर्वतावर नारद, देवल, व्यास, शुक, अंगिरा, मरीचि, कर्दम, कश्यप, गौतम, अत्रि, वसिष्ठ, भृगु, जमदग्नि, उत्तंक, परशुराम, शुक्राचार्य, अगस्त्य, पुलोमा, पुलस्त्य, पुलह, वरुण, क्रतु वगैरे मोठमोठे ऋषि व

सिद्ध, यक्ष, पिशाच, चारण, देव, गुह्यक, साध्य, अष्टवसु व अश्विनौदेव हेहि प्राप्त झाले. ऋषि व देव आलेले पाहून नंदिप्रमुख शिवगणांनीं त्यांचें आदरातिथ्य केलें व त्यांस चांगलीं चांगलीं वस्त्रें व अलंकार देऊन संतुष्टहि केलें. तांडवनृत्याचे वेळीं जिकडे तिकडे वाद्यें वाजत असून सर्वत्र शंकराच्या नांवाचा जयजयकार चालला आहे. त्या नृत्यांत श्रीराग, वसन्तराग, भैरवराग वगैरे अनेक रागांत गायनहि सुरू झालें आहे. आतां प्रत्येक रागाच्या साहा भार्याहि त्या रागांत उच्चारिल्या जात असत. त्या अनुक्रमें गौरी, कोलहली, धीरा, द्राविडी मालकौशिकी व देवगांधारी ह्या साहा भार्या श्रीरागाच्या होत. आंदोला, कौशिकी, चरममंजरी, गंडागिरी, देवशाखा व रामगिरी ह्या वसंतरागाच्या भार्या होत. त्रिगुणा, स्तंभतीर्था, अहिरी, कुंकुमा, वैराटी व सामवेरी ह्या पंचमरागाच्या साहा भार्या होत. भैरवी, गुर्जरी, भाषा, वेलागुली, कर्नाटकी व रक्तहंसा ह्या भैरव रागाच्या साहा भार्या होत. बंगाली, मधुरा, कामोदा, अक्षिनारिका, देवगिरी व देवाली ह्या मेघ रागाच्या साहा भार्या होत. त्रोटकी, मोडकी, नरादुम्बी, मल्हारी व सिंधु मल्हारी ह्या नटनारायण रागाच्या भार्या होत. ह्या सर्व रागिण्यासह अनेक रागांत गायन करून शंकर पार्वतीसह नृत्य करीत असतां ब्रह्मदेव हातांत मृदंग घेऊन वाजवूं लागला; विष्णु तालकौशल्य दाखवून शंकराला मदत करिता झाला. इंद्र अळगुजें वाजवूं लागला. ह्याप्रमाणें प्रत्येक देवता यथाशक्ति शंकराच्या तांडवनृत्याला साह्य करूं लागली असतां, त्या नृत्याला अपूर्व शोभा प्राप्त झाली. तांडवनृत्याचे वेळीं शंकरानें पांच मुखें प्रगट केलीं असून त्यांवर अनेक अलंकार व कूट धारण केले होते. तें त्या वेळचें स्वरूप इतकें सुंदर होतें कीं, त्याजकडे पाहणाराला अत्यंत आनंद होत असे. त्याच्या नृत्यांत नारद व तुंबुरु हातांत वीणा घेऊन प्राप्त झाले. अशातऱ्हेनें चातुर्मास्य नृत्य होतांच पार्वती संतुष्ट झाली; व शंकरास म्हणाली कीं, तुझें लिंग सर्वत्रांना अत्यंत पूज्य होईल, असें म्हणून मोठ्या आनंदानें पार्वतीनें शंकराची स्तुति केली. तिच्या स्तुतीनें शंकर प्रसन्न होऊन तिला इष्ट वर देते झाले व शंकरानें सर्वांस सांगितलें कीं, विष्णु व मी एकच आहें; ह्या आमच्या स्वरूपांत जे भेद मानितील ते अधोगतीला जातील. असें सांगून शंकरानें सर्व देवांना व ऋषींना स्वस्थानीं जाण्याची आज्ञा दिली.

## अध्याय २५५ वा.

### लक्ष्मीनारायणमाहात्म्य.

पार्वतीच्या शापानें विष्णुप्रमुख सर्व देव गंडकीनदींत शालिग्राम नांवानें उत्पन्न झाले; व नर्मदेंत शंकर शिवलिंगरूपानें अवतीर्ण झाले. जे कोणी शालिग्रामाचें पूजन करितात ते मोक्षाला प्राप्त होतात. चातुर्मास्यांत शंकर, विष्णु, गणपति, सूर्य व देवी ह्या पांच देवतांचें पूजन केलें असतां सर्व सिद्धि प्राप्त होतात. चातुर्मास्यांत शालिग्रामावर तीळ वाहिले असतां सर्व सिद्धि प्राप्त होतात. जो लक्ष्मीसहित विष्णूची पूजा करितो तो आसपासच्या पांच कोंस क्षेत्रांतील भूमिकेचें व प्राण्यांचें रक्षण करितो. ज्याठिकाणीं लक्ष्मीनारायणाचें शंखोदकानें पूजन होतें तें स्थान वैकुंठाहून सुद्धा श्रेष्ठपणाला प्राप्त होतें. ज्याठिकाणीं लक्ष्मीनारायणाचें मंदीर आहे तेथें संपत्ति, विजय, विष्णु व मुक्ति ह्या चारहि गोष्टि सतत वास्तव्य करितात, असें समजावें. विशेषेकरून चातुर्मास्यांत लक्ष्मीनारायणाचें पूजन केलें असतां त्याचें फळ विशेष आहे. चातुर्मास्यांत विष्णूचें तुलसीपत्रांनीं पूजन केलें असतां संसारचक्रापासून मुक्तता होते. तेंच विष्णूचें पूजन बिल्वपत्रानें केलें असतां संपूर्ण पातकें नष्ट होतात. हा विष्णु सर्व जगाला व्यापून राहिल्यामुळें सर्वांस वंद्य आहे.

## अध्याय २५६ वा.

### रामनाममाहात्म्य.

एकदां शंकर पार्वतीसह व इतर गणांसह आपल्या आसनांवर आनंदांत बसले असतां, पार्वती शंकराला प्रश्न करिते कीं, तुम्ही सर्व जगाचे प्रवर्तक व मुख्य असतां; आणि सर्व जग आपले गुणानुवाद वर्णन करीत असतां, आपण कोणाचें नामग्रहण करितां व कोणाची उपासना करितां ? आपल्याहून श्रेष्ठ असा दुसरा कोणता देव आहे ? तें सांगा. असा पार्वतीचा प्रश्न ऐकून शंकर पार्वतीला म्हणतात; प्रिये ! मी सर्व पातकांचें नाशन करणारें व माझ्याहून श्रेष्ठ असें भगवंताचें 'रामनाम' ग्रहण करितों; आणि त्याचीच उपासना करितों. राम ह्या नांवानें प्रसिद्ध असणारा जो भगवंताचा सातवा अवतार, तो ब्रह्मरूपी व श्रेष्ठ असल्यामुळें प्रणवाहूनहि महत्वाचा आहे. अशातऱ्हेचें तें राम-

नाम प्रणवपूर्वक एकदां जरी उच्चारिलें तरी असंख्य जन्मांचीं पातकें क्षणांत नष्ट होतात. श्रीराम ह्या नांवाचा उच्चार करणें म्हणजे साक्षात् वैकुंठलोकीं वास करणेंच होय. चातुर्मास्यांत रामनामाचा जप केला असतां, त्याचें फल अधिक आहे. रामनामाचा जप करणारा विष्णुरूप होऊन लोकप्रिय होतो. श्रीराम हा मंत्र सर्व मंत्रांचा राजा असल्यामुळें ह्या एका मंत्राच्या जपानें इतर सर्व मंत्र जपल्याचें फळ मिळतें. रामनामाच्या जपानेंच माझ्या हृदयांत, विष–प्राशनानें होणारी तळमळ तत्काळ नष्ट झाली; व माझें चित्त शांत झालें.

## अध्याय २५७ वा.

### वासुदेवनाममाहात्म्य.

पार्वतीनें वासुदेवाच्या "ॐ नमो भगवते वासुदेवाय" ह्या द्वादशाक्षरी नाममंत्राचें माहात्म्य शंकराला विचारिलें असतां शंकर म्हणतात, प्रिये! ॐ हा प्रणव उच्चारून मंत्रजप विप्राशिवाय कोणींहि करूं नये. स्त्री व शूद्र ह्यांना प्रणवोच्चाराचा निषेध असल्यामुळें प्रणवरहित मंत्रजप करण्यास हरकत नाहीं. ज्याप्रमाणें दिवा लाविला असतां अंधकाराचा नाश होतो तसाच वासुदेवाच्या नांवाचा मंत्र चातुर्मास्यांत जपला असतां सर्व पातकांचा नाश होतो, ह्या वरील मंत्राचा जप केला असतां भगवान् ब्रह्मस्वरूपाची प्राप्ती करून देतो. अशातऱ्हेनें शंकराकडून नाममहिमा श्रवण करून पार्वती हिमालयपर्वताच्या एका शिखरावर एकांतांत वासुदेवाच्या नाममंत्राचा जप करण्याकरितां निघून गेली.

## अध्याय २५८ वा.

### शंकरशापप्राप्ति.

ह्याप्रमाणें पार्वती तप करीत असतां कांहीं काळानें शंकर कामातुर होऊन पार्वतीला शोधण्याकरितां अरण्यांत हिंडूं लागले. फिरतां फिरतां ऋषींच्या आश्रमाजवळ येऊन शंकरानें ऋषिपत्न्यांवर मोहिन्यस्त्र टाकून त्यांना आपल्या ताब्यांत घेऊन ऋषिपत्न्यांसह आपली कामेच्छा तृप्त केली. कांहीं काळानीं हें वर्तमान ऋषींना समजताच त्यांनीं शंकराला शाप दिला कीं, ज्या लिंगानें तूं आमच्या स्त्रियांना भ्रष्ट केलेंस तें तुझें लिंग पृथ्वीवर गळून पडेल. असा शाप होताच शंकराला फारच वाईट वाटलें; व तो स्वर्गांत जाऊन कामधेनूची स्तुति करूं लागला.

## अध्याय २५९ वा.

### धर्मस्तुति.

ऋषींच्या शापाप्रमाणें शंकराचें लिंग अमरकंटक पर्वतावर पडलें व त्याच्या ठिकाणीं जो जलप्रवाह उत्पन्न झाला तीच नर्मदा नदी होय. ह्या शिवलिंगाचें चातुर्मास्यांत पूजन केलें असतां त्याचें फल विशेष आहे. वृष म्हणजे धर्म व वृष म्हणजे शंकर असा अर्थ असल्यानें व चार पायाचा वृषभरूपधारी धर्म शंकराचे ठिकाणीं वास्तव्य करीत असल्यामुळें शंकराला पांच मुखें धारण करावीं लागलीं; पैकीं मध्यवर्ती जें शंकराचें मुख तेंच त्याचें मुख्य मुख होय व सभोंवारचीं जीं चार मुखें तीं शंकराचे शरीरांत वास्तव्य करणाऱ्या धर्माच्या चार पायाचीं चार होत. तात्पर्य, धर्म हा शंकरच होय. धर्मरक्षणानें शंकर संतुष्ट होतो. जो वृषरूपी धर्माचा विध्वंस करितो, त्यास वृषल म्हणतात. धर्मसंज्ञक वृषाला चार शिंगें, चार पाय, दोन मस्तकें व सात हात आहेत. अशा धर्माचें सेवन करणारा पुरुष सर्व दुःखापासून व पापापासून मुक्त होऊन सुखयुक्त होतो.

## अध्याय २६० वा.

### शिवपूजामाहात्म्य.

गालवानें पैजवनाला ह्याप्रमाणें शिवलिंगमाहात्म्य, शालिग्रामपूजामाहात्म्य, भगवन्नाममाहात्म्य, धर्ममाहात्म्य वगैरे अनेक कथा सांगून रात्र मोठ्या आनंदानें काढून दुसरे दिवशीं सकाळीं स्वमार्गानें गमन केलें. त्या दिवसापासून त्या पैजवनानें शंकराचें आराधन करून त्यास प्रसन्न करून घेतलें. प्रसन्न झालेल्या शंकरानें पैजवनाला शिवपूजेचें माहात्म्य सांगून व त्याच्या सर्व इच्छा पूर्ण करून त्याला अंतकाळीं आपल्या शिवलोकाला नेलें.

## अध्याय २६१ वा.

### ध्यानयोग.

चातुर्मास्यांत सतत विष्णूचें ध्यान करावें. प्रथम शुद्धान्तःकरणानें स्नान-संध्यादि नित्यकर्म आटोपल्यावर, यथाविधीनें यमनियमासनादि अष्टांगयोगाच्या

साह्यानें, भगवद्ध्यानाला आरंभ करावा. तें ध्यान करीत असतांना हृदयांत भगवंताच्या मूर्तीचें स्मरण करून; व नासाग्रदृष्टि ठेऊन ध्यानयोगाची उपासना करावी. भगवंताची मूर्ति चांदण्याप्रमाणें गोरी व आनंद देणारी असून; त्यानें चार हातांत शंख, चक्र, गदा, पद्म इत्यादि आयुधें धारण केलीं आहेत. मेघाप्रमाणें श्यामवर्णाचे, तेजस्वी व कमलाप्रमाणें मनोहर ज्याचे नेत्र आहेत. जो गरुडावर बसलेला व सर्व जगाला व्यापून राहिलेला आहे, ज्याच्या वक्षस्थलावर श्रीवत्सलांछन आहे, ज्यानें पिवळा पीतांबर परिधान केला आहे, ज्यानें आपल्या शरीरावर अनेक अलंकार घातले आहेत, अशातऱ्हेनें विष्णूच्या मूर्तीची कल्पना करून त्याचें हृदयांत ध्यान करावें. पार्वतीनें सुद्धां ह्या विधीनेंच विष्णूचें ध्यान करून, विष्णूला प्रसन्न करून घेतलें व स्वतःच्या सर्व इच्छा पूर्ण केल्या.

---

## अध्याय २६२ वा.

### ज्ञानयोग.

पूर्वी " ॐ नमो भगवते वासुदेवाय " हा जो द्वादशाक्षरी मंत्र सांगितला, त्यांतील प्रत्येक अक्षरांचीं बीजें सांगतात. ॐ ह्या प्रणवाचें ब्रह्म हेंच बीज, शुभ्र वर्ण, मधुच्छंदा ऋषि; व परमात्मा देवता होय. दुसऱ्या न ह्या अक्षराचें बीज उदक, वर्ण पिवळा, सनातन देवता; आणि मन हा ऋषि होय. तिसऱ्या मो ह्या अक्षराचें बीज पृथिवी, विश्वामित्र ऋषि, वर्ण तांबडा, कुबेर देवता, होय. चवथ्या भ ह्या अक्षराचें बीज उदक, मरीची ऋषि, वर्ण पिंगट; व देवता इंद्र होय. पांचव्या ग ह्या अक्षराचें बीज वायु, वर्ण तांबडापिवळा मिश्रित, भरद्वाज ऋषि, वरुण देवता होय. साहाव्या व ह्या अक्षराचें बीज आकाश, कांती कुंदाप्रमाणें शुभ्र, महाबल ऋषि व वासुदेव देवता. सातव्या ते ह्या अक्षराचें बीज चंद्र, कांती विजेप्रमाणें, अंगिरा ऋषि; व सूर्य देवता होय. वा ह्या आठव्या अक्षराचें बीज सूर्य, ऋषि पुलस्त्य, कांति धूम्रवर्णाची व देवता शंकर होय. सु ह्या नवव्या अक्षराचें बीज मन असून कांती नीलवर्णाची आहे. पुलह हा ऋषि आहे; व वायू ही देवता होय. आतां दे ह्या दहाव्या अक्षराचें बीज हंस, वर्ण चित्रविचित्र, ऋषि वामदेव व देवता विनायक होय. वा ह्या अकराव्या अक्षराचें बीज यजमान, कांती स्वच्छ, ऋषि वसिष्ठ; व देवता ब्रह्मदेव. य ह्या शेवटच्या बाराव्या अक्षराचें बीज महत्तत्त्व असून पिंगट वर्ण आहे. भूचरी, खेचरी इत्यादि सिद्ध देवता होत, व नारदऋषी

होय. ह्याप्रमाणें बारा अक्षरांचें व्याख्यान केलें. अशा द्वादशाक्षरी मंत्रांच्या जपानें ज्ञानप्राप्ति होऊन मोक्ष मिळतो. ज्ञानयोग हेंच ह्या मुख्य मंत्राचें व मोक्षाचें बीज आहे. हा मंत्र अनधिकाऱ्याला कधींहि सांगूं नये. सर्व योगामध्यें ज्ञानयोग श्रेष्ठ आहे. बाकीचे सर्व योग ज्ञानयोगाचीं साधनें आहेत. ज्ञानयोग साध्य झाल्याशिवाय मोक्ष नाहीं. कर्म, उपासना व ज्ञान अशी योगाची परंपरा आहे. द्वादशाक्षरमंत्रानें भगवंताला आळवून उपासना सिद्ध झाल्यानंतर ज्ञानप्राप्ति होते. अशातऱ्हेनें क्रमाक्रमानें ज्ञानप्राप्ति झालेल्या प्राण्यासच मोक्ष मिळतो.

---

## अध्याय २६३ वा.

### मत्स्येंद्रनाथोत्पत्ति.

ज्ञानयोगाचें महत्त्व अवर्णनीय आहे. मन, वाणी व देह ह्याला दंड करणें ह्यास त्रिदंड म्हणतात. ज्ञानयोगाच्या साहाय्यानें प्रणवरूपी ब्रह्माचें तादात्म्य करून घ्यावें. ज्ञानप्राप्तीकरितां योग्य गुरूची सेवा केली पाहिजे. गुरु प्रसन्न झाला असतां सर्व कांहीं दुर्लभ वस्तुहि सुलभ होते. एकदां ब्रह्मदेव विमानांत बसून ईश्वराचें ध्यान करीत असतां त्याठिकाणीं क्षीरसागरांतून उत्पन्न झालेला मोठा मत्स्य ( मासा ) प्रगट झाला. मत्स्याला पाहून ब्रह्मदेवानें त्याला कुशलप्रश्न विचारिले असतां मत्स्य म्हणतो; ब्रह्मन् ! माझ्या मातेनें मला पितृवचनावरून येथें टाकिलें आहे. मी पुष्कळ वर्षें ह्या जलांत राहत आहे. तुझ्या दर्शनानें मी आज ज्ञानसंपन्न झालों आहे; नंतर ब्रह्मदेवाला त्याची दया आली व त्यास मनुष्यशरीर देऊन त्याचें मत्स्येंनाथ असे नांव ठेविलें; नंतर त्या मत्स्येंद्रनाथाला मोठा आनंद होऊन, तो हिमालयपर्वतावर शिवाराधना करिता झाला.

---

## अध्याय २६४ वा.

### तारकासुरनाश.

कार्तिकस्वामी व पार्वती उभयतां गोष्टी बोलत असतां तारकासुरानें त्रस्त केलेले इंद्रादि देव शंकराला आपली स्थिति सांगते झाले. त्यावेळीं तारकासुरास कार्तिकस्वामीच मारणार असल्यामुळें शंकरानें त्यास देवांचा सेनाधिपति नेमिलें. इंद्रादि देवांनीं कार्तिकस्वामीला आपापल्याजवळचीं वज्रादि आयुधें देऊन, सैन्यासह तारकाला

मारण्याकरितां युद्धभूमीवर पाठविलें. तारकासुर–सैन्याचें देवसैन्याबरोबर मोठें युद्ध होऊन, त्यांत दैत्यसैन्यांचा नाश झाला. नंतर तारक व कार्तिकस्वामी ह्यांचेंहि युद्ध होऊन तारक मारला गेला; आणि कार्तिकस्वामीला जय मिळाल्यामुळें जिकडे तिकडे आनंदीआनंद झाला; व युद्धांतून शिल्लक राहिलेलेले दैत्य पाताळांत पळून गेले. कार्तिकस्वामी विजयी झाल्यामुळें शंकर–पार्वतीलाहि मोठा आनंद झाला. शंकरपार्वतीनें कार्तिकस्वामीला विवाह करण्याचा आग्रह केला असतां कार्तिकस्वामी म्हणतो कीं, जगांत जितक्या स्त्रिया आहेत, त्या सर्व मला माझ्या मातोश्रीप्रमाणें आहेत; व जितके पुरुष आहेत, तितके सर्व वडिलाप्रमाणें आहेत; करितां मला विवाह कर्तव्य नाहीं. असें म्हणून कार्तिकस्वामी तेथेंच तप करीत बसला व सतत "ॐ नमो भगवते वासुदेवाय" ह्या द्वादशाक्षरी मंत्राचा जप करूं लागला; व त्यानें आणिमादि अनेक सिद्धि व ब्रह्मज्ञान ह्यांची प्राप्ति करून घेऊन सायुज्यमुक्ति मिळविली.

---

## अध्याय २६५ वा.

### अशून्यशयनव्रतमाहात्म्य.

शौनकादि ऋषि सुताला म्हणतात, मुने! आपण आम्हांला पुष्कळ नियम, व्रतें, दानें इत्यादि सांगितलींत व तीं ऐकून आमचीं मनें प्रसन्न झालीं आहेत; तथापि ज्यांना हीं सर्व चातुर्मास्यांतील व्रतादि कर्में आचरितां येणें अशक्य असेल त्यांनीं कोणतें कर्म केलें असतां, त्यांस वरील सर्व कर्मांचें श्रेय प्राप्त होईल, तें सांगा. असा शौनकादि ऋषींचा प्रश्न ऐकून सूत म्हणतात; शौनकादि ऋषि हो! ज्यांना पूर्वोक्त चातुर्मास्यकर्में करतां येणें अशक्य असेल, त्यांनीं भीष्मपंचकव्रत करावें. ह्या व्रतामध्यें नित्य उपोषण करून भक्तियुक्त अन्तःकरणानें यथाशक्ति ब्राह्मणांना सुवर्ण, अन्न वगैरे पदार्थ अर्पण करावे. ह्याप्रमाणें पांच दिवस विधि करून साहावे दिवशीं ब्राह्मणांची वस्त्रालंकारानें पूजा करून त्यांस भोजन घालावें; व आपणहि पारणें करावें जे कोणी ह्याप्रमाणें भीष्मपंचकव्रत आचरितील, त्यांस त्या व्रताच्या शतपट अधिक पुण्यफल प्राप्त होईल. एकादशीचे दिवशीं विष्णूची जाईच्या फुलांनीं पूजा करावी. द्वादशीला बिल्वपत्रांनीं, त्रयोदशीला कमळांनीं, चतुर्दशीला कल्हारपुष्पांनीं विष्णूचें पूजन करावें; व पौर्णिमेच्या दिवशीं माक्यानें विष्णूचें पूजन करून प्रतिपदेच्या दिवशीं शरीरशुद्ध्यर्थ पंचगव्य प्राशन करावें. आतां अशून्यशयन-

व्रताला आरंभ केव्हां करावा तें सांगतों. ह्या व्रताला प्रारंभ श्रावण वद्य द्वितीयेला करावा. प्रथम सकाळीं उठून अस्पृश्य लोकांशीं भाषणहि न करितां स्नान करून विष्णूजवळ जावें, व विष्णूची प्रार्थना करावी व विष्णुपूजन करून ब्राह्मणभोजन घालावें. ह्याप्रमाणें भाद्रपद, आश्विन व कार्तिक ह्या तीनहि महिन्यांत विष्णुपूजन व ब्राह्मणभोजन करून व्रताची सांगता करावी. व्रत करणारानें स्वतः चातुर्मास्यांत मीठ खाऊं नये; व तैलहि वर्ज्य करावें. अशातऱ्हेनें अशून्यशयनव्रत करणारांवर भगवान् संतुष्ट होऊन त्यास सिद्धि देतो.

# अध्याय २६६ वा.

## महाशिवरात्रिमाहात्म्य.

सूत म्हणतात; आतां तुम्हांला शिवरात्रीचें माहात्म्य सांगतों; ऐका. माघ कृष्ण चतुर्दशीच्या रात्रीला शिवरात्रि असें म्हणतात. शिवरात्रि सर्व दिवसांमध्यें श्रेष्ठ व पुण्य फल देणारी आहे. कोणी एकेदिवशीं नैमिषारण्यांत राहणारा एक चोर शिवरात्रीचे दिवशीं रात्रीं शिवपूजनाकरितां अंगावर अलंकार घालून शिवालयांत कांहीं स्त्रिया आल्या असतां, त्यांना पाहून ते अलंकर चोरण्याविषयीं विचार करूं लागला. त्यामुळें रात्रीं चोराला निद्रा आली नाहीं; व स्त्रियाहि जागरण करीत असल्यामुळें चोरालाहि चोरी करण्याची संधी मिळाली नाहीं. इतक्यांत रात्रीचा काल समाप्त होऊन दुसरे दिवशीं सूर्योदयहि झाला. चोरहि निराश होऊन परत गेला; व त्या स्त्रियाहि आपआपल्या स्थानीं निघून गेल्या. कांहीं दिवसांनीं तो चोर मृत होऊन दशार्ण देशाच्या राजकुलांत उत्पन्न झाला; तथापि त्याला पूर्वीच्या जन्मीं शिवरात्रीच्या दिवशीं जागरण घडल्यामुळें तेवढ्या पुण्यानें पूर्वजन्मीचें स्मरण होतें. तो राजा प्रतिवर्षी शिवरात्रीचे दिवशीं उपोषण करून जागरणादि करीत असे. एकदां तो शिवरात्रीचे दिवशीं सायंकाळीं शिवपूजन करीत असतां त्याकडे शांडिल्यादि ऋषि प्राप्त झाले. राजानें शांडिल्यादिकांचें आदरातिथ्य केल्यावर प्रश्न केला कीं, मला शिवरात्रीचें माहात्म्य सांगा. नंतर शांडिल्यादि ऋषि म्हणतात; राजन् ! शिवरात्रीचे दिवशीं सायंकाळीं शंकराची महाप्रहराला पूजा करावी; व जागरण करावें. अशातऱ्हेनें पूर्वीं दिलीप, नल, नहुष, मांधाता, धुंधुमार, सगर वगैरे पुण्य पुरुष शिवरात्रीच्या प्रभावानें मोठेपणाला प्राप्त होऊन कृतार्थ झाले.

## अध्याय २६७ वा.

—:0:—

### तुलापुरुषदान.

हाटकेश्वरक्षेत्रात असणाऱ्या मंकणकेश्वराचें पूजनहि सद्गति देणारें आहे. तसेंच सिद्धेश्वराचेंहि माहात्म्य अगाध आहे. सिद्धेश्वराची उत्पत्ति पूर्वीं सांगितली आहेच. जे कोणी ह्या सिद्धेश्वरासंनिध तुलापुरुषदान देतील त्याला सार्वभौम राज्य व सुखें प्राप्त होतील. आतां तुम्हांला तुलापुरुषदानाचा विधि सांगतों; ऐका. चंद्रग्रहण, सूर्यग्रहण, दक्षिणायन, उदगयन, तीर्थ इत्यादि प्रसंगीं तुलापुरुषदान करावें. तुलापुरुषदान म्हणजे आपल्या भारंभार द्रव्य ब्राह्मणाला अर्पण करणें हें होय. त्याकरितां मोठा मंडप तयार करावा. एक वेदी तयार करून ऋत्विजांचीहि योजना करावी; व तन्निमित्त ईश्वराला उद्देशून पुण्याहवाचनपूर्वक होम करावा. मांडवाला आठ खांब असून ते क्रमानें चंदन, खैर, बेल, पिंपळ, टेंभुरणी, देवदारु, अरणी, वड ह्या वृक्षांचे तयार केलेले असावेत. आठ खांबांची पूजा करून त्या ठिकाणीं आठ लोकपालांची स्थापना करावी व दोन बाजूला दोन शिंकीं जोडून त्यांची तयार केलेली तागडी त्या मांडवाला टांगावी; नंतर त्या तागडीची पूजा करून प्रार्थना करावी; नंतर एका शिंक्यांत स्वतः उभें राहून दुसऱ्या शिंक्यांत आपल्या भारंभार द्रव्य घालावें; व तें ब्राह्मणांना अर्पण करावें. अशा तऱ्हेनें हें तुलापुरुषदान केलें असतां त्रैलोक्यांतील सर्व तीर्थांत, सर्व क्षेत्रांत व सर्व पुण्यस्थानांत स्नान केल्याचें, त्या त्या सर्व तीर्थांचे काठीं वस्ती केल्याचें व त्या त्या देवतांचें पूजन केल्याचें फळ प्राप्त होतें; व ऐहिक सुख मिळून पारलौकिक जें मोक्ष-सुख तेंहि प्राप्त होतें.

---

## अध्याय २६८ वा.

### गौतमेश्वरमाहात्म्य.

गौतमेश्वराचें पूजन करणारे सार्वभौमत्वाला प्राप्त होतात; करितां ज्याला सार्वभौम राज्याची इच्छा असेल, त्यानें गौतमेश्वराचें अवश्य पूजन करावें. मांधाता, धुंधुमार, हरिश्चंद्र, पुरूरवा, भरत, कार्तवीर्य हे साहा सार्वभौम राजे गौतमेश्वरासंन्निध ब्राह्मणाला पृथ्वीदान केल्यामुळें सार्वभौमत्वाला प्राप्त झाले. आतां पृथ्वीदान कसें करावें तें सांगतों. एक तुला म्हणजे शंभर पलें,(४०० तोळे)

त्या प्रमाणानें पृथ्वी घेऊन; अर्धी किंवा पाव तुला म्हणजे पन्नास किंवा पंचवीस पलें द्रव्य घ्यावें; व त्या ठिकाणीं सातसमुद्रांची कल्पना करून, सप्तद्वीपांचीहि कल्पना करावी; व मध्यें मेरुपर्वताची कल्पना करून, गंगादि नद्यांची तेथें स्थापना करून सालंकृत केलेल्या भूमीचें ब्राह्मणाला दान द्यावें. नंतर प्रार्थना करावी कीं, हे पृथ्वी! तूं सर्व त्रैलोक्याला धारण करणारी आहेस; करितां जें हें मीं तुझें दान केलें आहे, त्यायोगें माझ्या सर्व इच्छा पूर्ण होवोत.

# अध्याय २६९ वा.

## कपालेश्वरमाहात्म्य.

आतां कपालेश्वराचें माहात्म्य सांगतों. त्या कपालेश्वराची स्थापना इंद्रानें केली आहे. पूर्वी त्वष्ट्याला वृत्र नांवाचा एक मुलगा झाला. वृत्रानें तपश्चर्या करून ब्रह्मदेवाला संतुष्ट केलें; व ब्राह्मणत्व संपादिलें; वृत्र तप करीत आहे, असें समजल्यावरून वृत्राच्या गैरहजेरींत इंद्रादि देवांनी दैत्यांचा पराभव केला, व दैत्यांना पाताळांत पळवून लाविलें. मागाहून वृत्राला त्याच्याच मातेकडून दैत्य-पराभवाचें वर्तमान समजल्यामुळें, देवांना जिंकण्याबद्दल वृत्राच्या मातेचा फारच आग्रह असल्यामुळें वृत्र दैत्यसैन्यासह इंद्रादि देवांबरोबर युद्ध करण्यास निघाला. दैत्यांचें व देवांचें युद्ध सुरू असतां त्यांत देवांचा पराभव झाला. त्या वेळीं बृहस्पति इंद्राला म्हणतो कीं, इंद्रा! हा समय आपल्याला विजय मिळण्याचा नसल्यामुळें तूं युद्ध करण्याच्या भानगडींत पडूं नको. नंतर इंद्रानें युद्ध करण्याचें नाकारून बृहस्पतीच्या मध्यस्थीनें वृत्राशीं सख्य केलें. सख्य झाल्यावर बृहस्पतीनें वृत्राला मारण्याबद्दल इंद्राला युक्ति सांगितली कीं, जर तूं दधीचि ऋषीच्या अस्थींचें वज्र तयार करून वृत्राचे अंगावर सोडिशील, तरच तो नष्ट होईल. अशी बृहस्पतीची युक्ति ऐकून इंद्राला मोठा आनंद झाला व त्यानें दधीचि मुनींजवळ जाऊन अस्थींची याचना केली. दधीचि म्हणाला कीं, मी आपला देह तपोऽग्नीनें दग्ध करतों; व नंतर माझ्या अस्थि तूं गोळा कर व त्यांचें वज्र तयार करून त्यायोगें तूं वृत्राचा नाश कर, असें सांगून दधीचीनें आपलें शरीर दग्ध केलें. शरीर दग्ध झाल्यावर अवशिष्ट राहिलेल्या अस्थि गोळा करून इंद्रानें त्यांचें एक वज्र तयार केलें; नंतर इंद्रानें एकदां वृत्र स्नानसंध्यादि नित्यकर्म करीत असतां, त्याच्या मागें उभें राहून त्याला न कळत त्याच्या अंगावर दधीचीच्या अस्थींचें तयार केलेलें वज्र टाकिलें; त्यामुळें वृत्राचा नाश

झाला. वृत्राला ब्रह्मत्व प्राप्त झाल्यामुळें त्याच्या नाशानें इंद्राला ब्रह्महत्त्येचें पातक लागलें; नंतर बृहस्पतीच्या सांगण्यावरून इंद्र कपालमोचनतीर्थांत स्नान करून व कपालेश्वराचें पूजन करून ब्रह्महत्त्यादि पातकापासून मुक्त झाला.

---

## अध्याय २७० वा.

---

### पापपिंडप्रदान.

कपालमोचनतीर्थांत भाद्रपदकृष्णपक्षांत स्नान करून, पंचवीस पल म्हणजे शंभर तोळे वजनाचा एक एक पिंड; असे चोवीस पिंड चोवीस तत्त्वांना उद्देशून द्यावे. त्या वेळीं ‘ ॐ पृथिव्यै नमः, ॐ अद्भ्यो नमः, ॐ तेजसे नमः ” इत्यादि प्रणवपूर्वक चतुर्थ्यंत तत्त्वांच्या नांवांचा शेवटीं ‘ नमः ’ हा शब्द स्थापून उच्चार करावा; व पिंड द्यावा. तीं तत्त्वें अनुक्रमें पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश, नाक, जीभ, नेत्र, कांतडी ( त्वचा ), वाणी, हात, पाय, गुद, शिस्न, स्पर्श, शब्द, रूप, रस, गंध, कान, मन, बुद्धि, अन्तःकरण, अहंकार, आत्मा, परमात्मा अशीं होत. “ धूरसि ” ह्या मंत्रानें धूप व “ अग्निर्ज्योतिः ” ह्या मंत्रानें दीप दाखवावा. “युवा सुवासा” ह्यानें वस्त्रदान करावें; व ब्राह्मणाला बोलावून त्याला वस्त्रादिकानें यथाशक्ति भोजनादि देऊन तृप्त करावें. अशा-हेनें पिंडदान केलें असतां संपूर्ण पातकें नष्ट होतात; म्हणून ह्यास पापपिंड अशी संज्ञा आहे. ह्याप्रमाणें पिण्डदान केल्यावर सांगता करावी.

---

## अध्याय २७१ वा.

---

### सप्तलिंगमाहात्म्य.

आतां सप्तलिंगाचें माहात्म्य सांगतों. पूर्वीं इंद्रद्युम्न नांवाचा एक राजा होता, तो सत्कर्माचरणानें देहासह ब्रह्मलोकाला गेला. ज्या वेळीं इंद्रद्युम्नाचें पुण्य संपलें, त्या वेळीं ब्रह्मदेव त्याला पुनः भूलोकांत जाण्याविषयीं सांगता झाला. त्या वेळीं इंद्रद्युम्नानें ब्रह्मदेवाला विचारिलें कीं, मी निष्पापी असतां मला भूलोकांत जाण्याची आज्ञा कां करितोस ! त्या वेळीं ब्रह्मदेव म्हणतो कीं, जोंपर्यंत तुझी कीर्ति सर्वत्र पसरलेली होती तोंपर्यंत तुझें वास्तव्य ब्रह्मलोकांत झालें. आतां

तुझी कीर्ति नष्ट झाल्यामुळें पुनः कीर्ति मिळविण्याकरितां तुला भूलोकीं गेलेंच पाहिजे; असें म्हणून ब्रह्मदेवानें त्यास खालीं ढकलून दिलें. तो भूतलावर येऊन आपल्याबद्दल सर्व लोकांना माहिती विचारीत असतां सर्वांनी त्याला इंद्रद्युम्नाबद्दल आम्हांला कांहीं माहित नाहीं, फार तर काय ! परंतु भूतलावर इंद्रद्युम्न नांवाचा राजा होता, हेंहि आम्हाला माहीत नाहीं, असें सर्वांनीं सांगितलें. हें ऐकून त्या राजाला फारच वाईट वाटलें; व तो आश्चर्यचकित होऊन मार्कण्डेयाकडे येऊन आपल्याबद्दल माहिती विचारूं लागला. मार्कण्डेय इंद्रद्युम्नाला म्हणाला कीं, मी सात कल्प पाहिले आहेत; परंतु तेवढ्या अवधींत इंद्रद्युम्नाचें नांव सुद्धा माझ्या ऐकिवात नाहीं. नंतर इंद्रद्युम्नानें मार्कण्डेयाला घेऊन मार्कण्डेयाच्याहि अगोदरच्या अशा एका वृद्ध बगळ्याजवळ जाऊन विचारिलें. त्यालाहि इंद्रद्युम्नाची माहिती नाहीं, असें समजताच बगळ्यासह ते त्याहूनहि पुरातन अशा एका घुबडाकडे येऊन त्यास विचारूं लागले. त्यालाहि त्याची माहिती नाहीं, हें पाहून ते चौघे त्याहूनहि प्राचीन अशा एका गिधाडाकडे गेले. तेथें हि त्याची इच्छा पूर्ण न झाल्यामुळें इंद्रद्युम्न, मार्कण्डेय, बगळा, गिधाड व घुबड असे पांचहि जण सर्वांहून जुन्या अशा एका कासवाकडे गेले. त्यांनीं इंद्रद्युम्नाच्या बद्दल माहिती देऊन सांगितलें कीं, इंद्रद्युम्न राजाला मी ओळखितों. मी शहाण्णव कल्पपर्यंत जिवंत राहिलों आहे. असें कासवाचें भाषण ऐकतांच इंद्रद्युम्नाला आनंद झाला; व तत्काळ पुनः स्वर्गांतून त्याला नेण्याकरितां विमान आलें; परंतु त्यानें विमानांत बसून जाण्याचें नाकारिलें. हा चमत्कार पाहून लोमश ऋषिहि त्या ठिकाणीं प्राप्त झाले; नंतर त्या सर्वांनीं हाटकेश्वरक्षेत्रांत जाऊन आपआपल्या नांवाचीं लिंगें स्थापित केलीं व ते मुक्त झाले. इंद्रद्युम्न, मार्कण्डेय, गृध्र (गिधाड) बक (बगळा), कूर्म (कासव), लोमश, उलूक (घुबड) ह्या सात जणांनीं इंद्रद्युम्नेश्वर, मार्कण्डेयेश्वर, गृध्रेश्वर, बकेश्वर, कूर्मेश्वर, लोमेश्वर व उलूकेश्वर अशा नांवानीं लिंगें स्थापिल्यामुळें ह्याला सप्तलिंग म्हणतात. जे कोणी ह्या सप्तलिंगांचें पूजन करितात, ते सर्व बंधनापासून मुक्त होतात. राजेलोकांनीं अवश्य पूजन करावें.

## अध्याय २७२ वा.

### युगस्वरूपवर्णन.

आतां कालमान सांगतों; ऐका. चार निमेष म्हणजे त्रुटि, दोन त्रुटि म्हणजे लव, दोन लव म्हणजे यव, पंधरा यव म्हणजे काष्ठा, तीस काष्ठा म्हणजे

कला, तीस कला म्हणजे क्षण, साठ क्षण म्हणजे पल, साठ पल म्हणजे नाडिका (घटिका), दोन नाडिका म्हणजे मुहूर्त, तीस मुहूर्त म्हणजे अहोरात्र दिवस, तीस दिवस म्हणजे महिना, दोन महिने म्हणजे ऋतु, तीन ऋतु म्हणजे अयन, दोन अयन म्हणजें वर्ष; मनुष्याचें जें एक वर्ष तोच देवांचा अहोरात्र दिवस. उत्तरायण हा दिवस व दक्षिणायन ही देवांची रात्र. ह्याप्रमाणें सतरा लक्ष अठ्ठावीस हजार वर्षें कृतयुगमान होय. कृतयुगानंतर त्रेतायुग; ह्यामध्यें युगप्रमाण बारा लक्ष शहाण्णव हजार वर्षें आहेत. द्वापारयुगाचें प्रमाण आठ लक्ष चौसष्ट हजार वर्षें होय व कलियुगाचें प्रमाण चार लक्ष बत्तीस हजार वर्षें होय. कृतयुगांत सर्व लोक पुण्यकर्में करणारे, दीर्घायु व दुःखहीन असतात. बाप जिवंत असतां पुत्राचा मृत्यु होत नाहीं. षड्रिपूंची बाधा होत नाहीं. धर्माचें खरें स्वरूप दृष्टिगोचर होतें. आतां त्रेतायुगांत धर्म तीनचतुर्थांश व अधर्म एकचतुर्थांश असल्यामुळें कृतयुगाहून त्रेतायुग कमी अधिकाराचें मानिलें आहे. ह्या त्रेतायुगांत सर्वत्र यज्ञ सुरू होतील. लोक आपापसांत स्पर्धा करितील. वेदाध्ययन करणारे लोक असल्यामुळें सर्व लोक शापानुग्रहसमर्थ असे होतील. सर्व लोक आपापल्या धर्मानें वागतील. तिसरें द्वापारयुग. ह्या युगांत धर्माधर्माचें स्वरूप सारखेंच राहतें. ह्या युगांत षड्रिपूंची पीडा होते. सेवाधर्माचें महत्त्व विशेष राहील. चवथें कलियुग. ह्या युगांत एकचतुर्थांश धर्म व तीनचतुर्थांश अधर्म राहील. ज्याचे घरीं पुष्कळ द्रव्य आहे, व ज्याच्या घरीं सुंदर स्त्रिया आहेत त्या त्या मनुष्याबरोबर लोक मैत्री करितील. विधवा, संन्याशी व तपस्वी हे अधर्मानें वागून ऐहिक व पारलौकिक सुखाला मुकतील. पुष्कळ लोक अधर्मानें वागणारे होतील. मुलींचीं लग्नें उशिरानें करितील. लोक अल्पायु होतील. ब्राह्मण भक्ष्याभक्ष्याचा विचार करणार नाहींत. सर्व प्राणी मुसलमानांच्या धर्माचें अनुकरण करितील. अशातऱ्हेनें सर्वत्र अधर्म पसरल्यामुळें भगवान् विष्णु कल्किनांवानें अवतार घेऊन सर्व दुष्टांचा नाश करून पुनः पूर्ववत् धर्मस्थापना करील. ह्या नंतर पुनः कृतयुगाला प्रारंभ होईल.

---

## अध्याय २७३ वा.

### ब्रह्मायुर्मान.

कृतयुग, त्रेतायुग, द्वापरयुग व कलियुग हीं चार युगें मिळून एक महायुग होतें. ही हजार महायुगें झालीं कीं, ब्रह्मदेवाचा दिवस व तितक्यांच कालपर्यंत

रात्र समजावी. अशातऱ्हेनें तीनशें साठ दिवस झाले कीं, ब्रह्मदेवाचें एक वर्ष व अशीं त्याच्याच मानानें शंभर वर्षें ब्रह्मदेवाचें आयुष्य आहे. त्याच्या एका दिवसांत चौदा इंद्र व चौदा मनु होतात. हल्लीं सातवा इंद्र व सातवाच मनु सुरू आहे. मनूचें प्रमाण एकाहत्तर महायुगें आहे. सांप्रत जयन्त नांवाच इंद्र व वैवस्वत नांवाचा मनु सुरू आहे. ह्या मनूचें अठ्ठावीसावें महायुग सुरू आहे. त्या नंतर बलिराजा इंद्र होणार आहे. ब्रह्मदेवास हल्लीं नववें वर्ष सुरू झालें आहे.

## अध्याय २७४ वा.

### दुर्वासेश्वरमाहात्म्य.

एक निंबशुचि नांवाचा विद्वान् ब्राह्मण होता. तो अत्यंत कृपण होता; परंतु श्रीमान् होता. त्याची सेवा करून त्याच्याजवळ असलेल्या द्रव्याची चोरी करण्याच्या वाईट बुद्धीनें दुःशील नांवाचा एक ब्राह्मण शिष्यत्व पत्करण्याकरितां आला. दुःशीलानें गुरूला विश्वास दाखवून त्याच्याजवळचें द्रव्य संधी साधून लांबविलें. पुढें दुःशीलाची व दुर्वासाची गांठ पडल्यामुळें दुर्वासानें त्याला ज्ञानोपदेश केला. त्यायोगें दुःशीलाला कृतकर्मांचा पश्चात्ताप होऊन तो दुर्वासाला शरण जावून पापनिर्वृत्तीचा उपाय विचारूं लागला. दुर्वासानें दुर्वासेश्वराचें पूजन करण्यास सांगितल्यामुळें दुःशीलानें तसें करितांच तो मुक्त झाला.

## अध्याय २७५ वा.

### निम्बेश्वरमाहात्म्य.

दुःशील निष्पाप होताच आपला गुरु जो निम्बशुचि त्याजवळ जाऊन केलेल्या अपराधाची क्षमा मागूं लागला; व गुरूला घेऊन हाटकेश्वर क्षेत्रांत आला; आणि गुरूच्या नांवानें त्यानें निंबेश्वरनांवाचें एक शिवलिंग स्थापिलें. नंतर तेथें दुःशील व निम्बशुचि उभयतां निम्बेश्वरपूजनानें मुक्त झाले.

## अध्याय २७६ वा.

### अकरा रुद्रांचें माहात्म्य.

ह्या हाटकेश्वरक्षेत्रांत अकरा रुद्र वास करितात. शंकर हा मूळ एकच असून भक्तांकरितां अकरा स्वरूपें धारण करून राहिला आहे. अकरास्वरूपानें

अवतीर्ण झालेल्या रुद्राला पाहून देव, ऋषि वगैरे पुण्यवंत प्राणी त्यांची स्तुति करूं लागले. जे कोणी चैत्र शुक्ल चतुर्दशीला हाटकेश्वर क्षेत्रांत अवतीर्ण झालेल्या एकादश रुद्रांची पूजा करितात किंवा त्यांचें दर्शन घेतात ते निष्पाप होत्साते शिवलोकाला प्राप्त होतात. जे दरिद्री असतील ते ह्यांच्या पूजनानें श्रीमान् होतील. जे निपुत्रिक असतील ते पुत्रवंत होतील. जे रोगी असतील ते निरोगी होतील. जो जी इच्छा करील ती ह्यांच्या पूजनानें सफल होईल.

## अध्याय २७७ वा.

### अकरा रुद्रांचीं नांवें.

आतां पूर्वी जे अकरा रुद्र सांगितले, त्यांचीं नांवें सांगतों; ऐका. मृगव्याध, सर्वसंज्ञ, निंदित, महायश, अजैकपाद, अहिर्बुध्न्य, पिनाकी, परंतप, दहन, ईश्वर व कपाली असे हे अकरा रुद्र होत. ह्या अकरा रुद्रांचें यथाविधि पूजन करून त्यांस उद्देशून ब्राह्मणांना अनेकप्रकारचीं दानें द्यावीं. मृगव्याध नांवाच्या रुद्राला उद्देशून ब्राह्मणाला गुळाची गाय तयार करून द्यावी. कपाली नामक रुद्राला उद्देशून लोण्याची गाईची मूर्ति तयार करून द्यावी. अजैकपादाला उद्देशून तुपाची गाय, अहिर्बुध्न्याकरितां स्वर्णगाय, पिनाकीच्या तुष्टयर्थ मिठाची गाय. परंतपाला रसाची गाय, दहनाला अन्नाची गाय, ईश्वराला जलाची गाय. अशातऱ्हेनें प्रत्येक रुद्राला उद्देशून निरनिराळ्या वस्तूंची गाईची मूर्ति तयार करून ब्राह्मणांना द्यावी; म्हणजे दानकर्त्या पुरुषाला ऐहिक सार्वभौमप्रभृति राज्यसुख मिळून अंतीं शिवलोकहि प्राप्त होईल. जर एकाद्याला अशातऱ्हेनें अकरा धेनु ( गाई ) देणें अशक्य असेल तर त्यानें अकरा रुद्रांच्या प्रीत्यर्थ एक गाय ब्राह्मणास द्यावी. अशातऱ्हेनें हें गोदानमहात्म्य श्रवण करणारांसहि शिव प्रसन्न होऊन मुक्ति देतात.

## अध्याय २७८ वा.

### द्वादश सूर्यांचें माहात्म्य.

आतां बारा सूर्यांचें माहात्म्य सांगतों; ऐका. पूर्वी शुनःशेपाला कृति या नांवाचा एक पुत्र झाला. त्या कृतीच्या शुन नांवाच्या पुत्राला चारायण नांवाचा पुत्र झाला. त्या चारायणाच्या आश्रमांत सावित्रीनें कांहीं कारणामुळें ब्रह्मदेवाला शाप दिल्यामुळें तो ब्रह्मदेव अंशरूपानें याज्ञवल्क्यनांवानें अवतीर्ण

झाला. त्यानें तारुण्यावस्थेंत व्यभिचारादि दुष्कृत्यें करण्यास प्रारंभ केल्यामुळें चारायणानें त्यास आपल्या आश्रमांतून घालवून दिलें. तत्काळ तो हाटकेश्वर क्षेत्रांत येऊन शाकल्य ऋषीला शरण गेला शाकल्य ऋषीनें त्याला आपलें-जवळ शिष्यरूपानें ठेवून घेऊन त्यास एके दिवशीं शान्त्यादि कर्म करण्याक-रितां आनर्तदेशच्या राजाकडे पाठविलें. राजानें त्या शिष्याचा पराक्रम पाहून शाकल्याकडे येऊन ह्मटलें कीं, तुह्मा मजकडे पाठविलेला शिष्य पुनः पाठवून दे. नंतर शाकल्यानें याज्ञवल्क्यास राजाकडे जाण्याबद्दल सांगितलें असतांहि त्यानें तें नाकारिल्यामुळें त्या शाकल्याला राग आला व याज्ञवल्क्यास शाक-ल्यानें शाप दिला कीं, तूं ब्रह्मभ्रष्ट होशील. नंतर याज्ञवल्क्य शाकल्यावर रागा-वून जो निघाला तो सूर्याची आराधना करून पुनः ब्रह्मत्व संपादन करिता झाला; व सूर्याजवळ वेदशास्त्राध्ययन करून यश संपादन करिता झाला. नंतर याज्ञवल्क्य बारा सूर्यांची उपासना करून व सौरसूक्तादि मंत्रांचें पठण करून मुक्त झाला. येथें याज्ञवल्क्यानें सूर्याराधना करून द्वादशादित्यांची स्थापना झाली.

## अध्याय २७९ वा.

### फलश्रुति.

हें नागरखंड पूर्वीं कार्तिकस्वामीनें भृगुऋषीला सांगितलें. भृगूनें अंगिराला, अंगिरानें च्यवनाला व च्यवनानें ऋचीकाला सांगितलें. हें सर्व स्कंदपुराण स्कंदानें म्हणजे कार्तिकस्वामीनें सांगितलें म्हणून ह्या पुराणास स्कंदपुराण म्हणतात. जे कोणी हें स्कंदपुराण किंवा हें नागरखंड श्रवण किंवा पठण करितील, ते पापमुक्त होऊन शिवलोकीं जातील. हें पुराण श्रवण किंवा पठण करणारांस आयुष्य, कांति, सुख व मोक्ष ह्यांची प्राप्ति होते. ह्याच्या श्रवणानें अनंत पुण्य प्राप्त होतें. जे कोणी हा ग्रंथ ब्राह्मणाला दान देतील ते कल्प-पर्यंत स्वर्गलोकांत राहतील. जे पुत्रार्थी असतील ते पुत्रवंत होतील. जे द्रव्येच्छु असतील ते ह्याच्या पठनानें श्रीमान् होतील. जी कन्या सत्पतीची इच्छा करणारी असेल तिला सत्पति प्राप्त होईल. हें पुराण श्रवण करून पुराणिकाचा पूजनादि सत्कार केला असतां ब्रह्मा, विष्णु, व शंकर ह्यांची पूजा केल्याचें त्यास फळ मिळतें. ह्या पुराणाच्या नित्य पूजनानें अनंत जन्मींची पातकें नष्ट होऊन ते शिवलोकाला प्राप्त होतात.

॥ नागरखंड समाप्त ॥ ६ ॥